# प्रस्तावना

माझ्या ग्रंथप्रकाशनयोजनेंतील हा तिसरा ग्रंथ आज पूर्ण करून वाचकांच्या हातांत देताना मला आनंद वाटतो. महायुद्धामुळें सर्व मुद्रणसामग्रीची महागाई झाली असल्यामुळें अंगीकृत केलेलें कार्य पार पडेल कां नाहीं असें भय वाटत होतें. पण उशीरानें का होईना संकल्प केल्याप्रमाणें आज हा निबंध बाहेर पडत आहे.

हा ग्रंथ लिहिताना ज्या निरनिराळ्या ग्रंथकारांच्या लिखाणांचें मला साहय्य झालें त्या सर्वांबद्दल कृतज्ञता व्यक्त करणाची मी ही संधि घेतों. ज्ञानदेवांच्या ग्रंथांचा माझ्या बुद्धीप्रमाणें अभ्यास करून चिकित्सक दृष्टीनें हा निबंध मी लिहावयास घेतला. मी व्हिले पार्ले येथें १९२९ सालीं रहावयास आल्यावर कित्येक मित्रमंडळीबरोबर ज्ञानेश्वरी वाचण्याचा क्रम सुरू झाला व तो अद्यापही चालू आहे. वाचून विवरण करण्याचें काम मजकडे असतें; त्यामुळें या ग्रंथाच्या अभ्यासांत मला अतिशय साहाय्य झालें, तेव्हां आज हा ग्रंथ प्रसिद्ध करतांना या मित्रमंडळीचा नामनिर्देश न करतां आभार मानणें मला आवश्यक वाटतें.

या पुस्तकाचीं मुद्रितें वाचण्याच्या कामांत माझे मित्र रा. रा. सदाशिव रावजी खादेवाले यांचें फार साहाय्य झालें. अद्यापि बऱ्याच ठिकाणीं मुद्रणदोष राहिलेले आहेत हें मी जाणून आहे; त्या दोषांचा सर्वस्वी धनी मी आहें व वाचकांनीं त्याबद्दल दयार्द्र अंतःकरणानें क्षमा करावी. पण याहीपेक्षां अधिक मुद्रणदोष झाले नाहींत याबद्दल रा. खांदेवाले यांचें साहाय्यच कारणीभूत आहे.

पुस्तकाच्या छपाईचें काम राष्ट्रवैभव छापखान्याच्या मंडळींनीं फार तत्परतेनें केलें, व पुस्तक उत्तम प्रकारें छापून त्वरित बाहेर निघावें म्हणून शक्य ते प्रयत्न केले; त्याबद्दल त्या सर्वांचे मी आभार मानतों.

माझी भूमिका विद्यार्थ्यांची आहे. माझ्या लिहिण्यांत कांहीं माहितीच्या चुका झाल्या असतील तर त्या दुरुस्त करण्यास मी केव्हांही तयार आहे. ज्ञानदेवाचा अभ्यास करण्याची वाचकांना या ग्रंथाच्या वाचनानें बुद्धि झाली तर माझे श्रम सफल झाले असें मला वाटेल.

व्हिले पार्लें ( मुंबई २४ )
कार्तिक शुद्ध १, शके १८६२

माधव दामोदर अळतेकर

## प्रो. माधव दामोदर अळतेकर यांचे प्रसिद्ध झालेले ग्रंथ

*अपराध कोणाचा ? ( सामाजिक कादंबरी )

*ललिता ( सामाजिक कादंबरी )

*शांताराम ( सामाजिक कादंबरी )

मुक्तबंध ( सामाजिक कादंबरी )

गोपाळ गणेश आगरकर ( चरित्रात्मक निबंध )

*अंतरंग ( सामाजिक कादंबरी )

नवें मानसशास्त्र आणि नवी नीति.

कालिदासाची सृष्टि

पानें व फुलें, भाग १ व २

*हीं पुस्तकें स्वतंत्र ग्रंथरूपानें प्रसिद्ध व्हावयाचीं आहेत.

**सूचना**—प्रो. अळतेकरांच्या ग्रंथप्रकाशनयोजनेची माहिती त्यांना "व्हिलें पार्लें, मुंबई नं. २४" या पत्त्यावर पत्र लिहिलें असतां आनंदानें देण्यांत येईल.

# अनुक्रमणिका

## प्रो. माधव दामोदर अळतेकर यांचे प्रसिद्ध होणारे ग्रंथ

# प्रकाशनाची योजना

## आगाऊ ग्राहकांस विशेष सवलत.

यासंबंधीं पूर्वीं प्रसिद्ध केलेल्या माहितीपत्रकातील पृष्ठसंख्या आणि किंमती यांच्यांत, कागदाची व छपाईच्या इतर वस्तूंची किमत अतिशय वाढलेली असल्यामुळें, कांहीं फेरफार करावा लागलेला आहे. पण या प्रकाशनयोजनेचे पांच रुपये भरून आगाऊ ग्राहक होणाऱ्यांच्या बाबतींत वाढलेल्या किंमतीचा बोजा त्यांच्यावर पडूं नये असें ठरविलें आहे. म्हणजे पुढील सर्व पुस्तकें त्यांना वीस रुपयांतच मिळतील. मात्र टपालखर्च प्रत्येक पुस्तकाचा निराळा द्यावा लागेल.

पुढील ग्रंथ क्रमाक्रमानें प्रसिद्ध व्हावयाचे आहेत. क्रमात फेरबदल झाल्यास त्याची सूचना आगाऊ देण्यांत येईल.

**१ कालिदासाची सृष्टि**—कालिदासाच्या काव्यनाटकाचें अपूर्व विवेचन. ग्रंथकर्त्यानें अगदीं नवीन दृष्टीनें कालिदासीय वाङ्मयाचें आलोचन या विस्तृत निबंधांत केलेलें आहे. सुंदर कापडी बांधणीं. किंमत रुपये २।.

**२ पानें व फुलें**—भाग पहिला. ( निबंध ) किं. रु. १॥.
भाग दुसरा ( लघुकथा व कविता ) किं. रु. १॥

**३ श्रीज्ञानदेव**—चरित्रात्मक निबंध. ज्ञानेश्वरी व अमृतानुभव या ग्रंथांचें व ज्ञानदेवी वाङ्मयाचें निरनिराळ्या बाजूंनीं आधुनिक दृष्टीनें विवरण. ज्ञानदेव-चरित्राचें चिकित्सक पद्धतीनें विवेचन. सुंदर कापडी बांधणी. किं. रु. २॥।

आगाऊ ग्राहकांना हीं प्रसिद्ध झालेलीं आठ रुपये किंमतीचीं पुस्तकें अवघ्या पांच रुपयांत मिळतात. टपालखर्च निराळा.

**४ हिंदी अर्थशास्त्र**—या विषयावर अद्यावत् सांगोपांग माहितीनें भरलेला आणि अगदीं आधुनिक पद्धतीनें लिहिलेला ग्रंथ. किं. रु. ३॥

**५ मराठी वाङ्मयाचा संक्षिप्त इतिहास**. किं. रु. ३॥

६ **अपराध कोणाचा ?**—ग्रंथकर्त्याची पहिली कादंबरी. पूर्वी **उद्यान** मासिकांत क्रमशः प्रसिद्ध झालेली होती. हिचा विषय सामाजिक असून आकर्षक आहे. किं. रु. १॥

७ **मराठी साहित्यशास्त्र.** किं. रु. ३॥

८ **ललिता**—ही सामाजिक कादंबरी **नवयुग** मासिकांत क्रमशः प्रसिद्ध झालेली होती. कि. रु. २

९ **विपर्यास**—सामाजिक विषयावरील अगदीं आजच्या काळची नवीन पद्धतीनें लिहिलेली कादंबरी. किंमत रु. २

१० **कौंट मांटे क्रिस्टो**—या अद्भुतरम्य फ्रेंच कादंबरीचें सुरस भाषांतर दोन भाग. कि. प्रत्येकीं रु. ४

या सर्व पुस्तकाची किमत बत्तीस रुपये होते. हीं सर्व पुस्तकें घेण्याचें अभिवचन देऊन प्रारंभीं निदान पांच रुपये पाठविणारांस तीं वीस रुपयांस मिळतील. टपालखर्च मात्र निराळा द्यावा लागेल. पहिली तीन पुस्तकें ग्राहकांच्या हातांत पडल्यावर आणखीं निदान पांच रुपये मागण्यांत येतील.

या वर्गणीदारांना प्रो. अळतेकरांची **मुक्तबंध** ( कादंबरी ) व **नवें मानसशास्त्र आणि नवी नीति** हीं पुस्तकें पाऊणपट किमतीस मिळतील. टपालखर्च निराळा द्यावा लागेल.

योजनेसंबंधीं सर्व पत्रव्यवहार पुढील पत्त्यावर करावा.

**प्रो. माधव दामोदर अळतेकर**
विहले पार्ले ( मुंबई २४ )

# श्री ज्ञानदेव

## चरित्रात्मक निबंध

### भाग पहिला

#### विषयप्रवेश

जिहीं आत्मबोधाचिया आवडी ।
केली स्वर्गसंसाराची कुरोंडी ।
तेवांचूनी येथींची गोडी ।
नेणती आणीक ॥ ज्ञानेश्वरी ६–२८

महाराष्ट्राच्या कोनाकोपऱ्यांतून, जेथें जेथें मराठी भाषा बोलतात त्या त्या ठिकाणीं "निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाई एकनाथ नामदेव तुकाराम" हा जयजयकार वरचेवर ऐकूं येतो. यांतील पहिलीं चार नांवें तेराव्या शतकांत महाराष्ट्राला ललामभूत झालेल्या चार भावंडांचीं; त्यांत वडील भाऊ निवृत्तिनाथ; हा बाकीच्या तिघांना गुरुस्थानीं होता तेव्हां त्याचें नांव प्रथम येतें यांत नवल नाहीं. याच्या पाठचा ज्ञानदेव; मराठी वाङ्मयाच्या सृष्टींत अत्युच्च शिखरांनीं, अत्यंत उन्नत विचारांनीं, काव्यकल्पनांनीं, प्रतिभाशाली वचनांनीं, प्रभावशाली उपदेशांनीं ज्याचे ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव हे ग्रंथ आज साडेसहाशें वर्षें नगाधिराज हिमालयाची बरोबरी करतात; ज्यानें

माझा मराठाची बोल कौतुकें । परी अमृतातेंही पैजा जिंके ।
ऐसीं अक्षरे रसिकें । मेळवीन ॥ ज्ञानेश्वरी, ६–१४

अशी कौतुकानें प्रतिज्ञा करून ती शेवटास नेली आणि कालीदास व जगन्नाथ पंडित अशासारख्या संस्कृत कवीश्वरांच्या यशाची जोड मराठीला

आणून दिली; ज्यानें केवळ कवित्व आणि भाषाशैली यांतच अपूर्व यश मिळविलें असें नाहीं तर अत्यंत दुर्गम अशा वस्तूचें विवेचन यथार्थपणें करून ज्यानें आपल्या आश्चर्यकारक वाणीच्या सामर्थ्यानें

> तेणेंकारणें मी बोलेन । बोली अरूपाचें रूप दावीन ।
> अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियांकरवीं ॥ ज्ञानेश्वरी ६-३६

हाही चमत्कार करून दाखविला तो आपल्या वडील भावाचा, निवृत्तीचा शिष्य. आमच्या मराठी वाङ्मयाला या थोर कवीनें, या श्रेष्ठ तत्वज्ञानें, या वैराग्यशील महात्म्यानें जगांतील उत्तमोत्तम वाङ्मयांच्या जोडीला आणून बसविलें. त्याचेंच कार्य पुढें नामदेव, एकनाथ, तुकाराम यांनीं चालविलें. त्या ज्ञानदेवाच्या चरित्राचा व कार्याचा परिचय करून घेण्यासाठीं या निबंधाचा खटाटोप आरंभिला आहे. ज्ञानदेवांचें चरित्र आणि त्यांची ग्रंथरचना यांतील स्वारस्य उत्तम प्रकारें प्रतीत होण्याला जी मनोवृत्ति पाहिजे तिचें वर्णन या भागाच्या सुरवातीला जें अवतरण दिलें आहे त्यांत फार थोडक्यांत पण परिपूर्णतेनें केलेलें आहे. ज्यांनीं स्वर्ग आणि संसार यांची कुरोंडी केली, यांना सर्वस्वीं टाकून दिलें आणि आत्मबोधाची, आत्मज्ञानाची प्राप्ति करून घेण्यासाठीं सर्वस्व खरचिलें त्यांनाच, निदान त्यांच्या मनःस्थितीशीं साम्य पावण्याइतकें कल्पनाभाग्य ज्यांजवळ आहे त्यांनाच, या विषयाची गोडी समजेल. ज्ञानदेवाचें चरित्र हें एका असामान्य पुरुषाचें चरित्र आहे. त्यांतील सर्व चमत्कार वर्ज करूनसुद्धां तें चरित्र असामान्य पुरुषाचें आहे. " अनामिका सार्थवती बभूव " हा न्याय जसा कालीदासाला लागू पडतो तसाच तो ज्ञानदेवालाही लागू पडतो. कवि आणि तत्वज्ञ, संत आणि शिक्षक या चारी नात्यांनीं ज्ञानदेवाचें स्थान फार थोर आहे; आणि भाविकांना चकित करून सोडणाऱ्या चमत्कारांपेक्षांही फार आश्चर्यकारक चमत्कार त्याच्या चरित्रांत आणि ग्रंथांत आहेत.

वारकरी मंडळींत तर ज्ञानेश्वरीला " आई " म्हणतात आणि पंढरीच्या वाळवटांत आषाढी कार्तिकी एकादशीच्या वेळीं चंद्रभागेच्या पुरापेक्षांही भक्तीच्या भावनेला पूर येतो त्यावेळीं ज्या प्रेमानें विठ्ठलाचा नामोच्चार होतो त्याच प्रेमानें ज्ञानदेवाचा नामोच्चार होतो. पण एका विशिष्ट पंथांतच ज्ञानदेव आणि त्यांचे ग्रंथ यांबद्दल प्रेम आहे असें मात्र नाहीं. ज्ञानेश्वरांची "एक तरी ओवी"

ज्यानें अनुभविली आहे अशा प्रत्येकाला, मग तो वारकरीच असेल असें नाहीं, ज्ञानदेव ही महान् विभूति आहे हें पटलेलें आहे. आधुनिक पंडितांत अग्रेसर असा महादेव गोविंद रानड्यासारखा विद्वन्मुकुटमणि ज्ञानेश्वरीला जीव कीं प्राण समजत असे. ज्ञानदेवांना प्रणाम करणाऱ्यांत अंधभक्तीनें प्रेरित झालेले लोक असतील, पण ज्ञानदेवाच्या भक्तमंडळांत डोळसांचा, ज्ञानदेवकालीन भाषेंत सांगावयाचें म्हणजे "देखण्यांचा" भरणाही फार मोठा आहे. ज्याप्रमाणें शिवाजी महाराजांनीं महाराष्ट्र आणि मराठे यांना राजकारणांत मान्य स्थानीं आणून बसविलें त्याप्रमाणें त्यांच्यापूर्वीं साडेतीनशें चारशें वर्षें ज्ञानदेवांनीं मराठी भाषेला उत्तम वाङ्मयाच्या सभेंत उत्तम स्थान मिळवून दिले. मराठी परंपरा म्हणून जी कांहीं आहे तिचा पाया ज्ञानदेवांनीं घातला. ज्या अभिमानानें इंग्रज शेक्सपीयरचा महिमा गातात त्याच अभिमानानें मराठ्यांनीं ज्ञानदेवांची थोरवी वर्णन करावी हें योग्य आहे. पण ज्ञानदेव नुसते उत्कृष्ट कवि नव्हते; ते तत्वदर्शी होते. आणि त्याहूनही अधिक म्हणजे समदर्शी, स्थितप्रज्ञ, योगी आणि ज्ञानी होते. कवित्व हा त्यांच्या अलोट दैवी संपत्तीचा एक भाग होता; किंबहुना आपल्या कवित्वाच्या बळानें त्यांनीं तत्त्व आणि ज्ञान, विवेक आणि वैराग्य, दया आणि आनंद हीं सर्व लोकांना सुलभपणें शिकविलीं.

ज्ञानदेवासारख्या थोर पुरुषाचें चरित्र भक्तीनें, प्रेमानें, आस्थेनें अवलोकन केलें पाहिजे यांत शंका नाहीं; पण तसें करतांना अंधश्रद्धेनें आपण भारून गेलें पाहिजे असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. ज्याप्रमाणें भगवद्गीतेंत त्याप्रमाणें ज्ञानेश्वरींत आणि ज्ञानदेवांच्या सर्व चरित्रांत सर्वत्र विवेकाचें, सदसद्विचारपूर्वक तत्त्वनिर्णयाचे साम्राज्य आहे. श्रीकृष्णांनीं अठरा अध्यायी गीतेचे निरूपण करून, अर्जुनाच्या सर्व शंकांचें समाधान करून, त्याला ज्ञान शिकविलें, कर्तव्याचा बोध दिला. श्रीकृष्णासारखा तत्त्वज्ञ आणि अर्जुनाचा हितकर्ता मित्र पण त्यानें सुद्धां " मी सांगतों म्हणून ऐक " असा जुलुम केला नाहीं तर " यथेच्छसि तथा कुरु " म्हणून अर्जुनास सांगितलें आणि ज्ञान हें विवेकानेंच, विवेकयुक्त वैराग्यानें, निष्काम कर्माचरणानें प्राप्त होतें म्हणून खात्री पटविली. त्या भगवद्गीतेंत व तिच्यावर आधारलेल्या ज्ञानेश्वरींत अंधश्रद्धेचें प्राबल्य किंबहुना अस्तित्वही असण्याचा संभव नाहीं हें कोणाही

विचारी माणसास पटण्यासारखें आहे. चिकित्साबुद्धीच्या पूर्ण अवलोकनानंतरही ज्ञानदेवाचें कार्य असामान्य व अत्यंत कल्याणकारक ठरतें. आज सहाशें सातशें वर्षांत महाराष्ट्रांत चाललेला ज्ञानदेवाचा जयजयकार न्याय्य आहे यांत शंका नाहीं व ज्ञानदेवाच्या ग्रंथांची ज्या ज्या परकीयांना ओळख झालेली आहे तेही आनंदाने त्याचा तसाच जयजयकार करतात हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. ज्ञानदेवाचे ग्रंथ हे मराठी वाङ्मयाचेंच काय पण विश्ववाङ्मयाचें अमोल असें धन आहे आणि आमचा महाराष्ट्र एका प्रकारच्या अर्थसंपदेंत दरिद्री असला तरी या अत्युच्च अर्थसंपदेंत, शब्दार्थसंपदेंत, त्यानें कोणापुढेंही मान खालीं घालण्याची आवश्यकता नाहीं असें भाग्य ज्यांनीं निर्माण केलें त्यांत ज्ञानदेव सिंहासनाधीश्वर आहेत.

२ ज्ञानदेवांच्या काळीं मुसलमानांचा शिरकाव दक्षिणेंत झालेला नव्हता. वेरूळला त्या काळीं हिंदू राजा राज्य करीत होता. म्हणजे ज्ञानेश्वरीची रचना स्वराज्यांत झालेली होती. महाराष्ट्रावर पुढें लौकरच कोसळणारें परकीय अंमलाचें व धर्मछळाचें संकट तेव्हां कोणाच्या होऱ्यांतही नव्हतें. त्यावेळीं सध्यांप्रमाणें प्रवासाच्या सोई नव्हत्या; तीर्थयात्रेखेरीज दुसऱ्या निमित्तानें आपले लोक बाहेर सहसा जात नसत; व तीर्थयात्रेला गेलेल्या लोकांतील बरेचसे परत येत नसत. शिवाय उत्तर हिंदुस्थानांत त्यावेळीं नुकताच कोठें कोठें सुरू झालेला यवनी अंमल राजधानीच्या किंवा तशासारख्या मोठ्या शहरांत जसा जाणवे तसा खेड्यापाड्यांतून जाणवत नव्हता. या आणि अशा अनेक कारणांमुळें तेराव्या शतकांत महाराष्ट्रांत मुसलमानी अंमलाचा वाससुद्धां कोणाला आला नसल्यास त्यांत नवल नाहीं. सध्यां मोंगलाईत दौलताबाद किल्ला आहे. हा औरंगाबादेहून वेरूळला जातांना वाटेंत लागतो. याच ठिकाणाला पूर्वी देवगिरी म्हणत व येथें जाधव किंवा यादव या घराण्यांतील राजे राज्य करीत. या राज्याचा मूळ पुरुष भिल्लम यानें शके ११०९ पासून १११४ पर्यंत देवगिरीला राज्यवैभव भोगिलें. भिल्लमपासून पांचवा पुरुष रामदेवराव यानें शके ११९३ ते १२३१ पर्यंत म्हणजे इसवी सन १२७१ पासून ते १३०९ पर्यंत म्हणजे सुमारें ३८ वर्षें देवगिरीला राज्य केलें. रामदेवरावाचा आजा सिंघण याचीही कारकीर्द ३७ वर्षांची झाली होती. या रामदेवरावाच्या राज्यांत ज्ञानदेव जन्माला आले

व त्याच्याच राजवटींत त्यांनीं ग्रंथरचना केली आणि समाधि घेतली. कालगणनेनें मुकुंदराजांचा समजतात तो काळ देवगिरीचा पहिला राजा भिल्लम याच्या सुमारास येतो. म्हणजे यादव किंवा जाधव राजांच्या कारकीर्दींत मराठी वाङ्मयानें फार पुढें पाऊल टाकलें. ज्ञानेश्वरीमध्यें रामदेवरावाचा मोठा गौरवपर उल्लेख आहे.

> तेथ यदुवंशविलासु । जो सकळकळानिवासु ।
> न्यायातें पोषी क्षितीशु । श्रीरामचंद्र ॥ १८–१८०५

ज्ञानदेवासारख्या निस्पृह ज्ञानी पुरुषानें या राजाचा असा गौरवपर उल्लेख करावा यावरून रामदेवराव हा चांगला राजा होऊन गेला हें उघड होतें. तो सकळकळानिवास होता आणि न्यायानें वागणारा होता. त्याच्या राज्यांत याप्रमाणें न्यायामुळें समाधान व विद्याकलांचें कौतुक होतें यामुळें ज्ञानदेवासारख्या तत्त्वज्ञाला ज्ञानेश्वरीसारखें "देशीकार लेणें" निर्माण करतां आलें. विवेकसिंधु, ज्ञानेश्वरी, अमृतानुभव यांसारखे ग्रंथ ज्यांच्या राज्यांत निर्माण झाले त्या यादव किंवा जाधव घराण्याचें, देवगिरीच्या राजांचें, महाराष्ट्रानें कृतज्ञतापूर्वक स्मरण ठेवलें पाहिजे यांत शंका नाहीं. दुर्दैवानें रामदेवरायाच्यानंतर थोड्याच वर्षांनीं महाराष्ट्र स्वराज्यसुखाला निदान तत्त्वतः मुकला. तत्त्वत: म्हणण्याचें कारण इतकेंच कीं उत्तर हिंदुस्थानावर यवनांचा अंमल जसा बसला तसा महाराष्ट्रावर कधींच बसला नाहीं. शिवाजीचे वडील शाहाजीराजे हे जवळ जवळ महाराष्ट्राचे राजेच होते; फक्त ते विजापुरानें नेमलेले राजे होते. परकी सत्तेची प्रत्यक्ष तीव्र आंच महाराष्ट्राला तशी फारशी कधीं लागली नाहीं असें म्हणण्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. ज्ञानेश्वरीचा म्हणजे ज्ञानदेवाचा काळ हा महाराष्ट्राच्या स्वराज्याच्या काळ होता. स्वराज्याच्या वातावरणांत महाराष्ट्रांत ज्ञानदेवांचे अपूर्व ग्रंथ निर्माण झाले व मराठी वाङ्मयाचा पाया उत्कृष्टपणें बसला.

रामदेवरावाच्या कारकीर्दींत महाराष्ट्र–स्वराज्य पूर्ण तेजानें तळपत होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. विद्यांना आणि कलांना त्यावेळीं मोठा भर आलेला होता. रामदेवरावाचा बाप व चुलता या दोघांच्या कारकीर्दींतही वाङ्मयाला फार चलती होती. महानुभावी वाङ्मयाचा ज्ञानदेवाच्यापूर्वीं कांहीं वर्षें उदय

झाला होता. अशा प्रकारें जाधव घराण्याच्या या उत्तरार्धांत महाराष्ट्रांत वाङ्मयाचें पाऊल पुढें सरकलें. हेमाद्रि हा प्रख्यात राजकार्यकुशल पुरुष याच राजवटींत झाला. हेमाद्रि म्हणजे हेमाडपंत; याचें नांव अद्यापि महाराष्ट्रांत गाजत आहे. हेमाद्रि हा उत्तम विद्वान् ही होता. तेव्हां हा काळच उत्तम वाङ्मयाच्या निर्मितीला अनुकूल होता असें दिसतें. लोक सुखी होते. रामदेवरावाच्या सत्तेचा वचक सर्वत्र होता. ही त्या काळची प्रसन्नता ज्ञानेश्वरीच्या वर्णनप्रकारांतही दृग्गोचर होते. अर्थात् त्या प्रसन्नतेचें मुख्य कारण स्वतः ज्ञानदेवाची प्रसन्न मनोवृत्ति हेंच होय. तथापि तो काळही तशा मनोवृत्तीला अनुकूल होता असें म्हटलें तर चुकणार नाहीं. आपल्या देशांत स्वराज्य असणें, आपल्या राजसत्तेचा सर्वत्र वचक असणें, जगाच्या संसारांत आपल्या लोकांना मान्यता असणें या गोष्टीही मनाच्या प्रसन्नतेला साहाय्यकारक होतात. या वेळची समाजस्थिति साधारणपणानें इंग्रजशाहीचा हिंदुस्थानांत उदय होण्यापूर्वी जशी होती तशीच होती. या समाजस्थितींत महाराष्ट्रांत इंग्रज येण्यापर्यंत फारसे फेरफार झाले असावेत असे दिसत नाहीं. जातिभेदाचा अंमल सर्वत्र होता. स्त्रिया व शूद्र यांचा विद्येशीं फारसा संबंध नव्हता. क्षत्रिय राजे म्हणून आणि ब्राह्मण विद्येचे अधिकारी म्हणून त्यांचें समाजांत प्राबल्य विशेष होतें. हा सर्व प्रकार ज्ञानदेवाच्या काळापूर्वीं कित्येक शतकें चालू होता व पुढें मुसलमानी सत्तेचे आघात महाराष्ट्रावर झाले तरी ती सत्ता कधींही बद्धमूल न झाल्याकारणानें तिचे परिणाम उत्तर हिंदुस्थानांत जसे झाले तसे आपल्या प्रांतांत बहुतेक झाले नाहींत. ब्राम्हणाब्राम्हणांत जे तीव्र भेद पेशवाईच्या काळीं उपस्थित झालेले दिसतात ते मात्र यावेळीं दिसत नाहींत. अमुक शाखेचा ब्राम्हण श्रेष्ठ व अमुक शाखेचा कनिष्ठ ही दृष्टि त्या वेळच्या व त्यानंतरच्या तीन शतकांत झालेल्या वाङ्मयांत दिसत नाहीं. या काळच्या मराठी वाङ्मयाला गोदावरीतीरावरचें वाङ्मय असेंही म्हणतां येईल. किंबहुना मराठी वाङ्मयाची सुरवात व पहिली वाढ गोदातीरीं झाली असें म्हणण्यांत अतिशयोक्ति होण्याचा संभव नाहीं. या वेळेला हिंदुस्थानभर कृष्णभक्ति प्रामुख्यानें पसरत चालली होती. महानुभाव हा पंथ मुख्यत्वेंकरून कृष्णभक्तीचा पंथ आहे. पंढरपूरचा विठ्ठल म्हणजेही विष्णूचा अवतार म्हणजे कृष्णाचा अवतार. तेव्हां याप्रमाणें वैष्णव धर्माचें—वैष्णव पंथाचें प्राबल्य यावेळीं सर्वत्र पसरत होतें व महाराष्ट्र अर्थात्

त्यापासून अलिप्त नव्हता. भक्तिमार्ग हा या पंथाचा विशेष होता. पंढरपूरच्या वैष्णवांनीं, वारकऱ्यांनीं, ज्ञानदेवांना आपले परात्पर गुरु म्हणून मान्य केलें व ज्ञानेश्वरीला ते " आई " समजतात. पण ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव या अमृततुल्य ग्रंथांचे कर्ते ज्ञानदेव हे खरेखुरे अद्वैतपंथी होते. विष्णु आणि शिव हा भेद ज्ञानदेवाच्या वृत्तींत नव्हता. ते स्वतः उत्कृष्ट योगमार्गी होते हें ज्ञानेश्वरी अध्याय सहावरून स्पष्ट होतेंच. त्याचप्रमाणें श्रीकृष्णाचें विषयानुरोधानें ज्ञानेश्वरींत प्रेमळ वर्णन करणारे ज्ञानदेव अमृतानुभवांत शंकराचे माहात्म्य सांगतात कसल्याही भेदापासून ज्ञानदेव अलिप्त होते. त्याचा सुपरिणाम महाराष्ट्र वाङ्मयावर व लोकांच्या वृत्तीवर झाला. त्याचें विवेचन यथास्थळ होईल. सध्यां लक्ष्यांत ठेवावयाचें तें इतकेंच कीं जाधवांच्या राजवटींत कृष्णभक्तीचें म्हणजे भक्तीचें माहात्म्य विशेष वाढून योगमार्ग मागें पडला होता. पण स्वतः ज्ञानदेव हे योगमार्गाचे अनुयायी होते. भक्तिमार्ग आणि योगमार्ग यांचें तुलनात्मक वर्णन करतांना ज्ञानदेवांनीं योगमार्गाला कमीपणा केव्हांही दिलेला नाहीं. तो मार्ग बिकट आहे याचा उल्लेख गीतेंत आहे व भावार्थदीपिकेच्या कर्त्यानें त्या कठिणपणाची कल्पना आपल्या वाचकांना आणून दिलेली आहे. परंतु भक्तिमार्ग म्हणजे कांहीं तांत्रिक किंवा बाह्य देखाव्याचा मार्ग आहे ही गोष्ट ज्ञानदेवांना पूर्णपणें अमान्य असून " न कळतां पद अग्निवरी पडे " तरी अग्नि दाह करतो या न्यायानें चुकून देवाचें नांव तोंडांत आलें तरी मोक्ष मिळतो या कल्पनेला त्यांची बिलकुल संमति नाहीं हें मरणकाळीं देवाचें स्मरण व्हावें याची चर्चा करतांना त्यांनीं स्पष्ट केलें आहे. अंधभक्तीला ज्ञानदेव मुळींच मान्यता देत नाहींत व हा त्यांचा मार्ग पुढें एकनाथ, तुकाराम इत्यादिकांनींच काय पण रामजोशी, अनंतफंदी यांनींही बिनचूक चोखाळलेला आहे हें मराठी वाङ्मयाच्या प्रेमळ वाचकांना विशेष स्पष्ट करून सांगण्याची आवश्यकता नाहीं.

परी वाचा मनें देहें । जैसा व्यापारु होये ।
तो मी करितु आहें । ऐसें न म्हणे ॥ १२–१७
आणि जेणे जेणे वेळे । घडती कर्में सकळें ।
तयांचीं तियें फळें । त्यजित जाये ॥ १२–२८

हें भक्तियोगाचें रहस्य आहे व तेराव्या अध्यायांत ज्ञानी पुरुषांचीं लक्षणें सांगतांना ढोंगीपणावर जे तडाखे ज्ञानदेवांनीं उडविलेले आहेत त्यावरून बाह्य देखावा आणि अज्ञान यांना ते थारा देत नाहींत हें स्पष्ट होतें. हीच गोष्ट अठराव्या शतकाच्या शेवटीं लावणीकार रामजोशांनीं

हीं काय गळयांत घालुनी तुळशीडीं लांकडें।
हीं काय भवाला दूर करितील माकडें।

या स्पष्ट शब्दांनीं गांवगन्ना लोकांना आपल्या शाहिरी वाणीनें जाहीर केली.

३ ज्ञानदेवकालीन महाराष्ट्रांत महाराष्ट्राच्या व मराठ्यांच्या परंपरेचा, विशिष्टतेचा पाया घट्टपणें बसला व महाराष्ट्रीयांच्या स्वभावांत जें उत्तम म्हणून आहे त्याची घटना याच काळांत झाली; आणि तोच काळ, स्वराज्याचा व स्वातंत्र्याचा, स्वाभिमानाचा आणि आनंदाचा असा असल्यामुळें या रचनेला फार अनुकूल होता. या काळांतील ज्ञानदेव हे शेवटचे म्हणण्यास हरकत नाहीं; तथापि त्यांचेंच नांव या काळाला देणें उचित दिसतें. मुकुंदराज हे ज्ञानदेवाच्या पूर्वीं सुमारें शंभर वर्षें झाले असें समजतात. त्यांच्या विवेकसिंधु या ग्रंथांत गुरुशिष्यलक्षणांचीं प्रथमच फोड केलेली आहे. त्यांवरून ढोंगाबद्दल तिरस्कार आणि सज्ञान भक्तीबद्दल कौतुक, अंधश्रद्धेचा त्याग आणि उत्तम आचरणाबद्दल आदर ही मराठ्यांच्या तत्त्वज्ञानाचीं मूलतत्त्वेंच ठरून गेलेलीं होतीं असें स्पष्ट होतें. कृष्णभक्तीला कित्येक प्रांतांत कित्येक कृष्णभक्तांनीं जे शोचनीय स्वरूप दिलें आणि तत्त्वज्ञानाचीं मूलतत्त्वें न समजल्यामुळें म्हणा किंवा दुसऱ्या कांहीं कारणामुळें म्हणा अज्ञ व भोळ्या लोकांना ज्या भलभलत्या गोष्टी शिकविल्या व करावयास लावल्या त्यांचा संपर्कही मुकुंदराज ज्ञानदेवापासून तो एकनाथ तुकारामापर्यंत महाराष्ट्राच्या वाङ्मयांत दिसत नाहीं ही गोष्ट जितकी विस्मयाची तितकीच अभिमानाची आहे. फार तर काय, शृंगार रसांत ज्यांची कविता अहोरात्र डुंबली त्या "जोशीबुवां"ना देखील हीं मूलतत्त्वें पूर्ण अवगत होतीं व त्या रसाचा आविष्कार करण्यासाठीं डफावर हात मारतांनासुद्धां त्या हाताचा तडाखा ढोंगी लोकांच्या थोबाडांना चांगलाच जाणवत असे ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. असें होतें म्हणूनच मोरोपंतासारखा सच्छील भक्त व कवि आणि रामजोशी यांची उत्कृष्ट मैत्री जमून जोशीबुवांनीं तमाशा सोडला व कीर्तनाला सुरवात केली.

ही जी महाराष्ट्राची परंपरा तिलाच महादेव गोविंद रानडे यांनीं भागवत धर्म असें नांव व पुढें विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं महाराष्ट्र धर्म असें नांव दिलेलें आढळतें. या दोन शब्दांच्या अर्थात दोघांच्याही मतें भिन्नता आहे. राजवाडे हे महाराष्ट्र धर्माचे प्रतिपादक व अध्वर्यु फक्त रामदासांना समजतात तर रानडे सर्व संतकवींच्या परंपरेला भागवतधर्म हे नांव देतात. संतकवींतून रामदासांना वेगळे काढण्यांत व त्यांचा सवतासुभा निर्माण करून ज्ञानदेवादिकांना पंगु म्हणण्यांत राजवाड्यांचा व तत्सम विचार असणाऱ्यांचा मोठाच प्रमाद झालेला आहे याबद्दल या ग्रंथाच्या विवेचनांत यथास्थळ स्पष्टीकरण होईल; पण रामदासांची विचारपरंपरा म्हणजे जिला महाराष्ट्रधर्म हें नवें नांव देण्याची कित्येकांची इच्छा आहे ही प्राचीन कवींचीच चालत आलेली विचारपरंपरा होती, व ज्या कित्येक गोष्टी रामदासी ग्रंथांत तिच्याहून निराळ्या आहेत अशी समजूत करून घेण्याची कित्येकांची फार प्रबळ इच्छा आहे त्या गोष्टी दुय्यम स्वरूपाच्या व एकदोन ठिकाणीं चिंतनीय आहेत म्हणजे त्रिकालाबाधित सत्य दर्शविणाऱ्या नसून प्रासंगिक व विशिष्ट अपवादभूत परिस्थितींत कसें वागावें यासंबंधीं स्थूल नियम सांगणाऱ्या आहेत हें विसरून चालणार नाहीं; त्यामुळें मूळ परंपरेला बाधा येत नाहीं. महाराष्ट्राच्या विशिष्ट परंपरेला मुकुंदराज--ज्ञानदेव यांच्या कालापासून व वाङ्मयापासून सुरवात झाली व त्या परंपरेला महाराष्ट्र धर्म हें नांव देणें अधिक सयुक्तिक होईल; मात्र हा शब्द राजवाडेप्रभृति मंडळीच्या संकुचित अर्थानें योजावयाचा नाहीं येवढें लक्षांत ठेवलें म्हणजे झालें. हिंदुस्थानच्या इतर भागांत भागवत धर्माचा अर्थ सगुणोपासक भक्तिपंथ असा आहे व तो अर्थ संपूर्णपणें आमच्या आद्य संत कवींनीं मान्य केलेला नाहीं म्हणूनही भागवत धर्म या शब्दापेक्षां महाराष्ट्र धर्म हा शब्दच अधिक ग्राह्य मानावा असें वाटतें.

या महाराष्ट्र धर्माचा पाया मुकुंदराज--ज्ञानदेवांनीं घातला. महानुभावीयांची परंपरा महाराष्ट्रधर्माचा विचार न करतां इतरत्र लोकप्रिय झालेल्या भागवतधर्मावर उभारलेली होती ही गोष्ट या ठिकाणीं लक्षांत ठेवण्यासारखी आहे. मानभावी पंथ महाराष्ट्रांत एकंदरींत अप्रिय कां झाला याचीं बरींच कारणें भावे, पांगारकर इत्यादि ग्रंथकारांनीं दिलेलीं आहेत व तीं सर्व विचारार्ह आहेत. पण

ज्या विशिष्ट आणि महत्वाच्या बाबतींत महाराष्ट्र धर्म तत्कालीन भागवत धर्माहून भिन्न आहे त्या बाबतींत, म्हणजे भक्तिमार्गाचें पर्यवसान शृंगारांत, अद्वैताचा त्याग करून श्रीकृष्णाला एकमेव परमेश्वर मानण्यांत आणि भक्तांनीं वाटेल तसे वागण्यांत पुष्कळ ठिकाणीं झालेलें होतें (त्या पर्यवसानाचे स्वरूप अद्यापि हिंदुस्थानांत कोठेंकोठें दिसतें, व जेथें बुवाशाहीचा गंध येतो त्या त्या ठिकाणीं महाराष्ट्रांतही दिसतें) त्या बाबतींत महानुभावी किंवा मानभावी पंथ हा महाराष्ट्र धर्माच्या जवळ नसून "भागवत धर्मा"च्या जवळ होता ही गोष्ट विशेषेंकरून त्यासंबंधीं अनादर व अप्रियता उत्पन्न होण्याला कारणीभूत झाली असावें असें स्पष्ट दिसतें. मुकुंदराज काय किंवा ज्ञानदेव काय किंवा त्यांच्यामागून आलेले मराठी कवि काय (यांतून वामनपंडित हे एकच महत्वाचा अपवाद म्हणून वगळावयाचें) हें कृष्ण आणि राम, विष्णु आणि शंकर या नांवासाठीं भांडणारे नव्हते. देवांच्या बाबतींतही ते समदर्शी होते आणि अद्वैत तत्त्वज्ञानाचा तो साहजिक परिणाम होता. त्या समदर्शित्वाचा भलताच अर्थ करून त्यांना सगुणोपासक बनविण्याचा कित्येकांनीं अट्टाहास केला आहे तो व्यर्थ आहे. मुकुंदराज ज्ञानदेवांनीं सर्व देवदेवतांना–साकार सगुण विष्णुकृष्ण-प्रभृति देवदेवतांना–मायाकार्यांत मोजले आहे, आणि अठराव्या शतकाच्या शेवटचे लावणीकार रामजोशी यांनींही "द्वैताला अनुसरूं नको" असा स्पष्ट इशारा सामान्य जनतेलाही दिलेला प्रसिद्ध आहे.

४ ज्ञानदेवानें आपला ग्रंथ मराठींत लिहून आबालवृद्धांची आणि स्त्री-शूद्रादिकांची अत्यंत उत्कृष्ट व श्रेष्ठ अशा ज्ञानाशीं गांठ घालून दिली. त्यासंबंधीं कांहीं उल्लेख सुरवातीसच माहीत असणें योग्य होईल. ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायांतील एक ओवी अगदीं प्रारंभीच्या परिच्छेदांत दिलेली आहे. लोकांना, सामान्य लोकांना अगदीं सोपें होईल अशा तऱ्हेनें ज्ञानाचें विवेचन करावें, ज्ञान सर्वांना सुलभ व्हावें, ज्ञानाचा "हक्क" सर्वांना आहे, हें ज्ञानदेवांचें स्पष्ट मत होतें आणि त्यांनीं आपली ग्रंथरचना त्या मताला अगदीं अनुसरून केली. तिसऱ्या अध्यायाच्या सुरवातीच्या कांहीं ओव्या पहाः—

तरी झकवितु आहांसी मातें । की तत्त्वचि कथिलें ध्वनितें ।
हें अवगमितां निरुतें । जाणवेना ॥ १६ ॥

म्हणूनि आइकें देवा । हा भावार्थु आतां न बोलावा ।
मज विवेकु सांगावा । मऱ्हाठा जी ॥ १७ ॥
मी अत्यंत जड असे । परी ऐसाही निकें परियेसे ।
श्रीकृष्णा बोलावे तुवां ऐसे । एकनिष्ठ ॥ १८ ॥
देखें रोगातें जिणावें । औषध तरी देयावें ।
परी तें अतिरुच्य व्हावें । मधुर जैसें ॥ १९ ॥
तैसें सकलार्थभरित । तत्त्व सांगावे उचित ।
परी बोधे माझें चित्त । जयापरी ॥ २० ॥

अशा प्रकारें "मऱ्हाठा" विवेक अत्यंत "जड" अशा माणसालाही कळेल अशा प्रकारें सांगण्याचा ज्ञानदेवांचा संकल्प होता आणि जरी त्यांनीं आपल्या ग्रंथाला "भावार्थदीपिका" हे विनयशील नांव दिलें आहे तरी तो विवेक "सकलार्थभरित" असून "एकनिष्ठ," निश्चित तत्व सांगणारा असावा असा त्यांचा कटाक्ष होता हें सहज लक्ष्यांत येतें. एकनिष्ठ असा सकलार्थ सांगणें ही गोष्ट फार महत्त्वाची आहे. तर्काची कसरत करून सामान्य लोकांना चकित करतां येतें पण शहाणे करतां येत नाहीं हें तत्त्व ज्ञानदेव पूर्णपणें जाणून होते.

आपला विषय विवेकाचा, वैराग्याचा, कर्तव्यज्ञानाचा, म्हणून शांत रसाचा असूनही त्याचें वर्णन आपण असें कांहीं काव्यमय करूं आणि तेंही मराठींत कीं रसिक वाचकांना आनंदाचें भरतें यावें असा ज्ञानदेवांचा प्रयत्न होता व तो सिद्धीस नेण्याचें सामर्थ्य त्यांच्या जवळ होतें.

जयाचिया बरवेपणी । कीजे आठां रसाची वोवाळणी ।
जो सज्जनाचिये आपणी । विसांवा जगीं ॥ ४—२१२
तो शांतचि अभिनवेल । ते परियसा मऱ्हाठे बोल ।
जे समुद्राहूनि सखोल । अर्थभरित ॥ ४—२१३

शांत रसासारखा सामान्य जनरुचीला न पटणारा रस वर्णन करतांना शृंगारादिक इतर आठ रस फिके वाटावेत असें सुंदर वर्णन मराठींत करावयाचें—आणि तें मराठी म्हणून कोणी नाक मुरडण्याचें कारण नाहीं, कां तर संस्कृताच्या बरोबरीनें हें मराठी "अर्थभरित" आहे येवढेंच नव्हे तर "समुद्राहूनी

सखोल" आहे–असा ज्ञानदेवांचा संकल्प होता. मराठीला ज्ञानदेवांनीं सरस्वतीच्या सिंहासनावर नेऊन बसविली. आपल्या मातृभाषेचा अभिमान त्यांना किती वाटत होता याला साक्ष पुढील ओव्या देतातः—

जियें कोवळिकेचेनि पाडें । दिसती नादींचे रंग थोडे ।
वेधें परिमळाचें बीक मोडे । जयाचेनी ॥ ६–१५
नवल बोलतीये रेखेची वाहणी । देखतां डोळयांही पुरो लागे धणी ।
ते म्हणती उघडली खाणी । रूपाची हे ॥ ६–१८
जेथ संपूर्ण पद उभारे । तेथ मनचि धांवे बाहिरें ।
बोलु भुजांही आविष्करे । आलिंगावया ॥ ६–१९

अर्थात् येवढ्या सुंदर भाषेचा उपयोग करून–आणि आमची मराठी भाषा शब्दरचनेंत येवढें सौंदर्य प्रकट करूं शकते हो गोष्ट सहज सिद्ध करून–केवळ रचनासौंदर्यावरच वाचकाला झुलवावयाचें हा कांहीं त्यांचा प्रधान हेतु नव्हता; तर

तेणे कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाचे रूप दावीन ।
अतींद्रिय परी भोगवीन । इंद्रियांकरवीं ॥ ६–३६

ही ज्ञानदेवांची आपल्या ग्रंथलेखनासंबंधीं प्रतिज्ञा होती. मराठींत ग्रंथरचना उत्तम करतां येते हें ज्ञानदेव वरचेवर वरचेवर प्रसन्नतेनें सांगतातः—

तिये अवधान द्यावें गोठी । बोलिजेल नीट मऱ्हाठी ।
जैसी कानाचे आधीं दृष्टि । उपेगा जाय ॥ ७–२०६
बुद्धीचिया जिभा । बोलाचा न चाखतां गाभा ।
अक्षरांचिया भांवा । इंद्रियें जिती ॥ ७–२०७
पहा पां मालतीचे कळे । घ्राणासि कीर वाटले परिमळें ।
परि विरचिला बरवा काई डोळे । सुखिये नव्हती ? ॥ ७–२०८
तैसें देशियेचिया हवावा । इंद्रियें करिती राणिवा ।
मग प्रमेयाचिया गांवा । लेसां जाइजे ॥ ७–२०९

देशीयेच्या–मराठीच्या सौंदर्यानें इंद्रियें राज्य करण्यासारखीं बळकट होतात आणि मग अगदीं सरळ ( लेसां ) प्रमेयाचें गांव गांठतात असें त्यांचें म्हणणें आहे. प्रमेय हें मुख्य पण तिकडे मन आकृष्ट होण्यास मराठीसारखी गोड

**भाषा, सुंदर भाषा, रसाळ भाषा फार उपयोगी पडते. अशा प्रकारें "मऱ्हाठा विवेक" ज्ञानदेवांनीं सांगितकेला आहे व तो सर्वांसाठीं आहे; सर्वांना आकृष्ट करणारा आहे; मराठीच्या आंगीं हें आकर्षणसामर्थ्य आहे.**

देशियेचेनि नागरपणें । शांतु शृंगारालें जिणे ।
तरी ओंवीया होती लेणें । साहित्यासी ॥ १०–४२
मूळ ग्रंथीचिया संस्कृता । वरी मऱ्हाठी नीट पढतां ।
अभिप्राय मानलिया उचिता । कवण भूमी हें न चोजवें ॥ १०–४३
जैसें अंगाचेनी सुंदरपणे । लेणिया अंगचि होय लेणे ।
तेथ अलंकारिलें कवणकवणें । हे निर्वचेना ॥ १०–४४
तैशी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं ।
शोभती आयणी । चोखट आइका ॥ १०–४५

**अशा प्रकारें मराठी संस्कृताबरोबर उत्तम शोभते हें ज्ञानदेवांचे उद्गार केवळ शाब्दिक नसून त्यांच्या ग्रंथरचनेनें त्यांची यथार्थता सिद्ध झालेली आहे. तेराव्या शतकांत मराठीला हें उन्नत स्थान प्राप्त करून देण्याचें पुण्य ज्ञानदेवांनीं संपादिलें आणि त्यासंबंधीं विसाव्या शतकाच्या मध्यकाळांतही शशंक असणारे पंडित आणि पंडितंमन्य केव्हां केव्हां कोठें कोठें दिसावेत हें आश्चर्य नव्हे काय? शिवाय गीतेच्या भाष्यानें ज्ञानदेवांनीं मराठींत ग्रंथरचना कां केली याचें कारणही स्पष्ट आहेः—**

वेदु संपन्न होय ठायी । परि कृपणु ऐसा आन नाहीं ।
जे कानीं लागता तिही । वर्णाच्याची ॥ १८–१४५७
येरां भवव्यथा ठेलीया । स्त्रीशूद्रादिकां प्राणियां ।
अनवसरु मांडूनियां । राहिला आहे ॥ १८–१४५८
तरी मज पाहतां तें मागील उणें । फेडावया गीतापणें ।
वेदु वेठला भलतेणें । सेव्य होवावया ॥ १८–१४५९
तैसं शब्दें जें न लभे । ते घट्टनिपा अनुष्टुभें ।
स्त्री शूद्रादिप्रतिभे । सामाविलें ॥ १८–१६९९
आणि तोचि हा मी आतां । श्रीव्यासाचीं पदे पाहत पाहतां ।
आणिला श्रवणपथा । मऱ्हाठिया ॥ १८–१७०८

या कारणे मियां । श्रीगीतार्थ मऱ्हाठिया ।
केला लोकां यया । दिठीचा विषो ॥ १८–१७३५

आणि हा गीतेचा " एकनिष्ठ " अर्थ मराठींत आणणें हा सहाशें वर्षांपूर्वी ज्ञानदेवांनीं मोठाच चमत्कार केला यांत शंका नाहीं. त्यांच्या सर्व उपदेशाचें रहस्य आणि सार या ज्ञानेश्वरी ग्रंथांत आहे. अशा ग्रंथाचा कर्ता, तत्वज्ञ आणि महाकवि, ज्ञानदेव याच्या चरित्राचा व ग्रंथांचा परिचय करून घ्यावा व तो ज्ञानदेवाच्या पद्धतीनें म्हणजे एकनिष्ठ विवेक जींत आहे त्या पद्धतीनें करून घ्यावा असें येथें योजिलें आहे. तसें करतांना अंधश्रद्धेचें प्रयोजन नाहीं; कारण " मऱ्हाठी विवेक " सांगणाऱ्या थोर विभूतीचें चरित्रही विवेकाच्या डोळयांनीं पाहिलें पाहिजे हें विशेष स्पष्ट करणें नलगे.

# भाग दुसरा

## प्रारंभ

अथवा ज्ञानाग्निहोत्री । जे परब्रह्म श्रोत्री
महासुखक्षेत्री । आदिवत ॥ ज्ञानेश्वरी ॥ ६–४४९ ॥
जे सिद्धांताचिया सिंहासनीं । राज्य करिती त्रिभुवनीं ।
जे कूजती कोकिल वनीं । संतोषाच्या ॥ ४५० ॥
जे विवेकद्रुमाचे मुळीं । बैसले आहाति नित्यफळीं ।
तया योगियांच्या कुळीं । जन्म पावे ॥ ४५१ ॥
मोटकी देहाकृति उमटे । आणि निजज्ञानाची पाहांट फुटे ।
सूर्यापुढें प्रकटे । प्रकाशु जैसा ॥ ४५२ ॥
तैशी दशेची वाट न पाहतां । वयसेचिया गांवा न येतां ।
बाळपणींच सर्वज्ञता । वरी तयातें ॥ ४५३ ॥
तियें सिद्ध प्रज्ञेचेनि लाभें । मनचि सारस्वतें दुभे ।
मग सकळ शास्त्रें स्वयंभें । निघती मुखें ॥ ४५४ ॥
ऐसें जें जन्म । जयालागीं देव सकाम ।
स्वर्गीं ठेले जपहोम । करिती सदा ॥ ४५५ ॥
अमरीं भाट होइजे । मग मृत्युलोकातें वानिजे ।
ऐसे जन्म पार्था गा जें । तें तो पावे ॥ ४५६ ॥

भगवद्गीतेच्या बेचाळीस आणि त्रेचाळीस ( अध्याय ६ ) श्लोकांवर भाष्य म्हणून केलेल्या वरील ओव्या वाचतांना ज्ञानदेवाच्या लोकप्रसिद्ध चरित्राचें स्मरण झाल्याशिवाय रहात नाहीं. त्या चरित्रांत वादग्रस्त भाग आहेत आणि ते केवळ अलौकिक चमत्कारांसंबंधींच नाहींत. ज्ञानदेव या नांवाचा एकच पुरुष महाराष्ट्रांत होऊन गेला कां दोन अथवा अधिक होऊन गेले, ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव यांचा कर्ता ज्ञानदेव आणि " बापरखमादेवीवरू " म्हणून अभंग लिहिणारा ज्ञानदेव हे एक कां दोन, अशा शंका प्रतिशंका निघून त्याचा थोडाबहुत ऊहापोह चाळीस पन्नास वर्षांपूर्वी होऊन गेला व त्यांत मोठमोठ्या

वाग्विवादपटु पंडितांनीं भाग घेतला. त्या वादविवादाचा परामर्श या ग्रंथांत घ्यावयाचा प्रयत्न पुढील एका भागांत करावयाचा आहे. पण सध्यां जें ज्ञानदेव-चरित्र लोकांत प्रसिद्ध आहे तिकडे आपणांस पहावयाचें आहे. जो वाद उपस्थित झाला होता त्यांतील मुद्दा तें चरित्र खोटें आहे हा नसून दोघातिघांच्या चरित्रांची भेसळ होऊन तें चरित्र शुद्ध स्वरूपांत उपलब्ध आहे कीं काय हा होता; व त्याचा निर्णय सर्व पुराव्याचा विचार करून केव्हांतरी लागणें इष्ट आहे. झालेल्या वादांत शंका समाधानापेक्षां कठोर शब्दांचें प्रदर्शन विशेष झालें त्यामुळें तत्त्वबोध फारसा हातीं लागला नाहीं. पण हे वाद जसें अंधश्रद्धेनें तुटत नाहींत तसे बिनपुराव्याच्या विधानांनीं मिटत नाहींत, येवढें म्हणून आपण आपल्या विषयाकडे वळण्यास हरकत नाहीं.

वरती दिलेल्या ओंव्यांतील वर्णनाचा बराचसा महत्त्वाचा भाग खुद्द ज्ञानदेवांच्या चरित्राला इतका लागू पडतो कीं पुनर्जन्म मानणारे ज्ञानदेवांना योगभ्रष्ट महात्मा म्हणण्याला कचरणार नाहीं. अल्पायुषांत प्रचंड कार्य उत्तम प्रकारें सिद्धीस नेणाऱ्यांचें चरित्र वाचलें म्हणजे त्याचा संदर्भ पुनर्जन्माच्या तत्त्वावरून लावण्याची इच्छा होते व अशीं उदाहरणें एकत्र करून त्या तत्त्वाची सत्यता सिद्ध करण्याचे प्रयत्न अलिकडच्या काळांत प्रसिद्ध थिऑसफीस्ट मि. जिनराजदास वगैरे लेखकांनीं केलेले आहेत. पण पुनर्जन्माच्या तत्त्वाचे मनुष्याच्या व्यवहारावर होणारे सर्व परिणाम लक्षांत घेतले म्हणजे त्या तत्त्वाचा चांगुलपणा चिंतनीय ठरतो व त्याला पूर्णपणें सिद्ध करण्याला पटणारा पुरावा मिळत नाहीं तोंपर्यंत त्या चिंतनीयतेंतच श्रद्धा ठेवणें भाग पडतें हेंही विसरून चालणार नाहीं. ज्ञानदेवांचे पूर्वजन्म काय होते याचें संशोधन कोणी केलेलें नाहीं हें एक आहे त्या परिस्थितींत सुखच मानलें पाहिजे. एक तर त्यांच्या याच जन्मांतल्या चरित्राविषयींच वाद उपस्थित झालेले आहेत तेव्हां या जन्मांतील वादाचा निर्णय लागणें जेथें कठीण तेथें पूर्वजन्मांचा वाद न केलेलाच बरा. तेव्हां जी माहिती सामान्यपणें सर्वत्र रूढ आहे तिच्याच आधारानें आपण प्रारंभ करणें बरें.

२ तसें करतांना ज्ञानदेवाच्या लौकिक चरित्रांतील अलौकिकपणा जसा डोळ्यांसमोर उभा राहतो त्याचप्रमाणें त्यांच्या मातापितरांच्या चरित्रांतील

वैशिष्ट्याकडेही आपलें लक्ष्य वेधतें. हा "ज्ञानियांचा राजा" ज्यांच्या पोटीं आला त्या आईबापांची कथा खरोखर आश्चर्यकारक आहे. ज्ञानदेवाचा पिता विठ्ठलपंत हा खरोखर जिज्ञासु, मुमुक्षु, आणि संसारव्यापांत पडूं नये अशा वृत्तीचा मनुष्य होता. लहानपणापासून प्रवासाची, तीर्थयात्रेची आवड आणि "देवाचा शोध" लावण्याची जबरदस्त आकांक्षा हे गुण त्याच्यांत प्रमुखपणानें दिसून येतात. सातशें वर्षांपूर्वीच्या हिंदुस्थानांत प्रवासाची आवड हा गुण असामान्य होता यांत शंका नाहीं व आसेतुहिमाचल भ्रमण करून "देवाचा शोध" लावण्याची आकांक्षा नास्तिकांकडूनही प्रशंसा प्राप्त करून घेण्यासारखी होती असें म्हणण्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. विठ्ठलपंत कुलकर्णी हे सध्यां निजामाच्या राज्यांत असणाऱ्या पैठणाजवळच्या आपेगांव नांवाच्या खेड्यांत रहात असत. त्यांचे वडील गोविंदपंत हे युजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण. आपेगांव पैठणाजवळ आहे आणि गोदावरीच्या तीरावर आहे. महाराष्ट्र भाषेच्या वैभवाची सुरवात गोदावरीच्या तीरावर झाली ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. पैठणाची प्रसिद्धी पुढें तीनशें वर्षांनीं एकनाथांमुळें विशेष झाली. मऱ्हाठी भाषेच्या दृष्टीने गोदावरीचें माहात्म्य मोठें आहे ही गोष्ट ज्ञानदेव एकनाथापासून तो त्र्यंबकेश्वरीं जन्माला आलेले आधुनिक कविवर्य कैलासवासी चंद्रशेखर यांच्या काळापर्यंत नजर फेकली म्हणजे डोळयांत भरतें व "गोदागौरव" पटतें. पुढें गोदावरीपासून कृष्णेच्या तीरापर्यंत मराठी वाङ्मयाचा व्याप वाढला व उत्तर हिंदुस्थानांत जमिनीच्या पिकाऊपणाबद्दल गंगायमुनांचा दुआब जसा प्रख्यात झाला त्याप्रमाणें गोदाकृष्णांच्या दुआबांत मराठी सारस्वताचे मळे पिकले व ज्ञानफलांची समृद्धि झाली, ही वाङ्मयाच्या भूगोलांतील गोष्ट महाराष्ट्रीयांनीं अभिमान बाळगण्यासारखी आहे यांत शंका नाहीं.

आपेगांवच्या गोविंदपंत कुळकर्ण्यांचा मुलगा विठ्ठलपंत हा आमच्या चरित्रनायकाचा पिता. विठ्ठलपंत हा आपल्या आईबापांचा एकुलता एक मुलगा होता तरी पण त्याच्या तीर्थयात्रांना ते फारसे आडवे आले नाहींत असें दिसतें. विठ्ठलपंताला लहानपणापासून तीर्थयात्रा करावी अशी तीव्र इच्छा होती आणि त्याप्रमाणें कांहीं काळानें तो घराबाहेर पडला. त्या काळीं एकदां घराबाहेर

पडल्यावर पुनः घरीं परत पोहोंचण्यास पुष्कळ कालावधि लागे आणि दरम्यान् डांकेनें पत्र येण्याचीं सध्यांसारखीं साधनें नसल्यामुळें बाहेरगांवीं किंवा दूर गेलेल्या माणसाचा समाचारही कळण्याला पुष्कळ वेळ लागत असे. आपे-गांवाहून विठ्ठलपंत निघाले ते पुष्कळ क्षेत्रांतरीं जाऊन कांहीं काळानें पुण्याजवळ बारा मैलांवर असलेल्या आळंदी गांवाला आले. आळंदी गांवाला क्षेत्रपणा ज्ञानदेवांच्या पुण्याईमुळें आला असें सध्यां तरी आपल्याला वाटतें व ज्ञानदेवांच्या पुण्याईव्यतिरिक्त त्या ठिकाणाला क्षेत्रत्व येण्याला दुसरा प्रत्यक्ष पुरावा फारसा ( किंवा थोडासा ) उपलब्धही आहे असें दिसत नाहीं. तथापि ज्या अर्थी क्षेत्रोक्षेत्रीं हिंडत विठ्ठलपंत आळंदीला आले व तेथें इंद्रायणी नदींत स्नान करून पूजाअर्चा करीत बसले त्या अर्थी त्या काळीं आळंदीलाही क्षेत्र समजण्याची प्रथा असावी असें अनुमान करतां येणें शक्य आहे. तें कसेंही असो; ज्ञानदेवांच्या चरित्रांत आळंदीला फार महत्वाचें स्थान आहे व ज्ञानदेवांच्या समाधीपासून तो आजतागायत

"आळंदी हा गांव । विश्रांतीचा ठाव"

सगळ्या महाराष्ट्राला होऊन बसलेला आहे. विठ्ठलपंतांना आळंदींत आपल्या भावी श्वशुरांची गांठ पडली व तेथेंच त्यांचा विवाह पण झाला. आळंदीचे जुनें नांव अलकापुरी आहे असें म्हणतात. लाक्षणिक अर्थानें ही आळंदी महाराष्ट्राची–महाराष्ट्र सारस्वताची–कुबेरनगरी होऊन बसलेली आहे यांत शंका नाहीं.

आळंदीला श्रीधरपंत किंवा सिधोपंत म्हणून यजुर्वेदी ब्राह्मण गृहस्थ रहात असत त्यांची आणि या तरुण यात्रेकरूची गांठ पडली. आपल्या देशाच्या गांवगाड्यांत अतीथ अभ्यागताचा परामर्श घेणें हें गृहस्थाश्रमाचें एक महत्वाचें कर्तव्य मानीत. सिधोपंतांनीं या यात्रेकरूची चौकशी केली आणि पुढील सर्व प्रकार कथेंत किंवा कादंबरींत व्हावा तसा झाला. सिधोपंतांना एक कन्या होती. ती तेव्हांच्या काळाच्या समजुतीप्रमाणें उपवर झाली असून तिचें लग्न जमलें नव्हतें म्हणून सिधोपंत काळजींत होते. सिधोपंत खटपटे आणि लटपटे नव्हते तेव्हां चार ठिकाणीं जाऊन, कोणाला मध्यस्थी घालून, कांहीं तरी थापाथापी किंवा देवघेव करून मुलींना उजवण्याची जी एक कला आहे तींत

ते बिणगात नव्हते. आपल्या समाजांत सध्यां सुद्धां शिकलेल्या सवरलेल्या आणि रूपसंपन्न मुलींना अनुरूप वर मिळण्याची केवढी पंचाईत पडते; मग त्या काळीं घरीं बसून जावई आतां चालून येईल ही शक्यता नसावी यांत कांहीं नवल नाहीं. तेव्हां या तरुण यात्रेकरूची गांठ पडल्यावर त्याच्या चालचालणुकीवर व चेहऱ्यामोहऱ्यावर सिधोपंत प्रथम प्रसन्न झाले व स्वतःचें घरदार सोडून येवढ्या दूर प्रवासाला आलेला हा तरुण आपणांस जावई म्हणून मिळेल, विशेषतः घरजावई म्हणून मिळेल तर फार उत्तम होईल हा विचार साहजिक त्यांच्या मनांत उत्पन्न झाला. वास्तविक विठ्ठलपंत आपल्या आईबापांचा एकुलता एक मुलगा; संसाराची आवड नाहीं व परमार्थाची गोडी वाटे म्हणून तीर्थयात्रेला, "देवाच्या शोधा"ला, बाहेर पडलेला; त्याला संसारी बनविण्याची कल्पना सिधोपंतांना झाली हा एक चमत्कार म्हणावा. त्यांनीं विठ्ठलपंतांना घरीं नेऊन त्यांचें चांगलें आदरातिथ्य केलें. विठ्ठलपंत त्या दिवशीं त्याचा पाहुणा झाला. हा आपणांस जावई मिळावा ही सिधोपंतांची इच्छा तीव्रतर झाली. आतां या ठिकाणीं एक चत्मकार घडला. त्या रात्रीं सिधोपंतांच्या स्वप्नांत प्रत्यक्ष पंढरीचा विठ्ठल येऊन त्यानें आपली कन्या घरीं आलेल्या पाहुण्याला सालंकृत अर्पण कर म्हणून त्यांना आज्ञा केली. सकाळीं उठल्यावर हा चमत्कार त्यांनीं विठ्ठलपंतांना सांगितला. पण विठ्ठलपंतांनीं हा केवळ चमत्कार ऐकून विवाहास तयार व्हावें हें त्या काळीं सुद्धां शक्य नव्हतें असें दिसतें. कारण ते म्हणाले—"मला यासंबंधीं जर विठ्ठलाची आज्ञा होईल तर मग या गोष्टीचा मी विचार करीन." प्रथम हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं विठ्ठलपंतांना लग्न करण्याची व संसारांत पडण्याची मुळींच इच्छा नव्हती. ती तशी असती तर गोविंदपंतांनीं आपेगांवांतच त्यांचे दोन हाताचे चार हात करून दिले असते. पण संसार नको म्हणून तर प्रेमळ मातापित्यांना कष्टी करून विठ्ठलपंत घराबाहेर पडला होता. तो आळंदीला आल्यावर त्याच्यापुढें पुनः विवाहाचाच प्रश्न सिधोपंतांनीं उभा केला. सिधोपंतांना स्वप्नांत विठ्ठलानें आज्ञा केली व तशी आपणांला झाली तर आपण विवाहाला कबूल होऊं असें विठ्ठलपंत बोलले. सिधोपंतांनीं पाहुण्यांना घरीं आणखी एक दिवस राहण्याची विनंति केली; अर्थात् मग विठ्ठलपंतांना

ना म्हणतां येईना. तथापि हा संसाराचा भार डोक्यावर घ्यावा कीं न घ्यावा याबद्दल विठ्ठलाचा दृष्टांत होऊनही त्यांची अनिश्चितता गेली नाहीं.

विठ्ठलपंतांचा अनिश्चितपणा पाहून सिधोपंतांनीं त्यांना परोपरीनें सांगितलें कीं विवाह झाल्यावर संसाराची तोसीश तुम्हांला लागणार नाहींत; माझें आहे तें तुमचेंच आहे. सिधोपंताची कन्या ही त्यांची एकुलती एकटीच होती तेव्हां मागेंपुढें त्यांचें होतें नव्हतें तें जावयासच मिळावयाचें होतें. तथापि एक अडचण होती ती ही कीं विठ्ठलपंतांचे आईबाप आपेगांवीं; त्यांना कळविल्याशिवाय व त्यांनीं आणल्याशिवाय विवाहविधि कसा उरकावयाचा ? त्याही अडचणीचें निराकरण सिधोपंतांनीं केलें. आपेगांव आळंदीहून दोनशें मैलांवर तेव्हां गोविंदपंतांना वगैरे आणवून विवाह त्वरित होणार नाहीं; व त्यांना तर एकदां तो उरकून टाकण्याची उत्कंठा लागलेली. अशा प्रकारें नाहीं होय करतां विठ्ठलपंतांनीं एकदाचा रुकार दिला व आळंदीला, आईबाप हजर नसतांना, त्यांचा विवाहविधि यथासांग झाला. या विवाहाचा एकंदर विचार केला म्हणजे पांडुरंगानें स्वप्नांत येऊन त्या बाबतींत मध्यस्थी करण्याचें कांहीं विशेष कारण होतें असें दिसत नाहीं. पण थोर पुरुषाची प्रत्येक गोष्ट अगदीं जन्म होणाच्या पूर्वींपासून अलौकिक असें म्हणण्याची व समजण्याची जी प्रथा आपल्यांत पडलेली आहे तिचा परिणाम उपरोक्त चमत्कार लोकसमजुतींत उत्पन्न होण्यांत आला असावा असें दिसतें. "मनीं वसे तें स्वप्नीं दिसे" ही आपल्या मराठींतील फार जुनी म्हण आहे व आधुनिक शास्त्रज्ञांच्या स्वप्नमीमांसेंतही तिला स्थान आहे. तेव्हां सिधोपंतांना कदाचित् स्वप्नांत पांडुरंगानें आपल्याला कांहीं सांगितलें असें वाटलें नसेल असें नाहीं. पण विठ्ठलपंतांनाही स्वप्न पडावें व तें पडून सुद्धां पुनः त्यांनीं आढेवेढे घ्यावेत व श्वशुरांनीं व्यवहाराच्या गोष्टी सांगितल्यावर शेवटीं एकदाचा रुकार द्यावा या गोष्टींचा ताळमेळ बरोबर बसत नाहीं. विठ्ठलपंत हा व्यवहारी बुद्धीचा माणूस नव्हता. सासऱ्याच्या पैशानें भुलण्यासारखी त्याची वृत्ति नव्हती. त्याची संसारांत पडण्याची इच्छा नव्हती. पण तो भिडस्त असावा असें दिसतें व सिधोपंतांच्या आग्रहाला मान देऊन भीड तुटेना म्हणून कदाचित् त्यानें विवाहाला रुकार दिलेला असावा. त्यांत सिधोपंताला किंवा त्याला कसलाही

दोष देण्याचें कारण नाहीं. सिधोपंत मुलीचा बाप होता. त्याला मुलीच्या विवाहाचें जमवावयाचें होतें. तो काळच असा होता कीं स्वप्नांत देवानें दृष्टांत दिला असे सांगण्यांत सिधोपंत खोटें बोलला असेंही समजण्याचें कारण नाहीं. उलट, दूर दुसऱ्या प्रांतांत येऊन, उत्तम आदरातिथ्य करून सालंकृत कन्यादान करूं इच्छिणाऱ्या सिधोपंताची भीड मोडवली नाहीं याबद्दल विठ्ठलपंतांसही दोष देण्याचें कारण नाहीं. पण भिडेला बळी पडून हें लग्न ठरलें व विठ्ठलपंतांचें मन खरोखर संसारांत कधीं नव्हतें हें पुढील वृत्तांतावरून स्पष्ट होतें. स्वप्नांत येऊन पांडुरंगानें केलेली आज्ञा पाळण्यासाठीं विवाहाला तयार होणारा विठ्ठलपंत पुढें पांडुरंगाला विचारल्याशिवाय बायकोला टाकून निघून गेला. इतकेंच नव्हे तर काशीमध्यें ज्या संन्याशाचा त्यानें उपदेश घेतला त्यालाही लग्नाची हकीकत त्यानें कळविली नाहीं. यावरून त्याच्या स्वप्नांत पांडुरंग आला हा चमत्कार या बाबतींत त्या वेळीं लोकांच्या ज्या चमत्कारिक कल्पना होत्या त्यामुळें जन्माला आला असें मानण्याशिवाय गत्यंतर नाहीं. कसेंही असो; आपेगांवच्या विठ्ठलपंत कुळकर्ण्यांचें लग्न आळंदीच्या सिधोपंताची कन्या रखमाबाई इजबरोबर झालें व विठ्ठलपंत आळंदीसच सासऱ्याच्या घरीं राहूं लागले. परमार्थ व संसारदेवता यांचा विवाह झाला व कांहीं काळ तरी संसाराच्या अनुषंगानें विठ्ठलपंतांनीं चालविला.

३ पण असा जुलुमाचा रामराम टिकणार किती दिवस? रखमाबाईंत न्यूनता कोणतीही नव्हती; पण विठ्ठलपंताची दृष्टि परमार्थाकडे लागलेली; "देवाच्या शोधा" पुढें त्याला "सुखाच्या शोधा" ची परवा वाटत नव्हती; किंबहुना देवाचा शोध म्हणजेच सुखाचा शोध असें त्याच्या मनानें घेतलें होतें. त्याच्या सुदैवानें सिधोपंतही धार्मिक वृत्तीचे होते व विवाहानंतर देवदर्शनाला नेण्याची चाल आहे तिला अनुसरून या नूतनपरिणीत विठ्ठलरखुमाईला पंढरपूरच्या विठ्ठलरखमाईच्या दर्शनाला त्यांनीं नेलें आणि अशा प्रकारें ज्या महाराष्ट्राच्या क्षेत्रांत आपल्या मुलांच्या नांवाचा जयजयकार प्रत्यक्ष देवाच्या बरोबरीनें पुढें शतकानुशतकें व्हावयाचा होता तेथील देवाचें दर्शन आपेगांवच्या विठ्ठलपंतानें घेतलें. पुढें कांहीं दिवस विठ्ठलपंतांनीं संसार भोगला; "सोसला" म्हणावा पाहिजे तर, कारण संसारावर त्यांचें चित्त कधीं जडलेंच नाहीं. कांहीं

वर्षें गेलीं; त्यांत पंढरपुरची वारी मुख्य प्रसंगीं तरी होत असावी असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. पण हळूहळू विठ्ठलपंतांच्या डोक्यांत परमार्थाचें, संन्यासाच्या विचाराचें, देवाची भेट होण्याच्या मनोवृत्तीचें, ब्रह्मस्वरूपीं लीन होण्याच्या आकांक्षेचें परिभ्रमण सुरू झालें. त्यांत ज्यामुळें विरक्तालाही अनुरक्तता उत्पन्न होते त्या अपत्यसुखाचा लाभ झाला असता तर मनुष्यस्वभावाला अनुसरून विठ्ठलपंतांना संसारही कदाचित् रमणीय वाटला असता. पण योगायोग निराळा होता. आमच्या समाजांत अपत्यसुखाची केवढी लालसा आहे याची नीट कल्पना संततिनियमनाच्या दृष्टिकोणानें सर्वत्र पाहणाऱ्यांना येणें कठीण पडतें. पण हा दृष्टिकोण सहाशें काय पण पन्नास वर्षांपूर्वींसुद्धां इकडे नव्हता. "धन्यास्तदंगरजसा मलिनीभवंति" म्हणणारा दुष्यंत राजा तर बोलून चालून संसारी होता आणि निपुत्रिक होता. पण शकुंतलेसारख्या धर्मकन्येच्या विरहाच्या वेळीं ज्याचे डोळे पाण्यानें डबडबून आले आणि घसा भरून आला तो कण्व तर इंद्रियजय मिळविलेला तपोनिधि होता ! आणि त्या तपोनिधीच्या भरलेल्या डोळ्यांचें आणि सद्गदित झालेल्या कंठाचें वर्णन वाचून जर्मन कवि गेटे यानें कालिदासाला महाकवित्वाचें प्रशस्तिपत्र दिलें. तेव्हां अपत्यसुखानें माणसाचें मन विरक्तींतून निघून अनुरक्तींत प्रविष्ट होतें हें खरें. पण तसा योगही विठ्ठलपंतांना न आल्यामुळें त्यांच्या परमार्थाकडे धावत सुटलेल्या मनाला संसाराकडे खेचण्याचें सामर्थ्य त्यांच्या सुशील आणि पतिकार्यतत्पर पत्नींतही नव्हतें; तेव्हां दुसऱ्या कोणांत नव्हतें हें सांगावयास नकोच. हळूहळू तीर्थयात्रेचें विचार त्यांच्या मनांत पुनः जोरानें खेळू लागले व योगसाधन करावें, परमार्थांत सर्व काळ घालवावा, अहं ब्रह्मास्मि, तत्वमसि, सर्वं खल्विदं ब्रह्म इत्यादि महावाक्याची प्रतीति घ्यावी अशी इच्छा आणि आकांक्षा यांनीं त्यांच्या मनांत कल्लोल सुरू केला. संसारांत गोडी फारशी त्यांना कधीं वाटली नव्हतीच पण जी वाटत होती, कांहीं तात्कालिक कारणामुळें संसार सह्य झाला होता, त्याही कारणांचें बळ कमी झालें आणि आतां यांतून बाहेर पडावें हाच विचार त्यांच्या मनांत सारखा घोळूं लागला. पण या विचाराचा पहिला झटका बराच सौम्य होता. ते उत्तरेकडील तीर्थयात्रा करून आळंदीकडे आले होते व पुढें रामेश्वराला व

दक्षिण हिंदुस्थानांतील तीर्थांना जाणार होते; पण मध्येंच संसारांत पडले. तेव्हां पहिला विचार त्यांनीं असा केला कीं रामेश्वराला जावें व तिकडून आपेगांवीं जाऊन आपल्या वडीलमातुःश्रींना भेटून यावें. तो विचार त्यांनीं सिधोपंतांना कळविला.

सिधोपंतांना रुकार देणें भागच होतें. मात्र असें ठरलें कीं दक्षिण प्रांतांतील यात्रा करून विठ्ठलपंतांनीं आळंदीला परत यावें व मग त्यांनीं सहकुटुंब आपेगांवीं जावें. आपल्या व्याह्यांना भेटण्याची सिधोपंतांचीही इच्छा होतीच; व तेही मग लेकीजावयाबरोबर सहकुटुंब आपेगांवीं जावयास निघणार होते. असो. विठ्ठलपंतांनीं दक्षिण प्रांताच्या यात्रेला सुरवात पंढरपुराहूनच केली. त्यावेळीं या यात्रा फारच कठीण होत्या. गिरीचा व्यंकोबा म्हणजे तिरुपति, मल्लिकार्जुनेश्वर जेथें आहे तें कृष्णातटाकीं असलेल्या श्रीशैल पर्वतावरचें ज्योतिर्लिंगस्थान, समुद्रकाठचें गोकर्ण महाबळेश्वर, दक्षिणेंतील काशी म्हणून ज्याला म्हणतात तें कांजीवरम् किंवा कांची (हे मद्रासपासून सुमारें चाळीस मैल आहे) तेथून खालीं जाऊन मीनाक्षीचें मदुरा येथील भव्य मंदिर, आणि शेवटीं दक्षिणसमुद्राच्या तीरावर बसलेलें व जेथें त्या वेळीं मोठ्या अडचणीनें समुद्रांतून जावें लागत असे व ज्याच्यापासून पुढें लंकेला जाण्यासाठीं रामचंद्रानें सेतु बांधविला अशी रामायणांत कथा आहे तें रामेश्वर, या सर्व ठिकाणीं विठ्ठलपंत गेले आणि तेथून पुढें वीस मैल जाऊन दक्षिण महासागरांत धनुष्कोटि येथेंही त्यांनीं सागरस्नान केलें. येथून लंकेचा किनारा अवघा वीस मैल आहे. सध्यां देखील धनुष्कोटीच्या किनाऱ्यावरून लंकेला जाणारें किंवा लंकेहून येणारें जहाज निम्म्या वाटेपर्यंत दिसत असतें. तेथून विठ्ठलपंत परतले व कृष्णाकाठचीं व दुसरीं क्षेत्रें करीत करीत कोल्हापूरच्या जगदंबेचें दर्शन घेऊन ते आळंदीला परत आले. त्या काळीं हा असा धोक्याचा दूरचा प्रवास करणारा हा ब्राह्मण नुसता मुमुक्षु होता एवढेंच नाहीं तर मोठा धाडशीही असला पाहिजे हें उघड आहे. जावई परत आलेला पाहून सिधो-पंतांना आनंद व्हावा हें स्वाभाविक होतें. जुन्या हिंदु समाजांत जावयाचें प्रकरणच असें होतें कीं त्याचा कोणालाही भरंवसा वाटत नसे. त्यांतल्या त्यांत विठ्ठलपंतांचा ओढा तीर्थयात्रेकडे फार व संसाराकडे कमी त्यामुळें

घरांतून गेलेला जावई परत येऊन संसारांत पडतो कां नाहीं याची मुलीच्या मातापितरांना मोठी काळजी वाटे. आळंदीला तीर्थयात्रा करून परत आल्यावर विठ्ठलपंत थोडे दिवस घरीं राहिले. नंतर, प्रथम ठरल्याप्रमाणें आपल्या मातापितरांना भेटण्यासाठीं ते सहकुटुंब निघाले व त्यांच्याबरोबर सिधोपंत व त्यांचें कुटुंब हेही निघाले. आपल्याकडचा जुना शास्त्रार्थ असा आहे कीं मुलीच्या घरीं तिला पुत्र होण्यापूर्वीं तिच्या आईबापांकडे अन्नग्रहण करावयाचें नाहीं; म्हणजे तोंपर्यंत जवळजवळ तिकडे जावयाचें नाहीं. पण विठ्ठलपंताचें लग्न अशा परिस्थितींत झालें कीं त्या वेळीं त्याचे मातापितर तेथें असणें शक्य नव्हतें. तेव्हां " सूनमुख " पहाण्याचा सोहळा विठ्ठलपंताच्या आईवडिलांना अनुभवण्यास सांपडलाच नव्हता. सिधोपंत आपल्या लवाजम्यानिशीं आपेगांवला गेले. जावयाला, व्ह्याह्याला, विहीणीला वगैरे द्यावयाच्या देणग्याही त्यांनीं बरोबर घेतल्या; व अशा प्रकारें विठ्ठलपंत कित्येक वर्षांनीं घरीं परत आले व तेही अगदीं आजकालच्या विलायतेला जाऊन येणाऱ्या अगदीं " अद्यावत् " तरुणाप्रमाणें सहकुटुंब आले. चिरंजीवांचें काय झालें याची बिचाऱ्या गोविंदपंतांना व त्यांचे कुटुंब नीराबाई यांना कांहींच माहिती नव्हती. ते डोळ्यांत तेल घालून मुलगा परत केव्हां येतो याची वाट पहात बसले होते व मुलगा परत येतो कीं नाहीं या चिंतेनेंही ते पुष्कळ वेळां व्यग्र होत. आणि म्हणून ही जी मायलेकाची व बापलेकाची भेट झाली तींत प्रेमाचा उमाळा येवढा मोठा होता कीं बाहेर दूर देशीं जाऊन विवाहबद्ध झाल्याबद्दल त्या वृद्ध मातापित्यांनीं मुलाला दोष तर दिला नाहींच पण त्याचें अभिनंदन केलें आणि सिधोपंतासारख्या सात्विक व संपन्न गृहस्थाबरोबर संबंध जडला म्हणून आनंद व्यक्त केला. यापुढें सिधोपंत आळंदीला परत गेले व विठ्ठलपंत सहकुटुंब स्वगृहीं राहून संसार करू लागले.

४ आपेगांवीं विठ्ठलपंत कांहीं दिवस सहकुटुंब राहिल्यावर क्रमाक्रमानें त्यांची आई व वडील हे मरण पावले. विठ्ठलपंतांच्या चित्ताला त्यामुळें उदासीनता आली; संसाराचा व्यवहारही त्याना फारसा समजत नव्हता असें दिसतें. जरी त्यांचें वय अगदीं तरुण म्हणजे पंचवीशीच्या सुमारास होते तरी तारुण्यसुलभ अशी त्यांची वृत्ति नव्हती. सढळ हातानें दानधर्म करावा,

आयव्ययाचा फारसा विचार ठेवूं नये असा प्रकार चालू झाला. माणूस मोठा सज्जन; सर्वांचें बरें करावें, परोपकार करावा, ही त्याची मनापासून इच्छा; पण संसारांत चित्त फारसें कधीं नव्हतेंच तें तिकडे कमी कमी होऊं लागलें व परमार्थाचा ध्यास अधिकाधिक लागला. त्याची तरुण पत्नी त्याच्या मनाप्रमाणें वागे पण हें संसारांतून उडून चाललेलें पतीचें अंतःकरण उलट खेचून आणण्याचें सामर्थ्य तिच्यांत नव्हतें. तिनें सर्व हकीकत आळंदीस आपल्या वडिलांना कळविली. तेव्हां सिधोपंत जामाताच्या समाचाराला आपेगांवीं आले. तेथें कांहीं दिवस राहून त्यांनीं सर्व प्रकार पाहिला व आपेगांवचें खटलें गुंडाळून आतां उभयतांनीं आळंदीस चलावें व आपल्या वृद्धापकाळीं आपणांजवळ रहावें अशी विनंति विठ्ठलपंतांना केली. आई वडील वारल्यानंतर आपेगांवचा ओढा त्यांना उरला नव्हताच; शिवाय आळंदी हें क्षेत्र, क्षेत्रांच्या रस्यावर, पंढरपूरला जवळ, परमार्थाच्या हमरस्त्यावरील ठिकाण हाही विचार त्यांच्या मनांत आला नसेल असें नाहीं. कसेंही असो, श्वशुराबरोबर ते जावयास निघाले व पुढें कांही वर्षें त्यांनीं आळंदीस घालविली आणि अशा प्रकारें आतां त्यांचा आणि आपेगांवचा संबंध तुटला तो कायम तुटला. आळंदीस आल्यावर विठ्ठलपंताचा परमार्थाचा नाद कमी न होता उलट वाढत चालला. पंढरपूरच्या वाऱ्या ते करीत, त्यामुळें संसारांत चित्त रममाण होण्याला साहाय्य होण्याचे कारण नव्हतें. तशांतही त्यांना अद्यापपावेतों संततीचा लाभ झाला नव्हता. मातापितर नातवंडांचें दर्शन होण्यापूर्वीच परलोकास गेले होते. सासुसासरेही वार्धक्याच्या मार्गांत लागलेले. खाण्यापिण्याची ददात नव्हती त्यामुळें उद्योग करण्याबाबद आंच नव्हती. विठ्ठलपंतांच्या अंतःकरणांत लहानपणापासून परमार्थाची ज्योत तेवत होती; आतां ती चांगली प्रज्वलित झाली व संसारांत मोक्ष नाहीं, संन्यास घेतल्याशिवाय जन्ममरणापासून सुटका नाहीं असे विचार त्यांच्या मनांत अधिक प्रबळतेनें घोळूं लागले. कर्म आणि संन्यास यांचा योग्य अर्थ सांगून अखिल महाराष्ट्रीयांना पिढ्यान-पिढ्या परात्पर गुरु होण्याची श्रेष्ठतम पदवी ज्याच्या पुत्राला लाभली त्याची ही या वेळची अशी स्थिति पाहून या वेळीं तो मुलगा ज्ञानदेव असता तर काय बहार झाली असती असा कालक्रमाला विरोध करणारा विचार मनांत आल्यावांचून रहात नाहीं. विठ्ठलपंतांनीं हळूहळू आपलें मनोगत पत्नीला

कळविण्यास सुरवात केली. पत्नीच्या अनुमतीशिवाय संन्यास घेतां येत नाहीं असें शास्त्र आहे तेव्हां ती अनुमति मिळविण्याच्या उद्योगाला ते लागले. तारुण्याच्या ऐन उमेदींत पति संन्यास घ्यावयास निघालेला पाहून त्या बिचारीची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. पुत्र झाल्याशिवाय, पितृऋण फेडल्याशिवाय सन्यास घेऊं नये असें तिनें नम्रतापूर्वक सुचविलें. तिचें म्हणणें खरें होतें, शास्त्राला धरून होतें, त्याचा न्यायीपणा नाकारणें विठ्ठलपंताला शक्य नव्हतें. पण त्यानें आपलें म्हणणें सोडलें नाहीं; आपल्या मोक्षप्राप्तींत आड न येण्याबद्दल पत्नीला त्यानें परोपरीनें विनविलें; ती बिचारी माणूसच होती; या रोजरोज चाललेल्या विनवण्यांना, दंडेलीला, परमार्थाच्या लांब लांब वर्णनाला एक दिवस ती कंटाळली; ती "आर्यस्त्री" होती तरी पण एक दिवस नवऱ्यावर रागावली. "संन्यास घेण्याचा येवढा हट्ट आहे, माझें कांहींही बोलणें मनावर घेत नाहीं, तर घ्या एकदां संन्यास" म्हणून एक दिवस रागानें, निराशेनें ती पतीला बोलली. आणि विठ्ठलपंत–त्याचा पोरकटपणा त्या गंभीरपणाच्या आणि वैराग्याच्या आवरणांत पुरेपूर भरला होता असें म्हणणें प्राप्त आहे–त्या शब्दांना अनुमति समजून घरांतून, बायकोला टाकून, बाहेर पडला.

गृहस्थाश्रम ही एक महत्वाची जबाबदारी आहे व ती पार पाडणें–अंगावर घेतल्यावर पार पाडणें–हें आपलें कर्तव्य आहे, हा आपला धर्म आहे, ही जाणीव पुष्कळ हिंदु पुरुषांना होत नाहीं. "स्वधर्मे निधनं श्रेयः" हें भगवद्गीतेंतील वाक्य या धर्माला लागू पडते याचा त्यांना पुष्कळ वेळां विसर पडतो. विठ्ठलपंत संन्यास घेण्यासाठीं घरांतून बाहेर पडले तेव्हां तिशीच्या आंत बाहेर होते. आपल्या तरुण पत्नीला केवढ्या दुःखात आपण लोटत आहों याचा त्यांनीं विचारही केला नाहीं. स्वतःच्या परमार्थापुढें प्रत्यक्ष आपणांवर सर्वस्वीं अवलंबून असलेल्या अबलेला आपण जाणून बुजून संकटांत ढकलून देत आहों हें त्यांना समजलेंही नाहीं. परमार्थाला समाजांत मान होता आणि अशा परमार्थाच्या नांवाखालीं घर सोडून जाणाऱ्या पुरुषाला समाजांत प्रतिष्ठा मिळे त्यामुळें आपल्या हातून मोठा अन्याय होत आहे याचें भान त्याला राहिलें नसावें. आळंदीहून उठून त्यांनीं काशीचा रस्ता धरला. काशीला

जाऊन राहावें ही समस्त हिंदूंची मोठी इच्छा असते. तिचाही अधिक परिणाम दुर्दैवी रुक्मिणीबाईच्या या पतिदेवाबर झाला. काशींत जाऊन तेथील एका प्रख्यात संन्यासाकडे ते गेले. संन्यास घेणें हा व्रतबंध, विवाह यांच्यासारखाच एक महत्वाचा विधि किंवा संस्कार आहे. काशीला श्रीपादयति नांवाचे संन्यासी रहात त्यांच्याकडे विठ्ठलपंत गेले व आपणांस आश्रम म्हणजे चतुर्थाश्रम देऊन अनुग्रह करावा अशी त्यांना त्यांनीं विनंति केली. श्रीपादयतींनीं सर्व हकीकत विचारली. बायकामुलें आहेत कां, संसाराची जबाबदारी आहे कां, येवढ्या तरुण वयांत इतकी विरक्ति उत्पन्न होण्याचीं कारणें काय या सर्व गोष्टींची त्यांनीं चौकशी केली. त्या चमत्काराच्या काळांत, स्वप्नांत पांडुरंगानें येऊन साक्षात्कार द्यावा अशा काळांत, श्रीपादयतींना या सर्व गोष्टी अंतर्ज्ञानानें कळल्या नाहींत हें नवल असें भाविकांना वाटेल. पण याचा अर्थ इतकाच कीं ते—श्रीपादयति—माणूस होते, देव नव्हते. आणि त्यांच्याकडे अनुग्रह मागावयास गेलेला विठ्ठलपंतही माणूसच होता. परमार्थाची अतीव लालसा उत्पन्न होऊन तो साध्य होण्यासाठीं कधींही व्यवहारानें न वागणारा विठ्ठलपंत या प्रसंगीं, ज्याच्याकडून तो मोक्ष मिळविणार होता त्या गुरुजवळ, खोटें बोलला; आपल्याला कोणी नाहीं म्हणून त्यानें सांगितलें; व त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवून श्रीपादयतींनीं त्यांस संन्यास दिला. विठ्ठलपंत लबाड नव्हता; पण संन्याशाचें त्याला वेड लागलें होतें; किंवा सौम्य शब्द पाहिजे असल्यास त्याला नाद लागला होता असें म्हणा. समाजांत कांहीं कांहीं नादांना म्हणजे वेडांना किंवा खुळांना प्रतिष्ठितपणा येत असतो, परमार्थाच्या नादाला असा प्रतिष्ठितपणा आपल्या समाजांत आहे. त्यामुळें कधीं कधीं ही खरोखर परमार्थाची विचारपूर्वक उत्पन्न झालेली तीव्र इच्छा आहे कां हा नाद आहे याचा पत्ता लागत नाहीं. विठ्ठलपंतांच्या बोलण्यावरून आणि त्यानें सांगितलेल्या खोट्या माहितीवरून हा संन्यास घेण्याला योग्य आहे असें श्रीपादयतींना वाटलें व त्याप्रमाणें त्यांनीं विठ्ठलपंतांना दीक्षा दिली. ही बातमी कांहीं दिवसांनीं आळंदीला येऊन पोहोंचली व बिचाऱ्या रुक्मिणीबाईवर वज्राघात व्हावा तसें झालें. तिचे मातापितर अगदीं वृद्ध झालेले; जवळचें दुसरें कोणी नाहीं; बरोबरचा पति जिवंत असून तिला नाहींसा झालेला. तेव्हां ती बिचारी काय करणार? हिंदु स्त्रियांच्या परंपरेला अनुसरून देवदेवतार्चनांत

ती काळ घालवूं लागली. आपल्याला जिवंतपणीं मृत्यु आला असें तिला वाटलें असल्यास नवल नाहीं. तिच्या पोटीं येणारीं मुलें "जीवन्मुक्ती"चा महामंत्र मराठी बोलानें जगांत प्रख्यात करतील हें त्यावेळीं तिला कसें कळणार? जें जें होईल तें तें सोसावें एवढें जीला माहीत होतें. कदाचित् तिच्या अंतःकरणांतील अंतर्भागांत आशेचा अंधुक दिवा तेवत होता पण तो तिलाही ठाऊक नव्हता.

५ कर्मधर्मसंयोग असा आला कीं ज्या श्रीपादयतींनीं चतुर्थाश्रमाची दीक्षा विठ्ठलपंतांना दिली तेच दक्षिण प्रांतांतील यात्रा करण्यासाठीं काशीहून निघाले व फिरत फिरत आळंदी येथें आले. तेथें एके दिवशीं सकाळीं रुक्मिणीबाई पिंपळाला प्रदक्षिणा घालीत होती व त्या आटोपल्यावर तिला हा यति दिसला; तेव्हां तिनें नेहेमींच्या शिरस्त्याला अनुसरून त्याला नमस्कार केला. श्रीपादयतींनीं ती तरुण सुवासिनी पाहून तिला "अष्टपुत्रा सौभाग्यवती भव" असा आशीर्वाद दिला. तो आशीर्वाद ऐकून त्या बिचाऱ्या रुक्मिणीबाईला त्या तशा दुःखदायी स्थितींतही हंसू आलें. आपल्या पतीनें आपणांला सोडून काशीस जाऊन संन्यास घेतला आणि हा वृद्ध संन्याशी आपणांला पुत्रप्राप्तीचा आशीर्वाद देत आहे तेव्हां नशीबाची क्रूरता व माणसाची सदिच्छा यांचा पुष्कळ वेळां कसा ताळमेळ बसत नाहीं हें लक्ष्यांत येऊन तिला तें विषण्ण हास्य उत्पन्न झालें असेल. पण तें पाहून श्रीपादयतींनीं तिला सर्व हकीकत विचारली व तिनेंही मोकळ्या मनानें ती सांगितली. सर्व हकीकत ऐकून व तिच्या पतीचें वर्णन ऐकून ज्याला आपण कांहीं दिवसांपूर्वी काशी येथें आश्रम दिला तो तर या स्त्रीचा पति नसेल ना अशी शंका त्यांच्या मनांत आली व त्या दुर्दैवी रुक्मिणीबाईची स्थिति पाहून त्यांचें मन इतकें कळवळलें कीं रामेश्वराची यात्रा सोडून ते पुनः काशीस गेले. त्यांनीं विठ्ठलपंतांना—त्यांचें नांव आतां चैतन्य होतें—सर्व हकीकत हडसून खडसून विचारली व त्यांची शंका खरी ठरली. श्रीपादयति हा असामान्य थोर पुरुष असला पाहिजे यांत शंका नाहीं. तरुण पत्नीचा त्याग करून, तिच्या संसाराचा खेळखंडोबा करून, स्वतःचा परमार्थ साधणें ही गोष्ट त्यांना पसंत नव्हती व तसें त्यांनीं विठ्ठलपंतांना स्पष्टपणें सांगितलें व संन्यासाचा त्याग करून परत पत्नीकडे जाण्याची त्याला आज्ञा केली. तो आज्ञा मोठी चमत्कारिक होती. एकदां संन्यास घेतला कीं तो कायमचा

झाला असें शास्त्र आहे. ज्यांत बिलकुल आश्रमांतर करतां येत नाहीं असा तो आश्रम आहे. त्यामुळें ही आज्ञा विठ्ठलपंतानें मान्य केल्यावरसुद्धां पुढें काय होणार हा प्रश्न होताच व विठ्ठलपंतांला मुलें झाल्यावर पुढें तो उपस्थित झालाच–पण मनुष्याच्या परस्पर कल्याणाला शास्त्र जर आडवें येत असेल तर तें टाकावें असा सुधारकी विचार श्रीपादयतींचा होता असें स्पष्ट दिसतें. ज्या शास्त्राधारें संन्याशाला आश्रम सोडतां येत नाहीं त्याच शास्त्राधारें गुरूची आज्ञा पाळलीच पाहिजे असा नियम आहे. श्रीपादयतींना निराधार रुक्मिणीबाईची ती करुणामूर्ति दिसत होती; तिच्या उध्वस्त झालेल्या संसाराचें चित्र त्यांच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें; विठ्ठलपंतानें खोटें सांगून आपल्याकडून संन्यास घेतला व रुक्मिणीबाईला निराधार करण्याच्या पातकांत आपणांला त्यानें सदिच्छेनें कां होईना पण वाटेकरी केलें ही गोष्ट त्यांनीं लक्षांत घेतली व परत जाऊन संसार कर म्हणून त्यांनीं शिष्याला आज्ञा केली व आपली आज्ञा म्हणजे वेदवाक्य आहे असें त्यास बजावलें आणि फजीत झालेल्या विठ्ठलपंतांना ती आज्ञा मान्य करणें भाग पाडलें. प्रत्यक्ष गुरूनें डोळ्यांत अंजन घातलें त्यामुळें त्याचें कांहीं चालेना. श्रीपादयतींनीं या वेळीं असामान्य गोष्ट केली; पण परिस्थितिही असामान्य होती. असामान्य परिस्थितींत केव्हां केव्हां सामान्य नियमांचें उल्लंघन करावें लागतें; त्याचा अर्थ सामान्य परिस्थितींतही ते नियम मोडावेत किंवा ते नसावेत असा होत नाहीं. पण नीतिशास्त्राचा हा सूक्ष्म धागा दोन्ही बाजूच्या आत्यंतिक अभिमान्यांना दिसणें शक्य नसतें; त्यामुळें समाजांत चांगल्या माणसांचा छळ होतो व वाईट माणसांना चांगलें म्हणण्याचा अट्टाहासही कोणी करतात. पण श्रीपादयतींना नीतिशास्त्र उत्तम अवगत होतें त्यामुळें त्यांनीं ही अशा प्रकारची आज्ञा केली.

गुरूच्या निर्वाणीच्या आज्ञेमुळें विठ्ठलपंतांना काशीवास सोडावा लागला व ते आळंदीला परत आले व त्यांनीं संसाराला सुरवात केली. त्यांच्या वागण्याचा सर्वांना चमत्कार वाटला व समाजाच्या दृष्टया त्यांनीं संन्यास सोडला हें बरोबर झालें नाहीं. पण गुरूचें सांगणें विठ्ठलपंतांना पूर्णपणें पटलें होतें यांत शंका नाहीं. तें पटल्यावर समाज काय म्हणेल याची त्यांनीं पर्वा केली नाहीं. गृहस्थाश्रमांतून मध्येंच पळून जाण्यांत आपल्या पत्नीच्या

स्थितीचा आपण विचार केला नाहीं हें त्यांच्या लक्ष्यांत आलें. आतां या ठिकाणीं विठ्ठलपंत हे काशीहून आळंदीला परत आले असें म्हटलें आहे. कित्येकांनीं असें म्हटलें आहे कीं श्रीपादयति, रुक्मिणीबाई व तिचे वृद्ध आईबाप यांना घेऊन, काशीला परत गेले व तेथें पतिपत्नीची भेट होऊन विठ्ठलपंतांचा संन्यास सुटला. कसेंही असो. ते परत गृहस्थाश्रमांत आले येवढी गोष्ट खरी. आळंदीला परत आल्यावर लौकरच लोकनिंदेचा मारा सुरू झाला व गांवच्या लोकांनीं संन्यासी पुनः गृहस्थ होऊ शकत नाहीं या शास्त्राधारावर या नवराबायकोंना बहिष्कृत केलें. त्या वेळची रूढि व समजूत पाहतां असें त्यांनीं केलें याबद्दल त्यांना दोष देतां येत नाहीं. पण लोकांनीं बहिष्कृत केल्यावर गुरूची आज्ञा पाळण्याच्या कामांत विठ्ठलपंतांनीं कसूर केली नाहीं याबद्दल त्यांची प्रशंसा करावी तितकी थोडी आहे. सगळें जग जरी आपल्यावर उलटलें तरी जी गोष्ट आपणांला सत्य व न्याय्य म्हणून पटलेली आहे तिचा त्याग करावयाचा नाहीं हा उत्तमांचा बाणा विठ्ठलपंतांनीं दाखविला व त्यामुळें " जगद्गुरूचा गुरु ( पिता ) " होण्याची त्यांनीं आपली पात्रता सिद्ध करून दिली यांत शंका नाहीं. विठ्ठलपंत कांहीं संन्यास झेपेना म्हणून गृहस्थाश्रमांत परत आले नव्हते. संन्यास ग्रहण करण्यांत पूर्वाश्रमांतील पत्नीच्या बाबतींत आपलें कर्तव्य चुकलें याबद्दल त्यांची खातरी पटली म्हणून ते गुरूच्या आज्ञेप्रमाणें संसारांत पुनः पडले. पत्नीसंबंधीं झालेला अन्याय दूर करण्यासाठीं त्यानीं अवघ्या जगाची परवा केली नाहीं व लोकांची निंदा सहन केली पण पत्नीचा त्याग केला नाहीं. शास्त्र लोकांच्या बाजूला होतें; माणुसकी विठ्ठलपंताच्या बाजूला होती. जरी शास्त्र हें सामान्यपणें माणुसकीच्या संरक्षणासाठीं तयार होत असतें तरी अशा कांहीं परिस्थिति निर्माण होतात कीं त्यांत शास्त्र आणि माणुसकी यांच्यांत विरोध येतो. अशा वेळीं शास्त्राचा त्याग करून माणुसकीची कांस धरावी लागते. आग्र्याहून शिव छत्रपति संभाजीसहित परत येतांना मथुरेला उतरले व तेथें त्यांनीं आपल्या मुलाला एका ब्राह्मणाच्या येथें ठेविलें. त्या ब्राह्मणाच्या घरावर मुसलमानांची तपासणी आली असतां त्या ब्राह्मणानें तो मुलगा आपल्या नात्यातला असल्याचें सांगितलें व तें सिद्ध करण्यासाठीं त्याला आपल्याजवळ जेवावयास घेतला. या वेळीं शास्त्र असो रूढि असो त्या वेळीं समाजांत जें

चालत होतें त्याचा भंग झाला. पण तो भंग करण्याला तो ब्राह्मण कचरला नाहीं. त्याला शास्त्राशास्त्रनिर्णय शास्त्री लोकांपेक्षांही अधिक चांगला माहीत होता. त्याचप्रमाणें, श्रीपादयतींनीं केलेला निर्णय त्या विशिष्ट परिस्थितींत न्यायाचा होता आणि हें पटल्यामुळें विठ्ठलपंतांनीं तो सक्रिय मान्य केला यांत त्यांचें थोर चारित्र्य प्रतीत होतें. आळंदीच्या सामान्य लोकांनीं विठ्ठलपंत व त्याची निरपराधी पत्नी यांना वाळीत टाकलें. सुखाची गोष्ट येवढीच होती कीं सासऱ्याच्या सुखवस्तुपणामुळें या बहिष्कृत दांपत्याला खाण्यापिण्याची, वस्त्रप्रावर्णाची ददात पडली नाहीं. लोकनिंदेला न जुमानता वृद्ध सिधोपंतानें लेकीला व जावयाला सांभाळलें आणि अशा प्रकारें महाराष्ट्राच्या भाग्योदयाला त्यानें मोठें साहाय्य केलें यांत शंका नाहीं.

६ असें सांगतात कीं विठ्ठलपंत संसारांत पुनः प्रविष्ट झाल्यानंतर त्यांनीं बारा वर्षें आळंदींत काळक्रमणा केली व इतक्या दिवसांनीं त्यांच्या पत्नीला पुत्रप्राप्ति झाली. साधारणपणें शके ११९० म्हणजे इसवी सन १२६८ या सालीं रुक्मिणीबाईच्या पहिल्या अपत्याचा जन्म झाला. त्याचें नांव निवृत्तिनाथ असें ठेविलें. पुढें तीन वर्षांनीं म्हणजे शके ११९३ (इ. स. १२७१) या सालीं ज्ञानदेवांचा जन्म झाला. त्यानंतर शके ११९६ (इ. स. १२७४) सालीं सोपानदेव व शके ११९९ (इ. स. १२७७) सालीं मुक्ताबाई यांचा अनुक्रमें जन्म झाला. आतां या सालांसंबंधींही तज्ज्ञांत निश्चित मत आहे असें दिसत नाहीं. वरील वर्षांचा उल्लेख कित्येक वर्षांपूर्वीं रा. रा. बळवंत खंडूजी पारख यांनीं लिहिलेल्या "श्री ज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र" या छोटेखानी ग्रंथांत आहे. या ग्रंथांत चिकित्सक दृष्टि फारशी दाखविलेली नाहीं; तथापि तें सुंदर भाषेंत लिहिलेलें असून त्यांत भाविकपणा पूर्ण भरलेला आहे. रा. रा. ल. रा. पांगारकर या विख्यात संतभक्तांनीं लिहिलेल्या "मराठी वाङ्मयाचा इतिहास" खंड पहिला या विस्तृत ग्रंथांत हींच वर्षें पुढीलप्रमाणें दिलेली आहेत.

निवृत्तिनाथांचा जन्म—श्रीमुखनाम संवत्सर माघ वद्य १ शके ११९५
(इ. स. १२७३)

ज्ञानदेवांचा जन्म—युवानाम संवत्सर श्रावण कृष्ण ८ (जन्माष्टमी)
शके ११९७ (इ. स. १२७५)

सोपानदेवांचा जन्म—ईश्वरनाम संवत्सर कार्तिक शुद्ध १५ शके ११९९
(इ. स. १२७७)

मुक्ताबाईचा जन्म—प्रमाथिनाम संवत्सर आश्विन शुद्ध १ शके १२०१
(इ. स. १२७९)

या सर्व तिथींच्यासंबंधीं निश्चित पुराव्यापेक्षां अनुमानावर अधिक भर आहे हें उघड आहे. एका तिथीसंबधीं निश्चित माहिती आहे असें समजण्यास हरकत नसावी. ती तिथि म्हणजे ज्ञानेश्वरी या ग्रंथाच्या रचनेची समाप्ति. ही समाप्ति देखील कोणत्या वर्षी झाली याचा उल्लेख ग्रंथाच्या शेवटीं पुढीलप्रमाणे "शके बाराशें बारोत्तरें। तैं टीका केली ज्ञानेश्वरें। सच्चिदानंद बावा आदरें लेखकु जाहला" ॥ अ. १८–१८१० या ओंवीत आहे. ज्ञानेश्वरींत अथपासून इतिपर्यंत (म्हणजे ही शेवटची ओंवी सोडून) ग्रंथकर्त्यानें स्वतःचा उल्लेख "ज्ञानदेव" या नांवानें केला आहे; "ज्ञानेश्वर" हें नांव फक्त याच ओवींत आढळतें. ज्ञानदेव ज्ञानेश्वर हे दोन होते कीं काय या वादालाही कारणीभूत असणाऱ्या गोष्टींत ही शेवटची ओवी आहे. शिवाय, यांत उल्लेखिलेल्या सच्चिदानंद बावा याचीही हकीकत चमत्कारपूर्ण अशी आहे. तेव्हां ही शेवटची ओवी ज्ञानदेवांची कां सच्चिदानंदबावांची कां एकनाथाची कां आणखी कोणाची यासंबंधीं निश्चितता वाटत नाहीं. शिवाय येवढा ग्रंथ पूर्ण झाला, त्याचे रचनासमाप्तीचे वर्ष दिलें, पण तिथि कां दिली नाहीं ? असे अनेक प्रश्न उभे राहतात. तूर्त त्यांत न शिरतां आपण शके १२१२ हा ज्ञानेश्वरी समाप्तीचा काळ समजू; निदान प्रत्यक्ष कागदपत्रांत कित्येक शतकें चालत असलेला एवढाच पुरावा उपलब्ध आहे. शके १२१२ म्हणजे इ. स. १२९०. आतां जर ज्ञानदेवांचा जन्म शके ११९७ या वर्षी झाला तर ज्ञानेश्वरी समाप्तिकाळीं त्यांचें वय १५ वर्षांचें असणार. ग्रंथाची रचना वर्षभर चालली होती असें समजलें तर वयाच्या १४ व्या वर्षी ग्रंथरचनेला सुरवात झाली असें म्हटलें पाहिजे. या वेळीं निवृत्तिनाथ सोळा वर्षांचे; सोपानदेव बारा वर्षांचे आणि मुक्ताबाई दहा वर्षांची असें दिसतें. ज्ञानेश्वरी ग्रंथसमाप्तीनंतर दहा वर्षांनीं म्हणजे वयाच्या एकविसाव्या वर्षी ज्ञानदेवांनीं समाधि घेतली (कार्तिक वद्य १३ शके १२१८ म्हणजे इ. स. १२९६) ग्रंथांतील विवेचनावरून

ज्ञानेश्वरी चौदा वर्षांच्या मुलानें लिहिली असें वाटत नाहीं. आतां श्रद्धा बळकट असल्यावर कोणताही चमत्कार पटेल, पण कित्येक प्रसंग असे येतात कीं तेथें श्रद्धावंतांची श्रद्धाही लटपटते. तसाच प्रकार या ज्ञानदेवकालीन कालनिर्णयाचा आहे. यासंबंधीं अधिक चर्चा होणें जरूर आहे. त्या चर्चेचा परिणाम निश्चित प्रमाण उपलब्ध करण्यांत होणार नाहीं हें वाचकांनीं प्रथमच लक्षांत ठेवावें. पण चर्चेमुळें कित्येक गोष्टी अधिक स्पष्ट होण्याचा संभव आहे. असो. याप्रमाणें विठ्ठलपंत परत संसारांत पडल्यावर त्यांना चार अपत्यें झालीं.

या अपत्यांचीं नांवेंही कुतूहल उत्पन्न करणारीं आहेत. पंढरपूरच्या एकादशीच्या यात्रेंत या चार नांवांचा जयघोष पांडुरंगाच्या नांवाच्या जयघोषाइतकाच सर्व लोक प्रेमानें करतात. "निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाई एकनाथ नामदेव तुकाराम" ही आरोळी महाराष्ट्राच्या वाङ्मयाचा, महाराष्ट्रधर्माचा, महाराष्ट्रपरंपरेचा, शिवछत्रपतींच्या कालापर्यंतचा इतिहास एका ओळींत, एका मंत्रांत, सांगते. वडिलांचे नांव विठ्ठलपंत, आईचें नांव रुक्मिणी, मुलांची नांवें अशीं पुरेपूर काव्यमय ! हा काय चमत्कार आहे ! प्रथम निवृत्ति, मग ज्ञान, आणि या सोपानानें मुक्तीची प्राप्ति अशी यावर हरिदासी कोटीही बसलेली आहे. कसेंही असो, हीं नांवें मराठी भाषा बोलणाऱ्यांनीं जिव्हाग्रीं धारण करून मस्तकानें वंदिलेलीं आहेत. या नांवांत महाराष्ट्राचें भाग्य मूर्तिमंत सांचलेलें आहे. या नांवांत मराठी वाङ्मयाच्या थोरवीचा, सौंदर्याचा, विचारशक्तीचा, बोधसामर्थ्याचा पूर्णावतार दृश्यमान होतो. आणि ज्या मातापितरांच्या पोटीं हीं चार मुलें जन्माला आलीं त्यांचा वृत्तांत, त्यांतील असामान्यपणा, त्या विठ्ठलपंताची परमार्थलालसा आणि त्याचें धारिष्ट, त्या रुक्मिणीबाईची श्रद्धा आणि अपूर्व सहनशक्ति, या सर्वांचा विचार केला म्हणजे आश्चर्य वाटतें ! निदान या भावंडांच्या असामान्यतेचा, अलौकिकतेचा प्रारंभ त्यांच्या मातापितरांपासून झाला होता असें वाटल्यावांचून रहात नाहीं. आणि अभंग लिहिणारा ज्ञानदेव व ज्ञानेश्वरी लिहिणारा ज्ञानदेव हे एकच का दोन भिन्न भिन्न व्यक्ति या वादाची चर्चा करतांनासुद्धां "बाप रखुमादेवीवर" हा चरण वरचेवर मनांत येऊन शांत रसाच्या आविष्कारानें शृंगार रसावर मात करणाऱ्या कविराजराजेश्वरानेंच आपल्या मातापितरांचा हा उल्लेख अत्यंत प्रेमळपणानें केला असला पाहिजे असें वाटूं लागतें. कारण

मुलांनीं ज्यांना केवळ देवतास्वरूप मानावें, ज्यांच्या तीर्थरूपत्वाबद्दल कसलीही शंका त्यांच्या मनांत कधींही येऊं नये असेच मातापितर या चार अपत्यांना लाभले होते यांत शंका नाहीं.

कालनिर्णय कांहींही ठरो–इतिहासाच्या यथास्थित ज्ञानासाठीं त्याचें महत्त्व अतिशय आहे–हीं चार भावंडें जन्माला आलीं याबद्दल वाद नाहीं किंवा मतभेद नाहीं. शेक्सपीयर होता किंवा नाहीं आणि त्याच्या नांवावर प्रसिद्ध असलेलीं नाटकें त्याचीं, कां दोहों पक्षांकडून लांच खाणारा पण अतिबुद्धिमान् व महाज्ञानी न्यायाधीश लॉर्ड बेकन यानें तीं लिहिलीं हा वाद जसा विलायतेंत गाजतो आहे तसा वादाच्या तडाक्यांत तरी ज्ञानदेव नाहींत हेंच आपण भाग्य समजावें. बरोबर कोणत्या सालीं ते होते याचा निर्णय जरी लागत नाहीं तरी ते होते याबद्दल शंका नाहीं. या मुलांच्या जन्मामुळें अर्थात् विठ्ठलपंताच्या संसारांत नवीनच गोष्टी उत्पन्न झाल्या. त्यांचा संबंध या भावंडाच्या चरित्राशीं प्रत्यक्ष आहे. नवीन सुधारणा अंगिकारिली कीं तिच्या बाबतींत कसाला लागण्याचा खरा प्रसंग मुलेंबाळें झालीं म्हणजेच येतो. विठ्ठलपंताचा समाजानें छळ केला; त्याची त्यानें परवा केली नाहीं. पण घरीं मुलें नांदूं लागल्यावर त्या छळाबद्दल त्याला बेपरवा राहणें शक्य नव्हतें. आणि तोच प्रसंग विठ्ठलपंत व रुक्मिणीबाई यांच्यावर आला.

# भाग तिसरा

## चार मुलें विरुद्ध जग

तिन्ही देव जैसे परब्रह्मींचे ठसे । जगीं सूर्य जैसे प्रकटले ॥
धन्य तो निवृत्ति धन्य तो सोपान । धन्य तो निधान ज्ञानदेव ॥
उपजतां ज्ञानी हें वर्म जाणोनी । आले लोटांगणीं चांगदेव ॥
प्रत्यक्ष पैठणीं भटीं केला वाद । रेड्यामुखीं वेद बोलविले ॥
सोहंसुकृताच्या सोडोनिया गांठी । केलीसे मराठी गीतादेवी ॥
नामा म्हणे सर्व सुकृत लाहिजे । एक वेळ जाइजे अलंकापुरा ॥

नामदेव

शंकर निवृत्ति हरि तूं ज्ञानेश, ब्रह्मदेव सोपान ।
चिद्या मुक्ता, तुमच्या कीर्तिसुधेचें सदा असो पान ॥

मोरोपंत

विठ्ठलपंतांच्या चार मुलांच्या जन्माचा कालनिश्चय करणें ही गोष्ट मागील भागांत सांगितल्याप्रमाणें कठीण असली तरी जो पुरावा उपलब्ध आहे यावरून ती ठरलेली आहे तशी ग्राह्य धरून पुढें जाणें तूर्त श्रेयस्कर आहे. संन्यासाचा संन्यास करून गृहस्थाश्रमांत पुनश्च प्रविष्ट झाल्यावर विठ्ठलपंतांना बारा वर्षांनीं मुलें होण्यास सुरवात झाली व एकामागून एक अशीं चार मुलें यांना सहा वर्षांच्या अवधींत झालीं. विठ्ठलपंत व त्यांचे कुटुंब हे सर्व या कालांत बहिष्कृतच होते; केवळ सासऱ्यानें दिलेल्या सुखवस्तूपणामुळें यांच्यावर उपासमारीची किंवा तशीच बिकट अशी कांहीं आपत्ति आली नाहीं. हिंदु समाजांत बहिष्कार ही गोष्ट किती खडतर होती याची कल्पना १९४० सालच्या पुण्यांत किंवा मुंबईत राहणाऱ्या कोणालाही येण्याचा संभव नाहीं. यापूर्वी पन्नास साठ वर्षांवर नजर फेकली तरीसुद्धां तेव्हां बहिष्कार फार कडा होता. पुण्यांत गाजलेल्या चहाग्रामण्यप्रकरणांत महादेव गोविंद रानडे यांच्यासारख्या गृहस्थानें प्रायश्चित्त घेतलें व बाळ गंगाधर टिळकां-सारख्यांनीं शास्त्रार्थाचे भारे उभे करून आपण कांहींही अशास्त्र आचरण केलें

नाहीं हें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला; या गोष्टींत त्या त्या व्यक्तींच्या माथीं दुर्बळपणा देण्याचा प्रयत्न जरी योग्य ठरला तरी अशा व्यक्तीसुद्धां बहिष्काराला भीत होत्या ही गोष्ट सिद्ध रहातेच. १८९० सालानंतरची जर ही स्थिति तर त्याच्या पूर्वी सहाशें वर्षे हिंदु समाजांत या अस्त्राची प्रखरता किती असेल याची कल्पना करतां येईल. बहिष्कारांत बारा वर्षें काढल्यानंतर विठ्ठलपंतांना मुलें व्हावींत हा त्यांच्या व त्यांच्या सुशील पत्नीच्या आयुष्यांतील एक योगायोग होता; पण त्याचबरोबर बहिष्कार भोगण्याची बारा वर्षे म्हणजे एक तप तपश्चर्या केल्यावर त्यांना ही फळप्राप्ति झाली ही गोष्टही आश्चर्यकारक वाटते. जीं असाधारण मुलें त्यांना झालीं तशीं मुलें खरोखर तपश्चर्येशिवाय, पुण्याईशिवाय होणें दुर्लभ असें जर जुन्या समजुतीच्या माणसांनीं म्हटलें तर नव्या समजुतीच्या माणसांनाही तें मान्य करावें लागेल. कुमारसंभव काव्यांत शंकराचा पार्वतीशीं विवाह जमवितांना सप्तर्षि हिमाचल पर्वतराजाला सांगतात— " हा शिव विश्वगुरु आहे. याचा सासरा होऊन विश्वगुरुचा गुरु होण्याचा मान तूं मिळव." त्याचप्रमाणें मराठी भाषा बोलणाऱ्यांचे आज सहाशें वर्षे खरोखर " जगद्गुरु " झालेले ज्ञानदेव यांच्या पितृत्वामुळें " विश्वगुरोर्गुरुः " ही पदवी विठ्ठलपंतांना लाभली आहे यांत शंका नाहीं; आणि ही पदवी प्राप्त होण्याला लोकच्छल सोसण्याची तपश्चर्या त्यांनीं बारा वर्षे केली होती. लोकांनीं त्या वेळच्या आपल्या समजुतीप्रमाणें वर्तन केलें; बहुतेकजण आपल्या काळच्या समजुतीपलीकडे जाऊं शकत नाहींत म्हणून त्यांनीं केलेला छळ प्रसन्न अंतःकरणानें सोसणें हेंच खऱ्या सुधारकीचें लक्षण आहे.

महिपतीच्या भक्तविजयांत आणि निरंजनमाधवाच्या ज्ञानेश्वरविजयांत विठ्ठलपंताच्या बहिष्कृत जीवनाचा वृत्तांत बराच काव्यमय प्रकारानें वर्णन केलेला आहे. नामदेवाचे अभंगचरणः—

द्विजीं वाळियेले जगीं सांडियेले । शेखीं उपेक्षिले आप्तवर्गीं ॥

आणि महिपतीची ओंवीः—

द्विजीं घातले वाळित । आप्तवर्गीं सांडिले त्वरित ॥

हे एकच अर्थ प्रतीत करतात. वैराग्याच्या पहिल्या उमाळ्यांत विठ्ठलपंतानें आपल्यावर असलेली पत्नीची जबाबदारी विसरून असत्याचरण केलें व प्रत्यक्ष

आपल्या गुरुजवळ खोटी गोष्ट सांगितली; गुरूला खरी गोष्ट कळतांच त्यानें विठ्ठलपंताला गृहस्थाश्रमांत परत धाडलें व ही गोष्ट लौकिक समजुतीविरूद्ध असतांनासुद्धां विठ्ठलपंतानें गुरूची आज्ञा म्हणून सर्वथा पाळली. वैराग्यसुद्धां विचारमूलक पाहिजे ही गोष्ट त्याला प्रत्यक्ष अनुभवानें समजली. साडेसहाशें वर्षांपूर्वीच्या महाराष्ट्रांत विठ्ठलपंताला बहिष्कृत झाल्यामुळें पुष्कळ त्रास सोसावा लागला असेल यांत शंका नाहीं. पण भजनपूजनांत वेळ घालविण्याची त्याला संवय असल्यामुळें त्यानें लोकनिंदेची परवा न करतां दिवस काढले व त्याच्या या जीवनांत त्याची पत्नी रुक्मिणीबाई इनें पूर्ण साहाय्य केलें यांतही शंका नाहीं. ज्ञान आणि वैराग्य, भक्ति आणि विशुद्ध आचरण यांच्या जोरावर या जोडप्यानें आयुष्य घालविलें व मुलांची निगा उत्तम केली. ज्ञानेश्वरींत ज्या ज्या ठिकाणीं आईबापांचा विशेषतः आईचा वर्णनसंदर्भ येतो त्या वेळीं ज्ञानदेवांची कोमल भाषा कोवळीकपणाची मूर्तिमंत मूस आहेसे वाटतें आणि या ओंव्या लिहिणाऱ्याला अत्यंत प्रेमळ आईचा सहवास होता असें पटल्याशिवाय रहात नाहीं. आणि म्हणूनच "बाप रखमादेवीवर" हे शब्द ज्ञानदेवाचेच आणि त्यांत त्यांची मातापितरांबद्दल निस्सीम प्रेमभावना सांठविलेली आहे, असें वाटतें. हीं मुलें हळूहळू वाढू लागली आणि थोरला मुलगा सहा सात वर्षांचा झाल्यावर अर्थात् त्याच्या व्रतबंधाचा-मुंजीचा विचार विठ्ठलपंत व रुक्मिणीबाई यांच्या मनांत यावा हें साहजिक होतें.

जन्मना जायते शूद्रः संस्काराद्द्विज उच्यते ।

या शास्त्रवचनाला अनुसरून निवृत्तिनाथाला मुंज झाल्याशिवाय ब्राह्मण म्हणवून घेतां आलें नसतें. आणि या मुंजीच्या प्रश्नामुळेंच बहिष्काराचा घोर परिणाम विठ्ठलपंताच्या पुढें उभा राहिला. सध्यांच्या काळांत संस्कार शब्दाला हास्यास्पदता प्राप्त झाली आहे व तसें होण्याला सनातनी म्हणविणारांनीं संस्काराच्या अर्थाचा अनर्थ केला हें एक बलवत्तर कारण आहे. पण ज्या समाजांत संस्काराला अतिशय महत्त्व होतें तेथें तो करावयास न मिळणें म्हणजे कोणासही अतीव दुःख होणारच. संन्याशाचीं मुलें त्यांचें अस्तित्व मान्य करण्यालाही समाज जेव्हां तयार नव्हता तेव्हां तशा मुलाची मुंज करण्याला संमति कोण देणार? आळंदी गांवच्या ब्राह्मणांनीं तर असली मुंज करण्याचें साफ नाकारलें यांत नवल नाहीं; आज आळंदीचें सर्व भाग्य

ज्ञानदेवांच्या कृपेमुळें आहे. वर्षांतून लाखो लोक आळंदीला धावतात तें ज्ञानदेवाच्या समाधीचें दर्शन घेण्यासाठीं; " आळंदी हा गांव । विश्रांतीचा ठाव " जर झाला असेल तर ती ज्ञानदेवाची पुण्याई. पण त्याच गांवांत ज्ञानदेव आणि त्यांचीं भावंडें यांना ब्राह्मण म्हणून कोणीही मान्य केलें नाहीं. असो. तेव्हां हें आलेलें संकट पार पडावें म्हणून विठ्ठलपंत व रुक्मिणीबाई हे मुलांना घेऊन पुरश्चरण करण्यासाठीं त्र्यंबकेश्वराला गेले. असें सांगतात कीं सहा महिने त्यांनीं दररोज ब्रह्मगिरीला प्रदक्षिणा घातली. बरोबर मुलेंही असत. या पुरश्चरणामुळें बहिष्कार उठला नाहीं पण निवृत्तिनाथांना आपल्या गुरूची प्राप्ति झाली व या भावंडांच्या इतिहासांत ती फार महत्वाची गोष्ट होती.

२ निवृत्तिनाथांना नाथपंथाचे गैनीनाथ हे सत्पुरुष गुरु कसे प्राप्त झाले हें आपण पुढें पाहूं. तूर्त त्याच्या मुंजीच्या प्रश्नांतून उत्पन्न झालेल्या वादाकडे आपण लक्ष देऊं. त्र्यंबकेश्वरीं कित्येक महिने पुरश्चरण करून विठ्ठलपंत सहकुटुंब आळंदीला परत आले. मुलें मोठीं होत चाललीं. त्र्यंबकेश्वरीं निवृत्तिनाथ हे गैनीनाथाचे शिष्य होऊन योगमार्गांत त्यांचा प्रवेश झाला व हळूहळू व्यवहारांतील गोष्टीही त्यांना समजूं लागल्या. अगदीं लहान वयापासून या मुलांना लोकांचा तिरस्कार सहन करावा लागला. बाहेरचीं माणसें कोणी जवळ करीनात तेव्हां आईबाप व हीं भावंडें यांच्यांतील जवळपणा अधिकच वाढला. या चार भावंडांतील एकोपा व परस्पर प्रेम हीं मोठीं लक्ष्यांत ठेवण्यासारखीं आहेत. आपली मुंज कां होत नाहीं हें निवृत्तीला समजलें व तोही हळूहळू वादांत भाग घेऊं लागला असें दिसतें. लहान वयांतच व्यवहाराची आंच लागल्यामुळें या भावंडांच्या भावना व विचारशक्ति हीं अल्प वयांतच परिणतावस्थेला गेलीं असावींत असें स्पष्ट दिसतें. आपल्या मुलांच्या मुंजी होणार नाहींत, आपल्या मुलीचें लग्न होणार नाहीं या विचारानें बिचारा विठ्ठलपंत व त्याची पत्नी हीं तळमळूं लागलीं व आळंदीच्या ब्राह्मणांकडे त्यानें प्रायश्चित्ताची याचना केली. वाटेल तें प्रायश्चित्त मी घेण्यास तयार आहे पण माझ्या मुलांना शुद्ध होऊंद्या, ब्राह्मण होऊंद्या अशी त्याची प्रार्थना होती. पण रूढीनें जखडलेल्या ब्राह्मणांनीं ती मान्य करणें शक्य नव्हतें. त्यांनीं विठ्ठलपंतांना सांगितलें कीं, " तुमच्या वर्तनाला प्रायश्चित्तच नाहीं व तुमच्या मुलांचे संस्कार व्हावयाचे नाहींत. तुमच्या पुरतें तुम्हांला

प्रायश्चित्त म्हणजे देहांत प्रायश्चित्त." हा ब्राह्मणांचा कठोर निर्णय विठ्ठलपंतांनीं ऐकला व गुरुच्या आज्ञेनें संसाराला सन्मुख झालेलें त्यांचें चित्त पुनः वैराग्याकडे वळलें. आपण जिवंत आहोंत तोंपर्यंत आपल्या मुलांवरचा अपवाद नाहींसा होणें शक्य नाहीं असेंही त्यांना वाटलें असावें. कांहींही असो, ब्राह्मणांनीं सुचविलेल्या देहांत प्रायश्चित्ताचा मार्ग ग्रहण करण्याचें विठ्ठलपंतांनीं ठरविलें व त्यांचेंच अनुकरण करण्याचें रुक्मिणीबाईंनीं ठरविलें. अनेक तीर्थयात्रा करून भागीरथीचें दर्शन घेऊन तिच्या तीरावर एक वेळ विठ्ठलपंतांनीं वास्तव्य केलें होतें. भागीरथीचा गुणच असा आहे कीं तिच्या तीराची गोडी लागलेला माणूस काशीप्रयागपासून गंगोत्रीपर्यंत केव्हां मजल मारील याचा नियम नाहीं. ब्राह्मणांनीं बहिष्कृत केलेलें आपलें शरीर गंगायमुनांच्या पवित्र संगमांत टाकून सर्व सांसारिक पातकांतून मुक्त व्हावें असें विठ्ठलपंतांनीं ठरविलें. एवढ्या आयासानें परत आलेला पति मुलांच्या प्रेमासाठीं म्हणून सुद्धां पुनः गमविण्याला रुक्मिणीबाई तयार नव्हती. त्या दोघांनींहीं प्रयाग क्षेत्रीं जाऊन तेथें पूर्वेकडून आलेली जान्हवी आणि पश्चिमेकडून आलेली यमुना यांचा संगम झालेला आहे तेथें देह विसर्जन करावयाचें असें निश्चित केलें. निवृत्तीचें वय या वेळीं दहा अकरा वर्षांचें तर ज्ञानदेवाचें वय आठ नऊ वर्षांचें होतें. मुक्ताबाई तर पांच साडे पांच वर्षांची केवळ बालिका होती. पण रूढि राक्षसीनें ग्रासलेल्या समाजाच्या छळाला कंटाळून या दांपत्यानें ब्राह्मणांनीं सुचविलेलें घोर प्रायश्चित्त घेण्याचें ठरविलें. आपल्या मधुर बालकांचें प्रेमही त्यांनीं आपल्या निश्चयाला आडवें येऊं दिलें नाहीं. एका दृष्टीनें हा विठ्ठलपंतांचा भित्रेपणा होता असें म्हणण्याचा मोह कोणाला होईल. पण शिलावस्थेप्रत पोंचलेल्या त्या समाजांत कसलाही फेरफार करणें निदान विठ्ठलपंताच्या शक्तीपलीकडचें होतें. त्याचा काळ, त्याची परिस्थिति, त्याच्या स्वतःच्या धर्मविषयक आणि कर्तव्यविषयक समजुती या सर्वांचा विचार केला म्हणजे जीवितार्चे सर्वस्व दान करण्याचा निश्चय केल्याबद्दल विठ्ठलपंतांना दोष देतांना, भित्रा म्हणतांना, जरा मन चाचरतें. भित्रीं माणसें देहाला जपतात. देहाची परवा न बाळगणाऱ्यांना भित्रे म्हणणें शक्य नाहीं. देहत्याग ही साधी गोष्ट नाहीं, सोपी गोष्ट नाहीं. विठ्ठलपंत हा निर्धाराचा माणूस होता ही गोष्ट निःसंशय; आपल्या मागें आपल्या मुलांचें काय होईल हा विचार त्याच्या मनांत आला नसेल असें कसें म्हणावें? पण

ईश्वरभक्तींत मुरलेली त्याची बुद्धि परमेश्वरावर हवाला ठेवूनच देहांत प्रायश्चित्त घेण्याला तयार झाली. विठ्ठलपंत आणि रुक्मिणीबाई हें महाराष्ट्रांत रूढीच्या राक्षसी वृत्तीला बळी पडलेलें दांपत्य होय. त्यांनीं कसलेंही पापाचरण केलें नव्हतें; फार तर औपचारिक प्रमाद त्यांच्या हातून घडला होता. रामानंद यतींनीं जो बुद्धीचा प्रगल्भपणा दाखविला तो समाजांतील शास्त्रीपंडितांच्या ठिकाणीं नव्हता. संन्याशानें पुनः संसारांत (कांहीं विशिष्ट परिस्थितींत) येणें हें शास्त्रमान्य नसतें तर रामानंदानें विठ्ठलपंतांना तसें करण्यास सांगितलें नसतें म्हणून तसें करणें सशास्त्र असलें पाहिजे असें कित्येकांचें म्हणणें आहे व तें निरपवाद असण्याचाही संभव आहे. पण सशास्त्रतेचा वाद जेव्हां जेव्हां उपस्थित करण्यांत येतो तेव्हां "शास्त्राद्रूढिर्बलीयसी" या तत्त्वाचा अंमल होतो आणि विठ्ठलपंतांच्या प्रार्थनेचा जो निर्णय आळंदीच्या ब्रह्मवृंदानें लाविला तो त्याच तत्त्वाला अनुसरून होता हें उघड आहे. विठ्ठलपंताचें जीवन याप्रमाणें शोकपर्यवसायी झालें व त्याचीं मुलें उघडीं पडलीं. विठ्ठलपंत व रुक्मिणीबाई हे प्रयागला गेले. मेल्यावर आपल्या अस्थि तेथें त्रिवेणींत पडाव्यात ही धार्मिक हिंदूची भावना असते. या अस्थि तेथें पोचविण्याचें अर्थात् मृतांच्या वारसांवर किंवा आप्तांवर येतें. विठ्ठलपंतांनीं हें काम दुसऱ्या कोणावरही सोंपविलें नाहीं. हिमालयांत बद्रिनाथाला जाऊन ब्रह्मकपालावर ज्या प्रमाणें आत्मपिंड दिला म्हणजे मागच्यांनीं श्राद्ध करण्याची आवश्यकता उरत नाहीं त्याप्रमाणें विठ्ठलपंतांनीं स्वतःच आपला देह त्रिवेणींत समर्पण केल्यामुळें त्यांची कोणी क्रिया करण्याचेंही कारण उरलें नाहीं. विठ्ठलपंतावरोबरच त्यांच्या थोर पत्नीनें, ज्ञानदेवाच्या आईनें, त्रिवेणींत उडी घातली आणि पतीच्या पावलावर पाऊल टाकून ती या जगांतल्या यातनांतून मुक्त झाली. कोट्यवधि जनांच्या अस्थि ग्रस्त करून त्यांचें पाप धुणारी त्रिवेणी या पुण्यशील दांपत्याच्या शरीरसंपर्गानें पुनीत झाली असें निःशंकपणें म्हणण्यास हरकत नाहीं. आईबाप असा घोर निश्चय करून जेव्हां आळंदी सोडून गेले तेव्हां त्या लहान मुलांना काय वाटले हें कोणी लिहून ठेविलेलें नाहीं. नाहीं म्हणावयास ज्ञानदेवाच्या समाधिप्रसंगीं निवृत्तिनाथाला भडभडून आलें त्या प्रसंगाचें वर्णन करतांना नामदेव ( हा कोणता नामदेव हाही वादाचा प्रश्न आहे ) म्हणतो:—

मायबापें आम्हां त्यागियेलें जेव्हां ।
ऐसें संकट तेव्हां झालें नाहीं. ॥

निवृत्तिनाथ या वेळीं दहा अकरा वर्षांचा होता व त्याची छाती त्या वेळीं फाटून गेली असेल. कसेंही असो, विठ्ठलपंत आणि रुक्मिणीबाई याप्रमाणें नाहींशी झाली आणि निवृत्तिनाथावर भावंडांची सर्व जबाबदारी आली. विठ्ठलपंतांचें चरित्र मोठें हृदयद्रावक आहे आणि एखाद्या उत्तम कवीला तो चांगला विषय आहे. हें दांपत्य जगाच्या छळामुळें गेलें पण जगावर त्यांनीं उपकारच केला. त्यांचीं अपत्यें हें महाराष्ट्राचें भाग्य झालें. मराठी वाङ्मयाचें रत्नभांडार निर्माण करणारे ज्ञानदेव त्यांनीं आपणाला दिलें. विठ्ठलपंत आणि रुक्मिणीबाई हे जगद्गुरूचे गुरु होऊन गेले.

३ विठ्ठलपंत व त्यांची पत्नी यांनीं प्रयागला जाऊन जीव देण्यापूर्वीं घडलेली महत्त्वाची गोष्ट म्हणजे निवृत्तिनाथाचा नाथपंथांत समावेश होय. नाथपंथ हा योगमार्गांतील प्राविण्याबद्दल विशेष प्रसिद्ध आहे. या पंथाचा स्थापनकर्ता आदिनाथ म्हणजे श्रीशंकर हा होता असें समजतात. त्यानें महत्त्वाचें ज्ञान आपली पत्नी पार्वती हिला सांगितलें तें मत्स्येंद्रनाथानें मोठ्या चमत्कारिक प्रकारानें ऐकिलें; तेव्हां ऐतिहासिक कालाच्या दृष्टीनें मत्स्येंद्रनाथ हा या पंथाच्या आदिगुरूंपैकीं एक असें समजणें विचारास धरून होईल. मत्स्येंद्रनाथाचा शिष्य गोरखनाथ; त्याचा शिष्य गैनीनाथ. हा गैनीनाथ त्र्यंबकेश्वराच्या डोंगराजवळच्याच एका डोंगरांत तश्चर्या करीत असे. हा आपल्या गुरूप्रमाणेंच योगमार्गांत निष्णात होता. मत्स्येंद्रनाथ, गोरखनाथ व राजा गोपीचंदाची आई मैनावती इचा गुरु व मत्स्येंद्रनाथाचा गुरुबंधु जालंदरनाथ या सर्वांच्या कथा चमत्कारांनीं भरलेल्या आहेत. त्या खऱ्या खोट्या मानणें हा ज्याच्या त्याच्या भावनेचा प्रश्न आहे. चमत्काराशिवाय नमस्कार नाहीं म्हणतात आणि म्हणून नमस्कारार्ह माणसांच्या चरित्रांत अलौकिक चमत्कार झाले म्हणून सांगण्याचा मोह त्यांच्या अज्ञान भक्तांना व शिष्यांना होतो. ते विशिष्ट चमत्कार झाले नसते तरी तीं माणसें नमस्कारार्ह होतीं, किंबहुना त्यांच्या वंदनीयतेचा संबंध त्या चमत्कारांशीं नसून खरोखर दुसऱ्या अस्सल महत्त्वाच्या गोष्टींकडे आहे ही गोष्ट ही अज्ञान मंडळी विसरतात

किंवा दृष्टीआड करतात. ज्ञानदेवांच्या अल्प आयुष्यांत अमृतानुभव आणि भावार्थदीपिका यांची रचना ही गोष्ट भिंत चालविणें किंवा रेडा बोलविणें यापेक्षांहि आश्चर्यकारक आहे हें मूढ किंवा मुग्ध माणसांना कळत नाहीं, वळत नाहीं. मत्स्येंद्रनाथ, जालंदरनाथ. गोरखनाथ यांच्या गोष्टी प्रसिद्ध आहेत व त्यांवर नाटकें आणि चित्रपटही झालेले आहेत तेव्हां त्या कथांचा पुनरुच्चार येथें करण्याचें प्रयोजन नाहीं. गैनीनाथ हा मोठा तपस्वी, वैराग्यशील व योगपारंगत असा पुरुष होता. त्याची व निवृत्तीची गांठ पडली तीही एक चमत्कारच दिसतो, पण त्या चमत्कारांत अलौकिकता, असंभाव्यता नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. त्र्यंबकेश्वरीं अनुष्ठान करीत असतां एक दिवस विठ्ठलपंत आपली पत्नी व मुलें यांना घेऊन डोंगरावरून उतरत असतां एक वाघ आला. त्यामुळें त्या बिचाऱ्यांची त्रेधा उडाली. आपलीं लहान मुलें संभाळण्याच्या भरांत थोरला दहा वर्षांचा मुलगा निवृत्ति हा कोठें नाहींसा झाला हें त्या दांपत्याच्या एकदम लक्षांत आलें नाहीं. पण त्या धांदलींत निवृत्ति पळत सुटला व वाट चुकला व वाट चुकून गैनीनाथ ज्या गुंफेंत ध्यानस्थ म्हणा किंवा तसेंच बसलें होतें तेथें गेला व "मला वाचवा" म्हणून त्यानें त्यांना विनंति केली. या सर्व प्रकारांत थोडीशी काव्यमयता असली तरी असंभाव्यता नाहीं. गैनीनाथांनीं मुलाकडे पाहून त्याच्या उत्तमत्वाबद्दल खूण गांठ बांधली व त्या दहा वर्षांच्या मुलाला गुरूपदेश दिला व त्याला योग शिकविला. गैनीनाथ व विठ्ठलपंतांचे वडील यांचाहि परिचय होता असें दिसतें. अशा प्रकारें ज्याची मुंज करण्याला ब्राह्मण तयार नव्हते व ज्याला समाजांत स्थान नव्हतें त्याला त्या काळच्या या प्रख्यात व मान्य गैनीनाथानें आपल्या पंथांत समाविष्ट करून घेतलें, त्याच्यावर अनुग्रह केला, आणि त्याला योगमार्गांत निष्णात केला. निवृत्तिनाथ हा आपल्या भांवडांचाही गुरू झाला व ज्ञानदेवांच्या ग्रंथांत निवृत्तिनाथाबद्दल अत्यंत प्रेमाचे उद्गार सर्वत्र आढळतात.

आपल्या "श्री ज्ञानेश्वर महाराज—चरित्र आणि ग्रंथविवेचन" या पुस्तकांत रा. रा. ल. रा. पांगारकर लिहितात (पृष्ठ ५१):—"निवृत्तिनाथ कांहीं दिवसांनीं श्रीगुरूंची आज्ञा घेऊन परत आले, आईबापांस व भावंडांस भेटले व ज्ञानेश्वरमहाराजांस त्यांनीं उपदेश केला. श्री ज्ञानेश्वर महाराज आपल्या

वयाच्या आठव्या वर्षींच श्री निवृत्ति गुरूपासून उपदेश घेऊन पूर्णतेस पावले." गैनीनाथांचे शिष्य निवृत्ति आणि निवृत्तिनाथाचे शिष्य ज्ञानदेव झाले. वयाच्या आठव्या वर्षीं ज्ञानदेवांची शास्त्रोक्त मुंज झाली नाहीं पण त्यांना यथाविधि गुरूपदेश मिळाला आणि गुरुसंनिध जाणें हा व्रतबंधाचाही हेतु असल्यामुळें ज्ञानदेवांची ही लौकिक नव्हे पण पारमार्थिक मुंजच झाली असें म्हणतां येईल. या ठिकाणीं प्रश्न येतो तो असा—निवृत्तिनाथ दहा वर्षांचा मुलगा नाहींसा झाला व पुढें कित्येक दिवस त्याचा पत्ता नव्हता. त्यावेळीं विठ्ठल-पंतांनीं काय केलें? कांहीं चौकशी केली नाहीं काय? नाहींसा झालेला मुलगा केव्हांना केव्हां तरी परत येईल अशा भरवंशानें ते स्वस्थ बसले असतील हें संभवनीय नाहीं. आणि गैनीनाथांचा आश्रम त्र्यंबकेश्वराहून तसा फार दूर नव्हता. मुलाला हुडकण्यासाठीं विठ्ठलपंत ब्रह्मगिरींत वगैरे आसपास सर्वत्र फिरला असेल व गैनीनाथासारखा थोर सत्पुरुष जवळपास रहातो हेंही त्याला माहीत नसणें शक्य नाहीं. वाघ आला आणि मुलगा पळत पळत नाहींसा झाला व मग तो गैनीनाथांच्या आश्रमांत किंवा गुहेंत शिरला ही गोष्ट मोठी काव्यमय आहे यांत शंका नाहीं; व ती त्याच प्रकारानें अधिक काव्यमय करतां येईल. पण दुसरीही गोष्ट संभवनीय वाटते. जो प्रचलित कथा आहे ती खोटी आहे असें म्हणण्याचें धाडस न करतां संभाव्यतेच्या दृष्टीनें दुसरी गोष्ट सुचविणें इष्ट वाटतें. ब्राह्मण्याची दीक्षा आपल्या मुलांना मिळत नाहीं हें विठ्ठलपंताला कळून चुकलें होतें. तेव्हां कोणत्या तरी प्रकारानें आपल्या मुलांना समाजांत मान्यता मिळावी, योग्य स्थान मिळावें ही त्याची इच्छा असणारच आणि एखाद्या नामांकित पंथांत प्रवेश करून एखाद्या थोर गुरूचें शिष्यत्व मिळविणें हाच प्रकार सुलभ होता. विठ्ठलपंतासारख्या परमार्थचिंतन करण्याऱ्या गृहस्थाला त्र्यंबकेश्वरीं चार सहा महिने राहिल्यावर जवळपास वास्तव्य करणाऱ्या गैनिनाथासारख्या एका मोठ्या पंथाच्या गुरूचें नांव माहीत झालें असलें पाहिजे व तो कधीं कधीं त्यांना जाऊन भेटलेलाही असला पाहिजे व शेवटीं विचारपूर्वक त्यानें आपला थोरला मुलगा गैनीनाथाचा चेला होण्याबद्दल संमति दिलेली असली पाहिजे. शिवाय गैनीनाथ हा विठ्ठलपंतांच्या वडिलांना ओळखे तेव्हां हीच गोष्ट अधिक संभवनीय आहे हें उघड आहे. संसार हा आपल्या मुलांना दुर्लभ झाला हें विठ्ठलपंत पहात होता;

स्वतः संसाराला महत्व देणारा नव्हता; पण मनुष्यदेहाचें सार्थक झालें
हेजे ही त्याची समजूत होती व तें गैनीनाथाचा अनुग्रह झाल्यास
वृत्तिनाथाच्या बाबतींत होईल असें त्याला वाटलें. म्हणून त्यानें आपण
ऊन निवृत्तीला गैनीनाथाच्या पायांवर नेऊन घातलें व त्या महापुरुषानें
वृत्तीला पाहतांच त्याच्यावर अनुग्रह केला ही गोष्ट निःसंशय ज्यास्ती
ावनीय आहे. डोंगरावर हिंडतांना विठ्ठलपंताला व त्याच्या मुलांना वाघ
ाला नसेल असें नाहीं व वाघापासून बचाव होण्याकरितां निवृत्तिनाथ
ोनाथाच्या गुंफेंत गेला नसेल असेंही नाहीं. पण सद्गुरूचा जो अनुग्रह
ृत्तीवर झाला तो विठ्ठलपंताच्या संमतीनें नव्हे तर प्रयत्नानें झाला ही गोष्ट
म्हांला अधिक संभवनीय वाटते म्हणून तिचा येथें उल्लेख केलेला आहे.
४ तेव्हांच्या कालाच्या मानानें या मुलांना ब्राह्मणाच्या घरीं जें शिक्षण
ावयाचें तें मिळालें. विठ्ठलपंत हा परमार्थनिष्ठ होता म्हणून वेदांतासारख्या
ायाकडेही त्यांचें लक्ष लागण्यासारखी परिस्थिति होती. गैनीनाथाचा
ग्रह झाल्यानंतर निवृत्तीचा योगाभ्यास सुरू झाला व ज्ञानदेवानेंही ज्येष्ठ
चा उपदेश घेऊन योगाभ्यासांत पारंगतता मिळविली. ज्ञानेश्वरींत आलेल्या
ाच्या वर्णनावरून ज्ञानदेव योगांत प्रत्यक्ष अनुभव घेतलेले होते हें स्पष्ट
तें. त्यासंबंधीं सविस्तर चर्चा पुढें "योगमार्ग–पंथराज" या भागांत
ली आहे. योगसाधनांत प्रविष्ट होण्याला जे प्राथमिक गुण लागतात ते
ृत्तिनाथ व ज्ञानदेव यांच्यांत होते ही गोष्ट आपोआपच मान्य केली
हजे. कळावयाला लागल्यापासून या भावंडांना लोकनिंदेचें–बहिष्काराचें
तर स्वरूप नजरेसमोर होतें. ज्या वयांत त्यांनीं खेळावें, बागडावें, केवळ
ंदांत असावें त्याच वयांत खडतर व्यवहाराशीं टक्कर देणाऱ्या आपल्या
बापांची परिस्थिति त्यांना पहावी लागली. पूर्वींच्या काळीं दहा दहा
बारा वर्षें वयाच्या मुली लग्नाच्या काळजीमुळें जशा अकालीं जाणत्या होत,
च प्रकार या मुलांच्या बाबतींत झाला. सुदैवानें गैनीनाथांचा अनुग्रह
यामुळें आपण कोठें तरी आहों, कुणाचे तरी आहों, असें वाटणें सुलभ
आणि म्हणून तशा प्रखर स्थितींतसुद्धां त्या भावंडांची मनें अप्रसन्न
ीं नाहींत, द्वेष किंवा असूया, चिरड आणि संताप यांचा प्रवेश त्यांच्या
ःकरणांत झाला नाहीं. जात्याच तीं मुलें उत्तम होतीं. त्यांतही गैनीनाथाच्या

समागमामुळें त्यांच्या आयुष्याला नवीन वळण लागलें. पुढें लोकापवादाला कंटाळून विठ्ठलपंत व त्याची पत्नी हीं प्रयागला गेलीं व तेथें त्यांनीं त्रिवेणीच्या प्रवाहांत आपले देह टाकले अशा प्रसंगींही गैनीनाथांचें पाठबळ हेंच त्यांना आधारभूत होतें. कदाचित् असेंही झालें असेल कीं गैनीनाथासारख्या सत्पुरुषाची कृपा आतां आपल्या मुलांवर आहे तेव्हां आतां आपण मुलांसाठीं म्हणून जगण्याची आवश्यकता नाहीं असें विठ्ठलपंतांना वाटलें. कांहींही असो, हीं पोरकीं झालेलीं मुलें आतां स्वतःच्या पायांवर उभीं राहिलीं. तसें केल्याशिवाय त्यांना गत्यंतर नव्हतें. गुरूपासून ज्ञान व विद्या, संप्रदाय आणि तपस्या यांची प्राप्ति निवृत्तीनें फार जलद करून घेतली ही त्या गुरुची थोरवी कीं निवृत्तीची थोरवी कीं दोघांच्याही थोरवीचें संमिश्र कार्य या वादांत आपण पडण्याचें कारण नाहीं. समाजबंधनें फाजील कडक झालीं व न्यायापेक्षां तंत्राला अधिक महत्त्व आलें म्हणजे त्याच्याविरुद्ध बंड होणें अपरिहार्य असतें. निवृत्तिनाथानें ज्ञान व शिक्षण मिळविल्यानंतर आपण सशास्त्र मुलें आहोंत हें सिद्ध करण्याचें ठरविलें व त्यासाठीं आळंदीच्या ब्राह्मणांपासून तो पैठणच्या ब्राह्मणांपर्यंत प्रयत्न केला. पैठण हें त्या वेळीं व त्याच्या पुढेंही कित्येक शतकें सामाजिक वादांचें न्यायासन होतें मुसलमानी कागदपत्रांत सुद्धां हिंदूंच्यासंबंधीं सामाजिक व (म्हणजेच) धार्मिक वाद निकालाकरितां मुसलमान बादशहा व अधिकारी पैठणास पाठवीत असत. हा आपल्या वडिलांनीं चालू केलेला वाद आपण धसास लावला पाहिजे अशी निवृत्तीची इच्छा होती व त्या बाबतींत शास्त्रीपंडितांशीं वादविवाद करण्याची तयारीही त्यानें केली होती असें स्पष्ट दिसतें. बारा वर्षांचा निवृत्ति व दहा वर्षांचा ज्ञानदेव अशीं हीं दोन मुलें अवघ्या जगाशीं टक्कर देण्यासाठीं, न्याय मिळविण्यासाठीं, स्वतःचा शुद्धपणा सिद्ध करण्यासाठीं बाहेर पडलीं हा देखावा खरोखरच जितका आश्चर्यजनक तितकाच स्फूर्तिदायक आहे यांत शंका नाहीं.

आईबाप गेल्यानंतर हीं मुलें आपल्या गांवीं म्हणजे आपेगांवीं गेलीं. तेथें त्यांच्या भाऊबंदांनीं त्यांना मुळींच थारा दिला नाहीं तेव्हां त्या अर्भकांना भिक्षा मागून पोट भरण्याचा प्रसंग आला. निवृत्ति व ज्ञानदेव या जोडीनें कोरान्न मागण्यास हिंडावें व छोट्या मुक्ताला सोपानानें सांभाळावें असा क्रम कित्येक दिवस चालला होता. वडिलांचें कांहींही पापाचरण झालें असलें तरी

हीं मुलें निरपराध आहेत ही दृष्टि त्या वेळच्या समाजांत आलेली नव्हती. ज्या ज्ञानदेवांनीं आपल्या अमृतमय वाणीचा वर्षाव करून महाराष्ट्रीयांना कायमचें समाधान मिळेल असा उपदेश केला, कर्तव्यमार्ग शिकविला, परमार्थ सांगितला, त्यांना कोरान्न मागावें लागलें, त्यांना बाळपणीं कोणीही थारा दिला नाहीं, आपल्या लहानग्या बहिणीचें संरक्षण त्यांनाच आपापसांत करावें लागलें हें चित्र अत्यंत हृदयद्रावक तर आहेच पण अशा परिस्थितीशीं बालवयांतच झुंजावें लागल्यामुळें निवृत्ति व ज्ञानदेव लौकर शहाणे झाले असें म्हणतां येईल. "चणे खावे लोखडाचे । तेव्हां देवपदीं नाचे" असें पुढें सुमारें चारशें वर्षांनीं ज्ञानदेवांना परात्पर गुरू मानणाऱ्या तुकारामांनीं म्हटलें तें अक्षरशः खरें आहे. महाराष्ट्राच्या संतमालिकेंत शोभण्याला अत्यंत योग्य अशा आगरकरांनाही बाळपणीं असेच वनवास काढावे लागले होते. विद्यार्जनाच्या इच्छेनें अल्पवयांत त्यांनीं सातार्‍यापासून रत्नागिरीपर्यंत पायीं प्रवास केला. निवृत्ति ज्ञानदेवही मातापितरांचा आधार तुटल्यावर जीविताच्या संग्रामांत निर्भयपणानें शिरले, अगदीं बाळपणीं लढले आणि म्हणूनच त्यांना व्यवहाराचें सर्व ज्ञान एवढ्या बालवयांत झालें. ज्ञानदेवाच्या ग्रंथांत व्यवहार-ज्ञान जें एवढें खच्चून भरलें आहे त्याचें कारण या वेळीं त्यांना आलेले जगाचे अनुभव हेच होय.

पुढें लौकरच त्यांनीं ब्राह्मण मंडळींना आपली मुंज व्हावी अशी प्रार्थना केली. निवृत्तीला अशा गोष्टीची फिकीर वाटत नव्हती पण ज्ञानदेवांचा अवतार वर्णाश्रमधर्माचें रक्षण करण्याकरितां झाला असल्यामुळें त्यांनीं निवृत्तीचें म्हणणें न ऐकतां स्ववर्णांत परत जाण्याचा हट्ट धरला असा प्रवाद कित्येकांनीं मांडला आहे. (पहा—ज्ञानेश्वरमहाराज. पांगारकर, पृष्ठ ७१.७२ इत्यादि). असा प्रवाद मांडणारे विसरतात कीं ज्ञानदेव हा निवृत्तीचा अत्यंत प्रेमळ असा शिष्य होता. तो गुरुमाउलीशीं वितंडवाद घालील काय? शिवाय पुढें भावार्थदीपिकेंत ज्यानें लिहिलें:—

म्हणोनि भक्ति गा येथ सरे । जाति अप्रमाण ॥ ९-४५२

म्हणोनि कुल जातिवर्ण । हे आघवेंचि वा अकारण ॥
एथ अर्जुना माझेपण । सार्थक एक ॥ ९-४५६

त्याला, आपलें मत जातिभेदाला, वर्णव्यवस्थेला अनुकूल आहे म्हणून आपल्या पंथाचा सभासद करावा हें रास्त नाहीं. ज्ञानदेवाचे सिद्धांत एखाद्याला मान्य नसले तर त्यांत बिघडत नाहीं; पण आपलीं मतें ज्ञानदेवाचे माथीं मारणें न्यायाचें नाहीं. खरी गोष्ट अशी होती कीं हीं दोन लहान मुलें कांहीं सायुज्य मुक्तीला त्या वेळीं गेलीं नव्हतीं. तीं माणसेंच होतीं आणि स्वाभिमान असणें म्हणजे दुरभिमान असणें अशी त्यांची समजूत केव्हांच नव्हती. आईबापांचे झालेले हाल, समाजानें त्यांचा केलेला छळ हीं त्यांनीं पाहिलीं होतीं, अनुभविलीं होतीं. तेव्हां दोघांनीं मिळून शक्य असेल तर ब्राह्मणांकडून शुद्धिपत्र मिळवावयाचें असा निश्चय केला यांत नवल नाहीं. याबाबतींत संदर्भ म्हणून ज्ञानदेवाच्या मुखीं घातलेले अभंग त्यांचेच आहेत कीं काय याबद्दल स्पष्ट शंका वाटते. ज्ञानदेवांच्या नांवावर विकणाऱ्या अभंगांपैकीं खरोखर त्यांचे किती आहेत हा प्रश्न अद्यापि सुटलेला नाहीं. पण सर्व त्यांचे आहेत हें म्हणण्याचें धाडस करण्यांत अर्थ नाहीं. निवृत्तिनाथ हे लहानपणींच ज्ञानी होऊन परमार्थाच्या परमोच्च भूमिकेवर अधिष्ठित झाले होते व त्यांचे शिष्य ज्ञानदेव होते. या शिष्याला गुरूबद्दल काय वाटत होतें हें ज्ञानेश्वरी वाचणाऱ्याला माहीत आहे.

> परी एथ असे एक आधारु। तेणेंचि बोलें मी सधरु।
> जे सानुकूल श्रीगुरु। ज्ञानदेवो म्हणे ॥ १–७५
>
> लोहाचें कनक होये। हे सामर्थ्य परिसींच आहे।
> कीं मृतही जीवित लाहे। अमृतसिद्धी ॥ १–७७
>
> जयाते कामधेनु माये। तयासी अप्राप्य काही आहे।
> म्हणवूनि मी प्रवर्तो लाहे। ग्रंथी इयें ॥ १–७९
>
> जो सर्वोपकारी समर्थु। सद्गुरु श्री निवृत्तिनाथु।
> राहटत असे मजही आतु। रिघोनिया ॥ १८–१७२८
>
> म्हणोनि माझे नित्य नवे। श्वासोच्छ्वासही प्रबंध होवावे।
> श्रीगुरुकृपा काय नोहे। ज्ञानदेवो म्हणे ॥ १८–१७३४
>
> तेसे श्री निवृत्तिनाथाचें। गौरव आहे जी साचें।
> ग्रंथु नोहे हें कृपेचें। वैभव तिये ॥ १८–१७५०

असे निवृत्तीबद्दल ठिकठिकाणीं उद्गार काढणारा ज्ञानदेव

" कुळीचा कुळधर्म अवश्य पाळावा । सर्वथा न करावा अनाचार ॥
किंवा, ज्ञानदेव म्हणे ऐकाजी निवृत्ति । बोलिली पद्धति धर्मशास्त्रीं ॥"

असें व्याख्यान निवृत्तिनाथाला देईल ही गोष्ट विश्वास ठेवण्यासारखी दिसत नाहीं. ज्ञानेश्वरींत सामाजिक गोष्टींबद्दल जो ऊहापोह आहे त्याची चर्चा या ग्रंथांत एका स्वतंत्र भागांत केलेली आहे. येथें या गोष्टीचा उल्लेख कां करावा लागला हें वाचकांच्या लक्षांत येईलच. सामाजानें आपल्या कपाळीं मारलेला कमीपणा कोणालाही आवडत नाहीं; तो खरोखर असला तरी तिसऱ्यानें तसें म्हणणें कोणालाही आवडत नाहीं. मग विठ्ठलपंतांच्या बाबतींत तर पूर्ण अन्याय झाला होता. शास्त्राधाराच्या तांत्रिकपणावर भर ठेवून विठ्ठलपंतांला समाजानें बहिष्कृत केलें. तो संसारांत मजा करण्याच्या बुद्धीनें निःसंशय परत आला नव्हता. तो कां परत आला ही कळण्याची अक्कल त्या वेळच्या समाजांतील नेत्यांना नसेल, पण त्यांचा मूर्खपणा हा कांहीं विठ्ठलपंताचा गुन्हा नव्हे. विठ्ठलपंत अत्यंत सदाचरणी होता व समाजानें त्याला अन्यायानें वागविलें–अन्याय जाणूनबुजून झाला असेल नाहींतर केवळ मूर्खपणामुळें झाला असेल. पण अन्याय तो अन्याय; निदान विठ्ठलपंतावर बहिष्कार घालणाऱ्या समाजानें त्याचीं मुलें निरपराध आहेत हें ओळखण्यास हरकत नव्हती. ही ओळख पटविण्याचा प्रयत्न ज्ञानदेव व निवृत्तिनाथ यांनीं करण्याचें ठरविलें हें "वर्णाश्रमधर्मा"चें स्तोम माजविणें नसून त्या वेळीं प्रचलित असलेल्या वर्णाश्रमधर्माविरुद्ध बंड होतें ही गोष्ट डोक्यांत शिरण्याला डोकें फारसें मोठें असलें पाहिजे अशांतला भाग नाहीं. असो. आतां हा प्रयत्न कसा काय यशस्वी झाला हें आपण पाहूं.

५ ज्ञानदेव व निवृत्तिनाथ यांचा वर निर्दिष्ट केलेला संवाद नामदेव, शिवदिनकेसरी इत्यादिकांनीं वर्णन केलेला आहे व शिवदिनकेसरीच्या ज्ञानेश्वरविजयांत बऱ्याच ठिकाणीं कविकल्पनेनें वास्तवतेची जागा घेतलेली आहे. नामदेवाचे ज्ञानेश्वर चरित्रावरील सर्वच अभंगही विश्वसनीय आहेत असें निश्चितपणें म्हणतां येणें कठीण आहे. महीपतीनें तर अठराव्या शतकांत आपले ग्रंथ लिहिले व अत्यंत गोड भाषेंत पूर्वींच्या प्रचलित असलेल्या गोष्टी त्यानें

सांगितल्या. पण या व अशाच साधनांतून ज्ञानदेवाच्या चरित्राची जुळवाजुळव करणें प्राप्त आहे व ती करतांना आधुनिक व वैचारिक दृष्टि ( केवळ श्रद्धेची नव्हे ) उपयोगांत आणली तर परंपरागत ऐकत आलेल्या कित्येक कथांच्या सत्यतेबद्दल शंका आल्याशिवाय राहणार नाहीं. निवृत्ति ज्ञानदेव आपल्या दोन लहान भावंडांना घेऊन आळंदीच्या ब्रह्मवृंदाकडे गेले व आपल्या मुंजी कराव्यात म्हणून त्यांनीं त्यांची प्रार्थना केली. आळंदीच्या ब्रह्मवृंदांनीं त्यांना पैठणाच्या ब्रह्मवृंदाकडे पाठविलें व तेथें गेल्यावर ज्ञानदेवांनीं एक दोन चमत्कारही करून दाखविले. चमत्कार करून दाखविल्यामुळें त्यांना लोकांनीं नमस्कार केला पण शुद्धिपत्र दिलें नाहीं ही गोष्ट या बाबतींत लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. पैठणच्या शास्त्रीपंडितांनीं मुलांच्या अर्जाचा विचार केला व संन्याशाच्या मुलांना मुंज करण्याचा अधिकार असल्याबद्दल कोठेंही शास्त्राधार नाहीं असें आपलें स्पष्ट मत दिलें. हें त्यांनीं दिलेलें मत तेव्हांच्या शास्त्राला अनुसरून होतें याबद्दल शंका नाहीं. स्मृतीमध्यें कालदेशानुसार फेरफार होतात आणि केले पाहिजेत व नवीन परिस्थितींत नियमही बदलावे लागतात किंवा नवीन करावे लागतात ही दूर किंवा विस्तृत दृष्टि त्यांच्याजवळ नव्हती म्हणून त्यांना दोषही देण्याचें कारण नाहीं; ही दृष्टि फारच थोड्या लोकांच्या ठिकाणीं असते. दुसऱ्याला काय बोचते हें आपणांला कळत नाहीं आणि " सर्वां भूतीं परमेश्वर भाव, आत्मभाव " हें जें वेदांताचें तत्व आहे तें आपणांला दुसऱ्याचीं दुःखें कळावींत यासाठीं आहे. मद्रास प्रांतांत वर्षभर उकाडा असतो तेव्हां विवस्त्र दशा ही त्या प्रांतांत श्रेयस्कर आहे. पण हिवाळ्यांत बद्रीनाथ किंवा केदारनाथ किंवा गंगोत्री हीं तीर्थस्थानें अथवा सिमला, मसूरी, दार्जीलिंग हीं भोगस्थानें या ठिकाणीं गेल्यावर विवस्त्रतेनें फुफुसदाहाचा विकार होऊन अकाल मृत्यु येतो; तेव्हां वस्त्रधारणासंबंधीं नियम कालदेशावलंबी आहेत हें तेथें गेल्यावर पटतें. म्हणजे प्रत्यक्ष अनुभवाशिवाय, ती परिस्थिति आपणांवर ओढवल्याशिवाय, तींत जो मनुष्य सांपडला आहे त्याच्या स्थितीची जाणीव आपल्याला होत नाहीं. संन्यासी गृहस्थाश्रम सोडून जातो तेव्हां त्याला मुलें नसतात, असणें शक्यही नाहीं, हें ठीक आहे. त्यानें परत संसारांत येऊं नये हेंही ठीक आहे. पण तो परत आला व प्रथम पत्नी असलेल्या स्त्रीबरोबर पुनः संसार करूं लागला तर त्याला झालेल्या मुलांना कोणत्या जातींत घालावयाचे हा प्रश्न

पैठणच्या पंडितांसमोर यावा व संन्यासी हा जातिविहीन असल्यामुळें त्याची मुलें ब्राह्मण जातींत घालण्याचें पंडितांनीं नाकारलें यांत नवल नाहीं. उपनयना-प्रमाणेंच विवाह हाही विधि असल्यामुळें ज्यांचें उपनयनच होत नाहीं त्यांचा विवाह (सशास्त्र) होणें हेंही अशक्य होतें. तेव्हां समोर असलेल्या शास्त्राला व रूढीला अनुसरून पैठणच्या शास्त्र्यांनीं निर्णय देण्याचें ठरविलें याबद्दल त्यांना दोष देण्यांत तात्पर्य नाहीं.

पैठणकर पंडितांनीं दिलेलें निर्णयपत्र म्हणून एक संस्कृत कवितात्मक शुद्धिपत्र प्रसिद्ध झालेलें आहे. "या शुद्धिपत्राच्या प्रामाण्याबद्दल विद्वानांत मतभेद आहे" असें रा. पांगारकर म्हणतात. यांतील एक श्लोक पहा:—

प्रारब्धलेखनविधौ विपर्ययादेव वर्णधर्मस्य।
यतिरपिपुनःपतिरभूदित्युक्त्वास्रौ बहिष्कृतो विप्रैः ॥

प्रारब्धांत लिहिल्याप्रमाणें वर्णधर्माच्या अगदीं उलट अशा प्रकारें यतीचा पुनः पति झाला म्हणून त्याला ब्राह्मणांनीं बहिष्कृत केलें.

अभवन्निवृत्तिमुख्यं ज्ञानेश्वरमध्यमं सुतत्रितयम्।
सोपानान्तं तुर्या तुर्यावस्थारता सुता मुक्ता ॥

त्याला तीन मुलगे झाले. त्यांत मोठा निवृत्ति, मधला ज्ञानेश्वर व शेवटचा सोपान आणि तुर्यावस्थेंतच निमग्न असणारी चवथी मुक्ता ही कन्या त्याला झाली. या आर्येवरून पैठणच्या ब्राह्मणांनीं दिलेलें हें शुद्धिपत्र असणें शक्य नाहीं हें लक्ष्यांत येतें. पुढील श्लोकांत रेड्याकडून वेद बोलविणें वगैरे ज्ञानदेवकृत चमत्कारांचा उल्लेख आहे व ज्ञानदेवाची पुष्कळ स्तुति आहे. तेव्हां हें "शुद्धिपत्र" ज्ञानदेवचरित्राला पुढें दोनतीन शतकानंतर कोणीतरी जोडलेलें शुद्धिपत्र आहे असें वाटतें. पैठणच्या ब्राह्मणांनीं उपनयनाची परवानगी देण्याचें नाकारलें; मात्र देहांत प्रायश्चित घेण्यास सांगितलें नाहीं. नामदेवाच्या अभंगांत म्हटल्याप्रमाणें पुढील निर्णय पैठणकरांनीं दिला:—

नाहीं प्रायश्चित्त उभयकुलभ्रष्ट। बोलियेले श्रेष्ठ पूर्वापार ॥
या एक उपाय असे शास्त्रमतें। अनन्य भक्तीने अनुसरावें ॥
तीव्र अनुतापें करावे भजन। गो खर आणि श्वान वंदूनिया ॥

शास्त्राधाराची विवंचना करणारे पंडित म्हणजे पंडितंमन्य हे "अनन्यभक्ती"चा

प्राकृत उपाय प्रायश्चित्त म्हणून सांगतील कीं काय ही गोष्टही चिंतनीय आहे. निरंजनमाधवानें नामदेवाच्या हकीकतीचाच विस्तार केला आहे:—

अनन्यभक्ति हरिपादपद्मीं । निष्ठा धरा केवळ सौख्यसद्मीं ॥
तीव्रानुतापे भजनासि मारा । टाकोनि मायामय हा पसारा ॥
श्रीकृष्णरूपें जग सर्व पाहा । द्विजादि चांडाल खरांत देहा ॥
विलोकितां वंदन ते करावे । लेखों नये आप दुजे परावें ॥
चित्तीं चिदानंद धरोनि राहा । चैतन्य ते एक अखंड पाहा ॥
या पद्धतीनेच तराल लोकीं । यावेगळा मार्ग तुम्हां नसे कीं ॥

आठदहा वर्षांच्या असहाय मुलांना "टाकोनि मायामय हा पसारा।" "श्रीकृष्णरूपें जग सर्व पाहा" म्हणून वेदांत सांगणाऱ्या पंडितांनीं आपण संसारांत असून या मुलांना माणुसकीचे प्राथमिक हक्क देण्यासही तयार नसावें हा जरा चमत्कार नाहीं काय ? आमच्या मतें नामदेवाच्या अभंगांत काय किंवा निरंजनमाधवाच्या श्लोकांत काय ब्राह्मणांचा म्हणून दिलेला निर्णय ऐतिहासिक नाहीं, केवळ काल्पनिक दिसतो. "तुमची मुंज होणार नाहीं, तुम्ही जातीनें ब्राह्मण नाहीं" एवढा त्यांनीं निर्णय दिला असला पाहिजे. बाकीचा वेदांत ज्ञानदेवांनीं पुढें जो महाराष्ट्राला शिकविला तो पैठणच्या पंडितांच्या तोंडीं घातला असावा. "श्रीकृष्णरूपें जग सर्व पाहा" हें सांगण्याचा अधिकार निवृत्ति ज्ञानदेवांचा होता; जातिभेदानें व भेदभावनेनें पछाडलेल्या शास्त्री-पंडितांचा नव्हता हें कोणालाही कळण्यासारखें आहे.

शिवाय या पैठणच्या दौऱ्यांत ज्ञानदेवांनीं चमत्कार करून दाखविले असें म्हणतात. हे चमत्कार घडले असोत वा नसोत, ते करून कां दाखविले ? तर सामान्य जनता ज्ञानदेवांच्या विरुद्ध होती म्हणून. "अलौकिका नोहावे" असें म्हणणाऱ्या पण "वर्णाश्रमधर्मरक्षक" ज्ञानदेवाचें महिमान गाणाऱ्यांनीं त्यांनीं केलेल्या चमत्कारांचाही चमत्कार मानवा हें जरा चमत्कारिक आहे. "अलौकिका नोहावें" मग चमत्कार कां करावेत ? पण हें राहूंद्या. ज्ञानदेवांनीं केलेले चमत्कार जे लोकप्रथेंत आले त्याचें मानसिक कारण म्हणजे, शास्त्राधारानें जें सिद्ध होत नव्हतें तें त्यांनीं चमत्कार करून सिद्ध केलें, हें आहे. "सर्वांभूतीं परमेश्वर आहे" "सर्वत्र एकच आत्मा आहे" हा वेदांत, हा भागवत धर्म, तेव्हांच्या पढीक शास्त्री-पंडितांना रुचत नव्हता; त्यांची कर्ममार्गावर म्हणजे कर्मठपणावर सर्व भिस्त

होती व लोकमत त्यांच्या बाजूचें होतें. या कर्ममार्गाविरुद्ध म्हणजे कर्मठपणा विरुद्ध शंकराचार्यांनीं बंड करून अद्वैत सिद्धांताची द्वाही फिरविली व ज्ञानदेवांनींही अद्वैताची कास धरून कर्मठपणावर हल्ला केला. ज्ञानेश्वरींत "कर्मठपणा" व तो करणारे "दीक्षित" यांची चेष्टा करून किती दाणादाण उडविलेली आहे हे ज्ञानदेवांना "वर्णप्रतिपालक" बनविणाऱ्यांच्या लक्षांत रहात नसले तरी भावार्थदीपिकेचें निर्विकार मनानें वाचन व मनन करणाऱ्यांच्या लक्षांतून तें जाणें शक्य नाहीं. तेव्हां पैठणचे कर्मठमार्गधुरंधर शास्त्रीपंडित आणि ब्रह्मवृंद हे वेदांताचा व भागवतधर्माचा कोणाला उपदेश करतील हे संभवनीय नाहीं. कारण याच शास्त्रीपंडितांनीं पुढें तीनशें वर्षांनीं त्याच पैठणांत त्या शहराचें नांव अजरामर करणाऱ्या एकनाथावर भागवतधर्माचा पुरस्कार करण्याबद्दल शिक्षा पुकारली हें इतिहासप्रसिद्ध आहे. तात्पर्य हें कीं मुंज होत नाहीं तेव्हां विवाह होणार नाहीं हें ओघानें आलेंच; म्हणजे संसारांत पडावयाचें नाहीं; म्हणजे जातीचा विचार उद्भवण्याचें कारण नाहीं, हा या निर्णयाचा मथितार्थ होता. माणसांनीं माणसांच्या बाबतींत असा निर्णय देणें हें सहारु असलें तरी माणुसकीच्याविरुद्ध आहे. पण या निर्णयानें निवृत्तिज्ञानदेवांना कसलाही विषाद वाटला नाहीं. गैनीनाथाच्या गुंफेंत जाऊन योगमार्गाची दीक्षा घेतल्यावर व ज्ञानदेवाला ती दिल्यावर निवृत्तिनाथानें या प्रश्नाचा निर्णय करून टाकलेला होता. जे अभेदमय झाले होते, त्यांना संसाराची काय परवा? संसारांत पडणाऱ्यांची मूढता ज्यांना पटली होती त्यांना "तुम्ही संसारांत पडावयाचें नाहीं" ही शिक्षा ऐकून काय विषाद वाटणार? अगोदरच संसार विन्मुख असलेलें त्या बालकांचें अंतःकरण तो पंडिती निर्णय ऐकून परमार्थाकडे अधिक वळलें यांत नवल काय? या वेळीं वयानें ते लहान होते पण लहान पणाची मर्यादा त्यांनीं ओलांडलीच नाहीं. विशीच्या आंत तीं चार भावंडे इहलोक सोडून गेलीं. तेव्हां पैठणच्या पंडितांचा निर्णय त्यांनीं अगदीं अक्षरशः पाळला यांत शंका नाहीं. त्यांना लोकांना जें द्यावयाचें होतें तें संसारांत जाऊन द्यावयाचें नव्हतें. संसाराचें रहस्य त्यांना अगोदरच कळलें होतें. पैठणच्या पंडितांचा निर्णय म्हणजेच निवृत्तिज्ञानदेवांच्या दिग्विजयाचा आरंभ होय या निर्णयप्रसंगींच त्यांनीं चमत्कार करून दाखविले व आपल्या नवीन तत्वज्ञानाची द्वाही फिरविण्याला सुरवात केली.

६ गैनीनाथांचा अनुग्रह झाल्यापासून तो पैठणाला जाऊन "भट्टीं" वाद करण्याच्या वेळेपर्यंत बरोबर किती वर्षें गेलीं हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं; पण सरासरीं या दरम्यान् दोन वर्षें गेलीं असावींत. त्या कालावधींत निवृत्ति व ज्ञानदेव या दोघांनींही अध्ययनांत बरीच मजल मारली व वादविवादांतही ते निष्णात झाले होते. "प्रत्यक्ष पैठणीं भट्टीं केला वाद" या वर्णनावरून या वादांत पक्षोपपक्ष करण्याचें सामर्थ्य या मुलांत त्या अल्पवयांतही आलेलें होतें असें स्पष्ट दिसतें. मोठमोठ्या गोष्टी हीं मुलें बोलूं लागली तेव्हां त्यांना बहिष्कृत मानणाऱ्यांना मोठी चिरड आली व तेव्हांच्या पद्धतीप्रमाणें अमुक अमुक चमत्कार करून दाखवाल कां म्हणून त्यांना त्यांनीं प्रश्न घातला; व त्याचें उत्तर ते चमत्कार प्रत्यक्ष करून दाखवून ज्ञानदेवांनीं दिलें; रस्त्याला चाललेल्या रेड्याच्या मुखानें वेद म्हणविण्याचा चमत्कार हा त्यांपैकींच होय. हा चमत्कार नसून "रेडे" आडनांवाच्या गृहस्थाच्या मुखांतून वेद म्हणवून दाखविला अशी कोटी करण्यांत तात्पर्य नाहीं. त्या वेळच्या लोकांचा चमत्कारांवर विश्वास होता व हा विश्वास सर्व कालीं सर्व देशांत आस्तित्वांत असतो. त्याचा अर्थ तो विश्वास योग्य आहे असा करण्याचें कारण नाहीं; पण जेथें हा विश्वास असतो तेथें बहुजनसमाजाला चकित करण्यासाठीं महापुरुषाच्या पाठीवर चमत्कारांचें ओझें त्याचे अनुयायी लादण्यास मागेपुढें पहात नाहींत. चमत्कार करून लोकांना चीत करावें या मताचे ज्ञानदेव निश्चित नव्हते. ज्ञानी पुरुषाच्या लक्षणांतील पहिलें "अमानित्व"; त्याची जी व्याख्या त्यांनीं ज्ञानेश्वरींत दिलेली आहे त्यावरून आमचें विधान सिद्ध होतें.

> पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ति कानीं नायकावी ॥
> हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोकां ॥ १३—१८९
> तेथ सत्काराची कें गोठी । के आदरा देईल भेटी ।
> मरणेंसी साटीं । नमस्कारितां ॥ १३–१९०
> वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे ॥
> परी वेडिवेमाजी दडे । महिमेभेणे ॥ १३—१९१

असे ज्ञानी पुरुषांचें वर्णन करणारे ज्ञानदेव कांहीं अलौकिक चमत्कार करून जाहिरात देतील ही गोष्ट संभवनीय वाटत नाहीं. चमत्कारांच्या कथा या थोर पुरुषांच्या पाठीमागें लागतात, त्या प्रत्यक्ष घडतात असे क्वचितच होतें.

हा आमचा अभिप्राय झाला. जे भाविक आहेत ते म्हणतील कीं चमत्कार होतात. त्यांच्याशीं तंटा करण्याची आवश्यकता नाहीं. भाविकपणाच्या हवेंत चमत्कारांचा पाऊसही पडूं शकतो; पण ज्ञानदेवांचें ज्ञानदेवत्व असल्या "अलौकिक" चमत्कारानें सिद्ध करण्याची आवश्यकता नाहीं हें आमचें म्हणणें. ज्ञानेश्वरी व अमृतानुभव हेच ज्ञानदेवांनीं केलेले मोठे चमत्कार आहेत त्यांच्या पुण्याईनें महाराष्ट्रांतील आबालवृद्धांना नवी वाचा फुटली. ज्ञानदेवांनी रेड्याकडून वेद बोलविला या रूपकाच्यामागें रेडा व माणूस यांच्या बाबतींत भूतदया त्यांना सारखीच होती हें तत्व आहे व त्या तत्वाच्या सत्यतेबद्दल वैमत्य असण्याचा संभव नाहीं. रेड्याच्या पाठीवर तडाखे मारतांच ज्ञानदेवांच्या पाठीला जखम होऊन तींतून भळभळां रक्त वाहूं लागलें ही स्थूल कथा रेड्याला मारल्यामुळें त्यांचें अंतःकरण कळवळलें या सूक्ष्म तत्वाची निदर्शक आहे; तें तत्व लोकांच्या अंतःकरणाला पटावें म्हणून या अतिरंजित वर्णनाचा हा उपयोग केलेला आहे; हा अतिशयोक्ति अलंकार आहे, हे सत्यकथन नव्हे, असें आम्हांस वाटतें.

रेड्यानें वेद बोलून दाखविण्याचा हा चमत्कार माघ शुद्ध ५ शके १२०९ या दिवशीं पैठण येथें घडला असें म्हणतात. ज्ञानदेवांची जन्मतीथ श्रावण कृष्ण ८ शके ११९७ ही धरली तर (जन्मवेळा व जन्मदिवस बरोबर जन्माष्टमीचा धरका आहे हें यांत लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे) या वेळी ज्ञानदेवांना बारा वर्षे सहा महिने होऊन गेले होते व शके १२१२ त ज्ञानेश्वरी लिहून झाली (ज्ञानेश्वरींत फक्त शक दिलेला आहे, तिथि वगैरे दिलेली नाहीं) हें लक्षांत ठेविलें म्हणजे ज्ञानेश्वरी लिहिण्यापूर्वी दोन वर्षे हा चमत्कार घडला व पैठणच्या ब्राह्मणांची ज्ञानदेवांच्या अलौकिक सामर्थ्याबद्दल खात्री पटली. (तरीही त्यांनीं त्यांना व त्यांच्या दोन भावंडांना उपनयन करण्याची परवानगी दिली नाहींच.) रेडा वेद बोलला तेव्हां तो अगदी दशग्रंथी ब्राह्मणाप्रमाणें बोलला वगैरे वर्णन अधिक करतां येईल व तसें कोणी कोणी केलें आहे; पण त्या मोहांत येथें पडण्याचें कारण नाहीं. फक्त निरंजन माधवाचे या प्रसंगाचे एक दोन श्लोक येथें देतों:—

जै अग्निमीळे स्वरयुक्त बोले । हें ऐकतां विस्मित विप्र झाले ।
कांहीं यजुर्वेदहि साम कांहीं । ऐसा नये सुस्वर सामकांहीं ॥

ते ऐकती सकळ एक मुहूर्त सारे । तें लोक मानिति हल्या वदला कसारे ।
हे मुख्य देव हरि शंकर हा विधाता । लोकोद्धरा प्रकटले कलिमाजीं आतां ॥

नामदेवांच्याही या प्रसंगाच्या वर्णनांतून एक दोन ओळी येथें घेतल्या तर तें उचित होईल.

धन्य यांचा वंश धन्य यांचे कुळ । धन्य पुण्यशील अवतार हे ॥
सकळ द्विजवर करिती नमस्कार । आनंदे जयकार गर्जताती ॥

पण हे पैठणचे विप्र मोठे व्यवहारचतुर होते. त्यांनीं ज्ञानदेवाचा जयजयकार केला, तीं सर्व भावंडें परमेश्वरी अवतार असल्याची कबुली दिली, त्यांना नमस्कारही त्यांनीं केले पण त्या भावंडांना जें पाहिजे होतें तें शुद्धिपत्र मात्र त्यांनीं दिलें नाहीं; यांत खरोखर आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. हिंदुधर्माच्या व समाजस्थितीच्या इतिहासाचा अभ्यास ज्यांनीं केला आहे त्यांना पैठणच्या ब्राह्मणांच्या या वृत्तीबद्दल आश्चर्य वाटणार नाहीं. अमेल ती खोड सोडावयाची नाहीं व ती खोड दाखविणारा फारच जबरदस्त असला तर त्याला त्या वेळीं पुरते व कायमचेही ईश्वरावतार समजून त्याचें तत्वज्ञान टाकून द्यावयाचें ही मौज या इतिहासांत एकाहून अधिक महत्वाच्या वेळीं घडलेली आहे. सांख्ययोगाचा प्रणेता कपिलमहामुनि याची कर्मठांच्या म्हणजे वैदिकांच्या दृष्टीनें नास्तिकांत गणना होते. कपिलाला ईश्वराचा अवतार मानतात व त्यानें सांगितलेल्या तत्वज्ञानाला कपिलगीता असें गोड नांव दिलेलें आहे. पण कपिलाचें तत्वज्ञान अनीश्वर असल्यामुळें ग्राह्य मात्र समजावयाचें नाहीं. ईश्वराचा अवतार अनीश्वर तत्वज्ञान कां व कसें सांगतो या प्रश्नाची चर्चा अर्थात् करावयाची नाहीं. कर्मठपणाविरुद्ध प्रचंड बंड उभारून यज्ञमार्गाचा विध्वंस करणारा भगवान् शाक्यमुनि बुद्ध यालाही आपण परमेश्वराचा अवतार समजतों. त्याचें तत्वज्ञान जगभर पसरलें; भरतखंडांतही तें पसरलें होतें; पण त्याला ईश्वराचा अवतार म्हणून नमस्कार करून त्याचें तत्वज्ञान मात्र म्हणजे बुद्धधर्म मात्र भरतखंडांतून आपण शिवेच्या पार घालविला. तोच प्रयोग ज्ञानदेवावर पैठणच्या विप्रांनीं केला असें ज्यांना म्हणावयाचें असेल त्यांनीं म्हणण्यास हरकत नाहीं.

शुद्धिपत्र मिळविण्यासाठीं हीं भावंडें पैठणला आलीं तीं कांहीं दिवस तेथेंच राहिलीं. तीं आपेगांवला परत जाणार होतीं पण बहुधा पैठण येथें लोका-

ग्रहामुळें किंवा अभ्यासासाठीं राहिलीं असावींत. रेड्याच्या मुखानें वेद बोलविणें हा एकच चमत्कार तेथें ज्ञानदेवांनीं केला नाहीं. ( चारी भावंडांत चमत्कार करण्याची भूमिका फक्त ज्ञानदेवाकडे होती हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. निवृत्तिनाथ चमत्कार करण्याच्या भानगडींत कधींही पडले नाहींत. सोपान व मुक्ता तर अद्यापि फार लहान होते.) रेडा बोलला तेव्हां निवृत्तिनाथ चौदा वर्षांचे व ज्ञानदेव बारा वर्षे वयाचे होते. ज्ञानदेवांनीं दुसरा एक अलौकिक चमत्कार केला. एका ब्राह्मणाच्या घरीं त्याच्या बापाचें श्राद्ध होतें. तेथें ज्ञानदेव म्हणाले कीं तुमचे पितर मी प्रत्यक्ष भोजनास बोलावितों. त्याप्रमाणें त्यांनीं ते बोलाविले व ते आले. या चमत्कारानें तर पैठणचे विप्र गारीगार होऊन गेले. या चमत्काराच्या दंतकथा ऐकण्यास मनोवेधक असतात व त्यांची छाननी करणें भाविकांस आवडत नाहीं, परवडतही नाहीं. आतां या चमत्काराचा आपण थोडासा अधिक विचार करूं. ब्राह्मणाच्या घरीं श्राद्ध निघालें; तेथें ज्ञानदेवांना बोलाविलें होतें कां ते आगंतुक म्हणून गेले? ते आगंतुक म्हणून जातील कां? आणि एखाद्या धंदेवाल्या डोंबाऱ्याप्रमाणें तेथें जाऊन मी पहा हो गंमत करून दाखवितों असें म्हणतील कां? ज्ञानेश्वरी व अमृतानुभव लिहिणारा मनुष्य "बोले तसा चाले" या श्रेष्ठ वर्गांतला होता. कांहीं तरी ढोंग धत्तूरा करून लोकांच्या डोळ्यांत धूळ फेकणारा तो बुवा नव्हता. तो आपण होऊन चमत्कार करण्यासाठीं कोठें जाईल हें जो बुद्धि आचरट भाविकपणानें चाळेनाशीं झाली आहे तिलाच पटेल; इतरत्र पटणें शक्य नाहीं. आणि ज्याची मुंज करण्याला पैठणच्या समस्त ब्रह्मवृंदानें नकार दिला होता त्याला पैठणचा कोणता ब्राह्मण श्राद्धाला बोलावील? निवृत्तिज्ञानदेव हे शंकरविष्णूचे अवतार म्हणून त्यांच्या पायावर लोटांगण घेणाऱ्या ( हें खरें मानावयाचें असेल तर ) ब्राह्मणांनीं सुद्धां त्यांना ब्राह्मण म्हणून, संस्काराला योग्य म्हणून मान्यता दिली नाहीं. मग त्यांना श्राद्धाचें आमंत्रण येईल तरी कसें? आणि निवृत्तिज्ञानदेव ( मुंज न झाल्यामुळें ते ब्राह्मण नव्हतेच ) हे कांहीं भटजी नव्हते कीं त्यांना कोणी श्राद्धाला बोलावील कीं ते आपण होऊन कोठें श्राद्धाला जातील? चमत्कारांच्या दंतकथा उठविणारे तेराव्या शतकांतील भाविक वेडे खुळे असतील; पण एकोणीसाव्या विसाव्या विशेषतः विसाव्या शतकांत त्यावर विश्वास ठेवतांना आजच्या भाविकांनीं जरा डोकें

चालवून विचार करावयास नको काय ? ज्ञानदेवांना श्राद्धाला कोणी बोलावले नसते आणि ज्ञानदेव आगंतुक म्हणून गेले नसते ही गोष्ट कोणालाही पटण्यासारखी आहे. पण येथेंच थांबण्याचें कारण नाहीं. ज्ञानदेवांनीं पितर बोलाविले आणि ते आले. ते कोठून आले ? पितृलोकांतून ( अर्थातच )? आतां पुनर्जन्म आणि पितृलोक यांचा मेळ कसा बसवावयाचा ? मनुष्य मेल्याबरोबर कर्माप्रमाणें गति मिळून दुसऱ्या योनींत जन्माला जातो कीं पितृलोकाला जातो कीं पितृलोक हें क्वारेन्टाईनसारखें आहे कीं जेथे तो कांहीं दिवस अडकून राहतो व किती दिवस अडकून राहतो ? कां आपल्या वंशजांनीं पाठविलेले पाणी पीत तेथेंच कायमचा राहतो ? हे प्रश्न विचारले म्हणजे कित्येकांना चिरड येते. पण भलत्याच चमत्काराच्या गोष्टी ज्या विचाराच्या एका कडवशा-पुढें पार नाहींशा होतात त्या आग्रहानें सांगण्याचा जर परिपाठ सुरू झाला व भाविकपणाला जर मूर्खपणाचें स्वरूप येऊं लागले तर हे प्रश्न विचारल्याशिवाय गत्यंतर नाहीं. अलिकडे मृताशीं संभाषण करण्याचा धुमाकूळ सर्वत्र चालू असतांना हे ( टेलीफोनच्या त्या टोकाला सतत बसलेले ) मृत जेथें आहेत तेथली कांहींच माहिती देत नाहींत या एकाच गोष्टीवरून हें सर्व प्रकरण ' नाशाबीद " होते ही गोष्ट जशी स्पष्ट आहे त्याप्रमाणेंच कित्येक चमत्कारांची वासलात त्यांच्यावर विवेकाचा थोडासा प्रकाशही टाकल्यावर लागते हें विसरून चालणार नाहीं. आणि ज्ञानदेव चमत्कार करून नमस्कार घेणारे नव्हते; त्यांच्या अंगच्या थोर गुणांनीं ते वंदनीय झाले आहेत. त्यांच्यावर तरी चमत्कारांची झूल टाकून त्यांना सजविण्याचें कारण नाहीं. पैठणला त्यांनीं केलेले चमत्कार हे त्यांचा थोरपणा स्थापित झाल्यानंतर त्यांच्यावर पुढील पिढींतील बावळट भाविकांनीं किंवा स्वतःला चमत्कार करणारे साधू म्हणवून मिरविणाऱ्या लफंग्यांनीं लादलेले दिसतात.

पैठणांत हीं भांवडें कांहीं दिवस राहिलीं. तेथें त्यांचा काळ अर्थात् अध्ययनांत व निरूपणांत जात असे. पैठण हें त्या कालीं महाराष्ट्रांत थोर क्षेत्र समजत. गोदावरीच्या तीरीं मराठी भाषेची पुष्कळच जोपासना झालेली आहे व वाङ्मयाचा व नदीचा, संस्कृतीचा व नदीचा संबंध लावावयाचा असेल तर मराठी वाङ्मयाचा व गोदावरीतीराचा संबंध फार निकट आहे. गोदावरीच्या तीरावर श्रीरामचंद्राचा वनवासांतील बराच काळ गेलेला होता

व भवभूतीच्या उत्तररामचरित्रामुळें रसिक जनांनाही गोदातीर हृद्य झालेलें आहे. तेथें राहून ज्ञानदेवांनीं ज्ञानेश्वरी लिहिण्यापूर्वीं विचार केला. ती नेवाशाला लिहिली कीं आपेगांवला लिहिली का इतरत्र कोठें लिहिली याचा यथास्थित निर्णय इतिहासाच्या साधनांच्या अभावीं लागणें कठीण दिसतें. पण पैठणच्या ब्राह्मणांनीं शुद्धिपत्र दिलें नाहीं म्हणून कसलाही विषाद न मानणारे आणि वेदांतातील "सर्वांभूतीं परमेश्वर" हें तत्त्व अंतःकरणांत पूर्ण बाणलेले निवृत्तिज्ञानदेव गोदेच्या तीरावर बसून लोकोपकाराचा, मूर्ख लोकांना शहाणे करण्याचा, संस्कृतांतील ज्ञानभांडार ज्याला ब्राह्मणांनीं कुलुपें ठोकून तें जनतेला अलभ्य केलें होतें तें फोडून मराठींत आणण्याचा आणि लोकांची बोलभाषा हीच ग्रंथभाषा करण्याचा विचार करीत होते. याच गोदातीरावर "अमृतातेंही पैजा जिंके" असे वाङ्मय निर्माण करून आमच्या मराठी मायबोलीला अभिजात भाषांच्या सिंहासनावर बसविण्याची प्रेरणा निवृत्तीनें आपला धाकटा भाऊ आणि अद्वितीय शिष्य ज्ञानदेव याला केली व ज्ञानदेवानें ती शिरसा वंद्य केली. याच गोदातीरावर पुढें तीनशें वर्षांनीं एकनाथानें आपले प्रचंड व सडेतोड ग्रंथ लिहिले व ज्ञानेश्वरी शुद्ध करून पुनः प्रसिद्ध केली. विसाव्या शतकांतही याच गोदातीरावर चंद्रशेखरासारख्या अत्युत्कृष्ट कवीचा उदय झाला. गोदातीर हें आमच्या मराठीचें माहेर आहे व तें ज्ञानदेवांच्या कालापासून मराठीचें पोषण करीत आलेलें आहे.

## भाग चौथा

### ग्रंथरचना

एवं जे महाभारतीं । श्रीव्यासें अप्रांतमती ।
भीष्मपर्वसंगतीं । म्हणितली कथा ॥ ११५४
तो श्रीकृष्णार्जुनसंवादु । नागरी बोली विशुद्धु ।
सांगोनि दाऊं प्रबंधु । वोंवियेच्या ॥ ११५५
नुसतीच्चि शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पथा ।
जे शृंगाराच्या माथां । पाय ठेवीं ॥ ११५६
दाऊं वेल्हाळे देशी नवी । जे साहित्यातें वोजावी ।
अमृतातें चुकी ठेवी । गोडसपणें ॥ ११५७
बोल वोल्हावलेनि गुणें । चंद्रासी घे उमाणे ।
रसरंगीं भुलवणें । नादु लोपी ॥ ११५८
खेचराच्चियाही मना । आणी सात्विकाचा पान्हा ।
श्रवणासवें सुमना । समाधि जोडे ॥ ११५९
तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थेसीं विश्व भरूं ।
आनंदाचें आवारू । मांडूं जगा ॥ ११६०
फिटो विवेकाची वाणी । हो काना मना जिणी ।
देखों आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ११६१
दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा ।
रिघो महाबोध सुकाला- । माजीं विश्व ॥ ११६२
हें निफजेल आतां आघवें । तेसें बोलिजेल बरवें ।
जें अधिष्ठिला असें परमदैवें । श्रीनिवृत्ति मी ॥ ११६३
म्हणोनी अक्षरीं सुभेदीं । उपमाश्लेष कोंदाकोंदी ।
झाडा देईन प्रतिपदीं । ग्रंथार्थासी ॥ ११६४
या ठावोवरी मातें । पुरतया सारस्वतें ।
केलें असे श्रीमंते । श्रीगुरुरायें ॥ ११६५

तेराव्या अध्यायाचें निरूपण संपवितांना ज्ञानदेवांनीं काढलेल्या उद्गारांचा हा उतारा जरा मोठा झाला. पण प्रस्तुत ग्रंथ लिहिणारा ज्ञानदेवांच्या वाणीचें वर्णन करण्यासाठींच लिहावयास बसला; तेव्हां ज्ञानदेवांचीं वचनें कमी अधिक देण्याला त्याला भीड वाटत नाहीं. ज्ञानेश्वरीच्या रचनेचें वर्णन वरीलप्रमाणें ज्ञानदेवांच्या शब्दांत आणि तेंही ज्ञानेश्वरींतच मिळतें आहे तर तेंच अंतःकरणांत भरून ठवणें इष्ट आहे. पैठणला केलेले चमत्कार आणि न मिळालेलें शुद्धिपत्र, किंवा ज्या कार्यासाठीं शुद्धिपत्र मिळविण्याची या भावंडांनीं खटपट केली त्या कार्यासाठीं सर्वथा निरुपयोगी असलेलें शुद्धिपत्र यांची हकीकत गेल्या भागांत सांगितली. निवृत्तिनाथादि भावंडांना "शुद्ध परब्रह्मींचे ठसे" हे प्रशंसापत्र पैठणच्या ब्राह्मणांनीं दिलें पण त्यांना मौंजीबंधनाची परवानगी मात्र त्यांनीं दिली नाहीं. पैठणसारख्या विद्येच्या ठिकाणीं ते गेलेच होते तेव्हां तेथें कांहीं दिवस राहून निवृत्ति ज्ञानदेवांनीं बराच अभ्यास केला, शास्त्रें पाहिलीं, भाष्यें वाचलीं, वेदांतांत प्रगति केली, योगसाधनांत पुढच्या पुढच्या पायऱ्या पादाक्रांत केल्या हें स्पष्ट दिसतें. "भाष्यकारातें वाट पुसत" जाणाऱ्या ज्ञानदेवांनीं श्रीशंकराचार्यांचें भाष्य ( म्हणजे महाभाष्य ) आणि गीताभाष्य हीं वाचलींच होतीं पण इतर मतस्थापकांचीं भाष्येंही त्यांनीं वाचलीं. कोणत्या भाग्यशाली पंडिताला त्यांना भाष्यें सांगण्याचें भाग्य लाधलें याचा कोठेंही उल्लेख नाहीं. पण पैठणमधून हीं भावंडें जीं बाहेर पडलीं तीं प्रख्यात होऊन बाहेर पडलीं आणि निवृत्ति व ज्ञानदेव ही विद्वान् म्हणून बाहेर पडलीं. पैठणांतून बाहेर पडून ते आपेगांवास गेले, तेथून आळंदीला गेले व तेथून प्रवरातीरीं नेवाशाला गेले व नेवासाला ज्ञानदेवांनीं आपला ज्ञानेश्वरी किंवा भावार्थदीपिका हा उज्ज्वल ग्रंथ निर्माण केला. ज्यांच्या मतें ज्ञानदेव अनेक होऊन गेले त्यांना नेवाशांत ज्ञानेश्वरी लिहिली हें मत मान्य नाहीं. पण आतांपर्यंत चालत आलेल्या समजुती सर्वथा चुकीच्या आहेत व दुसऱ्या कांहीं गोष्टी प्रत्यक्ष पुराव्यानें ( अनुमानानें नव्हे ) सिद्ध झालेल्या आहेत असा प्रकार नसल्यामुळें जी चरित्रकथा चालत आली आहे तीच येथें देणें प्राप्त आहे.

अहमदनगर जिल्ह्यांत नेवासें हा गांव प्रवरानदीच्या कांठावर आहे. विष्णूनें समुद्रमंथनानंतर दैत्यांच्या हातीं अमृत जाऊं न देण्यासाठीं मोहिनीचें रूप घेतलें होतें त्याच मोहिनीचें देवालय या नेवाशांत आहे. मोहिनीराज असें

तेथील देवास म्हणतात व त्यालाच महालया किंवा म्हाळसा हेंही नांव आहे. ज्ञानेश्वरी संपवितांना

तेथ जगाचें जीवनसूत्र । महालया असे ॥

असा उल्लेख ज्ञानदेवांनीं केलेला आहे. ज्ञानदेव नेवाशास कां गेले याचा कांहीं कोठेंही उल्लेख नाहीं. वास्तविक त्यांना आळंदीस राहूनही ग्रंथरचना करिता आली असती. खुद्द नेवाशाला प्रवरा आहे पण तेथून थोड्याच अंतरावर प्रवरा व गोदावरी यांचा संगम झालेला आहे. कदाचित् त्या वेळीं नेवासें हेच स्थान त्यांना रहाण्यास विशेष सोईचें असेल. या नेवाशांत जातां जातां ज्ञानदेवांनीं एक चमत्कार केला असें प्रसिद्ध आहे. सच्चिदानंदबोवा नांवाचा मनुष्य मरून पडला होता व तेथें त्याची बिचारी बायको रडत बसली होती. ज्ञानदेवांनीं चौकशी केली व ते म्हणाले, "सच्चिदानंदाला कधीं मरण येणें शक्य आहे काय ?" आणि असें म्हणून त्याच्या आंगाला त्यांनीं हात लावतांच तो मेलेला माणूस जिवंत झाला व ज्ञानदेवांच्या चरणांवर त्यानें मस्तक ठेविलें. ज्ञानेश्वरीचा आदरपूर्वक लेखक होणारा सच्चिदानंद तो हाच असें सांगतात. मेलेला माणूस जिवंत करणें हा चमत्कार तर खराच व तो चमत्कार ज्ञानदेवांनीं केला हें त्यांच्या चरित्रांत नमूद केलेंच पाहिजे. रेडा बोलविणें, पुढें चांगदेवाकडे जातांना भिंत चालविणें, आणि सच्चिदानंदबोवाला जिवंत करणें हे सर्व अलौकिक चमत्कार असल्यामुळें त्यांची लौकिक शहानिशा करण्याचा प्रयत्न फक्त कालहरणाला कारणीभूत होईल. येथें लक्ष्यांत ठेवण्याची गोष्ट एकच. अठरावा अध्याय संपवितांना "आतां विश्वात्मकें देवें" ( १७९३ ओवी ) येथून ते १७९९ ओवीपर्यंत म्हणजे

किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होऊनि तिहीं लोकीं ।
भजिजो आदिपुरुखी । अखंडित ॥

येथपर्यंत ज्ञानदेवांनीं मागितलेलें पसायदान किंवा प्रसाददान आहे. त्यापुढची ओवी

आणि ग्रंथोपजीवीये । विशेषीं लोकी इये ।
दृष्टादृष्ट विजयें । होवावें जी ॥ १८००

ज्ञानदेवांनींच लिहिली कीं काय याची शंका वाटते आणि याच्या पुढची ओवीही क्षेपक वाटते. निवृत्तिनाथांना उद्देशून कांहीं ओव्या ज्ञानेश्वरींत आहेत व

"आतां निरूपण पुढ चालूं द्या" अशी निवृत्तिनाथ आज्ञा करतात असेंही वर्णन आहे व तें सर्व स्वाभाविक आहे. पण पसायदान मागितल्यानंतर आणि तेंही "विश्वात्मक देवा"जवळ मागितल्यानंतर व तें संपूर्ण झाल्यावर "ज्ञानेश्वरीचें पुराण सांगून पोट भरणाऱ्याचें कल्याण होवो" ही मागणी ज्ञानदेवांनीं केली असेल असें मानण्यानें येथें मोठा विरस होतो यांत शंका नाहीं.

तेथ म्हणे विश्वेशरावो । हा होईल दानपसावो ।
येणें वरें ज्ञानदेवो । सुखिया झाला ॥ १८०१

हा सर्व प्रकार जरा चमत्कारिक वाटतो. आमच्या मतें या दोनी ओंव्या ज्ञानदेवांच्या नाहींत, मागाहून कोणीतरी घुसडल्या आहेत. पुढें "ऐसें युगीं वरीं कली" येथून ते

तिये गीतेचा कळसु । संपूर्ण हा अष्टादसु ।
म्हणे निवृत्तिदास । ज्ञानदेवो
पुढती पुढती पुढती । इया ग्रंथपुण्यसंपत्ति ।
सर्व सुखीं सर्व भूतीं । संपूर्ण होईजे ॥

येथपर्यंत ग्रंथसमाप्ति होते. वर दिलेली दुसरी ओवीही विशेष सकारण दिसत नाहीं. पण शेवटची ओवी म्हणून जी प्रसिद्ध आहे:—

शके बाराशे बारोत्तरें । तैं टीका केली ज्ञानेश्वरें ।
सच्चिदानंदबावा आदरें । लेखकु जाहला ॥

तिच्याकडे जरा लक्षपूर्वक पाहिले म्हणजे अनेक प्रश्न उद्भवतात. ही ओवी ज्ञानेश्वरांच्या हातची असेल काय ? ज्या ठिकाणीं ग्रंथरचना केली त्या ठिकाणची सविस्तर माहिती देणारा ग्रंथकार रचनाकालाचा फक्त शक मात्र देतो, तिथिवार वगैरे कांहींच देत नाहीं; हें जरा आश्चर्य आहे. या बाबतींत कसलाही प्रत्यक्ष पुरावा उपलब्ध नाहीं, पण आम्हांस असें वाटतें कीं ही ओवी ज्ञानदेवांची नसून दुसऱ्या कोणाची तरी आणि बहुधा सच्चिदानंदबावाची आहे. शके १२१२ त ज्ञानेश्वरी लिहिली एवढी प्रसिद्ध गोष्ट ही ओवी लिहिणाऱ्याला माहित होती व तसें असल्यास ही गोष्ट या ओवींत ग्रथित करून त्यानें सर्वांवर उपकार केलेले आहेत, कारण ज्ञानेश्वरीचा रचनाकाल वर्षांपुरता कां होईना सिद्ध करण्याला आधार फक्त ही एक ओवी आहे. ही ओवी लिहिणाऱ्यानें म्हणजे सच्चिदानंदबावानें १२१२ सालीं ज्ञानेश्वरानें गीतेवर केलेल्या टीकेची प्रत

मिळवून ती लिहून काढली असावी असें दिसतें. तसें असल्यास ज्ञानेश्वरीची रचना झाली त्या वेळीं तिचा लेखक सच्चिदानंदबावा होता असें समजण्याचें कारण नाहीं व त्याच्या बाबतींत ज्ञानदेवांनीं घडवून आणलेला चमत्कारही त्यांच्या चरित्रांत मागून घुसला असें म्हणणें सयुक्तिक होईल. आम्हांला काय वाटतें तें आम्हीं येथें लिहिलें आहे. तें लिहिणें म्हणजे या गोष्टीचा सप्रमाण निर्णय असें आम्हींही समजत नाहीं व प्रत्यक्ष पुराव्याच्या अभावीं तसा निर्णय तूर्त तरी लागेल असें दिसत नाहीं. पण प्रचलित कथेविषयीं आम्हांस शंका आली; ती व्यक्त करणें आणि आम्हांला योग्य वाटलें तें अनुमान सुचविणें हें आमचें कर्तव्य होतें म्हणून तें करणें आवश्यक झालें.

२ ज्ञानदेवांचा जन्मकाल शके ११९७ धरला म्हणजे ज्ञानेश्वरी संपूर्ण झाली त्या वेळीं त्यांचें वय पंधरा वर्षांचें आणि निवृत्तीचें सुमारें सतरा वर्षांचें हें ओघानेंच आलें. येवढ्या लहान वयांत असा अद्भुत ग्रंथ लिहिणें ही सामान्य गोष्ट नव्हे. याची रचना नेवासें येथें झाली, निदान ग्रंथसमाप्ति नेवासें येथें झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. सुरवात केव्हां झाली याबद्दल प्रत्यक्ष पुरावा समाप्तिकालासारखा कांहींही नाहीं; आणि अनुमानच करावयाचें झालें तर पैठणच्या शुद्धिपत्रप्रकरणाची दगदग संपण्यापूर्वीं कांहीं या ग्रंथाला सुरवात होणें शक्य नव्हतें असें म्हणतां येईल. आतां कोणत्या परिस्थितींत हा ग्रंथ ज्ञानदेवांनी लिहावयास घेतला? भगवद्गीताच भाष्यासाठीं कां घेतली? ग्रंथाची स्फूर्ति कोणी दिली? सद्गुरूला नमन करतांना ज्ञानदेव म्हणतातः—

> मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपूरु ।
> म्हणवूनी विशेषें अत्यादरु । विवेकावरी ॥ १–२२

गुरुकृपेनें संसाराचा पूर तरून गेलों आणि विवेकाकडे आपला ओढा लागला असें ज्ञानदेव सांगतात. वेदांताच्या परिभाषेंत विवेक म्हणजे आत्मानात्मविवेक. जें चिरंतन आहे तें आत्मतत्त्व; जें नाशिवंत आहे तें अनात्म. आणि आत्म कोणतें व अनात्म कोणतें हें ओळखणें हा विवेक. खरें कोणतें खोटें कोणतें, शुद्ध कोणतें अशुद्ध कोणतें, इत्यादि कळणें हाही विवेक पण हा व्यावहारिक विवेक व सर्वांच्या पुढची पायरी म्हणजे आत्मानात्मविवेक. तो ज्याला साधला, ज्यानें आत्मसात् केला त्याला विवेकाच्या इतर सर्व भूमिकाही उमगल्या पाहिजेत हें उघड आहे तिसाचा पाढा ज्याला आला त्याला

तिसापर्यंतचे सर्व पाढे येतात–आले पाहिजेत, तसाच प्रकार येथें आहे. तेव्हां वेदांतांतील, परमार्थांतील विवेक म्हणजे विवेक, अंधश्रद्धा नव्हे; आचरटपणा नव्हे, दुबळेपणा, बुवाबाजी नव्हे हेंही विसरतां कामा नये. ज्ञानदेवांचा विवेकावर अत्यादर होता आणि म्हणून ते जसें वेदांती होते तसे विवेकवादीही होते. किंबहुना वेदांताची थोरवी हीच कीं त्यांत विवेक आहे. आणि भगवद्गीता या ग्रंथांतही विवेक आहे. कृष्णानें अर्जुनाला "अमुक कर" म्हणून आज्ञा केली नाहीं; तर चर्चा करून त्याला आपला बोध पटवून दिला आणि पटवून दिल्यावरसुद्धां "यथेच्छसि तथा कुरु", तुझी इच्छा असेल तसें कर म्हणून त्यास सांगितलें. गीतेच्या या विवेकशालित्वामुळें ती सर्वांना प्रिय होते, सर्वांचीं मस्तकें तिजपुढें लवतात आणि ज्ञानदेवांचा सद्गुरुकृपेने, सद्गुरूच्या शिकवणीमुळें विवेकाकडे ओढा विशेष होता म्हणून त्यांनीं भगवद्गीतेचे विवरण मराठींत करण्याचें ठरविलें. याचें मुख्य कारण त्यांना आबालवृद्धांना हा विवेक पटवून द्यावयाचा होता. स्त्रियांना आणि शूद्रांना शिष्टांच्या समाजानें दूर केलें होतें, विद्येपासून अलग राखिलें होतें. त्या शिष्टपणाचा किल्ला नामोहरम करून त्यांना ज्ञानाची देणगी सर्वांना सारखेपणानें द्यावयाची होती. त्यांचा सद्गुरु जसा विवेकशाली होता तसाच "अभिलषित मनोरुचि पुरविता" होता. आणि या विवेकाची आवड असणाऱ्या बालग्रंथकारानें कथाही विवेकानें भरलेली अशी निवडली.

आतां अवधारा कथा गहन । जें कलाकौतुका जन्मस्थान ।
कीं अभिनव उद्यान । विवेकतरूंचें ॥ १–२८

या विवेकतरूच्या उद्यानाचें वर्णन करतां करतां ग्रंथरचनेच्या सुरवातीलाच आमचा हा कवि आनंदांत मग्न होऊन आपल्या काव्यसंपत्तीच्या भांडाराचा अपूर्व देखावा प्रकट करतो—

ना तरी सर्व सुखाची आदी । जे प्रमेय महानिधि ।
नाना नवरससुधाब्धि । परिपूर्ण हे ॥ १–२९
कीं परम धाम प्रकट । सर्व विद्यांचें मूळ पीठ ।
शास्त्रजातां वसौट । अशेषांचें ॥ १–३०
ना तरी सकळ धर्मांचें माहेर । सज्जनांचें जिव्हार ।
लावण्यरत्नभांडार । शारदेचें ॥ १–३१

म्हणोनी हा काव्या रावो । ग्रंथ गुरुवतीचा ठावो ।
येथूनि रसा झाला आवो । रसाळपणाचा ॥ १–३३
तेवींची आईका आणीक एक । येथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक ।
आणि महाबोधी कोंवळीक । दुणावली ॥ १–३४
येथ चातुर्य शाहणें झाले । प्रेम रुचीस आले ।
आणि सौभाग्य पोखले । सुखाचे येथ ॥ १–३५
माधुर्या मधुरता । शृंगारा सुरेखता ।
रूढपण उचिता । दिसलें भले ॥ १–३६
येथ कलाविदपणा कला । पुण्यासी प्रताप आगळा ।
म्हणऊनि जनमेजयाचे अवलीळा । दोष हरिले ॥ १–३७

**महाभारत ग्रंथांत मोठमोठीं प्रमेयें, सिद्धांत आहेत; नऊही रसांच्या अमृतानें तो ग्रंथ उचंबळलेला आहे; सर्व विद्यांचें मूळपीठ तेथें आहे आणि सर्व शास्त्रांचें वसतिस्थानही तेथेंच आहे; शारदेचें, काव्यशक्तीचें, ते लावण्यरत्नभांडार आहे; रसांना रसाळपणा या ग्रंथांत आला; शब्दरचनेच्या सौंदर्याला शास्त्रीयपणाची जोड येथेंच मिळाली; आणि महाबोध, महाज्ञान, हा कठीण विषयसुद्धां याच ग्रंथानें कोमल, कोंवळा, सोपा केला. कलेला कलाविदपणा आणि पुण्याला बलिष्ठपणा येथेंच प्राप्त झाला. ( पुण्य बलिष्ठ असतेंच असें सर्वदा दिसत नाहीं. ) आतां या महाभारतांतील गीतेचा प्रसंग व्याख्यानासाठीं ज्ञानदेवांनीं निवडला. त्याच्या वर्णनाचा थाट पहाः—**

आतां भारतकमळपरागु । गीताख्यु प्रसंगु ।
जो संवादला श्रीरंगु । अर्जुनेसीं ॥ १–५०

**भारतरूपीं कमलांतला पराग म्हणजे गीताप्रसंग असें गोड रूपक करून दुसऱ्या रूपकाच्या साहाय्यानें ज्ञानदेव गीतेचें महिमान सांगतात:—**

ना तरी शब्दब्रह्माब्धि । मथियला व्यासबुद्धी ।
निवडिलें निरवधि । नवनीत हें ॥ १–५१

**शब्दब्रह्माच्या, वाङ्मयाच्या सागराचें मंथन व्यासानें आपल्या बुद्धीनें करून हें त्यांतून जसें काय नवनीतच वेंचून काढलें आहे. पण नवनीताच्या पुढची गोष्ट ( जी युरोपांत माहीत नाहीं व जी हिंदुस्थानांत सर्वसामान्य आहे ) ती ही तयार केली.**

मग ज्ञानाग्निसंपर्कें । कडसिलें विवेकें ।
पद आलें परिपाकें । आमोदासी ॥ १–५२

हें नवनीत ज्ञानरूप अग्नीवर ठेवून विवेकाच्या साहाय्यानें, विचारपूर्वक, खरपूस कढविलें आणि तें चांगलें कढल्यामुळें ( परिपाक उत्तम झाल्यामुळें ) त्याचें आमोदयुक्त खमंग तूप झालें. अशा प्रकारें नवनीताहून सुंदर असें हें ज्ञानघृत आहे. तें तयार करण्याची पद्धत वरील ओवींत ज्ञानदेवांनीं दिलेली आहे ती विचारपूर्वक लक्षांत ठेविली पाहिजे. या ज्ञानघृताची अपेक्षा मोठमोठे लोक करीत असतात:—

जें अपेक्षिजे विरक्तीं । सदा अनुभविजे संतीं ।
सोहंभावें पारंगतीं । रमिजे जेथ ॥ १–५३
जें आकर्णिजे भक्तीं । जे आदिवंद्य त्रिजगतीं ।
तें भीष्मपर्वीं संगती । सांघिजेल ॥ १–५४
जे भगवद्गीता म्हणिजे । जे ब्रह्मेशानीं प्रशंसिजे ।
जे सनकादिकीं सेविजे । आदरेंसी ॥ १–५५

तेव्हां अशा प्रकारची ही नितांतरम्य कथा ज्ञानदेवांनीं आपल्या ग्रंथासाठीं घेतली. तिचें सेवन करण्याची योग्यता विरक्त, संत, सोहं ( मी ब्रह्म आहें ) या भावनेंत पारंगत झालेले आणि भक्त यांचीच आहे, त्यांनाच तिचें खरें रहस्य समजेल. ती कथा कोणी ऐकावी ? कोणाला रुचेल, विशेषतः पचेल ?

अहो अर्जुनाचिया पांतीं । जे परिसणिया योग्य होती ।
तिहीं कृपा करूनि संतीं । अवधान द्यावें ॥ १–६२

अर्जुनाच्या पंक्तीला बसून ऐकण्याला जे योग्य असतील त्या सज्जनांनीं या कथेकडे लक्ष द्यावें.

या ग्रंथाची रचना कशी होत गेली ? असें दिसतें कीं रोज कांहीं ग्रंथ तयार करावा व तो कित्येक नियमानें येणाऱ्या श्रोतेमंडळींना वाचून दाखवावा असें चाललें होतें. या श्रोते मंडळींत ज्ञानदेवाचे ज्येष्ठ बंधु व सद्गुरू निवृत्तिनाथ हे अग्रस्थानीं असत. वर दिलेली ओवी ही जशी सामान्य अर्थानें घेतां येते त्याप्रमाणें तिचा संदर्भयुक्त अर्थ घेतां येतो; म्हणजे समोर बसलेल्या श्रोत्यांची ती स्तुति आहे व प्रस्तुत ठिकाणीं तोच अर्थ अभिप्रेत आहे. जो सामान्य अर्थ त्यांत आहेच, त्यांतील खोच वाचकांच्या लक्षांत येईलच, पण ती खोच बोचूं

नये ही अर्थात् ज्ञानदेवांची फार इच्छा होती. कदाचित् त्या श्रोत्यांत " अर्जुनाचिये पांतीं "ला बसण्यायोग्य नसणारा एखादा असेल, नसेल असें नाहीं. पण विशेषत: तेथें निरूपणकर्त्याविषयीं प्रेम असणारेच श्रोते होते. त्याची साक्ष त्यानंतरच्या ओंव्यावरून लागलीच पटते:—

हे सलगी म्यां म्हणितलें । चरणांलागोनि विनविले ।
प्रभू सखोल हृदय आपुले । म्हणौनिया ॥ १–६३

आतां श्रोत्यांची स्तुति करतांना ज्ञानदेव स्वत:संबंधीं अत्यंत लीनतेनें बोलतात व त्यांच्यासारख्या महाकवीची ही नम्र वृत्ति मोठी हृदयंगम वाटते.

जैसा स्वभावो मायबापांचा । अपत्य बोले जरी बोबडी वाचा ।
तरी अधिकचि तयाचा । संतोष आथी ॥ १–६४
तैसा तुम्ही मी अंगिकारिला । सज्जनी आपला म्हणितला ।
तरी उणें सहजे उपसाहला । प्रार्थू काई ॥ १–६५

श्रोत्यांच्याबरोबर मधून मधून संभाषण ज्ञानेश्वरींत ग्रंथकार करीत असतो व प्रत्युत्तरही बहुतेक वेळीं निवृत्तिनाथ देतात; क्वचित् सर्व श्रोतृमंडळ मिळून देतात. म्हणून वर जें सांगितलें कीं रोज ग्रंथ लिहून तो निवडक श्रोत्यांना वाचून दाखविण्याचा क्रम असला पाहिजे तें बरोबर वाटतें. आणखी कांहीं प्रसंग पहाण्यासारखे आहेत. पांचव्या अध्यायांत " सर्वभूतहिते रता:" अशा सज्जनांचें वर्णन करतांना ग्रंथकार रंगांत येतो आणि अलंकारांची झोड उठवितो:–

ते आनंदाचे अनुकार । सुखाचे अंकुर ।
कीं महाबोधे विहार । केले जैसे ॥ १३८
ते विवेकाचे गांव । कीं परब्रम्हीचे स्वभाव ।
ना तरी अलंकारिले अवयव । ब्रह्मविद्येचे ॥ १३९

तेव्हां सद्गुरु निवृत्तिनाथ कौतुकानें म्हणतात:—

हें बहु असो एकैक । वानिसी काई ? ॥ १४०

अशा पुष्कळ गोष्टी आहेत. त्यांतील एकेकीचें तूं इतकें वर्णन करीत बसणार कीं काय ?

तूं संतस्तवनीं रमसी । तरी कथेची से न करिसी ।
कीं निराळीं बोल देखसी । सनागर ॥ १४१

संताची स्तुति तूं एकदां करण्यांत गर्क झालास कीं तुला कथेचें भान रहात

**नाहीं आणि जेथें निराळंबाचें ( निराळीं ) म्हणजे ब्रह्माचें वर्णन चाललें आहे तेथें सनागर, सुंदर, गोड शब्द अगदीं हुडकून घालण्याची तुला स्फूर्ति होते.**

परि तो रसातिशयो मुकुली । मग ग्रंथार्थदीपु उजळी ।
करी साधुहृदयराउळीं । मंगळ उखा ॥ १४२

**आतां हा रसाचा अतिशय सुटलेला प्रवाह आवर आणि ग्रंथाच्या अर्थरूपी दिव्याला उज्वलित कर म्हणजे ग्रंथाचा अर्थ सांग; आणि तो सांगून सज्जनांच्या अंतःकरणरूपीं राउळांत, घरांत मंगल असा उषःकालाचा प्रकाश पसरून दे.**

ऐसा श्रीगुरूचा उवाईला । निवृत्तिदासासी पातला ।
मग तो म्हणे श्रीकृष्ण बोलिला । तेंचि आइका ॥ १४३

**अशी श्रीगुरूची सूचना ज्ञानदेवाला मिळाली तेव्हां ज्ञानदेव म्हणतात, ठीक आहे; ( माझें बोलणें मी आवरतों ) जें श्रीकृष्ण बोलला तेंच ऐका; मी ग्रंथांत जें आहे तेंच सांगतों.**

**नवव्या अध्यायाच्या सुरवातीलाही श्रोत्यांना अवधान द्या, लक्ष द्या म्हणून ज्ञानदेव प्रार्थना करतातः—**

तरी अवधान एकले दीजे । मग सर्व सुखासी पात्र होइजे ।
हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड आइका ॥ १

**तुम्ही सावधानपणें ऐका म्हणजे श्रवणानें सर्व सुखें तुम्हांला प्राप्त होतील हें माझें प्रतिज्ञेचें बोलणें आहे.**

परी प्रौढी न बोलों हो जी । तुम्हां सर्वज्ञांच्या समाजीं ।
देयावें अवधान हे माझी । विनवणी सलगीची ॥ २

**पण मी फुशारकी मात्र मारीत नाहीं. कारण आपण मंडळी सर्वज्ञ आहांत. अवधान द्या एवढीच ही मी सलगीनें विनवणी करीत आहें. यापुढें कवि समोर जमलेल्या श्रोत्यांचें वर्णन करतात ( आणि म्हणून तसे कांहीं श्रोते समोर बसले होते असें आम्हांस वाटतें. )**

कीं जे ललेयाचे लळे सरती । मनोरथांचे मनोरथ पुरती ।
जरी माहेरें श्रीमंतें होतीं । तुम्हां ऐसीं ॥ ३
तुमचिया दिठिवेयाचिया वोले । सासिन्नले प्रसन्नतेचे मळे ।
ते साउली देखोनि लोळे । श्रांतु जी मी ॥ ४

प्रभु तुम्ही सुखामृताचे डोहो । म्हणूनी आपुलिया स्वेच्छा बोलावो लाहों ।
येथही जरी सलगी करूं बिहों । तरी निवों कें पां ॥ ५
ना तरी बाळक बोबडा बोलीं । वांकुडा विचुका पाउलीं ।
ते चोज करूनी माउली । रिझे जेवी ॥ ६

नवव्या अध्यायांतील विषय निरूपणाला गहन होता तेव्हां श्रोत्यांचें विशेष अवधान ग्रंथकाराला पाहिजे होतें व श्रोत्यांनीं "न्यून" नाहींसें करावें अशीही त्याची इच्छा होती. निवृत्तिनाथ व इतर कांहीं जाणते श्रोते ज्ञानदेवाच्या ग्रंथाची चर्चाही करीत असतील. तेव्हां ग्रंथरचनेचा हा प्रकार असा होता. छपाईची कला जेव्हां अस्तित्वांत नव्हती तेव्हां असाच प्रकार असावा हें साहजिक होतें.

३ ज्ञानेश्वरी मराठींत लिहिली म्हणजे ती सर्वांना सहज, सोपेपणानें कळावी म्हणून अर्जुन श्रीकृष्णाला वरचेवर म्हणतो—"देवा, मला मराठी अर्थ करून सांगा." संस्कृत पंडितांनीं संस्कृत भाषेंतील ज्ञान कांहीं थोड्या लोकांखेरीज सर्वांना दुर्लभ करून टाकलें होतें. तें ज्ञानभांडार आबालवृद्धांसाठीं, स्त्रीशूद्रा-साठीं, सर्वांसाठीं ज्ञानदेवांनीं खुलें केलें आणि मराठींत अत्यंत सुंदर ग्रंथरचना करतां येतें हेंही त्यांनी सिद्ध केलें. अठराव्या अध्यायाच्या शेवटीं ग्रंथसमाप्ति करतांना म्हटलें आहे:—

वेदु संपन्न होय ठाईं । परी कृपणु ऐसा आनु नाहीं ।
जो कानीं लागला तिहीं । वर्णाच्याची ॥ १४५७

वेद हा आपल्या ठिकाणीं चांगला श्रीमंत आहे पण असा कद्रू, कृपण दुसरा मिळणार नाहीं. कारण (जवळ एवढी संपन्नता असून) फक्त तीन वर्णांच्या (द्विजांच्या) कानाला तो लागला आहे, त्यांच्याच कानांत आपल्या गोष्टी तो सांगतो (कानांत सांगणें म्हणजे दुसऱ्याला न कळेल अशा प्रकारें सांगणें) आणि बाकीच्यांना म्हणजे शूद्र या चौथ्या वर्णाला किंवा पंचमांना तो कांहींही सांगत नाहीं.

येरां भवव्यथा ठेलिया । स्त्रीशूद्रादिकां प्राणियां ।
अनवसरू मांडूनिया । राहिला आहे ॥ १४५८

स्त्री, शूद्र वगैरे जीं दुसरीं माणसें त्यांना भवव्यथा म्हणजे संसाराची व्यथा

**होते पण त्यांच्या बाबतींत वेदानें मांडलेल्या कारभारांत जागा नाहीं; वेद त्यांच्यासाठीं कांहींही करीत नाहीं.**

तरी मज पाहतां तें मागील उणें । फेडावया गीतापणें ।
वेदु वेठला भलतेणें । सेव्य होवावया ॥ १४५९

**तेव्हां मला असें वाटतें कीं वाटेल त्याला उपयोग व्हावा म्हणून ( वर्णावर्ण न पहातां ) वेदालाच वेठीला धरून त्याला गीतेचें रूप दिलें आहे व अशा प्रकारें वेदांतील हा पूर्वीचा उणेपणा काढून टाकला आहे.**

यालागीं मागिली कुटी । म्याला वेदु गीतेच्या पोटीं ।
रिगाला, आतां गोमटी । कीर्ति पातला ॥ १४६५

**( तीन वर्णांच्याच उपयोगास येतो, बाकीच्यांना त्याचा कांहीं उपयोग नाहीं ) ही जी निंदा पूर्वी होत असे तिला भिऊन वेद गीतेच्या पोटांत शिरला आणि (गीतारूपानें सर्वांना प्राप्त झाल्यापासून) त्याला चांगली कीर्ति मिळाली.**

तैसें शब्दे जें न लभे । तें घडूनियां अनुष्टुभें ।
स्त्रीशूद्रादिप्रतिभे । सामाविलें ॥ १६९९

**जें शब्दाला मिळू शकत नाहीं असें ब्रह्मज्ञान अनुष्टुभ् छंदांत घालून स्त्रिया आणि शूद्र यांच्या प्रतिभेंत, कल्पनाशक्तीच्या आटोक्यांत या गीतेनें आणून सोडलें.**

आणि तोचि हा मी आतां । श्रीव्यासाचीं पदें पाहता पाहतां ।
आणिला श्रवणपथा । मऱ्हाटिया ॥ १७०८

**आणि तोच गीतार्थ व्यासाचीं वाक्यें लक्षपूर्वक वाचून मराठी जाणणाऱ्यांच्या कानावर यावा अशी व्यवस्था ही ज्ञानेश्वरी रचून मी केली.**

यालागीं आम्हां प्राकृतां । देशीकारें बंधें गीता ।
म्हणणें हें अनुचिता । कारण नोहे ॥ १७२०

**प्राकृत जनांच्यासाठीं देशी भाषेंत गीता सांगणें यांत अनुचित असें म्हणण्याचें कारण नाहीं. प्रथम आपल्याकडे खूपच कमीपणा घेऊन ज्ञानदेवांनीं गीता मराठींत आणल्याबद्दल लिहिलें. पण पुढें तें म्हणतात, माझ्या सद्गुरूची कृपा असल्यावर माझ्या हातून मराठींत असा ग्रंथ व्हावा यांत नवल काय ?**

तैसा व्यासाचा मागोवा घेतु । भाष्यकारांतें वाट पुसतु ।
अयोग्यही मी न पवतु । कें जाईन ॥ १७२२

**व्यासानें बरोबर काय म्हटलें आहे तें सर्व लक्षपूर्वक पाहिलें. गीतेवरील भाष्यकारांचा अभ्यास करून अवघड ठिकाणें समजावून घेतलीं. एवढी तयारी केल्यावर मी जरी अयोग्य असलों तरी हें कार्य शेवटास गेल्याशिवाय कसें राहील ? पण मी अयोग्य असलों तरी थोर सद्गुरूचा शिष्य आहे आणि त्याची पूर्ण कृपा मजवर आहे.**

आणि पृथिवी जयाचिया क्षमा । नुवगे स्थावरजंगमा ।
जयाचेनि अमृते चंद्रमा । निववी जग ॥ १७२३
जयाचें आगिक असिकें । तेज लाहोनि अर्कें ।
आंधाराचें सावाइकें । लोटिजत आहे ॥ १७२४
समुद्रा जयाचे तोय । तोया जयाचे माधुर्य ।
माधर्या सौंदर्य । जयाचेनी ॥ १७२५
पवना जयाचे बळ । आकाश जेणे पघळ ।
ज्ञान जेणें उज्ज्वळ । चक्रवर्ती ॥ १७२६
वेद जेणे सुभाष । सुख जेणे सोल्लास ।
हे असो रूपस । विश्व जेणे ॥ १७२७
जो सर्वोपकारी समर्थु । सद्गुरु श्री निवृत्तिनाथु ।
राहटत असे मजहीआंतु । रिगावया ॥ १७२८
आतां आयती गीता जगीं । मी सांगे मऱ्हाठिया भंगीं ।
येथें के विस्मयालागीं । ठावो आहे ॥ १७२९

**आपल्या सद्गुरूचें कौतुक सांगतांना ज्ञानदेव म्हणतातः—**

म्हणोनि माझे नित्य नवे । श्वासोश्वासही प्रबंध होवावे ।
श्री गुरुकृपा काय नोहे । ज्ञानदेवो म्हणे ॥ १७३४
या कारणे मिया । श्री गीतार्थ मऱ्हाठिया
केला जो कां यया । दिठीचा विषो ॥ १७३५

**मी गीतेचा अर्थ मराठींत इतक्या उत्तम प्रकारें आणलेला आहे कीं लोकांच्या दृष्टीचा तो विषय झाला आहे, शब्दरचना पाहूनच तो समजतो.**

**गीतेची रचना करण्यांत याप्रमाणें वाक्चातुर्य तर दाखविलेंच पण वाक्चातुर्यापेक्षांही अंतरंग, आंतला अर्थ, अत्यंत महत्त्वाचा आहे व अंतरंग**

**कळण्याची पात्रता असणारासच या अध्यात्म ग्रंथाचा अधिकार आहे; पण या ग्रंथाच्या वाक्चातुर्यानें सामान्य जनही आनंदित होईल.**

तैसे अध्यात्मशास्त्रीं इयें । अंतरंगचि अधिकारिये ।
परी लोकु वाक्चातुर्ये । होईल सुखिया ॥ १७४९

**गीतार्थांत प्रकट केलेल्या आपल्या वाक्चातुर्याचा ज्ञानदेवांना योग्य अभिमान होता. नवव्या अध्यायाचें अत्यंत अवघड असे निरूपण उत्तम प्रकारें केल्यावर दहाव्या अध्यायाच्या प्रस्तावनेंत ते म्हणतात:--**

देशीयेचे नागरपणे । शातु शृंगारानें जिणे ।
तरी ओवीया होतीं लेणे । साहित्यासी ॥ ४२

**मराठीं भाषेचें सौंदर्य इतकें अप्रतिम कीं त्याच्या सामर्थ्यानें शांत रसानें शृंगार रसावरही मात केली. या ( ज्ञानेश्वरींतील ) ओव्या म्हणजे साहित्याला, वाङ्मयाला मोठ्या अलंकार आहेत.**

मूळ ग्रंथींचिया संस्कृता । वरी मऱ्हाटी नीट पाहतां ।
अभिप्राय मानलिया उचिता । कवण भूमी हे न चोजवे ॥ ४३

**मूळचा संस्कृत ग्रंथ वाचला आणि नंतर ज्ञानेश्वरीच्या मराठी ओव्या नीट वाचून पाहिल्या आणि जर अभिप्राय योग्यपणें कळला तर मूळ कोणतें आणि भाष्य कोणतें हें कळणार नाहीं. हेंच स्पष्ट करण्याला या ब्रह्मचाऱ्यानें अगदीं संसारांतला आणि शृंगार रसांतला गोड व उचित दृष्टांत दिला:--**

जैसें आंगाचेनि सुंदरपणें । लेणिया आंगचि होय लेणें ।
तेथ अलंकारिलें कवणकवणें । हे निर्वचेना ॥ ४४
तैशी देशी आणि संस्कृत वाणी । एका भावार्थाच्या सुखासनीं ।
शोभती आयणी । चोख आइका ॥ ४५
तैसें देशियेचें लावण्य । हिरोनि आणीलें तारुण्य ।
मग रचिलें अगण्य । गीतातत्व ॥ ४७

**देशीयेच्या, मराठीच्या सौंदर्याबद्दल, लावण्याबद्दल, ज्ञानदेवांना फार अभिमान होता:--**

माझा मराठाचि बोल कौतुकें । अमृताते पैजा जिंके ।
तेशी अक्षरें रसिकें । मेळवीन ॥

**असें म्हणणाऱ्या याच कविश्रेष्ठानें देशी भाषेला संस्कृतच्या व कोणत्याही**

नागर भाषेच्या सिंहासनावर हक्कानें प्रस्थापित केली. हिंदुस्थानची उंची हिमालयाने ठरविली त्याप्रमाणें मराठीची थोरवी ज्ञानदेवानें निश्चित केली यांत कांहीं शंका नाहीं.

सातव्या अध्यायाचे शेवटीं मराठींतील आपली ग्रंथरचना विवेचनाच्या सुंदर विषयाला किती अनुकूल आहे हें सांगितलें आहे.

आतां तयाचें ते प्रश्न करणें । वरी सर्वज्ञ श्रीहरीचें बोलणें ।
हें संजयो आवडलेपणें । सांगेल कैसें ॥ २०५
तिये अवधान द्यावें गोठी । बोलिजेल नीट मऱ्हाठी ।
जैसी कानाचे आधीं दृष्टी । उपेगा जाये ॥ २०६

अर्जुनासारखा प्रश्न करणारा, श्रीकृष्णासारखा सर्वज्ञ त्या प्रश्नांचीं उत्तरें देणारा, आणि तो विषय ज्याला अतिशय प्रिय असा संजय या संवादाचें वर्णन करणारा. तेंच वर्णन आम्ही नीट मराठींत सांगतों तिकडे लक्ष द्यावें. तें अशा सुंदर शब्दरचनेनें सांगूं कीं कानांत (वाचून) शब्द पडण्यापूर्वीच शब्द-रचनेकडेच पाहून डोळे प्रथम आनंदित होतील, कानाच्या पूर्वीं दृष्टीचा उपयोग होईल.

बुद्धीचिया जिभा । बोलाचा न चाखतां गाभा ।
अक्षरांचिया भांबा । इंद्रियें जिती ॥ २०६

शब्दांच्या अंतरंगांतील अर्थ बुद्धीच्या जिभेनें चाखण्यापूर्वींच अक्षरांच्या (शब्दरचनेच्या) सौंदर्यानेंच इंद्रियें गारीगार होऊन जातील, इंद्रियांना शब्दरचना जिंकून टाकील. आणि हें स्पष्ट करण्यासाठीं एक गोडसा सुंदर दृष्टांतः—

पहा पां मालतीचे कळे । प्राणासी कीर वाटले परिमळें ।
परि वरिचिला बरवा कीर डोळे । सुखिया नव्हती ॥ २०८

मालतीपुष्पाच्या कळ्या सुगंधानें प्राणांना तर संतुष्ट करतातच पण वरच्या बरवेपणानें, सौंदर्यानें डोळे सुखी होत नाहींत काय ?

तैसे देशियेचिये हवावा । इंद्रिये करिती राणिवा ।
मग प्रेमयाचिया गांवा । लेसां जाईजे ॥ २०९
तेसें नागरपणें । बोलु निमे तें बोलणें ।
ऐका ज्ञानदेव म्हणे । निवृत्तीचा ॥ २१०

**ज्यानें बोलच नाहींसा होतो ( निःशब्द किंवा शब्दापलीकडचें जें ब्रह्म त्याचा अनुभव येतो ) असें बोलणें नागरपणानें ( उत्तम प्रकारें ) निवृत्तीचा ज्ञानदेव बोलेल तें ऐका. तें बोलणें नागर म्हणजे कसें तर देशी भाषेच्या सामर्थ्यानें इंद्रियें राज्य करूं लागतात ( सुखी होतात ) आणि याप्रमाणे प्रथम इंद्रियें सुखी होऊन वाचकाला, श्रोत्याला प्रमेयाच्या गांवाला पोहोंचतां येतें.**

**अकराव्या अध्यायाच्या सुरवातीला कांहीं ओव्याही या संबंधांत लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. शांत आणि अद्भुत या रसांचें या अध्यायांत सुंदर मिश्रण आहे.**

आतां यावरी एकादशीं । कथा आहे दोन्ही रसीं ।
येथ पार्था विश्वरूपेसी । होईले भेटी ॥ १
जेथ शांताचिया घरा । अद्भुत आला आहे पाहुणेरा ।
आणि येरांही रसां पांतिकरां । जाहला मानु ॥ २
अहो वधूवराचिये मिळणी । जैशी वऱ्हाडियांही लुगडीं लेणीं ।
तैसे देशियेच्या सुखासनीं । मिरवले रस ॥ ३
मीनले गंगायमुनेचे ओघ । तैसें रसां जाहले प्रयाग ।
म्हणोनि सुस्नात होय जग । आघवें येथ ॥ ६ ॥
माजी गीता सरस्वती गुप्त । आणि दोन्ही रस ते ओघ मूर्त ।
यालागीं त्रिवेणी हें उचित । फावली बापा ॥ ७
तीरें संस्कृताचीं गहनें । तोडोनि मऱ्हाठिया शब्दसोपानें ।
रचिलीं धर्मनिधानें । श्रीनिवृत्तिदेवें ॥ ९
म्हणोनी भलतेणें येथ सद्भावें नाहावें । प्रयागमाधव विश्वरूप पहावें ।
येतुलेनि संसारासि द्यावें । तिलोदक ॥ १०
येथ अर्जुनचि काय म्हणों पातला । आजि आवडतयाही सुकाळु जाहला ।
जे गीतार्थु हा आला । मऱ्हाठिये ॥ १४
हें सारस्वताचें गोड । तुम्हीचि लाविलें जी झाड ।
तरी आतां अवधानामृतें वाड । सिपोनि कीजे ॥ १९
मग हें रसभावफुलीं फुलेल । नानार्थ फळभारें फळा येईल ।
तुमचेनि धर्में होईल । सुरवाडु जगा ॥ २०

या बोला संत रिझले । म्हणती तोषलों गा भलें केलें ।
आतां सांगें जें बोलिले । अर्जुनें तेथ ॥ २१

तेव्हां ही ज्ञानेश्वरीची रचना अशा प्रकारें क्रमाक्रमानें झाली व जसजशी झाली तसतशी ती रसिक व सज्जन श्रोत्यांना ज्ञानदेवांनीं वाचून दाखविली, आणि आपल्या गुरूला तर ती अर्थात् नित्यशः वाचून दाखवीत.

४ ज्ञानेश्वरीची रचना शके १२१२ या वर्षीं पूरी झाली पण ग्रंथारंभ करून समाप्ति होईपर्यंत किती काळ लागला यासंबंधीं अर्थात् कांहींच माहीत नाहीं. बहुधा ही रचना कित्येक महिने चालली असावी. वयाच्या पंधराव्या वर्षीं ज्ञानदेवानें लिहिलेल्या या ग्रंथांत "व्यास आणि भाष्यकार" यांच्या ग्रंथांचें उत्तम ज्ञान आणि साहित्यशास्त्रांत उत्तम पारंगतता हे गुण विशेषेंकरून डोळ्यांत भरतात. मग गीतार्थाच्या "अंतरंगीं अधिकारिये" खुद्द ज्ञानेश्वरीचे प्रणेते होते हें सांगावयास नकोच. ज्या सद्‌गुरूच्या सामर्थ्यानें ज्ञानदेवांनीं ही ग्रंथरचना केली ते सद्‌गुरु निवृत्तिनाथ यावेळीं सतरा वर्षें वयाचे होते. ज्ञानेश्वरीच्या रचनेनंतर ज्ञानदेव या जगांत सहा वर्षें होते. त्यांचा समाधिकाळ शके १२१८ हा आहे व त्यापुढें एका वर्षांत त्यांच्या तिघांही भावंडांचें देहावसान झालें. ज्ञानदेवांच्या एकवीस वर्षांच्या आयुष्यांत ज्ञानेश्वरीची निर्मिति हा सर्वांत अद्भुत चमत्कार त्यांनीं करून दाखविला ही गोष्ट "रेडा बोलविणें आणि भिंत चालविणें" अशा चमत्कारांचें कौतुक करणाऱ्यांनाही मान्य होईल गीतेंतील तत्वज्ञान आणि कर्तव्यशास्त्र यांची "नीट मऱ्हाठींत" केलेली या ग्रंथांतील फोड ही त्यांनींच म्हटल्याप्रमाणें "मूळ भूमि न चोजवे" या प्रकारची झालेली आहे. योग आणि अध्यात्म यांचें या ग्रंथांतील विवरण स्पष्ट आणि निःसंदेह आहे; इतकें स्पष्ट आणि निःसंदेह आहे कीं कित्येक "सांप्रदायिक" म्हणवून घेणारी मंडळी ब्रह्मज्ञान इतकें उघड केल्याबद्दल ज्ञानेश्वरीकर्त्यांना दोष देतात. त्या वादांत पडण्याचा येथें विचार नाहीं. योग आणि अध्यात्म यांचें विवेचन करून त्या सर्वांचें पर्यवसान "कर्तव्य" सांगण्यांत केलेलें आहे आणि म्हणून गीता-ज्ञानेश्वरी हा अत्यंत व्यवहारोपयोगी ग्रंथ आहे. ज्ञानेश्वरी हें गीतेवरचें भाष्य आहे; त्यांत गीतेचा अर्थ उत्कृष्टपणें दिलेला आहे; पण हें गीतेचें भाषांतर नव्हे. या ग्रंथांत ग्रंथकर्त्यानें स्वतःचीं प्रतिभा आणि बुद्धि हीं निरलसपणानें आणि निःशंकपणानें ओतलेली आहेत.

भगवद्गीतेसारख्या सूत्रमय ग्रंथावर अशा प्रकारें ग्रंथ करणें म्हणजे नवीन ग्रंथनिर्मिति आहे. गीतेंतील तत्त्वें पटल्यामुळें आणि गीतेबद्दल अत्यंत आदर असल्यामुळे ग्रंथकारानें हा ग्रंथ मी नवीन लिहिला आहे असें न सांगतां विनम्रपणें ही गीतेची व्याख्या आहे असें सांगितलें. मोरोपंती महाभारत हा ग्रंथ महाभारताची कथा घेऊन बहुतेक ठिकाणीं जसा स्वतंत्र रचलेला आहे त्याहोपेक्षां फार मोठ्या प्रमाणांत ज्ञानेश्वरी हा स्वतंत्र ग्रंथ आहे. ज्ञानदेवांच्या ठिकाणीं स्वतंत्र ग्रंथनिर्मितीची शक्ति होती याबद्दल स्थूलदृष्टि व स्थूलबुद्धि वाचकाला व टीकाकारालाही शंका राहूं नये यासाठीं निवृत्तिनाथांनीं ज्ञानदेवांना "अमृतानुभव" लिहावयास सांगितला. या अमृततुल्य आश्चर्यकारक ग्रंथाचा परामर्श एका स्वतंत्र भागांत घेण्याचा प्रयत्न केलेला आहे. हा ग्रंथ ज्ञानदेवांनीं तीर्थयात्रेहून परत आल्यावर लिहिला व त्यांच्या वाङ्मयात्मक कर्तृत्वाच्या कीर्तिप्रासादाचा तो कळस असें म्हणण्यास हरकत नाहीं. याशिवाय ज्ञानदेवांच्या नांवावर जे ग्रंथ आणि अभंग आहेत त्यांच्या निश्चित कर्तृत्वाबद्दल वाद उपस्थित झालेले आहेत. त्यांचा निर्णय करणें हें सोपें काम नाहीं व प्रत्यक्ष इतिहासाचीं साधनें उपलब्ध नसल्यानें व तीं लौकरच उपस्थित होतील असा संभवही नसल्यानें त्यासंबंधीं हट्टीपणानें एखाद्या विशिष्ट मताचा प्रचार करण्यांत तादृश शहाणपण नाहीं. ज्ञानेश्वरीच्या बाबतींत लक्षांत ठेवण्यासारखी अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे कोणत्याही एखाद्या विशिष्ट पंथाचा पुरस्कार करण्यासाठीं किंवा मताचा धिःकार करण्यासाठीं हा ग्रंथ जन्माला आला नाहीं. यांत नाथपंथ, भक्तिमार्ग, पंढरपूर संतमंडळ, भागवतधर्म यापैकीं कोणाएकाचा प्रचार आहे असें म्हणणें धाडसाचें तर होईलच पण धाडसापेक्षांहीं त्यांत ज्ञानेश्वरीच्या अंतरंगाचा अवमान केल्याचें पातक घडतें हें विसरून चालणार नाहीं.

इहलोकांतील कर्तव्य निःशंकपणें समजावें हा उत्कृष्ट ज्ञानाचा एक भाग; आणि केवळ शारीरिक, इंद्रियगम्य सुखदुःखापलीकडे कांहीं उच्चतर गोष्टी आहेत हें समजावे हा उत्कृष्ट ज्ञानाचा दुसरा भाग. अशा प्रकारें जें ज्ञान निर्माण होतें तें ज्ञान अगदीं मुक्त हस्तानें सर्व माणसांनीं, "प्राकृतां"नीं लुटावें, तें त्यांना सोपें व्हावें, केवळ मराठी जाणणाऱ्यांनाही तें मिळावें, या हेतूनें संस्कृताच्या पेटींत ज्ञान झाकून ठेवून त्या पेटीला वर अधिकाराचें आणि परंपरेचें कुलूप

ोकलेलें होतें तें मोडून तोडून ज्ञानदेवांनीं या ग्रंथांत तें सर्वांचा हात पोहोंचेल अशा प्रकारें आणून ठेविलें आहे. लोकसत्ता, लोकशाही, समाजसत्ता ही ज्ञानाच्या बाबतींत ज्ञानदेवांनीं उत्कृष्टपणें अंमलांत आणली. सामान्य माणसांनाही नवव्यथा होते ही गोष्ट असामान्य म्हणून मिरविणाऱ्यांना बहुधा कळत नाहीं; आपण असामान्य आहोंत या डौलांत ते इतके चूर झालेले असतात कीं त्यांना दुसऱ्यांची आठवणच होत नाहीं. स्वार्थत्याग हा देखील स्वतःच्या बडेजावीचा विषय करून ते त्याचें रूपांतर स्वार्थांतच करतात. पण ज्ञानदेव म्हणजे मूर्तिमंत निःस्वार्थीपणा होता. " भूतांची दया हें भांडवल संता " त्या भूतदयेनें प्रेरित होऊन त्यांनीं " गीता–ज्ञानेश्वरी " ग्रंथ लिहिला. मोरोपंतांनीं या बाबतींत काढलेले उद्गार खरोखर समर्पक आहेत:—

श्रीमद्भगवद्गीताव्याख्या केली जगासि ताराया।
सारा या सद्ग्रंथा सेविती संसारताप साराया ॥

किंवा ज्ञानेश्वरीची प्रत शुद्ध करून प्रचलित करणारे एकनाथी भागवताचे कर्ते आणि ज्ञानदेवांनीं घालून दिलेल्या मार्गाला चोखाळणारे थोर सत्पुरुष यांनीं आपल्या एका अभंगांत हाच अभिप्राय मोरोपंतांच्या पूर्वींच व्यक्त केलेला होता तोही येथें देणें अप्रासंगिक होणार नाहीं:—

कृपाळु उदार माझा ज्ञानेश्वर । तया नमस्कार वारंवार ॥
न पाहे यातीकुळाचा विचार । भक्तकरुणाकर ज्ञानाबाई ॥
भलतिया भावें शरण जातां भेटी । पाडीतसे तुटी जन्मव्याधी ॥
ज्ञानाबाई माझी अनाथाची माय । एका जनार्दनी पाय वंदितसे ॥

तव्हां " यातिकुलाचा विचार " न करतां ज्ञानदेव हे " अनाथाची माय " होते. 'जन्मव्याधी "ची तुटी करावी हा त्यांचा हेतु होता; आणि त्या हेतूनें त्यांनीं ज्ञानेश्वरी लिहिली. पदोपदीं येणारीं कर्तव्यें करणें. त्यांपासून पळून न जाणें ही तर गीताशास्त्राची प्रमुख शिकवण आहे व तिचाच पुरस्कार ज्ञानदेवांनीं या ग्रंथांत केलेला आहे. गीता संपवितांना श्रीकृष्ण अर्जुनाला विचारतात:—

तरी सांग पां पांडवा । सशास्त्र सिद्धांतु आघवा ।
तुज एक चित्तें फावा । गेला आहे ? ॥ १८–१५४०
आम्ही तैसें हें जया रीति । उगाणिलें कानांच्या हातीं ।
येरी तैसेंचि तुझ्या चित्तीं । पैठें केलें कीं ? ॥ १५–४१

अथवा माझारीं । गेले सांडीविखुरी ।
किंवा उपेक्षेवरी । वाळूनि सांडिलें ॥ १५४२
जैसे आम्ही सांगितलें । तैसेंचि हृदयीं फावलें ।
तरी सांग पां वहिलें । पुसेन तें मी ॥ १५४३
तरी स्वाज्ञानजनितें । मागिलें मोहें तूंतें ।
भुलविलें तो येथें । असे कीं नाहीं ॥ १५४४
हें वहु पुसों कांई । सांगें तूं आपल्या ठाईं ।
कर्माकर्म कांही । देखतासी ॥ १५४५

**अत्यंत श्रेष्ठ अशा ज्ञानश्रवणानें अर्जुन तन्मय झाला होता. हा प्रश्न ऐकून आनंदानें, प्रेमानें, कृतज्ञतेनें त्यांचें अंतःकरण भरून आलें. फाटकी तुटकी नोकरी देणाऱ्याचें उपकार आपण जन्मभर स्मरतो, कसली तरी परीक्षा उत्तीर्ण झालों कीं पेढे वाटतों, पगारांत पांच रुपयाची वाढ करून देतों म्हणणाऱ्या उदरंभरू गुरूचे पाय धरतो; पण ज्यानें सर्वांत श्रेष्ठ ज्ञान दाखविलें, कर्तव्य निःसंदेहपणें पटवून दिलें, अंतःकरणांतील भय व शंका हीं नाहींशी केलीं असा जर सद्गुरू कोणी भेटला तर अर्जुनाची जी स्थिति झाली तीच आपली होणार नाहीं कां ? त्याला " आनंदामृताचें भरतें " आलें.**

विविधा औत्सुक्यांची दाटी । चीप दाटत होती कंठीं ।
ते करूनिया पैठी । हृदयामांजीं ॥ १८–१५५७
वाचेचे विगुळणें । सांवरूनि प्राणें ।
अक्रमाचे श्वसणे । ठेवूनि ठायीं ॥ १५५८

**तो अर्जुन कृष्णाला म्हणतो:–देवा मोह अद्यापि आहे कां म्हणून विचारतोस ?**

तरी तो सहकुटुंब गेला जी ठावो । घेऊनि आपुला ॥
आतां मोह असें कीं नाहीं । हें ऐसें जी पुससी काई ।
कृतकृत्य जाहलों पाहीं । तुझेपणें ॥ १६६२
गुंतलो होतों अर्जुनगुणें । तो मुक्त झालों तुझेंपणें ।
आतां पुसणें सांगणें । दोन्ही नाहीं ॥ १६६३
मी तुझेनि प्रसादें । लाधलेनी आत्मबोधें ।
मोहाचे तया कांदे । नेदींच उरों ॥ १६६४

आतां करणें कां न करणें । हें जेणें उठी दुजेपणें ।
तें तूंवाचूनि नेणे । सर्वत्र गा ॥ १६६५
येविषयी माझ्या ठायीं । संदेहाचें नुरेचि कांहीं ।
त्रिशुद्धी कर्म जेथ नाही । तें मी जालों ॥ १६६
जे मज तुम्हांआड । होतें भेदांचे कवाड ।
ते फेडोनि केलें गोड । सेवासुख ॥ १६७४
तरी आतां तुझी आज्ञा । सकळ देवाधिदेवराज्ञा ।
करीन देईं अनुज्ञा । भलतियेविषयीं ॥ १६७५

तेव्हां असा हा निःसंदेह मार्ग दाखविणारा ग्रंथ " नीट मऱ्हाठीं " त ज्ञानदेवांनीं आणला. हा लिहिला त्याच वेळीं अनेकांनीं श्रवण केला आणि या " वाळीत " टाकलेल्या भावंडांभोंवती लोक गोळा होऊं लागलें. निवृत्तिनाथ हे सर्वांचे गुरु; पण ज्ञानदेव हें जनतेच्या प्रेमाचा विशेष विषय झालें. ज्यांना " ब्राह्मण ' म्हणण्यांची ब्राह्मणांना शंका वाटली त्यानें असें ज्ञान प्रकट केलें कीं मोठमोठ्या यथार्थनाम ब्राह्मणांनीं आपलीं मस्तकें त्याच्या चरणधूलीनें पुनीत करून घ्यावीत. ज्ञानेश्वरीची रचना हा ज्ञानदेवाच्या आयुष्यांतील जसा सर्वांत मोठा अद्भुत चमत्कार त्याचप्रमाणें मराठी वाङ्मयांतीलही सर्वांत मोठा अद्भुत चमत्कार होय. यांत तुडुंब भरून राहिलेले रसांचे सागर, यांत सर्वत्र असणारीं अलंकारांचीं भांडारें, यांतील शब्दरचनेचे चमत्कार, यांतील कोंवळीक हें सर्वच कांहीं अद्भुत आहे, विस्मयजनक आहे. हा ग्रंथ वाचण्याला देखील विशेष पात्रता लागते:—

जैसे शारदीयेचे चंद्रकळे–। माजी अमृतकण कोवळे ।
ते वेंचितीं मनें मवाळे । चकोरतलगें ॥ १–५६
तियांपरी श्रोतां । हें अनुभवावी कथा ।
अति हळुवारपणा चित्ता । आणूनिया ॥ १–५७

या ग्रंथाचें साहित्यांग व अंतरंग हे पाहण्यासाठीं निराळें भागच विवेचनासाठीं घातलें पाहिजेत. येथें एवढेंच सांगावयाचें कीं हा ग्रंथ रचला आणि अवघ्या महाराष्ट्रानें ज्ञानदेवाला आपलें गुरुत्व दिलें. या ग्रंथरचनेनंतर त्यांचा व नामदेवाचा परिचय होऊन त्यांनीं तीर्थयात्रा केली. त्या कथाभागाकडे आपण आतां वळूं.

# भाग पांचवा

## तीर्थयात्रा

ज्ञानोबाचा हात । प्रेमें धरी विश्वनाथ ॥
ऐसें बोलत चालत । दोघे आले गंगेआंत ॥
ज्ञानोबाचे पायीं । मिठी घाली गंगाबाई ॥
नामा म्हणे सोडा बाई । ज्ञानदेव सर्वांठायीं ॥

नामदेव—तीर्थावळीचे अभंग

ज्ञानेश्वरीच्या रचनेनंतर पंढरपूर येथें यात्रेस गेल्यावेळीं ज्ञानदेव व नामदेव यांची गांठ पडून दोघांचा उत्तम स्नेह जमला व पुढें दोघांनीं मिळून कित्येक महिने तीर्थयात्रेंत घालविले ही हकीकत मुख्यत्वेंकरून नामदेवाच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या अभंगावरून कळते. किंबहुना ज्ञानदेवाच्या चरित्रांतील बहुतेक हकीकत नामदेवाच्या अभंगांवरूनच मिळालेली आहे. ज्ञानदेवांच्या काळीं महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं पुष्कळ संत होते व त्या सर्वांची गांठभेट होण्याचें स्थान म्हणजे पंढरपूर. ज्ञानदेव आणि पंढरपूर यांच्यांतील संबंध निश्चित करणें अगदीं सोपें आहे असें नाहीं. पंढरपूरची एकादशीला वारी करणाऱ्या विठ्ठल-भक्तांनीं ज्ञानेश्वरीचें अतिशय कौतुकानें स्वागत केलें, त्या ग्रंथाला "आई" म्हणून वंदन केलें आणि तो ग्रंथ वारकरी मंडळीचा मुख्य ग्रंथ होऊन बसला. एखाद्या विशिष्ट पंथासाठीं ज्ञानदेवांनीं हा ग्रंथ लिहिलेला नव्हता ही गोष्ट मागील भागांत स्पष्ट केलेली आहे. पण हा ग्रंथ जवळजवळ धर्मग्रंथ म्हणून वारकऱ्यांनीं आपलासा करून टाकला आणि या ग्रंथरचनेमुळें ज्ञानदेवांचा संबंध पंढरपुराशीं आला. पंढरपूरच्या वाळवंटांत ज्ञानबा-तुकाराम ही आरोळी सतत ऐकूं येते आणि ती महाराष्ट्रभर दुमदुमली. ज्ञानदेवाच्या ग्रंथामुळें पंढरपूरांत नवचैतन्य थरारलें आणि महाराष्ट्र धर्माची ध्वजा उंच फडफडूं लागली.

पंढरपुरास ज्ञानदेवाला विठ्ठलाचा परम भक्त नामदेव भेटला. ज्ञानदेव हे ज्ञानेश्वरीचे कर्ते, महासिद्ध हें नामदेवानें ऐकिलें होतें आणि विठ्ठलरखुमाई बरोबर गुजगोष्टी करणारा, त्यांच्या बरोबर जेवणाखाणारा असा नामदेव देवाचा

**लाडका भक्त म्हणून ज्ञानदेवानें ऐकिलें होतें. दोघांच्या भेटीचें वर्णन तीर्थावळीच्या अभंगांत सुरवातीलाच नामदेवानें केलेलें आहे. ते अभंगच या ठिकाणीं देणें न्यायाचें होईल.**

१

नामयाचे भेटी ज्ञानदेव आले । लोटांगण घातले नामदेवें ॥
देऊनी आलिंगन प्रीतीच्या पडिभरें । पूजिलें आदरें यथाविधि ॥
धन्य तो अवसरु संतसमागमु । करीतसे संभ्रमु आवडीचा ॥
नामदेव म्हणे सुफळ माझें जिणें । स्वामीच्या दर्शनें धन्य झालें ॥
पूर्व पुण्य माझें फलासी हें आलें । प्रत्यक्ष भेटले पांडुरंग ॥
संसारीं आसक्त मायामोहीं रत । तापत्रयसंतप्त झाले जीव ॥
ऐशीया पतिताचा करावा उद्धार । यालागीं अवतार तुमचा जगीं ॥
तरी मी एक दीन मूढ मतिहीन । चरणीचा रजरेणू संतांचिया ॥
म्हणोनी पंढरीनाथ पाळीतसे मातें । प्रेमजीवनभातें देवोनीया ॥
आजी स्वामींनी पाहिलें कृपादृष्टि । केली सुखवृष्टि अनिवार ॥
नामा म्हणे तुमच्या चरणाचा आधार । ठाकीन पैलपार भवनदीचा ॥

२

ज्ञानदेव म्हणे तूं भक्तशिरोमणी । जोडिले जन्मोनी केशवचरण ॥
प्रेमसुखगोडी तुजची फावली । वासना मावळली समूळ तुझी ॥
धन्य तुझें जन्म धन्य तुझें कुळ । धन्य तुज राउळ जवळी असे ॥
भक्तिप्रेम धन्य साधिलें त्वां सार । केला पै संसार देशोधडी ॥
क्षण एक एकांतीं बैसोनी सहज । अंतरीचें गुज बोलो कांहीं ॥
जीवन्मुक्त ज्ञानी जरी जाले पावन । तरी देवतीर्थभजन न संडिती ॥
भक्तशिरोमणी धन्य तूं संसारीं । परि एक अवधारी वचन माझें ॥
भूतळीचीं तीर्थें पहावीं नयनीं । अशी आर्त मनीं आहे माझ्या ॥
तुझ्या संगतीचें नित्य सुख घ्यावें । सार्थक करावें संसाराचें ॥
ऐशी ही उत्कंठा बहुत माझें पोटीं । भाग्यें झाली भेटी तुजशीं आजी ॥
ज्ञानदेव म्हणे पुरवी मनोरथ । करावा मुहूर्त प्रयाणासी ॥

**अशी ही तीर्थयात्राप्रकरणाची सुरवात आहे. तिची अधिक वाचपणी सुरवातीलाच करणें आवश्यक आहे.**

ज्ञानदेवांनीं तीर्थयात्रा करावी ही कल्पनाच मोठी रमणीय आहे आणि तिच्यांत संभवनीयता फार आहे. ज्ञानदेवांचे वडील विठ्ठलपंत हे तीर्थयात्रा करणारे जबर होते तेव्हां तो संस्कार आनुवंशिक म्हणून ज्ञानदेवांत आला असावा हें अशक्य नाहीं. आणि गीताशास्त्रावर व्याख्या करणाऱ्या या थोर पुरुषानें हिंदुस्थानांतील तीर्थयात्रा करण्याचें ठरवावें हेंही स्वाभाविक आहे. कधीं कधीं प्रश्न येतो तो हा कीं येवढ्या थोड्या आयुष्यांत तीर्थयात्रा ज्ञानदेवांना किती घडली असावी? एक गोष्ट वरील अभंगावरून स्पष्ट दिसते कीं तीर्थयात्रा करण्याचा संकल्प करून ज्ञानदेव प्रथम पंढरपुरास गेले व तेथें त्यांचा नामदेवाशीं परिचय झाला. अद्वैताचें तत्त्व अंगीं मुरलेल्या या थोर तत्त्ववेत्त्यानें नामदेवाचें सगुणोपासनेचें प्रेमळ स्वरूप पाहिलें व त्याचें त्याला कौतुक वाटलें. सगुणोपासक म्हणूनच नामदेवाचें मडकें (डोकें) कच्चें हा न्याय पुढें संतमंडळीच्या विनोदांत सिद्ध व्हावयाचा होता; पण या वेळीं पंढरपुरांत जमणाऱ्या भक्तमंडळींत नामदेव हें मोठें जाडें प्रकरण होतें यांत शंका नाहीं. आपण मिळून तीर्थयात्रा करूंया असें ज्ञानदेवानें नामदेवाला सुचविलें ही घटनाही मोठी मनोरम आहे. यावेळीं ज्ञानदेवाची ज्ञानेश्वरीमुळें व तत्पूर्वीच्या पैठणांतील "भट्टीं केला वाद" त्यामुळें पुष्कळच प्रसिद्धी झाली होती व त्याच्याभोंवतीं साधुसंत, मुमुक्षु व इतर जमूं लागले होते असें दिसतें. या मंडळींत नामदेवाचें स्थान महत्त्वाचें होतें व त्याच्यांत आणि ज्ञानदेवांत परस्पर आदर विशेष उत्पन्न झाला असें वर दिलेल्या अभंगावरून दिसतें. दोघांना परस्परांच्या संगतींत राहून कांहीं तरी शिकावें असें वाटत होतें आणि ज्ञानदेवाच्या तीर्थयात्रेची सुरवात पंढरपुरापासून झाली असेंही वरील अभंगावरून म्हणतां येते.

ज्ञानदेवाची तीर्थयात्रा करण्याची सूचना नामदेवाला फारशी मानवली नाहीं, असें पुढील अभंगावरून दिसतें:—

ऐसें ऐकोनी नामा विचारी मानसीं । म्हणे काय द्यावें यासीं प्रतिवचन ॥
विठोबाचे पाय आठवीले मनीं । बोले अमृतवचनीं तयाप्रती ॥
सर्वसुख आहे मज पांडुरंगीं । जावें कवणालागीं कवणा ठाया ॥
ऐहिक परत्र चाड मज नाहीं सर्वथा । न लगती पुरुषार्था मुक्ति चारी ॥
रंक होवोनिया पंढरी चोहटा । राखीन दारवंटा महाद्वारीं ॥

या सुखाकारणें शरीर कर्वतीं फोडिलें । दुर्जय तोडिले मायाजाळ ॥
त्रिभुवनीचें वैभव सांडोनिया दुरीं । झालोसे भिकारी पंढरीचा ॥
कल्पतरूची छाया कामधेनूचे दुभते । संपूर्ण आइतें सर्व काम ॥
विठोबाचे पायी काय मज उणे । वासनाची मनें गिळीली माझ्या ॥
पाळिलो पोसिलो जन्मोनी जयाचा । विकिलें कायावाचामनें त्याला ॥
नामा म्हणे स्वामी विठोबासी पुसा । आज्ञा देईल शिरसा धरीन त्याची ॥

पंढरपूराबद्दल एकांतिक प्रेम नामदेवांच्या अंतःकरणांत होतें. पंढरपूरांत राहाण्याचें सुख मिळावें म्हणून त्यानें " शरीर कर्वतीं फोडिलें " होतें आणि " दुर्जय मायापाश तोडिले " होते. पंढरपूरापुढें इतर तीर्थस्थानांची काय महती असें त्यांस अंतःकरणापासून वाटत होतें. पंढरपूराबद्दल ही एकांतिक वृत्ति, अनन्य भक्ति, ज्ञानदेवाच्या ठिकाणीं नव्हती ही गोष्ट वरील अभंगावरून सिद्ध होतें. " सर्वांभूतीं परमेश्वर " या तत्वाची द्वाही फिरविणारा अद्वैतवादी ज्ञानदेव एका तीर्थांतला देव मोठा व दुसऱ्या क्षेत्रांतील देव कमी असें मानील ही गोष्ट शक्यच नव्हती. तेव्हां ज्ञानदेवाला वारकरी पंथाचा पुरस्कर्ता किंवा पुढारी असें मानण्याचें कारण नाहीं. ज्ञानदेवाला वारकरी पंथानें आपला गुरु म्हणून पतकरला, आणि त्यानंतर हळू हळू पंढरपूर व ज्ञानदेव, विठ्ठल व ज्ञानदेव यांसंबंधीं दंतकथा पसरू लागल्या व कदाचित् ज्ञानदेवानें न केलेले अभंग त्याच्या नांवावर लादण्यांत आले व तत्वज्ञानी सिद्ध ज्ञानदेवाचा, लौकिक दृष्टीनें, हळू हळू भगवद्भक्त ( नामदेवासारखा ) ज्ञानदेव उत्पन्न झाला.

तीर्थयात्रेला सुरवात करण्यापूर्वी ज्ञानदेवांच्या ( आईकडून ) आजोबाला व आजीला देवाज्ञा झाली व आतां हीं भावंडें जगांत अगदीं एकटीं झालीं. चांगदेवाची व ज्ञानदेवाची गांठ हीही या तीर्थयात्रेला सुरवात होण्यापूर्वी व ज्ञानदेवाचें वास्तव्य आळंदीस असतांना पडली. चांगदेव हे त्या काळचे प्रख्यात योगी होते व ते चवदाशें वर्षें वयाचे होते असे म्हणतात. त्यांना योग साध्य होता पण ब्रह्मज्ञान झालेलें नव्हतें व त्यांचा योगविद्येचा गर्व हरण करण्यासाठीं ज्ञानदेव ज्या भिंतीवर बसले होते ती त्यांनीं योगबळानें चालविली व अशा प्रकारें ज्ञानदेव हे महायोगी असल्याबद्दल चांगदेवांची खात्री होऊन ते त्यांच्या पुढें नम्र झाले व या चौदाशें वर्षें वयाच्या योग्याला मुक्ताबाईसारख्या एवढ्याशा मुलीनें ब्रह्मज्ञानाचा " चांग्या, ऐक " म्हणून उपदेश केला. ही दोन योग्यां-

मधील "चढाओढ" चांगदेव जमीनदोस्त होण्यांत झाली. ही सर्व कथा मोठी आकर्षक आहे. ही चालविलेली भिंत आळंदीस पुष्कळ दिवस होती व भाविक यात्रेकरू तिची माती तोंडांत टाकून पुण्याई मिळवीत. पण अशानें भिंत नाहींशी होऊं लागली आणि म्हणून तिला आतां पक्क्या चिरेबंदींत घालून ठेविली आहे व यात्रेकरूंना तिला हात लावतां येतो पण खाऊन टाकतां येत नाहीं. आळंदींत देवळाच्या पुढें असलेला ( सोन्याचा ) पिंपळ आणि ही चालती भिंत या ज्ञानेश्वरकालीन वस्तु आहेत असें समजतात. त्याचप्रमाणें विसोबा खेचर नांवाचा एक दुष्ट मनुष्यही ज्ञानदेवांनीं चमत्कार करून सन्मार्गावर आणला व पुढे कांहीं वर्षांनीं तो नामदेवाचा गुरु झाला. हे सर्व चमत्कार तीर्थयात्रेला सुरवात करण्यापूर्वीं घडले. म्हणजे पंढरपूरला ज्ञानदेव गेले ते त्या काळचे एक नामांकित सिद्ध पुरुष म्हणून गेले.

२ तीर्थयात्रा करण्यासाठीं विठ्ठलाची अनुज्ञा घ्यावी असें नामदेवानें सांगितलें तेव्हां ज्ञानदेवांनीं राउळांत जाऊन देवाकडूनच नामदेवाला तीर्थयात्रेला जाण्यासाठीं अनुज्ञा घेण्याचें ठरविलें.

४

ज्ञानदेव म्हणे भला भक्तराज । कळलें गोप्यगुज सर्व तुझें ॥
धीर आणि चतुर सर्वस्वें उदार । साजे तुज अधिकार प्रेमभक्ति ॥
धन्य तूं संसारीं भक्तिभावशीळ । साधिलें त्वा केवळ प्रेमसुख ॥
देउनि आलिंगन धरियेला करीं । वंदियेलीं शिरीं चरणरजें ॥
राउळाभीतरी चला जाऊं वेगें । आज्ञा मागों दोघे तीर्थयात्रे ॥
सत्वर उठोनी आले स्वामीजवळी । मस्तकें ठेविलीं चरणावरी ॥
जीवाचा निजभाव सांगे ज्ञानदेव । ऐकोनी पंढरीराव हासिन्नले ॥
म्हणे तूं ज्ञानशील चिद्रूप केवळ । सबाह्य निर्मळ स्फटिक जैसा ॥
सहज तीर्थरूप तूंचि निरंतर । असता हा विचार काय करिशी ॥
येरू म्हणे स्वामी बोललेती बरवें । परि सार्थक करावें या देहाचें ॥
प्रसंगीं नामयाचें संगतीसुख घ्यावें । म्हणोनी ज्ञानदेवें धरिलें चरण ॥

तीर्थावळीचे अभंग वाचीत असतांना ते नामदेवानें स्वतः लिहिलेले आहेत कीं कोणी तरी नामदेवभक्तानें लिहिलेले आहेत अशी शंका वरचेवर येते. उपरोक्त अभंग केवळ कथनपर आहे व त्यांत शेवटीं "नामा म्हणे" हेंही

पालुपद नाहीं. पण हा जर अभंग नामदेवानें स्वतः लिहिला असें म्हणावयाचें तर ज्ञानदेवानें नामदेवाची

वंदियेलीं शिरीं चरणरजें

असें वर्णन नामदेव स्वतः करील कां? ज्ञानदेवापेक्षां नामदेव वयानें बरेच मोठे होते तेव्हां तिसऱ्यानें विशेषतः एखाद्या नामदेवभक्तानें अशा प्रकारचें वर्णन करणें शक्य आहे. ओळख झाल्यानंतर ज्ञानदेव व नामदेव यांची मैत्री अतिशयित जमली व नामयानें मिळविलेले (सगुण भक्तिद्वारां) प्रेमसुख ज्ञानदेवाला फार कौतुकास्पद वाटूं लागलें. कोणत्याही गोष्टींतील उत्तम भाग चटदिशीं लक्ष्यांत यावा अशी ज्ञानदेवाची साम्यवृत्ति होती व सगुणोपासना गौण आणि केवळ साधनरूप आहे हें जरी ज्ञानदेवाचें स्पष्ट तत्व होतें तरी तिच्याबद्दल अनादर त्याच्या ठिकाणीं नव्हता. विठ्ठलानें जेव्हां सांगितलें कीं "सहज तीर्थरूप तूंचि निरंतर" तेव्हां ज्ञानदेवांचें उत्तर मोठें मार्मिक आहे.

येरू म्हणे स्वामी बोलिलेती बरवे।
परि सार्थक करावें या देहाचे॥

देह अगदीं महासाधूचा झाला तरीसुद्धां तो देहच; त्याला देहधर्म असणारच तो "तीर्थरूप" होणें शक्य नाहीं. सौंदर्यानें मुसमुसलेल्या देहाचें कवीनें किती जरी वर्णन केलें; मुखाला चंद्राची आणि अशा इतर उपमांची किती जरी झोड उठविली; रसरसीत आणि टवटवीत ओठांच्या चुंबनाचें वर्णन करतांना लेखणी किती जरी बेहोष झाली तरी "मुखं श्लेष्मागारम्" ही भर्तृहरीनें केलेली चेष्टा नसून सत्यकथन आहे ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. त्याचप्रमाणें कितीही सत्पुरुष झाला तरी त्याच्या उष्ट्यानें उष्टावण करून घेणाऱ्या भक्तांची गणना महामूर्खांत करणें आणि असें उष्टावण आपल्या उष्ट्यानें करूं देणाऱ्या "सत्पुरुषा"ला लफंगा म्हणणें ही गोष्ट अगदीं क्षमपात्र आहे. ज्ञानदेव अंतर्यामीं, आत्मस्वरूपांत तीर्थरूप होते पण देहाला तपश्चर्या घडावी लागते, देहावर संयमनाचा अंमल चालावा लागतो, देहाचें प्रक्षालन व्हावें लागतें, देहाला व्यायाम करावा लागतो, देहाची शुद्धि वरचेवर करावी लागते; केवळ देहवादित्व म्हणजे अक्कल तहकूब झालेल्या मूर्खशिरोमणींचें बरळणें आहे ही गोष्ट अत्यंत स्पष्ट आहे; आणि ज्ञानदेवांनीं दिलेलें हें यात्रेचें कारण मोठें योग्य

आहे. विठ्ठलांनीं नामदेवाला तीर्थयात्रेला जाण्याबद्दल तावडतोब सांगितलें. विठ्ठलाला ज्ञानदेवाची "तीर्थरूपता" पटलेली होती व त्याच्या संगतींत नामदेवाचें अर्धवट ज्ञान पूर्ण ज्ञानांत रूपांतर पावेल हें त्याला माहीत होतें. "भक्तिसुख" झालें तरी त्यांत वैषयिकता आली, उपाधिमत्त्व आलें, रति आली, शृंगार आला, आणि म्हणूनच बीजगणितापूर्वीं अंकगणित शिकावें लागतें त्याप्रमाणें सगुणोपासना निर्गुणोपासनेची पायरी म्हणून तिचा कांहीं काळ डोकें थंड ठेवून अवलंब करणें ठीक आहे. पण मुमुक्षुला त्याच्यापुढें गेलें पाहिजे; म्हणून विठ्ठल नामदेवाला काय म्हणतात पहाः—

५

मग हांसोनी पंढरीनाथ पाही नाम्याकडे । म्हणे नवल केवढें भाग्य तुझें ॥
प्रत्यक्ष परब्रह्ममूर्ति ज्ञानेश्वर । करीतसे आदर संगतीचा ॥
ऐसें भाग्य जेणें सर्वस्वें साधावे । तरीच जन्मा यावें विष्णुदासा ॥
जावें स्वस्तिक्षेम यावें शीघ्रवत । करावे स्वहित कळेल तैसें ॥
सर्व भावें आमुचा विसर न पडावा । लोभ असो द्यावा मजवरी ॥
परीयेसी ज्ञानराजा—बोले जगजीवन । तूं तंव सर्वज्ञ सुखमूर्ति ॥
परी एक मागणे आहे तुजप्रती । आठवण चित्तीं असो द्यावी ॥
हें कृपेचें पोसणें माझें आवडतें । क्षण एक जीवापरतें न करी कदा ॥
परी त्वां सांकडें घातलें सर्वथा । दाटले अवस्था हृदय माझें ॥
आरुष साबडें नामें माझें वेडें । मार्गीं मागें पुढें सांभाळावें ॥
तहान भूक तुवां जाणावीं जीवींची । मज चिंता याची वाटे थोर ॥
मग नामयाचा हात धरोनी श्रीपती । देत असे हातीं ज्ञानदेवा ॥
रानीं वनीं जनीं विसंबसी क्षणीं । धाडितों देखोनी आर्त तुझें ॥
चरणीं ठेवुनि माथा निघते झाले दोघे । आले चंद्रभागे केलीं स्नानें ॥
पुंडलिकाचे चरण वंदूनिया नामा । उतरला भीमापैलतीरीं ॥

ज्ञानदेवासारख्या सतरा अठरा वर्षांच्या मुलाच्या हातीं नामदेवासारखा एवढा मोठा कर्तासवरता माणूस विठ्ठल निरवतो आणि त्याचें वर्णन "माझें आवडतें" "आरुष साबडें" असें करतो हा सगळाच चमत्कार आहे. तो काय झाला असेल तो असो पण हा अभंग कांहीं नामदेवानें लिहिलेला नव्हे. सर्वत्र ज्यांत नामदेवाचें विशेष कौतुक आहे असे हे तीर्थावळीचे अभंग

त्याच्या कोणी तरी भक्तानें लिहिलेले असावेत असें स्पष्ट दिसतें. ज्ञानदेवाच्या आग्रहामुळे नामदेवाला जाण्याची अनुज्ञा विठ्ठलानें दिली. नामदेवाच्या या आत्मचरित्रपर किंवा ज्ञानदेवचरित्रपर अभंगांत विठ्ठल हा चालती बोलती माणसांत वावरणारी व्यक्ति आहे. भाविक यावर श्रद्धा ठेवीत आले आहेत. ज्यांना भाविकपणा नाहीं ते चमत्कारावर श्रद्धा ठेवणार नहींत. सारांश स्पष्ट आहे कीं नामदेवाला घेऊन ज्ञानदेव तीर्थयात्रेला निघाले; पंढरी सोडणें नामदेवाला फार जड वाटलें पण ज्ञानदेवाच्या संगतीचा लाभ मिळून तीर्थयात्रा होणार या गोष्टीचा त्याला फार आल्हाद वाटला.

२ नामदेव व ज्ञानदेव हे निघून गेल्यानंतर विठ्ठलाला अत्यंत दुःख झालें व रुक्मिणीनें त्याचें सांत्वन केलें. इतर भक्त मंडळीही विठ्ठलाच्या दर्शनाला आली होती. त्यांच्याजवळही त्यानें आपला लाडका भक्त दूर देशीं गेल्याबद्दल खंती व्यक्त केली. इकडे नामदेव व ज्ञानदेव बोलत बोलत गप्पागोष्टी करीत चालले. अर्थात् भक्तीचें माहात्म्य ज्ञानदेव नामदेवाला विचारी आणि योगाचें व ज्ञानाचें माहात्म्य नामदेव ज्ञानदेवाला विचारी. तीर्थावळीच्या अभंगांत योग आणि ज्ञान यांपेक्षां भक्तिसुखाचें म्हणजे सगुण भक्तीचें माहात्म्य अतिशयित वर्णन केलेलें आहे आणि ज्ञानेश्वरी व अमृतानुभव हे ग्रंथ वाचून या विषयासंबंधीं ज्ञानदेवांचा अभिप्राय ज्यांना अवगत झालेला आहे त्यांना तीर्थावळीचे अभंग ज्ञानदेव-कालानंतर पुष्कळ वर्षांनीं जेव्हां पंढरीचें माहात्म्य विशेष वाढून ज्ञानेश्वरी ही समजून घेण्याची नव्हे तर पूजा करून बांधून ठेवण्याची व केवळ "आई" म्हणून नमस्कार करण्याची पोथी बऱ्याचशा वारकऱ्यांनीं बनविली त्या काळीं रचलेले असावेत असें वाटल्याशिवाय रहात नाहीं. ज्ञानदेव व नामदेव यांच्या या तीर्थयात्रेंत आणखी पुष्कळ संतमंडळी बरोबर होती, प्रत्येक मुक्कामाला नामदेव कीर्तन करीत व भक्तिसुखाचा आनंद लोकांकडून लुटवीत, ठिकठिकाणीं भजनाच्या दिंड्या उभ्या रहात व ज्ञानदेव नामदेवांचें स्वागत होई-आलीकडच्या अभिनव मराठींत सांगावयाचें म्हणजे, हार्दिक स्वागत होई—इत्यादि गोष्टी संभवनीय असणें जरी असंभवनीय नाहीं तरी तीर्थावळीच्या अभंगांत त्यांना आधार नाहीं. महिपतबावासारख्यांनीं पुढें चारशें वर्षांनंतर केलेल्या वर्णनांतून तीन चार शतकांत ज्ञानदेवचरित्रावर चढत गेलेल्या दंतकथांच्या थरांचाही समावेश होतो हेंसुद्धा वाचकांनीं विसरून चालणार नाहीं.

आतां नामदेव व ज्ञानदेव यांचा रस्त्यांत चाललेला संवाद हा तीर्थावळींतील प्रत्यक्ष अभंग घेऊनच आपण समजावून घेऊं. या अभंगाची भाषा साधारणपणें सोपी आहे हें वाचकांच्या लक्ष्यांत आलेलें आहेच.

९

ऐसे सुखरूप दोघे चालताती मार्गीं । परि चित्त पांडुरंगीं नामयाचें ॥
क्षणक्षणा वास परतोनी पाहे । वियोग न साहे पंढरीचा ॥
म्हणे कां गा केशवराजा मोकलीलें मातें । न येसी सांगातें सांभाळीत ॥
चिंतातुर थोर पडिलों ये परजनीं । न दिसे माझें कोणी जीवलग ॥
फुटोनी हृदय होती दोन्हीं भाग । बहुता उद्वेग वाटताती ॥
तूं माझी जननी तूं माझा जनीता । तूं बंधु चुलता पंढरीराया ॥
तूंचि इष्टमित्र तूंचि गणगोत । तूंचि कुळदैवत आवडते ॥
तूंचि माझें व्रत तूंचि माझें तीर्थ । तूंचि धर्म अर्थ काम देवा ॥
तूंचि ज्ञानचक्षु तूंचि माझा लक्षु । तूंचि माझा साक्षु स्वभावासीं ॥
साच कीं लटिकें हें माझें बोलणें । तुजवाचुनि जाणे कवण दुजा ॥
नामा म्हणे आपुले अनाथा सांभाळी । येऊनी हृदयकमळीं राहे माझ्या ॥

हा अभंग अत्यंत मधुर आहे व त्यांत वाचकांना ओळखीची असलेली नामदेवाची भाषासरणी स्पष्ट प्रतीतीला येते. यांत व्यक्त होणारी आतुरता, तळमळ इत्यादि सर्व गोष्टी विप्रलंभ शृंगाराशीं किती समरस आहेत हें काव्यशास्त्रज्ञ वाचकांच्या लक्ष्यांत आल्यावांचून राहणार नाहीं. भक्ति हा स्वतंत्र रस नसून तो स्वरूपानुषंगानें बहुधा शृंगारांत किंवा क्वचित् शांत रसांत समाविष्ट होतो असें आमचें प्रांजल मत आहे व त्या मताला परिपोषक असे नामदेवाचे आणि इतर संतकवींचे वरच्यासारखे शेंकडो अभंग मिळतात. असो. नामदेवाला याप्रमाणें विठ्ठलाचें विरहदुःख सारखें जाणवत होतें. पुढें वाट चालतां चालतां दोघांचा संवाद सुरू झाला.

१०

**ज्ञानदेव** म्हणे परियेसी विष्णुदासा । तूं सुख संतोषा पात्र होसी ॥
प्रेमाचा जिव्हाळा तुझ्या हृदयीं आला । तूं कां वेळोवेळां खंती करिसी ॥
विचारी सावध होउन भक्तराजा । सुखानंद तुझा तुजचिजवळी ॥

**या शेवटल्या ओळींतलें तत्त्वज्ञान सगुण भक्तीचें नव्हे तर अद्वैतानंदाचें आहे हें उघड आहे. "अहं ब्रह्मास्मि" या वाक्याचा उमज पडणें ही गोष्ट प्राप्त होण्याला सगुण भक्ति हा प्रारंभीचा एक उपाय आहे. आतां नामदेव ज्ञानदेवांना उत्तर देतोः—**

मी नेणे ज्ञानगति नेणें योगयुक्ति । न देखें विश्रांति एकेवीण ॥
सर्वभावें मज तेंचि रूप आवडे । तें पुंडलीकापुढें उभें असे ॥
तो माझा विठ्ठल दावा दृष्टीभरी । आस मी न करी आणिकांची ॥

**ज्ञानदेव अद्वैताच्या मात्रेचा आणखी एक वळसा देतातः—**

व्यापक विठ्ठल आहे सर्व देशीं । जरी सांडोनीया पाहसी भेदभ्रम ॥
तो नाहीं ऐसा ठाव उरलासे कवण । सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥

**नामदेव सांगतोः—**

काया वाचा मनें मज तोचि व्हावा । गीतीं गावा जीवा सुख वाटे ॥
ऐकावा श्रवणीं पहावा तोचि नयनीं । नव जावा जवळोनि दूर कोठें ॥

**ज्ञानदेव म्हणतातः—**

जें अक्षर अव्यक्त देशकाळरहित । ज्ञानी उपासीत सोहंभावें ॥
सर्वेंद्रियासहित आवरोनि चित्त । भोगिती अद्वैत नित्य सुख ॥

**नामदेव सांगतातः—**

सर्व सुख मज आहे त्याचे पायीं । आणिकांच्या बाहीं न पडे कदा ॥
तेथें माझें मन रंगलेंसे भावें । सुख येणें जीवें रेखिलें डोळां ॥

**त्यावर ज्ञानदेवांचें म्हणणें:—**

सर्वगत संपूर्ण सर्वकाळ असणें । होणें आणि जाणें नाहीं जया ॥
तें तुजमाझारीं तूं तयाभीतरीं । अनुभवीं निर्धारी ठेवोनि मन ॥

**नामदेव पुनः आपलें विठ्ठलप्रेम व्यक्त करतो—**

मी न मनीं, न मनीं, लटकी हे कहाणी । परि जलधरावाचुनी चातक जैसा ॥
तैसें माझें मन स्मरे रात्रंदिवस । पंढरीनिवास जीवन माझें ॥

**अशा प्रकारें सगुण भक्तीनें एकांतिक झालेला म्हणून अद्वैत सुखाला अत्यंत पात्र झालेला नामदेव पाहून ज्ञानदेवांना कौतुक वाटलें. कारण भक्तीनें देवाविषयीं जो असा एकजीव झाला तो सगुणाची उपाधि निरस्त झाली कीं**

**सोहंभावाला आलाच. " शिवोहं शिवोहं " किंवा " विठ्ठलोहं " ही "सोहं"च्या अलीकडची पायरी आहे.**

ऐसें ऐकोनि बोलणे म्हणे ज्ञानदेव । धन्य तुझा भाव एकविध ।
नामा म्हणे माझ्या सुखाचा विसावा । आवडे गा जीवा पंढरीरावो ॥

**आणि अशा प्रकारें त्यांचा गोड संवाद चाललेला होता व या मोठ्या गोष्टींचा विचार करीत ते मार्ग चालत होते.**

११

ऐसे नित्यानंदभरित क्रमिताती मार्गु । हृदयीं तो अनुरागु आवडीचा ॥
प्रेमें वोसंडीत करिती स्वहितगोष्टी । दाविती कसवटी अनुभवाची ॥
व्यापक तें सुख दृष्टी होतसे अनिवार । ब्रह्मरसे पूर वोसंडत ॥
ज्ञानदेव म्हणे परियेसी नामया । अद्वैत आत्मया प्रेममूर्ती ॥
भक्तिभाग्य तुवां जोडिले अविनाश । सांग पा सविलास मार्ग त्याचा ॥
कैसा तो साधावा सांग भजनविधि । कैसी नमनबुद्धि सत्वशील ॥
कैसा निर्विकल्प ध्यानाचा प्रकार । हा सर्व विचार सांगे मज ॥
कैसे तें श्रवण कैसे तें मनन । कैसे निजध्यासन दृढ होय ॥
कवण ते भक्ति कवण ते धृति । कवण विश्रांति दावी मज ॥
बहु उत्कंठित या सुखाकारणें । तें मज पारणें करवीं आजी ॥
सांगे हा अनुभव साधन उपाव । विनवी ज्ञानदेव नामयासी ॥

**या पुढच्या चार अभंगांत हाच संवाद आहे. ज्ञानेश्वरींत बाराव्या अध्यायांत भक्तीचें वर्णन करणारा आणि तेराव्या अध्यायांत " आचार्योपास्ती " वर काव्यरसानें थबथबलेलें वर्णन लिहिणारा ज्ञानदेव भक्तिमार्गाच्या तंत्राबद्दल अनभिज्ञ होता अशी कल्पना करण्याचें कारण नाहीं. पण नामदेव हा भक्तींतला अगदीं अनुभवी होता म्हणून रस्ता चालतां चालतां त्याला ज्ञानदेवानें त्यासंबंधीं आदरपूर्वक विचारावें हें स्वाभाविक आहे. हे चार अभंग पुष्कळ मोठे आहेत पण त्यांचा अनुवाद देण्यापेक्षां तेच येथें देणें अधिक युक्त होईल. भक्तिसुखाचा अनुभव सांग असें ज्ञानदेव म्हणालें. त्यावर नामदेव.—**

१२

परिसुनि ते गोष्टी घाली चरणां मिठी । दाटलासे कंठीं सद्गदीत ॥
कृपेचें पोसणें मी पंढरीरायाचें । येवढें भाग्य कैसें जाणिवेचें मज ॥

नव्हे बहुश्रुत नव्हे ज्ञानशील । दास मी दुर्बळ वैष्णवांचा ॥
नेणतें नेणतें कांहींच मी नेणतें । म्हणोनि देवें हातें निरविलें तुम्हां ॥
येतां माझा हात दिधला तुमच्या करीं । घातले आभारी मायबापें ॥
आतां त्याचें कृपावशें येईल वाचेसरिसें । कळलें कांही तैसें निवेदीन ॥
परि भानूस देखणे करिजे अनुतेजे । तैसें ज्ञान माझें स्वामीप्रती ॥
कल्पतरू याचक कृपणाचे द्वारीं । दैव भाकी थोरी कामधेनु ॥
तैसी तुमची यात्रा मज दीनाप्रती । न कळे काळगति समर्थाची ॥
मातेचिया स्वरें बालक बोबडे । खेळवी लाडे कोडें नेणें लाजो ॥
नामा म्हणे तैसें तुम्ही माझें कवतुक । करूनि मुखें सुख वाढविता ॥

**नामदेवाच्या या नम्र भाषणाला ज्ञानदेव म्हणतात:—**

१३

ज्ञानदेव म्हणती शंका न धरिजे मनीं । दृष्टि दुजेपणीं न ठेवावी ॥
सुखें सुख घ्यावे अनुभवोनी अनुभवावे । आहे ते आघवे ब्रह्मरूप ॥
त्या सुखाचा अनुभव करी सुखरूपा । सुखवस्तूच्या दीपा नामदेवा ॥
सुखाचिये ताटीं सुखचि वोगरी । तुझी होईल थोरी क्षुधातुरा ॥
पंढरीरायाचा तूं प्रेमभांडारी । आशा पूर्ण करी मज याचकाची ॥
विश्रांतीसी पात्र तूंचि विष्णुदासा । हा मज भरंवसा आहे तुझा ॥
म्हणोनी हा संगु धरिली थोर आस । झणी होसी उदास भक्तराया ॥
सिंधुहुनी सखोल सरस तुझे बोल । आनंदाची वोल नित्य नवी ॥
ते मज सादर ऐकवीं सत्वर । श्रवण क्षुधातुर झाले माझे ॥
जाणीव नेणीव तरी शोभे सर्व । जरी होय आविर्भाव वैराग्याचा ॥
ज्ञानदेव म्हणे तूं भक्त अंतरंग । नलगे तुज पाग बहुज्ञतेचा ॥

**शेवटच्या दोन ओवींत ज्ञानदेव नामदेवाची किती समर्पक आणि मधुर स्तुति करतात तें वाचक ध्यानांत घेतीलच. नामदेवानें पुढील अभंगांत आपला भक्तिमार्ग सांगितला आहे.**

१४

ऐसें ऐकोनीया प्रेमा आला पोटीं । म्हणे बोलवींत गोष्टी अनुभवाची ॥
येर कर्मधर्म सर्वही पाल्हाळ । श्रमुची केवळ जाणिवेचा ॥
ऐसा संत भेटे विरळा भाग्ययोगें । तो आथिला वैराग्यें सप्रेमळ ।

सर्वभूतीं दया सर्व भावे करुणा । जेथें मीतूंपणा मावळला ॥
भजन तया नांव वाटे मज गोड । येर ते काबाड वायां शीण ॥
नमन तें नम्रता न देखे गुणदोष । अंतरीं प्रकाश आनंदाचा ॥
येर ते दांभिक जाणावे मायावी । विश्वास मी जीवीं न धरी त्यांचा ॥
ध्यांन तया नांव निर्विकार निकें । जे विश्वीं माझ्या देखे विठोबासी ॥
अखंड हृदयीं तेंचि आठवण । साजिरे समचरण विटेवरी ॥
नादीं लुब्ध जैसी आसक्त हरिणी । जाय विसरूनी देहभान ॥
यापरी तल्लीन दृढ राखावे मन । या नांवे श्रवण आवडीचे ॥
व्यवसायीं चित्त ठेवुनी कृपण । लाभाचें चिंतन सर्व काळ ॥
यापरी अखंड स्वहितविचारण । करिजे तें मनन सत्वशील ॥
परपुरुषीं जैसी आसक्त व्यभिचारीणी । न लागे तिच्या मनीं कामधाम ॥
कीटकीं भृंगीचें जैसें अनुसंधान । निकें निजध्यासन एकविध ॥
सर्वभावे एक विठ्ठलची ध्याये । सर्वाभूतीं पाहे रूप त्याचें ॥
सर्वाहूनी निराळा रजतमावेगळा । भोगी प्रेमकळा तेचि भक्ति ॥
सत्वाचा सुभट्ट असंग एकट्ट । वैराग्य उद्भट्ट एकनिष्ठ ॥
प्रारब्धाचा भोगी नेणे देहस्मृति । अखंड ते धृति निर्विकार ॥
निर्वासना मन निजलाभे संपूर्ण । तेणे स्वरूपज्ञान विकल्पाचे ॥
अनुरागे गोविंद ध्यायिजे एकांतीं । यापरती विश्रांती आणिक नाहीं ॥
कायावाचामने हा माझा अनुभव । सांगितला सर्व आवडीचा ॥
नामा म्हणे हेंही बोलाविलें तेणे । उदार सर्वज्ञ पांडुरंगे ॥

याप्रमाणें नामदेवाचें हें भक्तिरहस्यकथन आहे व तें ऐकून ज्ञानदेवांनीं फा आनंद व्यक्त केला. कोणी कितीही थोर असोत

परी तुजवीण न मनीं मी विष्णुदासा ।

हे ज्ञानदेवांचे शब्द मोठे समर्पक वाटतात व या भक्तीचें स्वरूप मोठे मोहक वाटतें यांत शंका नाहीं. अर्थात् या भक्तीनें ज्ञान मिळविलें पाहिजे तेव्हांच मुक्ति मिळतें हें तत्व आहेच.

४ ज्ञानदेवाच्या या तीर्थयात्रेंत दुसरी कित्येक भक्तमंडळी सामील झाली होती व निवृत्तिनाथ, सोपानदेव व मुक्ताबाई ही मंडळीही त्याचेबरोबर होती इत्यादि हकीकत प्रचलित आहे व आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या ज्ञानदेवांच्या

चरित्रग्रंथांतून ती प्रसिद्ध झालेली आहे. तीर्थावळीच्या अभंगांत या हकीकतीचा निर्देश नाहीं. खुद्द ज्ञानदेव, नामदेव कोठें कोठें गेले होते याचा उल्लेख सोळाव्या अभंगांत आहे. तेथें म्हटलें आहे:—

पश्चिम प्रभास आदिकरोनी द्वारका । पाहिल्या सकळिका मोक्षपुऱ्या ॥
पंथीं पावन तीर्थें पाहिलीं सकळिकें । प्रक्षाळलीं पातकें वासनेचीं ॥

पुढें, प्रत्यक्ष यात्रेचा उल्लेख, विसाव्या अभंगांत आहे.

तीर्थें करोनि नामा पंढरीशी आला । जिवलगा भेटला विठोबासी ॥
सद्गदीत कंठ वोसंडला नयनीं । घातली लोळणी चरणांवरी ॥
म्हणे शिणलों पंढरीराया पाहे कृपादृष्टि । थोर झालों हिपुटी तुजवीण ॥
अज्ञानाचा भाग होता माझे मनी । हिंडलों म्हणोनी दारोदारीं ॥
परी पंढरीचे सुख पाहतां कोटि वाटे । स्वप्नींही परी कोठें न देखेची ॥
उदंड तीर्थाची ऐकों जाय प्रौढी । चित्त माझे वोढी चंद्रभागे ॥
म्हणोनि चरणांची ठाकोनी सावली । आलो मज सांभाळी मायबापा ॥
तया देवांची वास न पाहती माझे नयन । न करिती पूजन कर त्यांचें ॥
तेणें पंथे माझे न चालती चरण । न ऐकती श्रवण कीर्ति त्यांची ॥
कटी तटी जेणे कर नाहीं ठेविले । न देखों पाउले विटेवरी ॥
त्यासी म्हणतां देव लाजे माझें मन । ते कष्ट दारुण कोणा सांगू ॥ इत्यादि.

या अभंगांत ज्ञानदेवांचा उल्लेखच नाहीं व नामदेव तीर्थयात्रेंत पाहिलेल्या सर्व क्षेत्रांना व देवांना शिव्याशाप देत आला हें स्पष्ट आहे व त्यावरून ज्ञानदेवाच्या संगतीचा त्याच्यावर कसलाही परिणाम झाला नाहीं हेंही स्पष्ट आहे. तीर्थावळीच्या उरलेल्या अभंगांत विठ्ठलानें नामदेवाला परत आल्यावर मोठें जेवण घातलें व तेथें ब्राह्मण जेवावयाला आले आणि जेवण्याच्या बाबतींत अलिकडील भाषेंत बोलावयाचें म्हणजे ब्राह्मण–ब्राह्मणेतर वाद उत्पन्न झाला इत्यादि वर्णन आहे; त्यांत कांहीं तथ्यता आहे असें मानलें तरी त्याचा संबंध नामदेवचरित्राशीं जातो म्हणून त्याची अधिक विचक्षणा करण्याचें येथ कारण नाहीं. पण या सर्व प्रकारावरून तीर्थावळाचे अभंग हे "पंढरीमाहात्म्या"चा पुरस्कार करण्यासाठीं आणि नामदेवाचें श्रेष्ठत्व वर्णन करण्यासाठीं ज्ञानदेव–नामदेवकालानंतर कोणी तरी रचून ते नामदेवाच्या "कोटी" अभंगांत ढकलून दिले असावेत हा ग्रह दृढतर होतो. या तीर्थयात्रेंत

**एक चमत्कार घडल्याचीही हकीकत तीर्थावळींत आहे. त्या चमत्कारावरूनही योग आणि ज्ञान यांपेक्षां भक्तीचें माहात्म्य अधिक आहे हें दाखविण्याचा म्हणजे ज्ञानदेवाहून नामदेव श्रेष्ठ हें ठरविण्याचा या " तीर्थावळी "चा हेतु होता हें स्पष्ट होतें. येथें ते अभंगच देतों म्हणजे वाचकांना वरील विधान पटेल. रस्त्यावर चालतां चालतां**

१६

तृष्णाक्रांत वनीं होतसे पीडणीं । पडले चिंतवणीं जीवनालागी ॥
तंव दृष्टि एक कूप देखिल अवचिता । उदक तेथे पहाता नलगे अंत ॥
कवणेपरी येथे करूं रिगवण । प्राण संतर्पणीं वाचवावे ॥
मग त्या नामयाप्रति बोले ज्ञानदेवो । मज एक उपावो साध्य असे ॥
लघिमेचे लाघव करूनि ते अवसरीं । उतरूनी भीतरी घेतले जीवन ॥
घेउनी उदक निघालो बाहेरी । म्हणे अवधारी नामदेव ॥
आणोनी जीवन देइन तुझ्या हातीं । न दिसेची आन गति आणिक कांहीं ॥
पडिल्या संकटीं विचारावे मनी । सांडावी आयणी अभिमानाची ॥
आत्मा तो विठ्ठल सर्व निरंतरीं । निरोप दे झडकरी उशीर झाला ॥
आत्मा तो विठ्ठल असतां सर्व देहीं । माझी कांहीं नाहीं चिंता त्यासी ॥
नामा म्हणे धीर करावा नावेक । दावीन कौतुक स्वामीजवळी ॥

**आणि याप्रमाणें रेड्याच्या मुखानें वेद बोलविणाऱ्या आणि चांगदेवाला भेटण्यासाठीं भिंत चालविणाऱ्या व मेलेल्या सच्चिदानंदबावाला जिवंत करणाऱ्या ज्ञानदेवाबरोबर नामदेवांनीं चढाओढीचा विडा उचलून आपलें म्हणणें खरें करून दाखविलें.**

१७

मग लावूनिया नेत्र निर्धार पै केला । हृदयीं आठविला केशीराज ॥
इष्ट मित्र बंधु सोयरा जननी जनकु । नेणे मी आणिकु तुजवांचोनी ॥
येईं पंढरीराया मजलागीं धांवतु । झणी पहासी अंत कृपाळुवा ॥

**अशा प्रकारें या सतराव्या अभंगांत नामदेवानें विठ्ठलाचा धावा केला! द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगीं जसा भगवान् श्रीकृष्ण "द्वारकेंत गहिंवरला" त्याचप्रमाणें तिकडे "वैकुंठपुरींत पंढरीनाथ" रुक्माईबरोबर नामदेवाच्याच गोष्टी करीत**

होता तोही गहिंवरला. नामदेव आपलें स्मरण करीत आहे हें देवाला कळण्यापूर्वी—होय. देवाला कळण्यापूर्वी !—

१८

आणि माझा डावा कां लवतो लोचन । करितसे स्फुरण वाम बाहू ॥
उद्वेग उपसर्ग वाटताती जिवा । कोणा जीवलगाशीं झाले कष्ट ॥
वाजतां पै वारा न लागावा राजसा । माझ्या विष्णुदासा भाविकासी ॥
वाटे तहान भूक झाली त्या पीडणी । तरीच माझ्या मनीं ऐशी दशा ॥

आणि अशा मनःस्थितींत असतांना त्याला नामदेवाचा धावा ऐकूं आला. त्याबरोबर काय चमत्कार झाला पहाः—

तंव गडगडीत कूप उदकें वोसंडला । कल्पांतीं खवळला सिंधु जैसा ॥
ज्ञानदेव म्हणे झाले अभिनव । कैसा ऋणी देव केला येणें ॥
सावध करूनीया दिलें आलिंगन । जीवें लिंबलोण उतरिलें ॥

आणि अशा प्रकारें ज्ञान व योग यावर हा भक्तिमार्गाचा प्रताप गाजला. तीर्थावळींतील कित्येक अभंग फारच गोड आहेत व त्यांतील दोन तीन प्रत्यक्ष नामदेवाचे असतील. पण एकंदरींत नामदेवाच्या नांवावर खपणाऱ्या या ज्ञानदेव-चरित्रविषयक अभंगाबद्दल मधून मधून शंका येते, त्यांची विश्वसनीयता निश्चित वाटत नाहीं. या अभंगांत प्रेमसुख अपरंपार आहे पण सत्यकथन किती आहे हा प्रश्न चिंतनीय आहे.

जेथें नामदेव, उपरोक्त अभंगाप्रमाणें, पंढरपूरला अगदीं निराश होऊन परत आला तेथें इतर भक्त ज्ञानदेवाबरोबर यात्रेंत राहिले कां परत आले हा प्रश्न उभा राहतो व या तीर्थयात्रेचें सर्व भक्तमंडळाचा मोठा प्रवास हें वर्णन कितीही आल्हाददायक असलें तरी त्याच्या खरेपणाबद्दल शंका उपस्थित होते. पण अशा गोष्टीबद्दल एकदां दंतकथा व लोककथा जमूं लागल्या म्हणजे त्या कोठवर जातील याचा नियम नसतो. ज्ञानदेवांनीं यात्रा कोणकोणत्या केल्या याचा निर्णय करणें ही गोष्ट सोपी नाहीं. वर जीं ठिकाणें दिलेलीं आहेत त्यांचें मोघम स्वरूपही आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. "पश्चिम प्रभास आदिकरोनी द्वारका । पाहिल्या सकळिका मोक्षपुऱ्या । पंथीं पावन तीर्थें पाहिलीं सकळिकें" हें विधान फार मोघम आहे, यांत कोणत्याही यात्रेचें विशिष्ट वर्णन नाहीं, हा जरासा चमत्कारिक प्रकार आहे. प्रभास हें क्षेत्र काठेवाडांत साधारणपणें पूर्वेच्या

**बाजूला समुद्रकिनाऱ्याजवळ ( सोमनाथ व वेरावळ बंदर यांपासून फारसें दूर नाहीं अशा ठिकाणीं ) व द्वारका काठेवाडाच्या साधारणपणें पश्चिमेस; हीं दोन नांवें प्रथम दिलेलीं आहेत व नंतर सर्व मोक्षपुऱ्या पाहिल्या म्हणून सांगितलें आहे. सर्व मोक्षपुऱ्या म्हणजे**

अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका ।
पुरी द्वारावती चैव सप्तैते मोक्षदायकाः ॥

**या सात पुऱ्या. अयोध्या ( संयुक्त प्रांतांत ), मथुरा ( दिल्लीजवळ ), माया म्हणजे हरद्वार दिल्लीहून दोनशें मैलांवर हिमाचलाच्या पायथ्याशीं, काशी ( बिहार प्रांताच्या आलीकडे ), कांची म्हणजे कांजीवीरम ( मद्रासजवळ ), अवंतिका म्हणजे उज्जयिनी ( मध्य हिंदुस्थान ), आणि पुरी द्वारावती म्हणजे द्वारका ( काठेवाडांत ). अशा प्रकारें वरील अभंगांत द्वारकेचा दोन वेळां उल्लेख आहे. आणि या क्षेत्रांना जातांना वाटेंत लागणारीं सर्व क्षेत्रें. म्हणजे हा अभंग लिहिणाऱ्याला या तीर्थयात्रेची प्रत्यक्ष माहिती फारशी नव्हती असें म्हणणें भाग आहे.**

**काशीला ज्ञानदेव गेले होते त्यासंबंधीं अभंग तीर्थावळींत पुढील-प्रमाणें आहेतः—**

१

ज्ञानदेव आले काशी । विवेश्वर आडवे येती ॥
रामनगर वेशीपाशी । भेटी झाल्या उभयतांसी ॥
परस्परें आलिंगन । नामा वंदी उभयचरण ॥

२

पुढें उभे वेशीपाशीं । त्याला लोटांगण काशी ॥
स्वर्गीं देवा जाल्या भेटी । भोंवत्या पताकांच्या थाटी ॥
नामा म्हणे विठ्ठल बोला । ज्ञानोबासी म्हणे चला ॥

३

ज्ञानोबाचा हात । प्रेमें धरी विश्वनाथ ॥
ऐसें बोलत चालत । दोघे आले गंगेआंत ॥
ज्ञानोबाचे पायीं । मिठी घाली गंगाबाई ॥
हणे सोडा बाई । ज्ञानदेव सर्वांठायीं ॥

**आणि अशाच प्रकारचें अद्भुत वर्णन इतर क्षेत्रासंबंधींही करतां येईल. ज्ञानदेवांच्या तीर्थयात्रेसंबंधीं कादंबऱ्या लिहितां येतील, गोरोबा आले आणि नरहरि आले म्हणून मोठीं हृदयंगम वर्णनें त्यांत लिहितां येतील; पण कादंबरी म्हणजे चरित्र नव्हे. शुद्धिपत्र मिळविण्यासाठीं आळंदीहून पैठणपर्यंत हीं भावंडें वणवण हिंडलीं व ज्ञानेश्वरी ग्रंथ लोकांच्या श्रवणांत येऊं लागल्यावर ज्ञानदेवांबद्दल त्यांची पूज्यबुद्धि बळावली. ज्ञानदेवांच्या ठिकाणीं अमानित्व हा गुण अतिशयित होता तेव्हां लोकांच्या गर्दींत शिरून पूजा करून घेणें ही गोष्ट त्यांच्या अगदीं जीवावर आली असती. ज्ञानेश्वरींत तेराव्या अध्यायांत म्हटलें आहेः—**

आथिलेचि गुण वानितां । मान्यपणें मानितां ।
योग्यतेचे येतां । रूप अंगा ॥ १८६
तैं गजबजो लागे कैसा । व्याधें रुंधला मृगु जैसा ।
कां बाहीं तरतां वळसा । दाटला जेवीं ॥ १८७
पार्था ! तेणेंपाडें । सन्मानें जो सांकडे ।
गरिमेतें आंगाकडे । येवोंचि नेदी ॥ १८८
पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ति कानीं नायकावी ।
हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोकां ॥ १८९
तेथ सत्काराची कें गोठी । के आदरा देईल भेटी ।
मरणेसीं साटीं । नमस्कारितां ॥ १९०
वाचस्पतीचेनी पाडें । सर्वज्ञता तरी जोडे ।
परी वेडिवेमाजीं दडे । महिमेभेणें ॥ १९१
चातुर्य लपवी । महत्व हारवी ।
पिसेपण मिरवी । आवडोनी ॥ १९२
लौकिकाचा उद्वेगु । शास्त्रांवरी उबगु ।
उगेपणीं चांगु । आथी भरू ॥ १९३
जगें अवज्ञाची करावी । संबंधीं सोयचि न धरावी ।
ऐसी ऐसी जीवीं । चाड बहु ॥ १९४

**आणि ज्ञानेश्वरींतील ज्ञानी पुरुषाच्या वर्णनपर ओंव्या हा जर भगवान् श्री ज्ञानदेवाच्या आत्मस्वरूपदर्शनांतील भाग असेल तर ते ज्ञानदेव तीर्थयात्रा कसे**

करीत असतील याची कल्पना रसिक वाचकाला येईल. नामदेवाच्या कीर्तनाच्या किंवा भजनाच्या "फडां"तून ज्ञानदेव चालले आहेत; वाटेंत ठिकठिकाणीं संतमंडळी येऊन दिंडींत सामील होत आहेत; ज्ञानदेव पदोपदीं चमत्कार करीत चालले आहेत; नामदेव मधून मधून त्यांच्याशीं त्या बाबतींत चढाओढ करीत आहेत इत्यादि वर्णन वरील ओव्या ज्यांच्या कानांत सारख्या गुणगुणत आहेत त्यांना जरा निराळ्या अर्थानें चमत्कृतिपूर्ण वाटलें तर त्यांत चमत्कार मानण्याचें कारण नाहीं. तीर्थावळींत प्रकट झालेल्या नामदेवाप्रमाणें ज्ञानदेव "कडवे" भगवद्भक्त नव्हते. सर्वांभूतीं समदृष्टि ज्यानें केली त्याची "सर्वां देवीं" ही समदृष्टिच असली पाहिजे आणि तशीच ती होती. देव-देवतांतराचा अभिमान ही गोष्ट ज्ञानदेवाजवळ नव्हती असें सांगणें म्हणजे सूर्याजवळ अंधार नाहीं असें म्हणण्यासारखेंच आहे ज्ञानदेवांना आयुष्यच इतकें थोडें मिळालें कीं त्यांनीं बरीचशी तीर्थयात्रा करणें फारसें शक्य नव्हतें. आणि जी त्यांनीं केली असेल ती रसिक अंतःकरणानें, जिज्ञासु बुद्धीनें, देवाच्या आणि सृष्टीच्या अंतरंगांत शिरण्यासाठीं केली असली पाहिजे.

[ ५ ] आतां या तीर्थयात्रेचें वर्णन दोन ग्रंथकारांनीं केलें आहे त्याचा थोडा थोडा मासला येथें देतों.

"अशा प्रकारें करमणूक करीत करीत वाटेच्या अनेकविध तीर्थांचीं स्नानें करून तेथील देवांचीं दर्शनें घेत घेत (ते) चालले. पश्चिमेचे प्रभास, पट्टण, द्वारका, सोरटी सोमनाथ, डाकूरजी भगवान्, बेचराजी देवी, सिद्धपुरी, मातृगया, पुष्करराज हीं तीर्थें करून हे दोघे मारवाड देशांतून चालले....... मारवाडांतून उत्तरेस पंजाब देशांतील स्थानेश्वर, नगरकोटनिवासिनी श्रीज्वाला-मुखी देवी, बदरिकाश्रम, हिमालयांतील पवित्र गंगोत्री, जम्नोत्री, हरिद्वार इत्यादि तीर्थें करीत करीत हे आमचे दोघे महासाधु दिल्लीस आले...दिल्लीहून श्री ज्ञानेश्वर आणि नामदेव हे बरोबर निघून मथुरा, गोकुळ, वृंदावन, अयोध्या हीं क्षेत्रें करीत करीत कांहीं दिवसांनीं श्री वाराणसी क्षेत्रांत आले. तेथें विधियुक्त यात्रा, श्रीविश्वेश्वरदर्शन, प्रदक्षिणा वगैरे करून श्रीरामभक्त महासाधु कबीर ह्यांची व आमचे ज्ञानेश्वर नामदेव यांची भेट झाली. तेथें कबीराच्या येथेंही पुष्कळ चमत्कार घडले. मग तेथून हे सद्भक्तशिरोमणि निघाले ते प्रयाग, गया, चित्रकूट, अनसूया, गिरि, पूर्वसमुद्र, जगन्नाथ, ओंकार, उज्जनी

महाकाल, सप्तशृंग, नाशिक, त्र्यंबक, पुण्यस्तंभ, प्रतिष्ठान, घृष्णेश्वर, परळी, वैजनाथ (परळी वैजनाथ हें खरोखर एकच ठिकाण आहे) वगैरे तीर्थें करीत आंवढ्या नागनाथास आले. (या ठिकाणीं नामदेवांनीं चमत्कार केलेला होता. त्यामुळे पूर्वाभिमुख देऊळ पश्चिमाभिमुख झालें.)... नंतर तेथून निघून पंपासरोवर, श्रीव्यंकटेश, स्वामी कार्तिक, श्रीशैलमल्लिकार्जुन, शिवकांची, विष्णुकांची, मदुरा–मीनाक्षी, सेतुबंध रामेश्वर, दक्षिणसमुद्र वगैरे करून पुनः हे उत्तरेस चालले. येतांना पश्चिमेकडील परशुराम, गोकर्ण, महाबळेश्वर, (गोकर्ण महाबळेश्वर हें एकच ठिकाण आहे) भीमाशंकरादि तीर्थें करीत करीत श्री पंढरपुरास ज्ञानेश्वर आणि नामदेव हे सुरक्षित येऊन पोहोंचले" इत्यादि. (श्रीज्ञानेश्वर महाराजांचे चरित्र, बळवंत खंडूजी पारख, ).

या सर्व वर्णनाला आधार वर दिलेल्या "पश्चिम प्रभास आदिकरोनी द्वारका। पाहिल्या सकळिका मोक्षपुऱ्या। पंथीं पावनतीर्थें पाहिलीं सकळिक" या तीर्थावळींतील अभंगाच्या तीन ओळी. शिवाय "तीर्थें करूनी नामा पंढरीशीं आला" या विसाव्या अभंगाची दाद रा. ब. खं. पारख यांनीं घेतलेलीच नाहीं. रा. पारख यांनी ज्ञानेश्वरचरित्र सुंदर भाषेंत पुष्कळच वर्षांपूर्वीं लिहिलें होतें व त्या काळीं संशोधनाचें तंत्र फारसें कोणाला माहीत नव्हतें असें म्हणतां येईल. तरीसुद्धां आपल्या अद्भुतरम्य वर्णनांत ही तीर्थयात्रा ज्ञानदेव नामदेव या दोघांनींच केली असें रा. पारख सांगतात व तें तीर्थावळींतील वर्णनाला धरून आहे. पण या नंतर पुष्कळ वर्षांनीं म्हणजे सन १९१२ या वर्षीं रा. रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर या प्रख्यात संतवाङ्मयाभ्यासू गृहस्थांनीं आपला "श्रीज्ञानेश्वर महाराज–चरित्र आणि ग्रंथविवेचन" हा फार सुंदर भाषेंत लिहिलेला ग्रंथ प्रसिद्ध केला. त्याच्या सहाव्या प्रकरणांत या तीर्थयात्रेची मोठी सुरस हकीकत आहे. तिलाही अगदीं मूळांतला आधार म्हणजे वर दिलेल्या तीर्थावळींतील अभंगाच्या ओळीच हें सांगावयास नकोच. अर्थात् महिपतबावांच्या ग्रंथांतून दिलेली हकीकतही रा. पांगारकरांनीं घेतलेली आहे. पांगारकर लिहितात त्याप्रमाणें ही तीर्थयात्रा या दोघांनींच केली नाहीं. ज्ञानदेव व नामदेव पंढरपुरांत विठ्ठलाचा निरोप घेऊन बाहेर पडले. "श्रीनिवृत्तिनाथांची आज्ञा घेऊन ज्ञानेश्वरमहाराजांनीं तीर्थयात्रेला निघण्याचा बेत मुक्रर केला. श्रीगुरु निवृत्तिनाथही बरोबर होतेच. सोपानदेव, मुक्ताबाई हे

आणि इतर ज्या भक्तांना यांच्या सहवासाचा लाभ घ्यावासा वाटला ते सर्व मिळून आळंदीहून बरोबर निघाले." मग ही सर्व मंडळी पंढरपुरास आली. "मंगळवेढ्याहून चोखामेळा व आरणभेंडीहून सावंता माळी हे या संतमेळ्यास पंढरीस येऊन मिळाले. चालत चालत सर्व मंडळी कऱ्हाडजवळ येऊन पोहोंचली." याप्रमाणें सर्व मंडळी मार्गक्रमण करीत असतांना एके दिवशीं तेरगांवीं येऊन पोहोंचली. तेथें गोरोबा कुंभार रहात होते. गोरोबांनीं संतांचें मोठ्या भक्तिभावानें आदरातिथ्य केलें. प्रत्येक मुक्कामास ज्ञानदेवांचें कीर्तन होत असे." या ठिकाणीं रा. पांगारकरांनीं गोरोबांनीं सर्वांचीं डोकीं आपल्या थापटण्यानें तपासून पाहिल्याची व नामदेवाचें मडकें ( डोकें ) कच्चें असल्याची गोष्ट दिली आहे. तिचा विस्तृत उल्लेख महिपतीच्या ग्रंथांत आहे. "सर्व मंडळी गोरोबांची आज्ञा घेऊन निघाली तों शिवरात्रीच्या सुमारास औंवढ्या नागनाथीं येऊन पोंचली," "ज्ञानेश्वर महाराज तीर्थयात्रा करीत करीत सातपुड्यापर्यंत आले." ज्ञानेश्वर महाराज यानंतर प्रयागास गेले. "तेथें त्रिवेणीचें स्नान करून व भारद्वाजाश्रम पाहून ते काशीस गेले. त्यावेळीं मणिकर्णिकेच्या घाटावर मुद्गलाचार्य मोठा यज्ञ करीत असल्यामुळें काशीस वैदिक, शास्त्री, पुराणिक इत्यादि विद्वान् ब्राह्मणांची मोठी दंगल उडून राहिली होती व यज्ञप्रसंगीं अग्रपूजेचा मान कोणाला द्यावा याबद्दल तंटा माजून राहिला होता. तो तंटा मिटेना तेव्हां मुद्गलाचार्यांनीं एक हस्तिनी ( म्हणजे हत्तीण ) आणून तिच्या सोंडेंत एक पुष्पमाला दिली व ती ज्याच्या गळ्यांत माळ घालील त्याची अग्रपूजा करावी असें ठरविलें. प्रत्येकास वाटे कीं हा मान मला मिळावा, पण या मानाची रेसभर अपेक्षा नसलेल्या ज्ञानेश्वरांच्या गळ्यांत ती माळ येऊन अचानक पडली व 'पुंडलीक वरदे'च्या जयघोषांनीं काशीक्षेत्र दणाणून सोडलें." "तीर्थयात्रेचा पंथ क्रमीत असतां आपली संतमंडळी हस्तिनापूर उर्फ दिल्ली येथें आली." येथें नामदेवांनीं मेलेली गाय जिवंत करून यवन पातशाहाला चकित करून सोडलें. "ज्ञानेश्वर महाराज काशीच्या पंचक्रोशींत फिरून गया, अयोध्या, गोकुळ, वृंदावन, द्वारका, गिरनार इत्यादि तीर्थें हिंडत मारवाडांत आले." मारवाडांत उपरोक्त विहीरींत पाणी वर चढण्याचा चमत्कार झाला आणि अशा प्रकारें "तीर्थयात्रा संपवून संतमंडळी परत पंढरपुरास आली." महिपतबोवांच्या

भक्तविजयांतील कथांचा आधार घेऊन रा. पांगारकर यांनीं लिहिलेला मजकूर लक्षांत घेतला तरीसुद्धां तीर्थयात्रेच्या सर्व वर्णनाचा मूळ आधार तीर्थावळीच्या अभंगांतील तीन ओळी, हीच गोष्ट शिल्लक राहते. रा. पांगारकरांनीं रा. पारख यांच्यापेक्षां थोडीशी अधिक चिकित्सक बुद्धि दाखवून ज्ञानदेवांना बदरिकाश्रम, गंगोत्री, जन्नोत्री इकडे हिंडवून आणलें नाहीं हीही गोष्ट येथें निर्दिष्ट करण्यासारखी आहे. नामदेव यात्रेंतून मध्येंच निघून आला ही गोष्ट पांगारकरांनींही उल्लेखिलेली नाहीं.

याप्रमाणें हें तीर्थयात्राप्रकरण आहे. हें चमत्कारांनीं भरलेलें आहे यांत चमत्कार नाहीं; पण ज्ञानदेव चमत्काराचे पुरस्कर्ते नव्हते येवढें लक्षांत ठेवून जिज्ञासूंनीं आपल्या चिकित्सक बुद्धीचा थोडाबहुत उपयोग करण्यांत चूक होणार नाहीं ज्ञानदेव परत पंढरपुरास आल्यावर श्रीगुरूंच्या आज्ञेवरून त्यांनीं "अमृतानुभव" हा कशाचीही व्याख्या नसलेला स्वतंत्र ग्रंथ रचला. या ग्रंथाला उपमा नाहीं. त्याचा परिचय करून देण्याचा प्रयत्न दुसऱ्या एका भागांत केलेला आहे. या शिवाय ज्ञानदेवांच्या नांवावर मिळणारी रचना बरीच आहे तिचाही परामर्श घेण्याचा प्रयत्न अन्यत्र याच ग्रंथांत केलेला आहे. तीर्थयात्रेनंतर हळू हळू ज्ञानदेवांचा समाधिकाळ जवळ येत चालला. तिकडे वळण्यापूर्वी त्यांच्या काळच्या व त्यांच्याशीं संबंध आलेल्या संत-सज्जनांची ओळख करून घेणें आवश्यक आहे. तेव्हां यापुढील भागांत ज्ञानदेवांच्या मित्रपरिवाराची म्हणजेच तत्कालीन महाराष्ट्रीय संतमंडळाची थोडक्यांत हकीकत दिलेली आहे.

# भाग सहावा

## परिवार

जयाचें नांव तीर्थरावो। दर्शनें प्रशस्तीसी ठावो।
जयाचेनि संगें ब्रह्मभावो। भ्रांतासही ॥ १०२
जयाचेनि बोले धर्मु जिये। दिठी महासिद्धीतें विये।
देखें स्वर्गसुखादि इयें। खेळु जयाचा ॥ १०३
विपायें जरी आठवला चित्ता। तरी दे आपुली योग्यता।
हें असो तयातें प्रशंसिता। लाभु आथी ॥ १०४
पुढती अस्तवेना ऐसें। जया पाहिलें अद्वैतदिवसें।
मग आपणपांचि आपणु असे। अखंडित ॥ १०५

ज्ञानेश्वरी, ६

ज्ञानदेवांचा परिवार—ज्याला घर ना दार, संसार ना उपाधि त्याचा परिवार कसचा? पण ज्ञानदेवांचा परिवार फार मोठा होता आणि त्यांचा परिवार हें महाराष्ट्राचें भाग्य होऊन गेलें. त्यांचा परिवार म्हणजे प्रथम त्यांचीं भावंडें आणि नंतर त्यांचे नामदेवप्रभृति संतमित्र. त्यांचीं व त्यांनीं केलेल्या चमत्कारांचीं वर्णनें करतां करतां आपले संतचरित्रकार महिपतिबावा यांच्या लेखणीला विलक्षण माधुर्य चढलेलें आहे. ज्ञानदेवांच्या भावंडांची हकीकत आतांपर्यंत बरीच आली आहे. येथें त्यांची त्यांच्या कवित्वद्वारां थोडीशी ओळख करून द्यावयाची आहे. ज्येष्ठ बंधु निवृत्तिनाथ हे ज्ञानदेवांचे गुरु. आपल्या सद्गुरूबद्दल ज्ञानदेवांनीं ज्ञानेश्वरींत व अमृतानुभवांत ठिकठिकाणीं मोठे प्रेमोद्गार काढले आहेत. ज्ञानदेवांना निवृत्तिनाथांबद्दल अत्यंत पूज्यभाव व अभिमान होता आणि ज्ञानदेवाबद्दल निवृत्तिनाथांना निरतिशय प्रेम होतें. ज्ञानदेवांच्या निर्याणसमयीं हा ज्ञानदेवांचा सद्गुरू, शंकरापेक्षां श्रेष्ठ म्हणून ज्याचें वर्णन अमृतानुभवांत ज्ञानदेवांनीं केलेलें आहे असा, त्या निवृत्तिनाथाचें हृदय खळबळून गेलें. नामदेवानें त्या प्रसंगाच्या केलेल्या वर्णनावरून शाकुंतलांतल्या चौथ्या अंकांतील श्लोकचतुष्टयाची आठवण कोणत्याही

**रसिकाला झाल्याशिवाय राहणार नाहीं. निवृत्तिनाथांच्या नांवावर सुमारें पावणेचारशें अभंग प्रसिद्ध आहेत. त्यांतील मासल्यासाठीं थोडे येथें देतों. श्रीकृष्णासंबंधीं अद्वैतपर अभंग निवृत्तिनाथांचे म्हणून जे प्रसिद्ध आहेत त्यांत माधुर्य अनुपम भरलेलें आहे.**

१

वैभव विलास नेणोनी सायास । कल्पनेची आस नाहीं जेथें ॥
तें रूप दुर्लभ कृष्णमूर्ति ठसा । वोतल्या दश दिशा नंदा घरीं ॥
योगियाचें ध्यान मनाचें उन्मन । भक्ताचें जीवन गाई चारी ॥
निवृत्ति साकार ब्रह्मीचा प्रकार । ॐ तत्सदाकार कृष्णलीला ॥

२

मेघ अमृताला जेथूनि पवाड । दुजियाची चाड नाहीं जेथें ॥
ते कृष्णरूप गाडे । यशोदा घे पुढें । दूध वाडें कोडें । मागतसे ॥
सृष्टीचा उपवडु ब्रह्मांडाचा घडु । ब्रह्मीचा उपवडु उघड दिसे ॥
निवृत्ति उघडु ब्रह्मामाजीं लोळे । नंदाघरीं खेळे गोपवेषें ॥

**सद्गुरूचा प्रसाद झाल्यानंतर जी स्थिति प्राप्त झाली तिचें वर्णन केलेल्या अभंगांपैकीं एकदोन देतों.**

१

सार हे निःसार निवडुनी घेईन । सर्व हा होईन आत्माराम ॥
राम सर्वाघरीं बिंबलासे आम्हा । पूर्ण तो पौर्णिमा सोळा कळी ॥
न देखों दुसरें हरिवीण काज । आणिकाचें चोज नाहीं तेथें ॥
निवृत्ति गौरव गुरुमुखें घेत । आपणचि होत समरसें ॥

२

निमाली ते निशा पळाला तो दीन । प्रपंचाचें भान लोपिन्नलें ॥
हरिवीण नाहीं सूत्रधारीरूप । वासना संकल्प उपटिला ॥
तोडियेलें सूत्र उगविला गळा । अखंड सोहळा ब्रह्मरूप ॥
निवृत्ति निःसंग परब्रह्म चांग । फेडियला पांग गुरुराजें ॥

**पुढील अभंग तत्वार्थानें भरलेला आहेः—**

अनुभवाच्या गांवीं ज्ञान हेंचि फळ । विज्ञान केवळ वृक्ष तया ॥
साधनीं स्वानुभव अनुभवीं अनुभव । ब्रह्माची राणीव आम्हां घरीं ॥

रिकामा बरवु नसे खेळ मेळे । ब्रह्मची कल्लोळे भोगीतुसे ॥
निवृत्ति सरळ निरसले अज्ञान । सर्वत्र संपूर्ण आत्माराम ॥

**पंढरपूर व तेथील काल्लासमारंभ यासंबंधीं निवृत्तिनाथाचे बरेच अभंग आहेत. आपल्या तीन भावंडाबद्दलही त्यांचा एक अभंग आहे. त्यांत इतरही संतांचा उल्लेख आहे.**

सोपान संवगडा स्वानंद ज्ञानदेव । मुक्ताईचा भाव विठ्ठलराज ॥
दिंडी टाळघोळ गाती विठ्ठलनाम । खेचरासी प्रेम विठ्ठलासी ॥
नरहरि विठा नारा ते गोणाई । प्रेमभरित गेहीं वोसंडत ॥
निवृत्ति प्रकट ज्ञानदेवा सांगे । पुंडलीकसंगे हरि खेळे ॥

**हा अभंग निवृत्तिनाथांचाच आहे काय? पण पुढील अभंग याहूनही चमत्कारिक आहे.**

धन्य हा खेचर धन्य हा सोपान । भक्तीचें जीवन जनक हेतु ॥
धन्य याचे कुळ पवित्र कुशळ । नित्य या गोपाळ जवळी असे ॥
याचेनी स्मरणें नाशतीं दारुणें । कैवल्य पावणे ब्रह्मामाजीं ॥
निवृत्ति म्हणे परब्रह्म हे साकार । तेथील अंकुर उमटले ॥

**हाही अभंग निवृत्तिनाथांचाच काय? आणि असेल तर यांतील सोपान म्हणजे त्याचा भाऊ सोपानदेव तोच काय? आणि त्याच्या म्हणजे आपल्या जातिकुळाला निवृत्तिनाथ धन्यवाद देत आहे? अतिशय अडचणीचे इतर प्रश्न अशा अभंगांच्या आधारावर उभे करण्यापेक्षां हे अभंगच निवृत्तिनाथांचे नसून त्याच्या नांवावर कोणीतरी दडपून दिले आहेत असें म्हणणें ज्यास्ती सयुक्तिक दिसतें.**

**आतां त्याचे एकदोन उपदेशपर अभंग देतों.**

१

समता वर्तावी अहंता खंडावी । तेणेंची पदवी मोक्षमार्ग ॥
क्षमा धरी चित्तीं अखंड श्रीपति । एकतत्व चित्तीं ध्याईजेसु ॥
नाम हाचि मंत्र नित्य नाम सार । दुसरा विचार घेऊं नको ॥
अन्य शास्त्रें भजतां नाहीं पैं मुक्तता । हरिनाम गातां मुक्ति रोकडी ॥
नित्यसुख घ्यावें नामचि अनुभवावें । तरिच सुख पावावें इहलोकीं ॥
निवृत्ति भजन नित्य अनुष्ठान । एकरूप ध्यान मनीं ध्यातु सदा ॥

निवृत्तिनाथांच्या नांवावर खपणारे बरेचसे अभंग त्यांचे नव्हेत हें स्पष्ट दिसतें. त्यांतील बऱ्याच गोष्टी निवृत्तिज्ञानदेव यांच्या चरित्राशीं, तत्त्वांशीं, विसंगत दिसतात आणि कित्येक शतकांनंतर कोणी तरी हे अभंग रचून या पुरुषांच्या नांवावर ढकललेले दिसतात हें स्पष्टपणें नमूद करणें आवश्यक आहे.

सोपानदेवाच्या नांवावर सुमारें पन्नास अभंग प्रसिद्ध आहेत. नमुन्यासाठीं एक येथें देतों. हा ज्ञानदेवासबंधीं आहे.

ज्ञानदेवीं ज्ञान नाहीं तेथें भिन्न । प्रपंचाचें भरण तेथें नाहीं ॥
स्वरूपाची खूण होउनी सकळ । भोगी सर्वकाळ चित्सत्ता ॥
आत्मा परमात्मा भेदाभेदद्वंद्व । एक तव अभेद जनीं वनीं ॥
सोपान दीपन दीपीं तें जीवन । तयामाजी मन एक झालें ॥

मुक्ताबाई ही या भावंडांत सर्वांत लहान. ही आपल्या थोरल्या भावंडांची फार लाडकी "ताई" होती आणि ब्रह्मज्ञान जाणणारी होती. हिनें अनेक चमत्कार केलेले आहेत. नामदेवाला "तूं कच्चा" म्हणून ही एवढीशी पोर वरचेवर हिणवत असे. विसोबा खेचर या गृहस्थानें ज्ञानदेवाचा द्वेष करून आपल्या ब्राह्मण्याची कीर्ति गाजविली होती. याचें पहिलें नांव विसोबा चाटी. एक दिवस निवृत्तिनाथानें सणाच्या वेळीं मुक्ताबाईला मांडे तयार करण्यास सांगितलें. त्यासाठीं कुंभाराकडून खापर आणण्यासाठीं निघालेली ही मुलगी विसोबानें पाहिली व तिला खापर देऊं नको म्हणून त्यानें कुंभाराला सांगितलें. तेव्हां ती खिन्न होऊन परत आली. तिला खिन्न पाहून ज्ञानदेवांनीं कारण विचारलें व तें ऐकतांच योगसामर्थ्यानें पोटांतील जठराग्नि पेटविला व आपली पाठ सपाटून तापविली व त्यावर मुक्ताबाईनें मांडे भाजून घेतले. हा चमत्कार पाहून विसोबा चाटी त्यांना शरण गेले व विसोबा खेचर म्हणजे खेचर वृत्तीनें राहणारे म्हणून प्रसिद्धीला आले. नामदेवाचा हा विसोबा खेचरच गुरु झाला. ही गोष्ट म्हणजे मांडे भाजण्याची गोष्ट झाली तेव्हां मुक्ताबाई फार तर दहा बारा वर्षांची असेल. ज्ञानदेवांच्या पाठीवर मांडे भाजण्याच्या चमत्काराइतकाच दुसरा चमत्कार म्हणजे येवढ्या लहान वयांत मुक्ताबाईला मांडे करतां येत होते; व ती आपल्या भावंडांना खायला जेवायला करून वाढीत असे. मुक्ताबाई म्हणजे मोठी तीव्र बुद्धीची मुलगी होती यांत शंका नाहीं. निवृत्तिनाथ व

**ज्ञानदेव या भावंडांना शोभण्यासारखी ती बहीण होती व मराठी वाङ्मयांत " ढवळे " रचणाऱ्या महदंबेप्रमाणेंच तिची आद्य कवयित्रींत गणना केली पाहिजे.**

**मुक्ताबाईचे दोन चार अभंग येथें देतों. तिच्या नांवावर एकंदर चाळीस बेचाळीस अभंग प्रसिद्ध आहेत.**

१

आधी तूं मुक्त होतासि रे प्राणिया । परि वासने पापिणिया नाडिलासी ॥
आधीचें आठवी मग घेई परी । हरिनाम जिव्हारीं मंत्रसार ॥
आदि मध्य हरि ऊर्ध्व पै वैकुंठ । जाईल वासना हरि होईल प्रकट ॥
एक तत्व धरीं हरिनाम गोड । येर ते काबाड विषयवोढी ॥
नाना मते सांडी वासना पापिणी । एक नारायणीं चाड धरी ॥
मुक्ताबाई मुक्तलग साडिली हे वासना । मुक्तामुक्ती राना हरिपाठ ॥

२

निर्गुणाची सेज सगुणाची बाज । तेथें केशीराज पहुडले ॥
कैसें याचे करणें दिवसा चादिणें । सबळें ऊठणे एक तत्त्वीं ॥
नाहीं या ममता अवघीच समता । आदि अंतु बिंबता नलगे वेळु ॥
मुक्ताई सधन सर्वत्र नारायण । जीवशीव संपूर्ण एका तत्वे ॥

३

प्रारब्ध संचित आचरण गोमटें । निवृत्तितटाकें निघालो आम्ही ॥
मुळींचा पदार्थ मुळीच पै गेला । परतोनी अबोला संसारासी ॥
सत्यमिथ्याभाव सत्वर फळला । हृदयीं सामावला हरिराज ॥
अव्यक्त आकार साकार हे स्फूर्ति । जीवेंशिवे प्राप्ति ऐसें केलें ॥
सकाम निष्काम वृत्तीचा निज फेर । वैकुंठाकार दाखविले ॥
मुक्तलग मुक्त मुक्ताईचें तट । अवघेच वैकुंठ निघोट रया ॥

**ज्ञानदेवानें येवढ्या लहान वयांत ज्ञानेश्वरी कशी लिहिली हें कोडें आपल्यापुढें आहे. पण त्याच्यापेक्षां वयानें तीन चार वर्षे लहान असलेल्या मुक्ताबाईनें हे असले अद्वैत ज्ञानानें भरलेले सुंदर अभंग कसे रचले हेंही एक कोडेंच आहे. मुक्ताबाईच्या नांवावर दोन कूट अभंग प्रसिद्ध आहेत. त्यांतला छोटा येथें देतों:—**

मुंगी उडाली आकाशीं । तिणे गिळिले सूर्याशीं ॥
थोर नवलाव झाला । वांझे पुत्र प्रसवला ॥
विंचु पाताळाशी जाय । शेष माथां वंदी पाय ॥
माशी व्याली घार झाली । देखोनी मुक्ताई हांसली ॥

अशीं कूट पदें जुन्या मराठी वाङ्मयांत बरींच आहेत व त्यांची सोडवणूक वेदांत शास्त्राचें सूक्ष्म ज्ञान असणाऱ्यांनीं करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. मुक्ताबाईच्या बुद्धीचें व वैराग्याचें कौतुक करावें तितकें थोडें आहे. याप्रमाणें ज्ञानदेवांच्या तीन भावंडांचा परिचय झाल्यानंतर आपण त्यांच्या तत्कालीन संतमित्रांकडे वळूं.

[ २ ] मुक्ताबाईचें नांव घेतांच चांगदेवाचीही आठवण होते. चांगदेव हे त्या काळचे मोठे योगी आणि सिद्धि प्राप्त झालेले पुरुष होते. ते चौदाशें वर्षें वयाचे होते व योगबलानें 'वाघावर बसत' आणि सर्पाचा चाबूक करीत. [ पाठीवर 'बसवून' घेण्याइतका वाघ गरीब झाल्यावर येवढ्या जबर चाबकाची जरूरी काय असा प्रश्न निघण्याचा संभव आहे पण तिकडे आपण येथें लक्ष देण्याचें कारण नाहीं. ] चांगदेवांचें चरित्र निळोबा म्हणून तुकारामाचे शिष्य होते त्यांनीं लिहिलेलें आहे. चांगदेव तापी नदीच्या कांठीं रहात. हे योगविद्येंत फार निष्णात होते. त्यांचा शिष्यपरिवार बराच मोठा होता. त्यांनीं ज्ञानदेवानें केलेले चमत्कार ऐकले व अशा योग्याची व आपली गांठ पडून आपलें योगवैभव त्याला दाखविण्याची संधि मिळावी अशी त्यांना इच्छा झाली.

उपजता ज्ञानी हे वर्म जाणोनी ।
आले लोटांगणी चांगदेव ॥

असें नामदेवानें वर्णन केलें आहे. पण चांगदेवांना अहंता बरीच होती. ज्ञानदेवासारख्या मुलाला मायना काय लिहावा याची शंका येऊन त्यांनीं कोरा कागद–मजकूर न लिहितां–पत्र म्हणून ज्ञानदेवाकडे पाठविला. ही दंतकथा खरी असो खोटी असो, चौदाशें वर्षें योगसाधन करून पुनः चांगदेव कोरा तो कोरा राहिला हें दाखविण्याचा तिचा हेतु आहे. ज्ञानदेवांनीं पत्रोत्तर पाठविलें व पुढें त्यांच्या भेटीला चांगदेव वाघावर बसून आले. त्या वेळीं ज्ञानदेव आपल्या भावंडांसहित एका भिंताडावर ऊन खात बसले होते. चांगदेवाचा गर्व हरण-

करण्यासाठीं ज्ञानदेवांनींही योगबलाच्या सामर्थ्यानें ती भिंत चालविली व तो चमत्कार पाहून चांगदेवाचा माथा ज्ञानदेवापुढें विनम्र झाला. चांगदेवपासष्टी नांवाचें छोटेसें प्रकरण चांगदेवाला उपदेश करण्यासाठीं ज्ञानदेवानें रचिलें व त्यांत अद्वैत तत्त्वाचें विवरण आहे. चांगदेवाची एक अशी गोष्ट सांगतात कीं ज्ञानदेवाचे चमत्कार पाहिल्यानंतर एक दिवस ते मुक्ताबाई स्नान करीत होती तेथें गेले व ती निसर्गावस्थेंत असलेली पाहून अशा स्थितींत तिला पाहिल्याची लाज वाटून तेथून परत जाऊं लागले. चांगदेवाच्या या "विषम" चित्तवृत्तीबद्दल मुक्ताबाईनें त्याची चांगलीच हजेरी घेतली. मुक्ताबाई त्याला काय म्हणाली याचें वर्णन महिपतीनें केलें आहे तें मोठें मजेदार आहे.

जरी गुरुकृपा असती तुजवरी । तरी विकार न येतां अंतरी ।
भिंतीस कोनाडे तैशापरी । मानूनि पुढे येतासी ॥
जनीं वनीं हिंडतां गाय । वस्त्रें नेसत असती काय ।
त्या पशूवेषीं मी पाहे । तुज कां नये प्रत्यया ॥

मुक्ताबाई पुढें, चांगदेव ज्ञानदेवांचे शिष्य झाल्यावर, त्यांना चांग्या म्हणून हांक मारीत असे. चौदाशें वर्षें वयाच्या या सिद्ध पुरुषाला या बारा चौदा वर्षांच्या मुलीनें "चांग्या" म्हणून हाक मारावी व तिचा त्यानें विषाद मानूं नये हें ज्ञानदेवाच्या सद्गुरुप्रसादामुळें त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झालेल्या समतेचें निदर्शक होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. चांगदेवाची उलट मुक्ताबाईवरच पूज्यबुद्धि अतिशय वाढली. ज्ञानदेवाच्या घरांत मुक्ताबाई व चांगदेव यांचे वरचेवर संवाद होत व त्यांत ब्रह्मज्ञानविवेचन वरचेवर होई. चांगदेवाचे कांहीं अभंग प्रसिद्ध आहेत; त्यावरून या अतिवृद्ध सिद्धाच्या ठिकाणीं इतर गुणांबरोबर विनोदबुद्धीही होती असें दिसून येतें. त्याचे कांहीं कूट अभंग मोठे मजेदार आहेत:—एक नमुना—

नोवरीचे हातीं चित्रीव काठी । नोवरी लागे संन्याशापाठी ॥
नारायण म्हणा नारायण म्हणा । नारायण म्हणावो नोवरीवो ॥
विश्वरूप नोवरी संन्याशा रातली । त्या आम्हां भली सोयरीक झाली ॥
दिगंबर नोवरा क्षपणिक वऱ्हाडी । वटेश्वर चांगा वाहतो लुगडीं ॥

चांगदेव मुक्तबाईला आपली बहीण समजत असे. पुढील कूट अभंग कळावयाला कठीण नाहीं.

वऱ्हाडी आले संसारनगरा । चांगा नोवरा केळवला ॥
हातीं काकण उभा वटेश्वरीं । शांति हे नोवरी पर्णावया ॥
पर्णिली शांति बैसली पाटीं । मुक्ताबाई करवली हळदुली वाटी ॥

**चांगदेवाचा पुढील अद्वैतपर अभंग पहाः—**

रूप नाहीं तेथें नांव नाहीं । गुण नाहीं तेथें निर्गुण नाहीं ॥
रूप नाही तेथें मन सांगावया गेलें । आपणचि बुडालें अरूपीं रे ॥
चांगावटेश्वरीं रूप ना गुण । सहज निर्गुण बाईयांनो ॥

**चांगदेव मुक्ताबाईला बहीण समजत होता तर ती लहान मुलगी या चौदाशें वर्षांच्या म्हाताऱ्याला आपलें मूल समजत होती. पुढील अभंग चौदा वर्षें वयाच्या मुलीनें चौदाशें वर्षें वयाच्या माणसाला उद्देशून केला आहे असें कोणास वाटेल काय ?**

भावें भक्ती करूनि वैराग्य जोडसी । तरी तूं पावसी ब्रह्मसुख ॥
ज्ञानतत्त्वीं करीं करीं हा विचार । निर्गुणी आकार निरामय ॥
चांग्या सोय धरीं ज्ञानवटेश्वरीं । मुक्ताई जिव्हारीं बोधु करी ॥

**योगापेक्षां ज्ञान महत्वाचें आहे. हा सिद्धांत ज्ञानदेवाकडे येऊन चांगदेव शिकला. ज्ञानाशिवाय मुक्ति नाहीं हा सिद्धांत शंकराचार्यांप्रमाणें ज्ञानदेवांना मान्य होता. चांगदेवपासष्टींतील ओव्या अमृतानुभवांतील ओव्यांच्या धाटणीच्या आहेत. चांगदेवानें आपल्या शिष्यमंडळींत समाविष्ट होणें हा ज्ञानदेवाचा त्या काळीं फारच मोठा विजय होता. ज्ञानदेव स्वतः योगमार्गी होते पण योग व ज्ञान यांतील तारतम्य त्यांना पूर्णपणें पटलेलें होतें व ते चांगदेवाला उमजलें नव्हतें. चांगदेवाची अहंता एकदां नाहींशी झाल्यावर तो या चार भावंडांत पांचवा झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. चमत्कार करून याप्रमाणें चांगदेवासारख्या महासिद्धाला व विसोबा चाटीसारख्या संसारी माणसाला ज्ञानदेवानें ताळ्यावर आणलें पण त्यांचें परावर्तन केवळ चमत्कारामुळें झालें नाहीं. तें ज्ञानप्राप्तीमुळें झालें व ती ज्ञानप्राप्ति त्यांना ज्ञानदेवाच्या कृपेमुळें झाली. नामदेवासंबंधीं देखील असेंच म्हणतां येईल. त्याच्याही भक्तींत " ज्ञान " नव्हतें; तें त्याला ज्ञानदेवाच्या संगतीनें मिळालें व विसोबा चाटीसारख्या परावर्तन झालेल्या पतिताचें गुरुत्व त्यानें ज्ञानदेवाच्या सांगण्यामुळेंच पत्करलें. नामदेवाची हकीकत**

या ठिकाणीं विस्तारानें देण्याचें कारण नाहीं; पण ज्ञानदेवपरिवारांत त्याचें स्थान मोठें असल्यामुळें त्याच्या चरित्राचें थोडक्यांत निदर्शन येथें केलें पाहिजे.

[ ३ ] नामदेवाचें चरित्र चमत्कारांनीं भरलेलें आहे व त्याचा जन्म बरोबर कोठें झाला व तो बरोबर केव्हां जन्माला आला याबद्दलही निश्चित असें कांहीं माहीत नाहीं. रा. रा. ल. रा. पांगारकर यांनीं "ज्ञानेश्वरांची प्रभावळ" या ग्रंथांत बरेच परिश्रम करून त्या वेळच्या मंडळीसंबंधीं कालनिर्णय केलेला आहे. त्यांत नामदेवांचा जन्मकाल कार्तिक शुद्ध ११ शके ११९२ म्हणून दिलेला आहे; म्हणजे ते ज्ञानदेवाहून पांच वर्षांनीं मोठे होते. नामदेव नांवाचे अनेक ग्रंथकार जुन्या मराठींत झाले ही गोष्ट खरी व एक नामदेव महानुभावपंथी होऊन गेला. चाळीस वर्षांपूर्वीं ज्ञानदेव–नामदेव यांच्या परस्परसंबंधाबद्दल व कालानुक्रमाबद्दल पुष्कळ वादविवाद होऊन गेला पण त्यांतून निश्चित असें बाहेर कांहींच पडलें नाहीं. एकापेक्षां अधिक नामदेव झाले तर यांतील ज्ञानदेवाचा मित्र कोणता; त्याचप्रमाणें ज्ञानदेव व ज्ञानेश्वर असे दोघे पुरुष होऊन गेले व एकाचा मित्र एक नामदेव व दुसऱ्याचा मित्र दुसरा नामदेव असा वाद निघून त्यासंबंधीं पूर्वपक्ष उत्तरपक्ष झाले; पण उत्तरपक्षांत गालि-प्रदानाचा धुरळा बराच उडाल्यामुळें अद्यापि याही प्रश्नांचा कांहीं समाधानकारक निर्णय लागला आहे असें म्हणतां येत नाहीं. नामदेव हा निस्सीम विठ्ठलभक्त होता. भक्तींत तो परिपूर्ण पण ज्ञानांत कच्चा होता व असा नामदेव ज्ञानदेवाचा समकालीन व मित्र होता हें गृहीत धरल्यानंतर त्याच्या नांवावर खपणाऱ्या अभंगाची गाथा तपासली तर त्या अभंगांत परस्परविरुद्ध अशा गोष्टी सांपडतात व त्यांतील कित्येक अभंग त्यानें केलेले नव्हेत असें स्पष्ट दिसतें. यासंबंधीं निर्देश तीर्थयात्राप्रकरणांत तीर्थावळीच्या अभंगासंबंधी मागील प्रकरणांत एका-पेक्षां अधिक वेळां आलेला आहे. नामदेवानें शतकोटि अभंग करण्याचा निश्चय केला होता व तो पार पाडण्यास त्याचीं बायकामुलें, पैपाहुणे, आलेगेले या सर्वांनीं मदत केली. तरी पण तो निश्चय त्याच्या मृत्यूच्या वेळेपर्यंत तडीला गेला नाहीं व कांहीं अभंग करावयाचे राहिले. तो संकल्प पुढें साडेतीनशें वर्षांनीं तुकारामानें पुरा केला अशी कथा आहे. नामदेवाला उद्धवाचा अवतार समजतात. आपल्याकडे मनुष्य थोडासा मोठा झाला कीं त्याला अवतार समजण्याचा प्रघात आहे व रामदास मारुतीचे अवतार, शिवाजी महाराज

शंकराचे अवतार, टिळक शिवाजीचे अवतार इत्यादि कथा प्रचारांत येतात. शंभर कोटी अभंगाची प्रतिज्ञा ही पण साठ सहस्र वर्षे तपश्चर्या या कोटींतीलच दिसते. तेव्हां या बाबतींत अधिक चर्चा करण्याचें कारण नाहीं. नामदेवाचा व ज्ञानदेवाचा अप्रतिम स्नेह जमला व विठ्ठलाचा हा आवडता भक्त ज्ञानेश्वरीच्या कर्त्याला गुरुस्थानीं मानूं लागला आणि विसोबा खेचराला त्यानें प्रत्यक्ष गुरू केलें. सगुणोपासनेसंबंधीं त्याच्या वृत्तींत फारसा अंतर पडला असें दिसत नाहीं व सगुणभक्तीचा तो मूर्तिमंत पुतळा होऊन गेला यांत कांहीं शंका नाहीं. त्याच्या शेकडों अभंगांत माधुर्य ओतप्रोत भरलेलें आहे आणि प्रेमळपणा व रसाळपणा या गुणांत मराठी वाङ्मयांत त्याच्याशीं कोणी बरोबरी करील असें वाटत नाहीं. त्याच्या अभंगांत एक प्रकारची विलक्षण गोडी आहे आणि त्याचें कारण गोडी हा पदार्थ वैषयिक आहे व निर्गुण, निर्विषयक, निरुपाधिक अशा तत्त्वज्ञानांत तशी गोडी असण्याचा संभव कमी. नामदेव हा ज्ञानदेवानंतर पुष्कळ वर्षे जगला आणि विठ्ठलाचें व पंढरीचें माहात्म्य चक्रवाढ व्याजाच्या गतीनें वाढविण्याचें खरें श्रेय त्याच्याकडे आहे. मराठी संतमंडळांत त्याचें नांव अजरामर झालेलें आहे व विठ्ठलभक्त ही पदवी खास त्याची आहे. त्याच्या अभंगाचे एक दोन नमुने येथें देतों.

ज्ञानदेवाबद्दल स्तुतिपर व थोडक्यांत चरित्रपर असा त्याचा अभंग प्रसिद्ध आहे. या अभंगांत मुक्ताबाईचा उल्लेख नाहीं ही गोष्ट चिंतनीय आहे.

तिन्ही देव जैसे परब्रह्मीचे ठसे । जगीं सूर्य जैसे प्रकटले ॥
धन्य तो निवृत्ति धन्य तो सोपान । धन्य तें निधान ज्ञानदेव ॥
उपजतां ज्ञानी हें वर्म जाणोनी । आले लोटांगणी चांगदेव ॥
प्रत्यक्ष पैठणीं भट्टी केला वाद । रेड्यामुखीं वेद बोलविला ॥
सोहंसुकृताच्या सोडोनीया गांठीं । केलीसे मराठी गीतादेवी ॥
नामा म्हणे सर्व सुकृत लाहिजे । एक वेळ जाइजे आळंदीसी ॥

गीतादेवीचें मराठीकरण हा ज्ञानदेवांचा पराक्रम त्या काळच्या सर्व महाराष्ट्रीयांना मोठा अभिनंदनीय वाटला होता. असो. आतां पंढरीच्या विठ्ठलाबद्दल नामदेवाचे अभंगः—

१

वैकुंठीं पाहे तंव चतुर्भुज दिसे । परि सुंदर रूप तेथें नाहीं ॥
क्षीरसागरीं पाहे तो तेथें निद्रिस्त । परि सुंदर रूप तेथें नाहीं ॥
द्वारके पाहे तंव पाताळी चरण । परि सुंदर रूप तेथे नाहीं ॥
हृदयीं पाहे तंव अव्यक्तचि दिसे । परि सुंदर रूप तेथें नाही ॥
नामा म्हणे ऐसा सर्व गुणसंपूर्ण । पंढरीये उभा शोभत असे ॥

२

कस्तुरी कुंकुम रेखे लाल टिळा । केशराची उटी सर्वांगासी ॥
पाहिला पाहिला माझा पांडुरंग । जीवीं जीवलग डोळेभरी ॥
हार शोभे गळां मंजरीचा तुरा । कर्णे रत्न किळा झळाळीत ॥
विटेवरी नीट गोमटी पाउले । त्यांवरी ठेविलें मस्तक म्यां ॥
नामयाची धणी भुकेली ते घाली । आनंद दिवाळी आजी झाली ॥

३

केशवाच्या नामीं लागलेसे ध्यान । देखे त्रिभुवन तदाकार ॥
जया तया म्हणे माझा चक्रपाणी । जाय लोटांगणीं सर्व भावे ॥
प्रेम वोसंडत नामाचेनि छंदे । हृदय प्रेमानंदें वोसंडत ॥
धाउनी येउनी चरणाजवळी । वंदी पायधुळी सर्वभावे ॥
घनश्याम मूर्ति सुंदर सांवळी । ध्यान हृदयकमळीं नित्य राहो ॥

**आतां पंढरपुराबद्दल पुढील अभंग पहाः—**

ऐसें तीर्थ कुणी दाखवा सुलभ । जेथें प्रत्यक्ष भेटे परब्रह्म ॥
कोठें ऐसें क्षेत्र आहे त्रिभुवनी । सकळां शिरोमणी चंद्रभागा ॥
ऐसें तीर्थ कोणी दाखवावे एक । देखतांची सुख पावे मन ॥
ऐसें तीर्थ कोणी दाखवा साजिरें । सदा प्रेमपूरें वोसंडत ॥
ऐसे तीर्थ कोणी दाखवा सुलभ । तेथें समारंभ हरिकथेचा ॥
ऐसे तीर्थ कोणी दाखवा निर्मळ । परब्रह्म केवळ सकळां जीवां ॥
नामा म्हणे आम्हां दीनांचें माहेर । धन्य पंढरपूर गीतीं गातां ॥

**पंढरपूरचा हा अभिमान हें नामदेवाचें वैशिष्ट्य आहे.**

**आतां ढोंगी, लबाड, दुराचारी व कर्मठ लोकांविषयीं नामदेवानें ओढलेले कोरडे पहाः—**

१

पलंगीं नारी बैसवूनी । माये हाती वाहे पाणी ॥
ऐसा कलियुगीं आचार । क्रिया भ्रष्ट झाले नर ॥
स्त्रीसी पाटावाची चोळी । माता शिवती सोवळी ।
स्त्रियेचा कैवार वोढी । मातेसी म्हणे राड वेडी ॥
स्त्रीचें ऐकोनी उत्तर । सख्ख्या बंधूसी पाडी वैर ॥
म्हणे विष्णुदास नामा । ऐसा कलियुगाचा महिमा ॥

**हा विष्णुदास नामा पंढरपूरभक्त नामदेवाहून निराळा होता असें म्हणतात व रामदास आणि रामीरामदास यांचा जसा घोटाळा होतो तसाच घोटाळा नामदेव व विष्णुदास नामा यांच्या बाबतींत झाला असावा असें दिसतें.**

२

गोमुखी गोवूनि काय जपतोसी । जपतप त्यासी विघ्न करी ॥
नामसंकीर्तनें जळतील पापें । चुकतील खेपा चौऱ्याशीच्या ॥
उपवास करी उग्र अनुष्ठानीं । तया चक्रपाणी अंतरतो ॥
नामा म्हणे ऐसे बहुतेक प्राणी । पचतील खाणी भ्रष्ट लोक ॥

३

विष्णूसी भजला शिव दुरावला । अधःपात झाला तया नरा ॥
शिवपूजा करी विष्णूसी अव्हेरी । तयाचिये घरी यम नांदे ॥
विष्णुकथा ऐकी शिवासी जो निंदी । तयासी गोविंदीं ठाव नाहीं ॥
नामा म्हणे शिव विष्णु मूर्ति एक । वेदाचा विवेक आत्माराम ॥

४

देहाचें ममत्व नाहीं जों तुटलें । विषयीं विटलें मन नाहीं ॥
तंव नित्य सुख कैसेनि आतुडे । नेणती बापुडे प्रेमसुख ॥
मीच एक भक्त मीच एक मुक्त । म्हणती पतित दुराचारी ॥
नामा म्हणे तुझे कृपेवीण देवा । केवि जोडे ठेवा विश्रांतीचा ॥

**आतां नामदेवाला " कच्चे मडकें " म्हणणाऱ्यांना पुढील अभंग उत्तरादाखल आहे कीं काय ?**

गुरूच्या वचनें होईल पैं ज्ञान । न कळे प्रेमखूण विठोबाची ॥
वेदीं हे विचारा पुराणातें पुसा । विठोबाचा कैसा प्रेमभाव ॥

साधकासी सिद्धि होईल पै प्राप्ति । न कळे निरुती प्रेमखूण ॥
नामा म्हणे सोडा जाणीवेचा सीण । संतांची ते खूण जाणे संत ॥

**कदाचित् हा अभंग लिहिल्यानंतर नामदेवांनीं विसोबा खेचराचें शिष्यत्व पत्करलें असावें. नामदेव हा ज्ञानदेव चरित्रांतील एक फार महत्वाचा धागा आहे आणि मराठी वाङ्मयांत पहिल्या प्रतींत त्याचें स्थान आहे.**

**[ ४ ] नामदेवाचा विचार करतांना त्याच्या घरीं नोकर म्हणून काम करणारी जनाबाई हिचीही आठवण होते. "म्हणे नामयाची जनी" हे महाराष्ट्रांतील पहिल्या कवयित्रीतील एकीचें पालुपद आहे. या संतमंडळाच्या सहवासांत दासदासींना देखील ब्रह्मज्ञानाचा आस्वाद मिळून कवित्व करण्याची स्फूर्ति होत असे. जनाबाईच्या अभंगांत गोडी फार आहे.**

गंगा गेली सिंधूपाशी । त्याणें अव्हेरिलें तिसी ॥
तरी ते सांगावें कवणाला । ऐसें बोले गा विठ्ठला ॥
जळ कोपे जळचरा । माता अव्हेरी लेंकुरा ॥
जनी म्हणे शरण आलें । अव्हेरिता बीद गेलें ॥

**भक्तांसाठीं देव काय करतो त्याचें वर्णन पुढील अभंगांत आहे. भगवद्गीतेंतील "योगक्षेमं वहाम्यहम्" यावरील ज्ञानेश्वरींतील व्याख्यान जनाबाईने कदाचित् ज्ञानदेवांच्या मुखांतूनच ऐकलें असेल.**

ज्याचा सखा हरी । त्यावरी विश्व कृपा करी ॥
उणे पडों नेदी त्याचें । वारें सोसी आघाताचें ॥
तयाबीण क्षणभरी । कदा आपण नव्हे दुरी ॥
आंग आपुलें ओढोनी । त्याला राखे जो निर्वाणीं ॥
ऐसा अंकित भक्तासी । म्हणे नामयाची दासी ॥

**प्रत्यक्ष विठ्ठल जनाबाईचीं कामे करीत असे. त्याचा उल्लेख पुढील अभंगांत आहे.**

आतां पुरे हा संसार । कुठें फेडूं उपकार ॥
सांडूनिया थोरपण । करी दळण कांडण ॥
नारीरूप होउनी हरी । माझें न्हाणधुणें करी ॥
राना जाय वेची शेणी । शेखीं वाहे घरीं पाणी ॥
ठाव मागे पायापाशीं । म्हणे नामयाची दासी ॥

ज्ञानदेवाबद्दलचा पुढील अभंग नामदेवाच्या घरीं दळण कांडण करणाऱ्या दासीच्या मुखांतून निघालेला आहे व त्यांतील भावना अत्यंत हृदयंगम आहे.

विवेकसागर । सखा माझा ज्ञानेश्वर ॥
मरोनीया जावें । बा माझ्याच्या पोटा यावें ॥
ऐसे करी गा माझ्या भावा । सख्या माझ्या ज्ञानदेवा ॥
जाइन ओंवाळुनी । म्हणे जन्मोजन्मी जनी ॥

जनाबाईचे बरेच अभंग प्रसिद्ध आहेत व त्यांतील सुंदर कल्पना आणि माधुर्य आपणांस तल्लीन करतात.

ज्ञानदेवाच्या परिवारांत जातिभेद नव्हता. म्हणून ज्ञानदेव–मंडळ हें महाराष्ट्राच्या काय पण भरतखंडाच्या इतिहासांत अपूर्व आहे. मराठी भाषेची सेवा ज्यांनीं प्रथम केली त्यांत अठरापगड जातीचे स्त्रीपुरुष होते. या परिवारांतील नरहरी सोनार, चोखामेळा महार, सेना न्हावी, गोरा कुंभार, सावंता माळी, भागु महारीण, इत्यादि नांवें लक्षांत घेतलीं म्हणजे वरील विधानाची सत्यता पटते. गोरा कुंभार हा मोठा विनोदी होता. ज्ञानदेवमंडळांत त्याला मोठी मान्यता होती. एकदां सर्व संत गोष्टी करीत बसले असतां अशी कल्पना निघाली कीं गोरा कुंभारानें सर्वांचीं डोकीं तपासावीं. त्याप्रमाणें गोऱ्यानें आपले मडकीं करतांना उपयोग करण्याचें थापटणें घेऊन प्रत्येकाच्या डोक्यावर त्यानें प्रहार करण्याला सुरवात केली; प्रत्येकानें हंसत खेळत या प्रसादाचा स्वीकार केला. पण नामदेवाच्या डोक्यावर जेव्हां थापटणें बसलें तेव्हां तो ओरडला. त्याबरोबर "मडकें कच्चें रे कच्चें" म्हणून गोरोबा ओरडला व संतमंडळांत हंशा उडाला. नामदेवानें गुरू केला नव्हता व त्याला अद्वैत ज्ञान झालें नव्हतें या गोष्टीला अनुलक्षून ही गोष्ट आहे. पण या गोष्टी-वरून एक मजेदार घटना लक्षांत येते. या संतमंडळींत भेदाभेद नव्हता. (अद्वैत पंथाची ध्वजा हातीं घेणारांत तो नसलाच पाहिजे.) सर्व एकमेकांना सारख्या आदरानें वागवीत. गोरा कुंभाराचा पुढील अभंग अद्वैत तत्त्वज्ञानाच्या अंतर्गत आनंदानें भरून राहिलेला आहे.

मुकिया साखर चाखाया दिधली । बोलतांही बोली बोलवेना ॥
तो काय शब्द खुंटला संवाद । आपला आनंद अवधाराया ॥

आनंदी आनंद मिळोनि राहणे । अखंडित होणें न होनियां ॥
म्हणे गोरा कुंभार जीवन्मुक्त होणे । जग हें करणें शहाणें बापा ॥

**चोखामेळा हा महार होता. जनाबाईच्या पुढील अभंगांत त्याचें वर्णन आहे.**

यातिहीन चोखामेळा । त्यासी भक्तीचा कळवळा ॥
जाला त्याचा म्हणियारा । राहे घरीं करी थारा ॥
देव बाटविला त्याणें । हासे जनी गाय गाणें ॥

**जनाबाईबरोबर अखिल महाराष्ट्र हंसावयास लागून अस्पृश्यतेचा पूर्ण उच्छेद करील तो सुदीन; पण तो सुदीन जवळ आणण्याचा प्रयत्न ज्ञानदेवकाळीं झाला होता हें लक्षांत ठेविलें पाहिजे. चोखामेळयाला विठ्ठलाच्या दर्शनाची बंदी बडव्यांनीं केली त्याचा उल्लेख पुढील अभंगांत आहे.**

धांव घाली विठू आतां चालू नको मंद ।
बडवे मज मारिती ऐसा काहीं नाहीं अपराध ॥
विठोबाचा हार तुझे कंठीं कैसा आला ।
शिव्या देवोनि म्हणती महारा देव बाटविला ॥
अहो जी महाराज ! तुमचे द्वारींचा कुतरा ।
नका जी मोकलूं चक्रपाणी दुजे द्वारां ॥
जोडोनिया कर चोखा विनवितों देवा ।
बोलिलों उत्तर परि राग न धरावा ॥

**चोख्यानें देव बाटविला आणि या बाटविण्याला सर्व संत मंडळाची पूर्ण संमति होती. चोखामेळयाचे अभंग सुंदर आहेत व त्यांत उत्कृष्ट तत्त्वविचार पहावयास मिळतो. पुढील अभंग पहा:—**

१

देहीं देखिली पंढरी । आत्मा अविनाश विटेवरी ॥
तो हा पांडुरंग जाणा । शांति रुक्मिणी निजांगना ॥
आकारलें तितुकें नासे । आत्मा अविनाश विठ्ठल दिसे ॥
ऐसा विठ्ठल हृदयीं ध्यायीं । चोखा मेळा जडला पायीं ॥

२

आम्हां न कळे ज्ञान न कळे पुराण । वेदांचें वचन न कळे ॥
आगमाची आटी निगमाचा भेद । शास्त्रांचा संवाद न कळे आम्हां ॥

योग याग तप अष्टांग साधन । न कळेचि दान व्रत तप ॥
चोखा म्हणे माझा भोळा भाव देवा । गाईन केशवा नाम तुझें ॥

**विटाळ, अस्पृश्यता, म्हणून ओरडणारांना पुढील आहेर आहे:—**

पंचहि भूतांचा एकचि विटाळ । अवघाचि मेळ जगी नांदे ॥
तेथें तो सोवळा वोवळा तो कोण । विटाळाचे कारण देह मूळ ॥
आदि अंती अवघा विटाळ संचला । सोवळा तो झाला कोण न कळे ॥
चोखा म्हणे मज नवल वाटते । विटाळापरतें आहे कोण ? ॥

**चोखोबासारखा ज्ञानी महार ज्ञानदेवाच्या मित्रमंडळांत होता हें महाराष्ट्रधर्माचें वैशिष्ट्य आहे. चोखोबाचे अभंग तर उत्तम आहेतच पण त्याच्या बायकोचे देखील कांहीं अभंग आहेत. त्यांतील एक:—**

नाही उरली वासना । तुम्हां नारायणा पाहतां ॥
उरला नाही भेदाभेद । झाले शुद्ध अंतर ॥
विटाळाचे होते जाळे । तुटले बळे नामाच्या ॥
चौंदहाची तुटली दोरी । म्हणे चोखयाची म्हारी ॥

**भागु महारीण म्हणून एक कवयित्री याच काळीं होऊन गेली. तिचा ज्ञानदेवाबद्दलचा अभंग:—**

कृपेच्या सागरा । माय बापा ज्ञानेश्वरा ॥
देहेभाव हो सोडून । बा माझे धरा ध्यान ॥
जेणे पाषाण तारिले । मुखे पशु वेद बोले ॥
भिती चालविली । ऐसी कृपाळु माउली ॥
ऐसा कृपाळु भक्तांचा । माय बाप हा आमुचा ॥
विश्रांतीचा ठाव । भागु म्हणे ज्ञानदेव ॥

**हिच्या पुढील अभंगांत "अस्पृश्य" प्रश्नाचा उल्लेख आहे:—**

आलों तुझ्या दर्शनासी । भेट द्यावी बा आम्हांसी ॥
सर्व संत हो राउळीं । मी रे येकली तळमळी ॥
करुणा ऐक विठाई । मज बाळा भेटी देई ॥
देव आले हो बाहेरी । मज नेले खांद्यावरी ॥
भागु म्हणे भेट झाली । माझी चिंता ही हारली ॥

**आतां नरहरि सोनाराचे दोन अभंग पाहूं. पहिला ज्ञानदेवासंबंधीं आहे.**

संवगडे निवृत्त सोपान मुक्ताबाई । ज्ञानदेवापार्यां भाव माझा ॥
धन्य ते वैष्णव मिळाले सकळी । जीवभाव मी ओवाळी तया चरणीं ॥
अखंड ध्यानीं ध्यातो ह्रदयीं साचार । नरहरी सोनार कायामनें ॥

**दुसरा अभंग अद्वैत वृत्तीविषयीं आहे.**

शिव आणि विष्णु एकचि प्रतिमा । ऐसा ज्याचा प्रेमा सदोदीत ॥
धन्य ते संसारी नर आणि नारी । वाचे हरहरी उच्चारिती ॥
नाहीं पै तो भेद अवघाचि अभेद । द्वेषा द्वेषसंबंधा उरी नुरे ॥
सोनार नरहरि न देखें पै द्वैत । अवघा मूर्तिमंत एक रूप ॥

**स्वतःच्या धंद्याचा उल्लेख करून नरहरीनें एक सुंदर अभंग केलेला आहे.**

देवा तुझा मी सोनार । तुझे नामाचा व्यवहार ॥
देह बागेसरी जाणा । अंतरात्मा नाम सोनें ॥
त्रिगुणाची करुनि मूस । आत ओतिला ब्रह्मरस ॥
जिव शिव करुनि फुंकी । रात्रंदिवस ठोकाठोकी ॥
विवेक हातवडा घेऊन । कामक्रोध केला चूर्ण ॥
मनबुद्धीची कातरी । रामनाम सोनें चोरी ॥
ज्ञान ताजवा घेउनि हातीं । दोन्ही अक्षरें जोखिती ॥
खांद्या वाहोनि पोतडी । उतरला पैलथडी ॥
नरहरी सोनार हरीचा दास । भजन करी रात्रंदिवस ॥

**सेना न्हावी हा एक या वेळचा भगवद्भक्त ज्ञानदेव मंडळांतला होता. याचे कांहीं अभंग प्रसिद्ध आहेत. ज्ञानदेवाबद्दल त्याला अत्यंत आदर होता.**

अलंकापुरवासिनी । ज्ञानाबाई मायबहिणी ॥
लेकुराची चिंता । वागवावी कृपावंता ॥
मी तों आहे यातिहीन । माझा राखा अभिमान ॥
करुनि विनवणी । सेना लागतो चरणीं ॥

**याच्या अभंगांत मार्मिकपणा व कोठें कोठें विनोदही आढळतो.**

उदार तुम्ही संत । मायबाप कृपावंत ॥
केवढा केला उपकार । काय वानूं मी पामर ॥

जड जीवा उद्धार केला । मार्ग सुपंथ दाविला ॥
सेना म्हणे उतराई । होतां न दिसे कांही ॥

पुढील अभंगांत सेनानें आपल्या धंद्याचा उल्लेख केलेला आहे. त्यांतील वर्णनांत कदाचित् कोणाला बीभत्सता व अश्लीलता आहे असें म्हणण्याचा मोह होईल. तो मोह त्यांनीं टाकावा व अभंगांतील सुंदर अर्थ लक्षांत घ्यावा.

आम्ही बारीक बारीक । करूं हजामत बारीक ॥
विवेकदर्पण दाऊं । वैराग्यचिमटा हालवूं ॥
उदकशांति डोई घोळूं । अहंकाराची शेंडी पिळूं ॥
भावार्थाच्या बगला झाडूं । कामक्रोध नखें काढूं ॥
चौवर्णा देउनि हात । सेना राहिला निवांत ॥

५ ज्ञानदेवाचा परिवार म्हणजे तेराव्या शतकांत महाराष्ट्रांत जी नवचैतन्याची उभारणी झाली तिचे कारागीर होत. आणि त्या सर्वांच्या अग्रभागीं ज्ञानेश्वरीचा कर्ता देदीप्यमान असा प्रकाशतो. या मंडळीच्या बैठका होत, त्यांचे परस्पर संवाद होत, त्यांच्यांत वेळीं प्रसंगीं विनोद होई आणि या सर्व कथा महिपतिबावांच्या गोड ग्रंथांतून वाचावयास मिळतात. त्या वाचनांना ठिकठिकाणीं चमत्कारांचीं वर्णनें वाचून विवेकबुद्धीचा वाचक अडखळतो. त्यानें चमत्काराविषयीं शंका प्रदर्शित केली कीं भाविक मंडळींना बरें वाटत नाहीं व भाविकपणाचें स्तोम माजविणार तर शिव्यागाळीपर्यंत मजल आणतात. पण विचारी माणसांनीं त्यामुळे या कथा वाचण्याचें टाकूं नये. विवेकबुद्धीचा पूर्ण उपयोग करून, कांहीं अग्राह्य असें वाटल्यास तें सोडून देऊन सुद्धां, या कथांत जें सार उरतें त्यांत "दैवी चमत्कार" असा नसला तरी तसा पुष्कळ आहे. वयाच्या पंधराव्या सोळाव्या वर्षीं ज्ञानेश्वरी अमृतानुभवासारखे ग्रंथ लिहिणें ही काय सामान्य गोष्ट आहे ? पितामातेंनें लोकत्रासाला भिऊन पळ काढल्यावर तीन भावंडांचा सांभाळ शिरावर घेऊन निवृत्तिनाथासारख्या अल्पवयी मुलानें गैनीनाथासारख्या त्या काळीं गाजलेल्या योग्याचें प्रेम संपादून त्यापासून योगमार्ग साध्य करून घ्यावा ही काय सामान्य गोष्ट आहे ? दोन अल्पवयी बालकांनीं पैठणसारख्या विद्वानांच्या आगरांत जाऊन त्यांच्याशीं शास्त्रविषयक वादविवाद करावा व त्यांच्याकडून शुद्धिपत्र नाहीं तरी प्रशंसा मिळवावी ही गोष्ट काय सामान्य आहे ?

मुक्ताबाईसारख्या एवढ्याशा मुलीनें नामदेवाला शहाणपण शिकवावें आणि चौदाशें वर्षें वयाच्या "चांग्या"ला ब्रह्मज्ञानाचे घुटके पाजावेत हो काय सामान्य गोष्ट आहे ? इतके चमत्कार जे करूं शकतात त्यांची असामान्यता सिद्ध करण्यासाठीं रेड्याच्या मुखानें वेद बोलविण्याची आणि उभी भिंत चालविण्याची आणि मेलेला माणूस उठविण्याची आणि पाठीवर मांडे भाजण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. या कथा नसत्या तरी विचारी जे आहेत त्यांची मान आदरानें व पूज्य भावनेनें निवृत्तिज्ञानदेवापुढे वांकलीच असती.

पण ज्ञानदेवांनीं केलेला मोठा चमत्कार म्हणजे अठरापगड जातीचे लोक एका ठिकाणीं गोळा करून मराठी समाजांत त्यांनीं धृति उत्पन्न केली. त्या धृतीचें वर्णन ज्ञानेश्वरींत तेराव्या अध्यायांत मोठें मार्मिक केलेलें आहे.

तरी तत्त्वां परस्परें । उघड जातिस्वभाववैरें ॥
नव्हे पृथ्वीतें नीरें । निनाशिजे ॥ १४३
नीरातें आटी तेज । तेजा वायूसी झुंज ॥
आणि गगन तंव सहज । वायु भक्षी ॥ १४४
तेवींचि कोणेही वेळे । आपण कायिसयाही न मिळे ॥
आंत रिघोनि वेगळें । आकाश हें ॥ १४५
ऐसीं हीं पांचही भूतें । न साहती एकमेकातें ॥
कीं तियेही ऐक्यातें । देहासी येती ॥ १४६
द्वंद्वाची उखिविखी । सोडूनि वसती एकी ॥
एकएकातें पोखीं । निजगुणें गा ॥ १४७
ऐसें न मिळे तया साजणें । चाले धैर्य जेणें ॥
तया नांव म्हणे । धृति मी गा ॥

जातीचीं " पांच " भूतें एकमेकांना सहन करीत नाहींत. तेव्हां एकमेकांना " न मिळणाऱ्यांना साजणें, " एकत्र करून त्यांच्याकडून कार्य करविणें हें धृतीचें मर्म आहे. त्या धृतीला कार्यरूपांत ज्ञानदेवांनीं आणलें व महाराष्ट्रांतील भेदाभदाचे टवाळ व्यावहारिक बाबतींतसुद्धां पार नाहींसें करून टाकलें. त्यांच्या परिवारांत कुणबीमाळ्यापासून चांगदेवासारख्या सिद्ध पुरुषापर्यंत सर्वांचा समावेश होता. त्यांत मुक्ताबाई जनाबाईसारख्या स्त्रिया होत्या. त्यांत स्पृश्य होते, अस्पृश्य होते. त्यांत अवघा महाराष्ट्र

सामावला होता. महाराष्ट्रावर तेव्हां स्वराज्य होतें आणि म्हणून त्या वेळच्या वाङ्मयांत आनंद आणि प्रसन्नता यांचें साम्राज्य नांदत असलेलें दृष्टीस पडतें. ज्ञानदेवपरिवारांत बसणें, प्रत्यक्ष ज्ञानदेवांच्या मुखानें ज्ञानेश्वरी ऐकणें, नामदेवाचें कीर्तन श्रवण करणें, जनाबाईचें विठ्ठलाबरोबर होणारें संभाषण कानावर येणें, निरनिराळया जातीचीं व दर्जाची मंडळी "हें विश्वचि माझें घर। ऐशी बुद्धि जयाची स्थिर" या अत्यंत उदात्त भूमिकेवर एकत्र झालेलें पाहणें, हें भाग्य ज्ञानदेवांनीं महाराष्ट्राला लाभवून दिलें. आणि या सर्व मंडळींनीं आमच्या मायबोलीच्या वैभवाचा मोठा प्रासाद उभा केला. ज्ञानदेवांचा परिवार हा मराठी वागीश्वरीचा परिवार आहे. त्यांच्या कृपेनें, त्यांच्या ग्रंथरचनेनें आमची मराठी अमृताशीं पैज मारू लागली, नव्हे पैज मारून ती जिंकू लागली. अमृताचे मुख्य गुण दोन; त्याचें माधुर्य फार असतें आणि त्यानें मरणाची भीति रहात नाहीं. हे गुण ज्ञानेश्वरींत, अमृतानुभवांत आणि तत्कालीन सर्व वाङ्मयांत दिसून येतात.

अशा या परिवारांत ज्ञानदेवांनीं कांहीं वर्षें घालविलीं. पण अमृतानुभव लिहिल्यानंतर त्यांचें कार्य झालें आणि त्यांनीं निजधामाला जाण्याचा, समाधि घेण्याचा विचार केला. पुढील भागांत त्या विस्मयजनक विषयाकडे वळूं.

---

# भाग सातवा

## समाधि

अनुभव हा सागर गुह्य आणि ब्रह्म ।
उघडें अध्यात्म बोलियेलें ॥
प्रकट हें गुह्य उकलिलें गाबाळ ।
केलें करतळमळ ज्ञानयानें ॥
कोणाची कल्पना नुरेची बा येथें ।
उघडा गुह्यार्थ सिद्ध केला ॥
करणें न करणें सांगितला पंथ ।
तिन्ही लोकीं कीर्ति वाढविली ॥
ज्ञान हें अंजन साधी संजीवनी ।
नामा म्हणे यांनीं ख्याति केली ॥

ज्ञानेश्वरी लिहून झाल्यावर सहा वर्षांनीं म्हणजे वयाला एकवीस वर्षें पुरीं झाल्यावर दोन तीन महिन्यांनीं आळंदी मुक्कामीं ज्ञानदेवांनीं समाधि घेतली. हा समाधीचा दिवस गुरुवार कार्तिक वद्य १३ शके १२१८ हा होता याबद्दल शंका दिसत नाहीं. नामदेव, जनाबाई, विसोबा खेचर, चोखामेळा इत्यादि तत्कालीन मंडळींनीं या दिवसाचा प्रत्यक्ष उल्लेख केलेला आहे आणि पंढरपूरची कार्तिकी ( म्हणजे शुद्ध ) एकादशीची यात्रा नंतर आळंदीस वद्य ११ ला जाते आणि तेथें त्रयोदशीला ज्ञानदेवांच्या समाधितिथीचा समारंभही होतो. या वर्षी संवत्सराचें नांव दुर्मुख होतें आणि रा. पांगारकर लिहितात कीं "या दिवसाची तारीख पंचवीस आक्टोबर १२९६ ही होय." ज्ञानेश्वरीच्या रचनेनंतर ज्ञानदेवांनीं तीर्थयात्रा केली आणि त्यानंतर अमृतानुभव हा ग्रंथ लिहिला. त्यांची इतर ग्रंथरचना या दरम्यानच्या कालांतच झाली. त्यांच्या समाधिप्रकरणालाही मुख्य आधार नामदेवाच्या अभंगांचा. त्यांत लिहिलेल्या प्रत्येक विधानावर डोळे झांकून विश्वास ठेवावा ही "श्रद्धे"ची व्याख्या करणाऱ्यांच्या तोंडीं लागून फायदा नाहीं. विचारपूर्वक शंका आली तर ती प्रकट करून तिचें निरसन करून घेणें आवश्यक आहे असें भगवान् श्रीकृष्णांचें व खुद्द ज्ञानदेवांचें सांगणें आहे हा विचार देखील ज्यांच्या

जवळ नाहीं त्यांनीं आलीकडच्या विद्वानांच्या नांवानें उगाच खडे फोडण्यांत तात्पर्य नाहीं. स्रश्रद्ध म्हणजे आंधळा नव्हे आणि संशयात्मा म्हणजे ज्याच्या बुद्धीचा निर्णय झाला नाहीं, होऊं शकत नाहीं तो. ज्याच्या बुद्धीचा निर्णय निश्चित झाला तो संशयात्मा नव्हे. भगवान् श्रीकृष्ण सांगतातः—

इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।
विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ १८–६३

यांतील दुसऱ्या ओळीचा, **विमृश्य एतत् अशेषेण**, या पदाचा आंधळया श्रद्धेचा अश्लाघ्य प्रचार करणारे, जर अर्थ लक्षांत घेतील आणि **यथा इच्छसि तथा कुरु**, या श्रीकृष्णाच्या उदारपणाचें जर ते अनुकरण करतील तर आधुनिक तार्किक विद्वानांना शिव्याशाप देण्यांत त्यांच्या 'पुण्याई'ची जी हानि होत आहे ती होणार नाहीं. वरील ओळ ज्ञानदेव पुढीलप्रमाणें 'नीट मराठीं'त देतातः—

तेंसे सर्वज्ञेंही मियां । सर्वही निर्धारूनियां ।
निकें होय ते धनंजया । सांगितलें तुज ॥ १८–१३३१
आतां तूं ययावरी । निकें हें निर्धारीं ।
निर्धारूनि करीं । आवडे तैंसे ॥ १८–१३३२

श्रीकृष्ण विवेकवादी असल्यामुळें, आंधळी श्रद्धा हा लफंग्या लोकांनीं मूर्ख लोकांच्या गळीं उतरवलेला गुण आहे हें त्यांना पूर्ण मान्य असल्यामुळें, "निर्धारोनी करीं । आवडे तैसें" असा स्पष्ट आदेश ते देतात. तेव्हां नामदेवाच्या अभंगात तर्कशुद्धतेचा अभाव दिसला, अविश्वसनीयता दिसली कीं तें करंटेपण आहे म्हणून ओरडा करणाऱ्यांना या बाबतींत श्रीकृष्ण आणि ज्ञानदेव यांचेही अभिप्राय माहीत नाहींत हें उघड आहे. आधारभूत साधनांचा उपयोग डोळे उघडे ठेवून करावा लागतो; आणि तसा तो करणे हेंच सरळपणाचें ( नुसतें शहाणपणाचेंच नव्हे ) लक्षण आहे ही गोष्ट स्वतःला श्रद्धावान् म्हणून मिरविणाऱ्यांनीं दृष्टीआड करून चालणार नाहीं.

सध्यांच्या कायद्याप्रमाणें मनुष्याच्या वयाला एकवीस वर्षें पुरीं झालीं म्हणजे तो वयांत येतो, जबाबदारी घेण्याला लायख ठरतो. ज्ञानदेवांनीं वयाला एकवीस वर्षें पुरीं होण्यापूर्वीं दोन उत्तमोत्तम ग्रंथ लिहिले आणि तीं पुरीं झाल्यावर त्यांनीं समाधि घेण्याचें ठरविलें. ज्ञानेश्वरीची प्रसिद्धी होऊन तिला

असंख्य भक्तजन मिळाले आणि तिची रचना करणाऱ्याबद्दल महाराष्ट्रांत अत्यंत आदरबुद्धि निर्माण झाली. त्यानंतर सहा वर्षें तीर्थयात्रेसाठीं म्हणा किंवा अन्य कारणाकरितां म्हणा ज्ञानदेव जेथें जेथें वावरले तेथें तेथें त्यांचा महापुरुष म्हणून सन्मान झाला. नामदेवासारखा गाजलेला भगवद्भक्त, चांगदेवासारखा प्रख्यात योगी, विसोबा चाटी (खेचर) सारखे कर्मठ ब्राह्मण आणि स्पृश्यास्पृश्य जातींतील अनेक कर्ते पुरुष हे त्यांच्या प्रभावळींत दाखल झाले आणि अगदीं अल्पावधींत ज्ञानदेव हो एक महाराष्ट्रांतील प्रचंड संस्था, अनुपमेय शक्ति झाली. त्यांच्यासंबंधीं किंवा त्यांच्या वेळच्या संतमंडळीसंबंधीं वर्णन करणाऱ्या जुन्या मराठींतील ग्रंथांत चमत्कारांच्या हकीकती देण्यावर फार भर आहे; आणि या चमत्कारांचे उल्लेख तत्कालीन लोकांनीं केलेले आहेत. 'रेड्यामुखीं वेद बोलविला'' या चमत्काराचा उल्लेख नामदेवानें व पुढें अडीचशें वर्षांनीं एकनाथानें केलेला आहे. या चमत्कारांच्या गर्दींत या भावंडांचे स्वभावविशेष प्रत्यक्ष वर्णन करण्याचा भाग अधिक पुढें येणें कठीण झालें. तथापि निरनिराळ्या कथा व वर्णनें यावरून त्यासंबंधीं अप्रत्यक्ष अनुमान बांधतां येतें. शिवाय ग्रंथावरून ग्रंथकाराला ओळखणें ही गोष्ट जरी एकंदरींत चिंतनीय असली तरी तिच्या साहाय्यानें ग्रंथकाराच्या कांहीं स्वभावविशेषांचा सामान्यपणें कयास बांधतां येणार नाहीं असें नाहीं. एक गोष्ट अगदीं निर्विवाद आहे कीं या चार भावंडांचें एकमेकांवर पराकाष्ठेचें प्रेम होतें आणि तिघेही भाऊ आपल्या धाकट्या बहिणीला—मुक्ताबाईला—जिवाभावापलीकडे जपत. मुक्ताबाईचें वय ज्ञानदेवांनीं समाधि घेतली तेव्हां अवघें १७ वर्षांचें होतें आणि त्यापुढच्या वर्षांत ती आपल्या दोन भावंडांप्रमाणेंच इहलोकांतून नाहींशी झाली. तिला या भावांनीं अगदीं लहान वयापासून वाढविली, हातावांद्यावर खेळविली, आईबापांच्या जागीं ते झाले. या थोर भावंडांची बहीण म्हणून तत्कालीन सर्व संतही तिचें फार कौतुक करीत. मुलेंबाळें ही कुटुंबाची, संसाराची शोभा आहे. त्यांतल्या त्यांत मुली म्हणजे संसाराचा शृंगार आहे. आणि शिवाय मुक्ताबाई सामान्य मुलगी नव्हती. नामदेवाबरोबर सगुणनिर्गुणभक्तीबद्दल आणि चांगदेवाबरोबर ज्ञानविरहित योगाबद्दल वादविवाद करण्याइतकी तिला या गहन विषयांची ओळख होती. चारी भावंडें सारख्याच संकटांना भोगून वर आलेलीं होतीं. लोकछळाच्या दिव्यांतून ते बाहेर पडलेले होते. त्यामुळें जरी त्यांचें वय लहान होतें तरी

त्यांना जगाचा, संसाराचा अनुभव फार आलेला होता. लोकछलानें त्रस्त होऊन आपल्या आईबापांनीं प्रयाग क्षेत्राला प्रयाण केलें व तेथें आपला देह त्रिवेणीच्या उदकांत अर्पण केला हें दुःख त्यांनीं भोगलें होतें. दुसरी गोष्ट, सज्जनांनीं त्यांच्याकडे यावें, त्यांच्याभोंवतीं जमावें, त्यांच्या निशाणाखालीं कार्य करावें असा लोकांना आकृष्ट करण्याचा, ज्याला पुढारीपणाचा गुण म्हणतात तो निवृत्तीच्या किंवा ज्ञानदेवाच्या किंवा दोघांच्याही ठिकाणीं होता. बाळपणांत लोकछलाचा अनुभव घेतल्यानंतर पुढें आपल्या बुद्धीच्या, विद्येच्या, सद्वर्तनाच्या, प्रभावानें या भावंडांनीं आणि ज्ञानदेवानें आपल्या अद्भुत ग्रंथरचनासामर्थ्यानें जगाला आश्चर्यचकित करून सोडल्यावर मग सापेक्षतेनें त्यांना चांगले दिवस आले. त्यांचीं लोकांत मान्यता वाढली. त्यांच्या चरणांवर सहस्रावधि लोकांचीं मस्तकें नम्र होऊं लागलीं. मराठीच्या नगरींत ज्ञानदेवानें ब्रह्मविद्येचा सुकाळ करून मराठी भाषेला संस्कृताच्या बरोबरीनें सिंहासनाधिष्ठित केलें. आणि हा सर्व पराक्रम वयाची विशी ओलांडण्याच्या पूर्वीं केला आणि मग केवळ लोकांचे नमस्कार घेण्यासाठीं संसारांत राहण्यापेक्षां आपलें कर्तव्य झालें, लोकांचें "ऋण" फेडलें, हें समजून त्यांनीं समाधि घेण्याचा निश्चय केला.

२ नामदेवानें वर्णन केल्याप्रमाणें एक दिवस ज्ञानदेवानें पंढरपुरांत पांडुरंगाला प्रार्थना केली:—

मंगळमूर्ति सुखधामा । भक्तांचिया कल्पद्रुमा ।
निवृत्तीचिया पुरुषोत्तमा । नमो तुज ॥
विद्यासागरा वैरागरा । संकटीं माउली ज्ञानेश्वरा ।
भरित दाटलें अंबरा । तो तूं योगेश्वरा मोक्षदायी ॥
मति चालविली रसाळ । संतश्रोतियां केला सुकाळ ।
दिधलें पुरुषार्थाचें बळ । तें तूं केवळ संजीवन ॥
अमृतानुभव आनंदलहरी । ग्रंथ सिद्ध केला ज्ञानेश्वरी ।
संस्कृत, प्राकृत वैखरी । वदविली माझी ॥
आतां मोक्षाचिया वाटा । पाहिला षट्चक्र चोहटा ।
आज्ञा द्यावी वैकुंठा । ज्ञानदेव म्हणे ॥

योगमार्गानें मोक्षाच्या वाटेवरच्या चव्हाट्यावर जाण्याची म्हणजे समाधि घेण्याची इच्छा याप्रमाणें ज्ञानदेवांनीं केली; व ही समाधि आळंदींत–

अलकापुरांत–घेण्याचा आपला मानस त्यांनीं प्रकट केला. त्यांनीं आत्मविद्येची जो चर्चा केली त्यानें सज्जन श्रोते सुख पावले; जन्माला येऊन कार्य करावयाचें तें केलें; त्या कार्याबद्दल मानपत्रें मिळवावीत, जयजयकार करून घ्यावा ही इच्छा वा अपेक्षा ज्ञानदेवासारख्या थोर ज्ञानी पुरुषाला नव्हती. ज्या उल्हासानें व्रतबंधाच्या वेळीं आठनऊ वर्षांचा मुलगा शृंगारलेल्या घोड्यावर बसून भिक्षावळीसाठीं देवालयाकडे जाण्यासाठीं बाहेर पडतो व समोर चाललेल्या दारूकामांत तल्लीन होतो आणि हा समारंभ आपला म्हणून आनंद मानतो त्याच (पोरकट) उल्हासानें वयाची साठो उलटतांच शष्ट्यब्दिपूर्तीचे समारंभांत गर्क होणारे लोक शहाणे म्हणविणाऱ्यांत इतके सापडतात कीं कार्य संपल्या-बरोबर संसारांतून निवृत्त होऊन समाधिसुखांत दंग होण्याची ही ज्ञानदेवांची वृत्ति आश्चर्य उत्पन्न करते; आणि त्या वृत्तीतर्ले अमानित्व लक्षांत घेऊन आपण कौतुकानें, आदरानें ज्ञानदेवाकडे पाहूं लागतो. शके १२१८ च्या कार्तिक शुद्ध एकादशीला हा समाधीचा निश्चय ज्ञानदेवांनीं पंढरीला पांडुरंगासमोर केला असें दिसतें.

ज्ञानदेव समाधि घेणार ही गोष्ट त्याच वेळीं पंढरपुरांत महायात्रेसाठीं जमलेल्या सर्वांना विदित झाली आणि ज्ञानदेवाचें शेवटचें दर्शन घेण्यासाठीं पंढरपुरची यात्रा आळंदीकडे वळली. त्याचें वर्णन नामदेवानें केलें आहे:—

> पंढरीचा पोहा आला अलंकापुरी । पंच कोसावरी साधुजन ॥
> पांडुरंगासगे वैष्णवाचे भार । दिंड्या ते बाहेर निघाल्यासे ॥
> पताकाचे भार निघाले बाहेर । भेटती ऋषीश्वर पांडुरंगा ॥
> अवघिया भेटी झाल्या त्या बाहेरी । मग अलंकापुरी येते झाले ॥
> सोपानानें मग केला नमस्कार । उतरिले पार पांडुरंग ॥

या मंडळींना सामोरा सोपानदेव आला होता व प्रत्यक्ष पांडुरंग सहकुटुंब या समाधीच्या समारंभासाठीं वारकऱ्यांच्या बरोबर आळंदीला आले व तेथील इंद्रायणी नदी उतरून (सध्यां पुण्याकडून मंडळी जातात त्याप्रमाणें) आळंदी गांवांत गेले. अश्रद्धावंतांनीं व विवेचकांनींसुद्धां रुक्मिणीपांडुरंग हे आळंदीला प्रत्यक्ष आले होते ही गोष्ट मान्य करूनच हे नामदेवाचे अभंग वाचण्यांत मोठा आनंद आहे. नुसते पांडुरंगच आळंदीला आले होते असें नाहीं:—

हरिहर विधाता आले अलंकापुरीं । इंद्रायणीतीरीं एकथाटी ॥
योगियाचा सखा कोठें ज्ञानेश्वर । जाती ऋषीश्वर भेटावया ॥
शून्याचिया पोटीं निरंजन गुंफा । ज्ञानयज्ञ सोपा सिद्ध केला ॥
उन्मनी निद्रा लागलीसे फार । स्वरूपीं ज्ञानेश्वर जागा झाला ॥
नामा म्हणे देवा भली केली बुद्धी । लागली समाधि ज्ञानदेवा ॥

ही सर्व मंडळी गेली त्या वेळीं (बहुधा आपल्या नित्यक्रमाप्रमाणें) ज्ञानदेव समाधिसुखांत दंग होते. त्या (नित्याच्या) समाधीचें वर्णन नामदेव करतातः—

लागली उन्मनी वैराग्याची धुणी । जागा निरंजनी निरंतर ॥
भूचरी खेचरी चाचरीच्या छंदें । अगोचरींच्या नादें सहस्रदळीं ।
औट हात ध्वनि चित्तवृत्ति जेथें । उजळली ज्योत तन्मयाची ॥
नामा म्हणे देवा करा सावधान । नाहीं देहभान ज्ञानदेवा ॥

पहिल्या तीन चरणांतील वर्णन योगशास्त्राच्या पारिभाषिक शब्दांत आहे.

त्या समाधींतून ज्ञानदेव यथाक्रम बाहेर आले व त्यांनीं विठ्ठलाजवळ कायमची समाधि पाहिजे म्हणून प्रार्थना केली. तुझा हट्ट पुरवीन असें वचनही विठ्ठलानें दिलें.

उदित झालें मन आता काय अनु (न) मान ।
करी शीघ्र प्रस्थान आज्ञा माझी ॥
देवाचा हो कर धरोनी ज्ञानेश्वर । निघाला बाहेर योगीराज ॥
मागें पुढें संत चालिले मिरवीत । कौतुक पहात इहलोकीं ॥
नारा विठा गोंदा महादा विरक्त । परसा भागवत उभे तेथें ॥
समुदाय वैष्णव मिळालासे भारी । महोत्सव गजरीं आरंभिला ॥
नामा म्हणे गुण दाविले श्रीहरी । धन्य अलंकापुरी पुण्यभूमि ॥

अशा प्रकारें ज्ञानदेवाचा समाधि—सोहळा पहाण्यासाठीं प्रत्यक्ष विठ्ठल येऊन ज्ञानदेवांच्या पुण्याईनेंच त्याचें सर्वांना दर्शन झालें. "ज्ञानदेवायोगें सकळांसी दर्शन । परब्रह्म निधान डुल्लतसें" असें या प्रसंगाचें वर्णन नामदेव करतो. आळंदी ही पुण्यभूमि असून समाधीला फार योग्य स्थान आहे असेंही विठ्ठलानें सांगितलें. आणि मग समाधीची तयारी सुरू झाली. सर्व साहित्य आणलें. "तुळशी आणि बेल दर्भ आणि फुलें । उदक हें चांगलें भागीरथीचें ॥" या सर्व वस्तु आणल्या. नंतर साडेतीन पावलें निश्चळपणें पुढें टाकल्यावर

**"देव म्हणे आता होई सावधान । माग वरदान मज कांहीं ॥" तेव्हां कार्तिक शुद्ध एकादशी जशी पंढरीची तशी कार्तिक वद्य एकादशी आळंदीची व्हावी म्हणून ज्ञानदेवानें मागितलें आणि विठ्ठलानेंही मोठ्या आवडीनें हें वरदान दिलें व "जेथें ज्ञानदेव तेथें मी निशिदिनीं" असें सर्वांना सांगितलें. आतां ज्ञानदेव आपल्यांतून जाणार म्हणून सर्व लोक तर दुःखित झालेंच पण प्रत्यक्ष पांडुरंगही गहिंवरला आणि म्हणाला:—**

कोण जाणे माझे जीवींचा कळवळा । प्रेमाश्रु डोळां लोटताती
अवघियांचें मन दुःखित तटस्थ । लहान थोर संत वोसंडती ॥
तारियेले जड या माझ्या कीर्तनीं । आठवती मनीं गुण तुझे ॥
नामा म्हणे येथें बोलवेना मज । जातसे निजगुज आवडीचें ॥

**आणि मग नामदेवांनीं ज्ञानदेवाचें विठ्ठलाजवळ वर्णन केलें; त्यांतील एक अभंग या भागाच्या सुरवातीस दिलेला आहे. मोठमोठे चमत्कार करून दाखविले आणि पतितांना तारून ज्ञानदेवानें आपली भक्ति ख्यात केली असें सांगून नामदेव वर्णन करतात:—**

अहंकार पोटीचे उतरीलें जहर । केला उपकार जगामाजीं ॥
काम क्रोध उतें उतरिले दंभ । करपले कोंभ संशयांचे ॥
विकल्पाचे पायीं घातियेली बेडी । केली ताडातोडी इंद्रियांची ॥
स्वर्गादिक सुखें कमाविलीं रोकडीं । वैकुंठासी शिडी लावियेली ॥
नामा म्हणे धन्य उभारिल्या ध्वजा । घातियेल्या शेजा सुखधामीं ॥

**आणि अशी ही थोर विभूति चालली म्हणून सर्वत्र तळमळ सुरू झाली.**

कासावीस प्राण मन तळमळी । जैसी कां मासोळी जीवनावीण ॥
दाही दिशा ओस वाटती उदास । करिताती सोस मनामाजीं ॥
घातियेली घोण प्राण आला कंठीं । ज्ञानदेवासाठीं तळमळी ॥
नामा म्हणे देवा वाटतसे खंती । चालली विभूति योगियाची ॥

**नामदेवांचे हे अभंग करुण रसानें तुडुंब भरलेले आहेत. पुढचा अभंग:—**

नानापरी मन आवरीतों भारी । कांहीं केल्या हरि विसर न पडे ॥
दृश्या अदृश्याच्या दूर केल्या गोष्टी । उघडिली दृष्टी ज्ञानदेवें ॥
गीतेवरी टीका ग्रंथ केला सार । केवळ ईश्वर ज्ञानाचा हा ॥
नामा म्हणे आतां देहासी विटला । स्वरूपीं पालटला ज्ञानदेव ॥

**शेवटची ओळ सश्रद्ध व विवेचक दोघांनींही ध्यानांत घ्यावी. असो; दशमीच्या दिवशीं बाहेर पडून एकादशीच्या दिवशीं हरिजागर करावा आणि द्वादशीला पारणें सोडून त्रयोदशीला समाधि घ्यावी असें ठरलें. आणि मग ज्ञानदेवानें पांडुरंगाकडे आपलीं भावंडें निरविलीं. त्या प्रसंगाचें हृदयद्रावक वर्णन नामदेवानें केलें आहे:—**

निवृत्ति सोपान मुक्ताई धाकुटी । धरियेली कंठीं पांडुरंगें ॥
कळवळलीं मनीं करिती दीर्घ ध्वनि । आठविती मनीं ज्ञानदेव ॥
विकळ झाले चित्त संदेह दुश्चित । नामा विकळ तेथ होत असे ॥

**आणि प्रत्यक्ष पांडुरंगानें या तीन भावंडांचें समाधान करण्याचा प्रयत्न केला. ज्ञानदेवानें " पापी उद्धरीले । पतित तारिले । जड पाठविले । मोक्षपंथीं॥" इतकेंच नव्हे तर याहून विशेष गोष्टी केल्या.**

निसंगासी संग नलगे आणिकांचा । परमार्थ हा साचा गहन केला ॥
जड या जीवांचे हरविलें अज्ञान । नेले उतरून भवसिंधु ॥
ज्ञानियासी केली सिंधुसंजीवनी । झाले जनींवनीं एक तारू ॥
नामा म्हणे सत्य बा माझ्याचे बोलणे । करी लिंबलोण पदीं त्याचें ॥

**परंतु तीं सर्व माणसें होतीं, ज्ञानी होतीं तरी माणसेंच होतीं. ज्ञानदेवाच्या वियोगाची कल्पना त्यांना असह्य झाली. ज्ञानदेवाचे गुण, त्यानें केलेले चमत्कार या सर्वांची आठवण त्यांना झाली आणि तीं भावंडें स्फुंदूं लागलीं. विठ्ठलानें त्यांचे परोपरीनें समाधान केलें. खुद्द ज्ञानदेवानें काय ज्ञान प्रकट केलें, " स्वयें नंदादीप उजळिला, " त्याची आठवण त्यानें करून दिली आणि समाधीच्या आड येऊं नका असें त्यांना विनविलें; आणि पुढच्या कार्यक्रमाला सुरवात झाली**

आणिक वाद्यें तेथे वाजताती अपार । उठावले भार वैष्णवाचे ॥
चिद्रत्न मंडप दिधला कल्लोळ । जैसे दीपमाळ दीप ठेले ॥
नक्षत्र गोंधळ उसळती भारी । चक्रें त्याजवरी उल्लाळती ॥
मोतिये तोरणें लाविलीं अपार । झळकती तारे विभु ऐसे ॥
नामा म्हणे देवा नवल केले गहन । पुंजाळिलें गगन ज्ञानदेवें ॥ १ ॥
निवृत्तिज्ञानदेव उभे दोहीकडे । सोपान ते पुढें मुक्ताबाई ॥
देहुडे सुरगण थक्क पडिलें लोकां । सुरू केला डंका वैकुंठीचा ॥
चक्रतीर्थीं उभे देव साधुजन । करविलें स्नान ज्ञानदेवा ॥

देवाचें हें तीर्थ घेतलें ज्ञानेश्वरें । केला नमस्कार पादपद्मीं ॥
विठ्ठल रुक्मिणी ऋषि सुरवर । पूजा ज्ञानेश्वर करीतसे ॥
नामयाच्या हातीं गंध अक्षता । पूजा महंता मान्य झाली ॥ २ ॥
टाळ विणे मृदंग वाजती अपार । नारद तुंबर गीत गाती ॥
शुक वामदेव अंबऋषि सादर । मध्यें ज्ञानेश्वर ब्रह्मरूप ॥
पिपीलिकेसी मार्ग जावया न मिळे । जाती भार मेळे वैष्णवांचे ॥
नामा म्हणे देवा दाविली नवाळी । पुरविली आळी ज्ञानोबाची ॥ ३ ॥
दशमीचे दिवशीं केली प्रदक्षिणा । आणिक कीर्तना संत उभे ॥
रात्रंदिवस त्यांही केला हरिजागर । हरिदिनी थोर कृष्णपक्षीं ॥
मग केलें स्नान भागीरथीचे तीरीं । संतमहंता भारी पूजियेले ॥
अवलोकिलें डोळां आंतर बाहेरी । मग सिद्धेश्वरी येते झाले ॥
सिद्धेश्वरालागीं पूजीलें निवळ । मागीतलें स्थळ समाधीसी ॥
गंगा आणि गिरिजा नीळकंठ ईश्वर । केला नमस्कार नामा म्हणे ॥ ४ ॥

**सिद्धेश्वराजवळ समाधि घेण्याचें निश्चित झाले होतें तेथें मंडळी येऊन पोहोंचली. समाधीची जागा झाडून साफसूफ करून घेतली. द्वादशीला पारण्याचा मोठा समारंभ झाला.**

गंगा गिरजा राही रुक्माबाई भामा । उठिल्या राधण्या पारण्याच्या ॥

**सगळ्या पंक्ति पिंपळाच्या पानावर बसविल्या. "पात्रें ते श्रीपति वाढूं लागे," नुसतें वाढूं लागले नाहींत तर**

सोंवळयानें हरि वाढितो सकळां । मनींचा कळवळा कोण जाणे ॥
रुक्माईचे कानीं सांगितली गोष्ट । विस्तारावे ताट ज्ञानदेवा ॥
राई रुक्माबाई वाढिती आवडीनें । मोडितो पारणें ज्ञानदेव ॥
नामा म्हणे देवा परब्रह्म अन्न । जातो बोलावणें ज्ञानदेवा ॥ १ ॥
निवृत्ति मुक्ताईचें करिनी समाधान । घेतला सोपान मध्यभागीं ॥
ऐक्य आह्निक्याची बैसली एकवटे । विस्तारिली ताटें रुक्माईनें ॥
एक एकालागीं देतानी प्रसाद । आतां ज्ञानराज पाहूं डोळां ॥
नामा म्हणे स्वस्थ जेवितां पंगतीं । घृतपात्र हातीं विस्तारीतु ॥ २ ॥

**ऐक्याप्रत पावलेला ज्ञानदेव आणि आह्निक्यांत—इहलोकांत असलेले इतर यांची एक पंक्ति झाली. मग ज्ञानदेवाला चंदनाची उटी लावून अक्षता लावल्या व**

पुष्पमाळा त्याच्या गळयांत घातल्या. दोन प्रहरीं भोजन आटोपल्यावर तिसऱ्या प्रहरीं कीर्तनाला सुरवात झाली. आणि मग प्रत्येक जण समाधीपूर्वी ज्ञानदेवाच्या भेटीस निघाला. समाधीच्या जागेची ज्ञानदेवांनीं पूजा केली. ते त्या प्रसंगीं पूर्ण आनंदांत निमग्न होते. देहभावाचा पूर्ण निरास होऊन समाधिसुखाची वाट ते पहात होते. भावंडांचे हात ज्ञानदेवानें विठ्ठलाच्या हातीं दिले तेव्हां ती ईश्वरमूर्ति गहिंवरली, कासावीस झाली. मग ज्ञानदेवांनीं सर्वांना नमस्कार केला. शेवटचा नमस्कार निवृत्तिनाथाला केला त्याचें वर्णन नामदेव करतातः—

पुढे ज्ञानेश्वर जोडोनिया कर । बोलतो उत्तर स्वामिसंगें ।
पाळिलें पोसिलें चालविला लळा । बा माझ्या कृपाळा निवृत्तिराजा ॥
स्वामीचीया योगें झालों स्वरूपाकार । उतरलो पार मायानदी ॥
निवृत्तीने हात उतरिला वदना । त्यागिलें निधाना आम्हांलागीं ॥
नामा म्हणे देवा देखवेना मज । ब्रम्हीं ज्ञानराज मिळविला ॥

आपल्या लाडक्या भावाचा, आपल्या दिगंतकीर्ति बंधुरत्नाचा शेवटचा निरोप घेतांना त्याचा गुणगौरव निवृत्तीनें फार मार्मिक शब्दांत करून ज्ञानदेवाच्या पराक्रमाचें रहस्यच प्रकट केलें.

वोसंडोनी निवृत्ति आलिंगों लागला । आणिकांच्या डोळां अश्रू येती ॥
अमर्यादा कधीं केली नाहीं येणें । शिष्यगुरुपण सिद्धी नेलें ॥
गीतार्थाचा अवघा घेतला सोहळा । गुह्यगौप्यमाळा लेवविल्या ॥
फेडिलीं डोळयांचीं अत्यंत पारणीं । आतां ऐसे कोणी सखे नाहीं ॥
काढोनीया गुह्य देव केले फोल । आठविती बोल मनामाजीं ॥
नामा म्हणे संत कासावीस सारे । लाविती पदर डोळयांसी ॥

तो प्रसंगच मोठा हृदयद्रावक होता. ज्ञानदेवानें सोपानाचें समाधान करण्यास पुनः पांडुरंगास सांगितलें. त्यानंतर तीन्ही भावंडांनीं आपण आतां फार दिवस जगणार नाहीं हें स्पष्टपणें सांगितलें. आपण चारी भावंडें एकरूप आहोंत म्हणून निवृत्तीनें सांगितलें. आणि आतां आपली ताटातूट होणार या कल्पनेनें तो कैवल्यदानी ज्ञानी पण कासाविस झाला. तो निवृत्तिनाथ होता पण त्याचें मनुष्यपण त्या वेळीं त्याला आवरलें नाहीं.

निवृत्तिदेव म्हणे करितां समाधान । कांहीं केल्या मन रहात नाहीं ॥
बांधल्या तळयाचा फुटलासे पाट । ओघ बारा वाट मुरडताती ॥

बांधल्या पेंढीचा सुटलासे आळा । तृण रानोमाळा पांगलेसें ॥
हरिणीवीण खोपी पडियेली वोस । दशदिशा पाडस भ्रमताती ॥
मायबापे आम्हां त्यागियेले जेव्हां । ऐसे संकट तेव्हां झालें नाही ॥
नामा म्हणे देवा पेटला हुताशन । करा समाधान निवृत्तीचें ॥

**निवृत्तीची ती स्थिति विस्मयजनक होती पण मानुषतासुलभ होती. सर्वांनीं त्याचें समाधान केलें.**

ज्ञानीयांनीं ऐसी करावी जंव खंती । अज्ञानाचा किती पाड आला ॥

**म्हणून त्याला सांगितलें. मग ज्ञानदेव समाधीला बसले. राईरुक्माबाईनीं ज्ञानदेवांना ओंवाळिलें. त्या काळची मोठमोठी मंडळी तेथें आदरानें उभी राहिली. ज्ञानदेवानें समाधिस्थानाला प्रदक्षिणा घातली. आंत जाण्याला पायऱ्या केल्या होत्या; बाहेरच्या पहिल्या पायरीवर पांडुरंग उभा होता. पांडुरंग आणि परात्पर गुरु निवृत्तिनाथ यांनीं ज्ञानदेवाचे हात धरले.**

देव निवृत्ति यांनी धरिले दोन्ही कर । जातो ज्ञानेश्वर बैसावया ॥
नदीचिया माशा घातले माजवण । तैसे जनवन कालवले ॥
दाही दिशा धुंद उदयास्तावीण । तैसेची गगन कालवले ॥
जाउनी ज्ञानेश्वर बैसले आसनावरी । पुढे ज्ञानेश्वरी ठेवियेली ॥
ज्ञानदेव म्हणे सुखी केलें देवा । पादपद्मीं ठेवा निरंतर ॥
तीन वेळ तेव्हां जोडिले करकमळ । झांकियेले डोळे ज्ञानदेवें ॥
भीममुद्रा डोळां निरंजन मैदान । झाले ब्रह्मपूर्ण ज्ञानदेव ॥
नामा म्हणे आतां लोपला दिनकर । बाप ज्ञानेश्वर समाधिस्थ ॥

**" लोपला दिनकर " या शब्दप्रयोगावरून ज्ञानदेवांनीं योगमार्गानें देहत्याग केला हाच अर्थ स्पष्ट सूचित होतो. नंतर निवृत्तिनाथ व गोपाळ–विठ्ठल बाहेर आले व समाधीवर शिळा बसविली. बाहेर आल्यावर सर्वांचा शोक अनावर झाला. ' सोपान मुक्ताई सांडिती शरीरा । म्हणती धरा धरा निवृत्तीसी " असा प्रकार झाला. सगळ्यांनी दुःखित अंतःकरणानें ज्ञानदेवांच्या समाधीला फुलें वाहिलीं. सगळ्यांनीं मिळून ज्ञानदेवांच्या नांवानें जयजयकार केला; आणि याप्रमाणें ज्ञानदेवांच्या ऐहिक यात्रेचा शेवट झाला. सर्व मंडळी पुढच्या म्हणजे मार्गशीर्ष शुद्ध एकादशीपर्यंत समाधीजवळच राहिली आणि भजन कीर्तन हीं सारखीं चालू होतीं. मग द्वादशीला पारणें होऊन सर्व मंडळी**

पांडुरंगासहित त्रयोदशीला म्हणजे ज्ञानदेवानें समाधी घेतल्यानंतर पंधरवड्यानें परत जावयास निघाली. ज्या प्रकारें नामदेवानें या प्रसंगाचें साद्यंत वर्णन केलें आहे त्यावरून ज्ञानदेवांनीं समाधि लावून देहत्याग केला ही गोष्ट स्पष्ट होतें आणि या प्रसंगीं शोककल्लोळ उडाला, निवृत्तिनाथासारख्या ज्ञानी पुरुषाचेंही देहभान नाहींसें झालें त्यावरून पुनः परत न येणार म्हणून ज्ञानदेवांनीं सर्वांचा शेवटचा निरोप घेतला याबद्दल शंका रहात नाहीं. देहाला आल्याचें कार्य झाल्याबरोबर ज्ञानदेवांनीं देहत्याग केला. ज्या आश्चर्यकारक तत्त्वज्ञानाचा उपदेश त्यांनीं आपल्या ग्रंथांतून केला त्याला अगदीं अनुरूप अशा "देहातीत"पणें त्यांनीं समाधि घेतली. अमृतानुभवाच्या नवव्या प्रकरणांतील "जीवन्मुक्त" पुरुषाच्या स्थितीचा त्यांनीं सर्वांस अनुभव आणून दिला.

३ ज्ञानदेवांच्या समाधीनंतर एक वर्षाच्या आंत बाकीचीं तीन्हींही भावंडें निजधामाला गेलीं. चौदाशें वर्षें योगबळानें जीवमान असलेल्या चांगदेवांनींही याच वर्षीं आपल्या देहाचें विसर्जन केलें. नामदेवाच्या अभंगांत म्हटलें आहे:—

> प्रथम ज्ञानेश्वरें काढियेली वाट । धरियेले वैकुंठ अलंकापुरीं ॥
> इंद्रनीळ पर्वत नेमिला सोपाना । निवृत्तीसी जाणा त्रिंबकेश्वर ॥
> चौथी मुक्ताबाई नेमियेली तापी । नामा म्हणे ख्याती केली त्यांनीं ॥

प्रथम ज्ञानदेवानें वाट काढली आणि अलंकापुरांत म्हणजे आळंदींत वैकुंठ गांठलें. याही उल्लेखावरून ज्ञानदेवांनीं योगसाधन करून देहत्याग केला हेंच स्पष्ट होतें. सोपानदेवाच्या समाधीसाठीं इंद्रनीळ पर्वत नेमिला होता; निवृत्तिनाथाचें निर्याण त्र्यंबकेश्वरीं व्हावयाचें होते आणि मुक्ताबाईची देहावसानाची जागा तापी नदीच्या कांठीं ठरली होती असा वरील ओळींचा अर्थ आहे. पुण्याजवळ पुरंदर किल्ला आहे तोच इंद्रनीळ पर्वत; त्याच्या शेजारीं सासवड नांवाचा गांव आहे. गांवाजवळ कऱ्हा नांवाची लहानशी नदी आहे. तेथें मार्गशीर्ष वद्य त्रयोदशीला म्हणजे ज्ञानदेवांच्या समाधीनंतर बरोबर एक महिन्यानें आणि आळंदी सोडल्यावर बरोबर पंधरवड्यानें सोपानदेवांचा मृत्यु झाला. सासवडलाही पुष्कळ संतमंडळी जमली होती. याही प्रसंगावर नामदेवाचे म्हणून अभंग आहेत व त्यांत सोपानदेवानें समाधि घेतली असें म्हटलें आहे.

> सोपानदेवें ग्रंथ केला होता सार । ठेविला समोर निवृत्तीच्या ॥

असा एका अभंगांत उल्लेख आहे. सोपानदेवाच्या मृत्यूमुळें निवृत्तिनाथ आणि मुक्ताबाई हे अगदीं उदास होऊन गेले व चांगदेवालाही जगण्याचा कंटाळा आला. ज्ञानदेव गेले, सोपानदेव गेले आतां मुक्ताबाई आणि निवृत्तिनाथ जाणार हा विचार चांगदेवाला असह्य झाला. मुक्ताबाई ही वयानें लहान बालिका; पण वृद्ध चांगदेवाला तिच्यापासून ब्रह्मज्ञान मिळालें. तिच्यावर त्याची भक्ति फार होती. चौदाशें वर्षें जगूनसुद्धां आपलें अज्ञान गेलें नव्हतें; आपण मोठ्या अभिमानी वृत्तीनें आळंदीला आलों; आणि तेथें "अज्ञान केलें दुरी मुक्ताबाईनें" असें चांगदेव सांगतो. मुक्ताबाई हीच खरोखर या वृद्ध योग्याला गुरुस्थानीं होती.

अवघ्या विद्येचा करुनी अभ्यास । पावलों मी क्लेश देवराया ॥
मुक्ताबाईयोगें उतरलो भवसिंधु । तैशी दीनबंधु कृपा करी ॥

तेव्हां मुक्ताबाईचें मरण डोळयांनीं पहाण्याचा प्रसंग चांगदेवाला नको होता. विसोबा खेचरही या प्रसंगीं बरोबर होते. सर्वांच्या संमतीनें चांगदेवानें माघ वद्य त्रयोदशीला म्हणजे ज्ञानदेवानंतर तीन महिन्यांनीं पुणतांबें येथें गोदावरी-तीरावर समाधि घेतली. पुणतांब्याहून ही सर्व मंडळी नेवाशाला गेली. याच ठिकाणीं ज्ञानेश्वरीचें लेखन पुरें झालें होतें. तें लेखन पुरें होऊन सहा वर्षें झालीं नाहीं तोंच ज्ञानदेवानें समाधि घेतली. नेवाशाहून निवृत्तिनाथ, मुक्ताबाई आणि नामदेव हें आपेगांवला गेले. याच गांवांत आईबाप सोडून गेल्यावर निवृत्तिज्ञानदेवांनीं भिक्षा मागून कांहीं काळ आपल्या लहान भावंडांचा प्रतिपाळ केला. सगळी पूर्वींची आठवण होऊन बिचारी मुक्ताबाई शोकविव्हल झाली.

मुक्ताई उदास झाली असे फार । आतां हें शरीर रक्षूं नये ॥
त्यागिले आहार अन्नपाणी सकळीं । निवृत्तिराज तळमळी मनामाजीं ॥

त्याचप्रमाणें

निवृत्तिराज म्हणे आतां पंढरीनाथा । मुक्ताईला जपा अवघे जण ॥
चित्तवृत्ति तिची स्वरूपीं निमग्न । नाहीं देहभान मुक्ताईला ॥
अवघे जण जपती जपे नारायण । चालती घेऊन मध्यभागीं ॥
निवृत्तिराजें धरली मुक्ताबाई हातीं । सांभाळीत जाती निशीदिनीं ॥
पदोपदीं जपे निवृत्तिराज करें । आणिक ऋषीश्वर सांभाळिती ॥
नामा म्हणे देवा जातां तांतडीनें । पुढें स्थळ कोण नेमियेले ॥

**शके १२१८ संवत्सर संपून आतां १२१९ संवत्सर सुरू झालें होतें. वैशाख महिन्यांत ही सर्व मंडळी फिरत फिरत तापीतीरावरील महत् नगर या गांवीं आली. हें स्थळ फार सुंदर होतें असें पुढील अभंगावरून दिसून येईल**

तापीचीये तीरीं महद् ग्राम थोर । असे सोमेश्वर पुरातन ॥
वद्य वैशाख मास दशमी निर्मळ । उष्णकाळ फार तापतसे ॥
तेथें परशुरामे मारियेला बाण । पाहती पुरातन पश्चिमेस ॥
पाहिले माय आम्ही तापीतीर । उतरले भार वैष्णवांचे ॥
धन्य तापीतीर दिसे मनोहर । दोही थडीं भार पताकांचे ॥
नामा म्हणे हरि आवडीचें स्थळ । कण्हेर कमळ उदय झाला ॥

**या ठिकाणचें सृष्टिवर्णन पुढील अभंगांत फारच सुंदर असें दिलेलें आहे.**

फुलले अनेक तरुवर तेथें । दुर्वा दर्भ आंत उगवले ॥
करंज जाभळीं लागली एकथाटीं । वरी बहुदाटी तरुवरांची ॥
अमृतफळे अपार विस्तारिले फार । त्यामाजीं मयूर टाहो देती ॥
कंठ कोकिळा त्या सुस्वर गायन । तरुवर सुमनें परिमळ ॥
पारिजातकाची दाटी झाली भारी । आंत मैलागिरी डुल्लताती ॥
नामा म्हणे देवा भजा हा एकांत । मार्कंडेयें येथें तप केलें ॥ १ ॥
सोनियाचीं झाडें अनेक कर्दळी । त्यांत रानकेळी फोफावल्या ॥
सिताफळी भरीत अवघी तापीथडी । दाट दिसती गाढीं रामफळें ॥
तापीतीरीं ऋषि आणि शारंगधर । पाठीमागें भार वैष्णवांचे ॥
धन्य महत्नगर सोमेश्वर । धन्य तापीतीर योगियांचें ॥
उष्णकाळीं छाया आवडती फार । म्हणती ऋषीश्वर रम्य स्थळ ॥
नामा म्हणे देवा रंगलें अंतःकरण । उतरतीं विमाने गंधर्वांचीं ॥ २ ॥

**अशा या सुंदर स्थळीं वैशाख शुद्ध द्वादशीला मोठें वादळ झालें आणि विजांचा कडकडाट होऊन अपघातानें मुक्ताबाईला मृत्यु आला. तिचा देह देखील नंतर कोणाला दिसला नाहीं. या अपघाताचें वर्णन पुढील अभंगांत आहे.**

टाळ विणे मृदंग सुस्वर गायन । कोंदलें गगन दाही दिशा ॥
प्रळयींच्या वीजा वर्षती अपार । झाला धुंधकार दाही दिशा ॥
करोनीया स्नान बैसले बाहेर । म्हणती अंधकार फार झाला ॥

झुंजाट सुटला वारा कापूं लागे धरा । नभची अंतरा कालवलें ॥
नामा म्हणे देवा झाली कैसी गति । पडलीसे भ्रांति अवघ्या जनां ॥ १ ॥
निवृत्तिराज म्हणे प्रळयींचा वारा । सुटला शारंगधरा ऐसें वाटे ॥
हालते गगन डोलती विमानें । गेलें देहभान अवघियांचे ॥
अवघियांचे डोळे झांकले एकदां । माध्यान्ही अंबुदा वळुनि आले ॥
निवृत्ति पांडुरंग राई रुखमाई । धरा म्हणती घाई मुक्ताईला ॥
नामा म्हणे केशवा जाहला उबाळा । कांहीं केल्या डोळां उघडों नेदी॥२॥
ऋषि म्हणती हरि पातलेसे विघ्न । आतां कैसे प्राण वांचतील ॥
कोणाचिया शुद्धी नाहींचिया कोणा । म्हणती नारायणा मृत्यु आला ॥
कडाडली वीज निरंजनी जेव्हां । मुक्ताबाई तेव्हां गुप्त झाली ॥
वैकुंठी लक्ष घंटा वाजती एकघाई । झाली मुक्ताबाई स्वरूपाकार ॥
एक प्रहर झाला प्रकाश त्रिभुवनी । जेव्हां निरंजनी गुप्त झाली ॥
गेलें निवारुनी आकाश आभुट । नामा म्हणे कोठें मुक्ताबाई ॥ ३ ॥
उघडिल्या दिशा उघडिलें गगन । पाहिलें वदन भास्कराचे ॥
निवृत्तिराजाते कळवळा वाटे भारी । आतां आम्हां हरि आज्ञा द्यावी ॥
जयजयकारें टाळ्या पिटिती सकळ । नाचती गोपाळ तापीतीरीं ॥
सकळाचें चित्तीं येतो कळवळा । मुक्ताबाई डोळां पाहिली नाहीं ॥
नानापरी खेद करिती योगेश्वर । लाविती पदर डोळियासी ॥
नामा म्हणे देवा कैसें आतां कांहीं । आम्हा मुक्ताबाई बोलली नाही ॥

**ह्या प्रकारें मुक्ताबाईचा अंत झाला. "होती ऐसी नाहीं झाली मुक्ताबाई." ग त्या ठिकाणीं सर्व मंडळी एक महिनाभर राहिली. ते दिवस त्यांना युगाप्रमाणें वाटले. निवृत्तिनाथ तर अतिशय कष्टी झाले. तिन्हीं धाकटीं भावंडें डोळ्यांसमोर गेलीं ! आणि काय तीं गोड भावंडें !**

आत्ममुख एक बोलती बोलणीं । ज्ञानराज मनीं आठवती ॥
ज्ञानराजें आमुचे निवविले डोळे । आतां ऐसे खेळे नाहीं कोणी ॥
ऐकावा हा अर्थ मुक्ताईच्या मुखीं । आतां ऐसो सखी नाहीं कोणी ॥

**निवृत्तिनाथाला ज्ञानदेवाचे गुण सारखे आठवूं लागले.**

अविट बोलणें बोलवें अनादि । जें गुह्य वेदीं सांपडेना
कीर्ति वैराग्य केले सामराज्य । गुरुत्वासी लाज नाहीं आली ॥

नाशिवंत शरीर केलें अविनाश । घडविला विलास अध्यात्मींचा ॥
अविट बोलणी आठवतो मनीं । आतां त्रिभुवनीं दिसेनात ॥
तुझ्यामुळें हरि चालतो उगला । देहाआधीं गेला प्राण माझा ॥
नामा म्हणे देवा करितां ऐसा घोर । साडील शरीर निवृत्तिराज ॥ १ ॥
जें जें सुख आम्ही अनुभविलें मना । त्याचा नारायणा आठव होतो ॥
ऐसे पदोपदीं निवृत्तिनाथ कष्टी । कोण कोणाच्या गोष्टी आठवाव्या ॥
ज्येष्ठाच्या आधी कनिष्ठाचें जाणे । केलें नारायणे उफराटे ॥
उफराटे फार कळलें माझें मनीं । वळचणीचें पाणी आढ्या गेलें ॥
अवघ्यापरिस कष्टी केले मुक्ताईने । कांहींच बोलणें घडले नाहीं ॥
नामा म्हणे विठोबा एकशी बोलणें । अवघियांचीं मने कळवळलीं ॥ २ ॥

**गहिनिनाथानें आपल्याला जें ज्ञान दिलें तें ज्ञानदेवानें व्याख्या करून ग्रंथांत समाविष्ट केलें.**

काढिला शोधून अनुभव मुक्ताईनें । तें ज्ञान सोपानें संपादिलें ॥

**अशा प्रकारच्या आठवणी काढीत काढीत मंडळी सप्तशृंगीच्या डोंगरावर आली आणि तेथें देवीचें दर्शन घेऊन सर्वजण गोदातीरीं त्र्यंबकेश्वरांत उतरले. या ठिकाणीं ज्येष्ठ वद्य द्वादशीला म्हणजे मुक्ताबाईच्या मृत्यूनंतर बरोबर एक महिन्यानें निवृत्तिनाथांनीं देह ठेविला. अशा प्रकारें आठ महिन्यांत हीं चार भावंडें इहलोकांतून नाहींशीं झालीं. ज्ञानदेव प्रथम गेले व पुढें सात महिन्यांत सोपान, मुक्ताबाई आणि निवृत्तिनाथ यांनीं त्यांच्या पावलांवर पाउल टाकून हा लोक सोडला. "चारी देव जैसे परब्रह्मीचे ठसे" ते गेले तेव्हां महाराष्ट्रांत सर्वत्र दुःख झालें यांत नवल नाहीं.**

**४ ज्ञानदेवाच्या समाधीपासून तों निवृत्तिनाथांच्या समाधीपर्यंत जो वृत्तांत उपलब्ध आहे तो नामदेवाच्या अभंगांत आहे. ज्ञानदेवानें समाधि घेतल्या-नंतर नामदेवानें शोकविव्हल होऊन ज्ञानदेवाचें दर्शन व्हावें म्हणून पांडुरंगा-जवळ हट्ट धरला व तो पांडुरंगानें पुरविला अशीही हकीकत नामदेवाच्या या विषयांवरील शेवटच्या भागांत आहे. नामदेव पांडुरंगाला म्हणतोः—**

नामदेव म्हणे देवा ज्ञानदेव सृष्टि । पडेल कां दृष्टि पुनः आतां ॥
ज्ञानाचा वियोग जडला हृद्रोग । भेटीचा प्रयोग करा देवा ॥
ज्ञानदेव माझा दाखवा या वेळीं । जीव तळमळी त्याच्यावीण ॥

संत अंतरला सखा झाला दूर । आतां पंढरपूर कैसे करूं ॥
तुमचे दर्शन ज्ञान कृपादान । पंढरीस येणें याचसाठीं ॥ १ ॥
तरीच येईन पंढरीस । दृष्टी देखेन ज्ञानेश ॥
ज्ञानदेवा भेटी व्हावी । ऐशी सोय देवा लावी ॥
ऐशियाच्या कृपादानें । तुम्हां संगती नाचणें ॥
पंढरीचें जे कां सुख । जाणे तो एक भाविक ॥ २ ॥

**पांडुरंगानें नामदेवाचें समाधान करण्याचा प्रयत्न केलाः—**

देव म्हणे नाम्या पाहे । ज्ञानदेव मीच आहे ॥
तो आणि मी नाहीं दुजा । ज्ञानदेव आत्मा माझा ॥
माझ्या ठायीं ठेवी हेत । सोड खंत खंडी द्वैत ॥
नाम्या उमज मानसीं । ऐसें म्हणे हृषीकेशी ॥

**पण नाम्या उमजला नाहीं; त्यानें खंती सोडली नाहीं; त्यानें द्वैत खंडलें नाहीं. उलट तो म्हणतोः—**

नामदेव म्हणे देवा । ब्रह्मज्ञान पोटीं ठेवा ॥
तुम्ही मायेसंगें गूढ । ज्ञान जाणिवेचें आड ॥
आम्हां नाहीं याची चाड । वाटे संतभेटी गोड ॥
संतभेटी प्रेम फावे । प्रेमें देवाशीं भेटावे ॥
प्रेम आहे पोटभरी । त्यासी देव पोटीं धरी ॥
नामदेवाठायीं प्रेम । मार्गीं आडविलें ब्रह्म ॥

**शेवटीं देवानें नामदेवाचा लळा पुरविला व गरूडाला पाठवून (वैकुंठाहून) पुष्पक विमानांतून ज्ञानदेवास आणविलें. "ज्ञानदेवा पहातां डोळां । नामदेवा हर्ष झाला ॥" त्यानें त्याचे पाय धरले व वियोगदुःख सहन होत नाहीं म्हणून त्यास सांगितलें. पुढें काय झालें हें अभंगावरून स्पष्ट होत नाहीं. पण ज्ञानदेव जर विमानांतून आले तर ते समाधीच्या जागीं नव्हते, वैकुंठांत होते, म्हणजे वैकुंठवासी झाले होते, म्हणजे मृत्यु पावले होते ही गोष्ट स्पष्ट आहे.**

**हे सर्व अभंग लक्षपूर्वक वाचले म्हणजे ते नामदेवानें लिहिले आहेत कीं काय याबद्दल शंका येते. त्यांतील कित्येकांत नामदेवाचा रसाळपणा ओतप्रोत भरलेला आहे यांत शंका नाहीं; पण एकंदर ते कोणातरी नामदेवभक्तानें ज्ञानदेव–नामदेव चरित्रावर लिहिलें असावेत असें वाटतें. या अभंगांतून**

अतिशयोक्ति आणि काल्पनिक वर्णन हीं बऱ्याच ठिकाणीं आहेत याबद्दलही वाद होण्याचें कारण नाहीं. देवांची विमानें आलीं, नारद तुंबर गावयास लागले, राईरुक्माबाई यांच्याबरोबर सत्यभामाही वाढावयास आली या गोष्टींवरून देवतांचें आगमन हा काल्पनिक भाग आहे याबद्दल शंका रहात नाहीं. पांडुरंगानें केवळ ज्ञानदेवाच्या समाधीलाच नव्हे तर सर्वांच्या समाधिसमारंभासाठीं प्रत्यक्ष सहकुटुंब हजर रहावें असें वाटणें ही गोष्ट भक्तिपंथांत एक विशिष्ट भावनापूर्ण मनोवृत्ति होते तिचा परिणाम आहे; तो परिणाम झाला म्हणजे काल्पनिक गोष्टी सत्य आहेत असें वाटतें; आणि तीच गोष्ट येथें झालेली आहे. चमत्कारांचा चमत्कार असा आहे कीं त्यांचा कडेपर्यंत तपास लावला कीं ते पुष्कळांनीं ऐकलेले आहेत पण पाहिलेले कोणीही नाहींत असें निश्चित होतें. ज्ञानदेवापासून तो निवृत्तिनाथाच्या समाधीपर्यंत जे जे चमत्कार म्हणून वाटतात ते झालेच नव्हते असें या नामदेवाच्या अभंगांचें सूक्ष्म परीक्षण केलें म्हणजे आपणांस आढळून येते. नामदेवानें ज्ञानोबाची गांठ पडावी म्हणून पांडुरंगाजवळ आळ घेणें व पांडुरंगानें ती पुरविण्यासाठीं गरुडाला वैकुंठास पाठविणें व ज्ञानदेवानें तेथून पुष्पक विमानांतून येणें ( आणि आपण आळंदीच्या समाधिस्थानांत नाहीं असें सिद्ध करणें ) या सर्व गोष्टीवरून तर चमत्कारांचा काल्पनिकपणा अधिकच सिद्ध होतो. श्रद्धेच्या पायीं माणसांनीं वेडें बनण्याचें कारण नाहीं ही गोष्ट श्रद्धेचे वकीलही मान्य करतील. ज्ञानदेवांनीं समाधि लावून योगाप्रमाणें देहत्याग केला एवढी गोष्ट या सर्व वर्णनावरून मान्य करण्यास हरकत नाहीं.

सोपानदेवाच्या व निवृत्तीच्या समाधीच्या वेळीं ज्ञानदेवसमाधीच्याच सर्व गोष्टींची वर्णनकारानें पुनरावृत्ति करावी याचा अर्थ एका विशिष्ट ठशाचें वर्णन करणें त्यावेळीं ग्राह्य समजलें जात होतें व कवीनें तें त्याप्रमाणें केलेलें आहे असाच होतो. हीं तीन्हीं भावंडें व चांगदेव ज्ञानदेवाच्या वियोगामुळें दुःखानें मरण पावलीं ही गोष्ट उघड आहे. मुक्ताबाईला महत् नगरांत ( तापीतीरीं माणगांव म्हणून एदलाबादेपासून कांहीं अंतरावर आहे तेंच हें महत् नगर असें रा. पांगारकर म्हणतात ) वैशाख महिन्यांत वादळांत मृत्यु आला. बहुधा तिच्या अंगावर वीज पडून ती मृत्यु पावली. पावसाळा सुरू होण्यापूर्वीं अशीं वादळें आपल्याकडे सर्वत्र होतात व त्यावेळीं वीज पडून पुष्कळ वेळां प्राण-

झालि होते हें प्रसिद्धच आहे. ज्ञानदेवांच्या मृत्यूनंतर उदास होऊन निवृत्ति-सोपानमुक्ताबाई आणि त्यांचे कित्येक मित्र हे महाराष्ट्रांत भटकत होते व या प्रवासांतच हीं भावंडें क्रमाक्रमानें मृत्यु पावलीं. चमत्कार घडले कीं नाहींत याबद्दल विवाद करण्यांत फारसा अर्थ नाहीं. जे अंधश्रद्ध आहेत त्यांची या बाबतींत खात्री पटविणें शक्य नाहीं व जे विवेचक आहेत ते अशक्य गोष्टीवर "चक्षुर्वैसत्यम्" झाल्याशिवाय केव्हांहीं विश्वास ठेवणार नाहींत. दुसऱ्यानें पाहिलें म्हणून सांगणें हें "चक्षुर्वैसत्यम्" नव्हे. पण अनैसर्गिक चमत्कार सोडून दिले तरी एकविशी पुरी होण्याच्या पूर्वीं ज्ञानदेवानें किंवा सतरा वर्षें पुरीं होण्यापूर्वीं मुक्ताबाईनें जे बुद्धीचे आणि सोशिकपणाचे चमत्कार करून दाखविले त्यांना सामान्यपणें अलौकिक हें नांव देण्यांस हरकत नाहीं. "ज्ञानेश्वरी" ची रचना पंधराव्या वर्षीं आणि "अमृतानुभवाची" रचना अठराव्या वर्षीं हे वाङ्मय सृष्टींतले चमत्कार खरोखर मनुष्याच्या कल्पनेला थक्क करतात. याच्यापुढें रेडा बोलविणें आणि भिंत चालविणें हे चमत्कार कांहींच नव्हत. पण सामान्य जनांना ज्ञानेश्वरीचा चमत्कार कळण्यास ती यथासांग समजली पाहिजे. रेडा वेद बोलला किंवा भिंत चालली या गोष्टींचा चमत्कार समजण्यास फारसे परिश्रम लागत नाहींत. शिवाय ज्ञानदेवांच्या ग्रंथांचा अभ्यास करणाऱ्यांना ते चमत्कार–वादी नव्हते हें माहीत आहे. योगबलानें प्राप्त झालेल्या ऋद्धि आणि सिद्धि या मोक्षमार्गांत अडचणी आहेत असें त्यांचें स्पष्ट मत होतें. तेव्हां कोणत्याही कारणासाठीं ते योगबलाचे चमत्कार करून दाखवितील ही गोष्ट खरी मानतां येत नाहीं. पण सामान्य जनांत "चमत्काराशिवाय नमस्कार नाहीं" आणि म्हणून प्रत्येक मोठ्या माणसाच्या नांवावर चमत्कार चढविण्याचा प्रकार चालतो.

पण या चमत्कारांखेरीज आणखीही विवादात्मक गोष्टी ज्ञानदेवाच्या चरित्राबाबतींत लोकांपुढें उभ्या राहिल्या आहेत. त्यामुळें कोणीही आपलें डोकें गरम करून घेण्याचें कारण नाहीं. ज्ञानदेवांचे ग्रंथ हे त्यांनीं कायमचें वैभव महाराष्ट्राला दिलेलें आहे. त्यांच्यापुढें हे वादविवादाचे प्रश्न सगळे कमी महत्वाचे वाटतात. अर्थात् प्रश्न उपस्थित झाले कीं त्यांचा विचार केला पाहिजे; निर्णय लावण्याचा प्रयत्न केला पाहिजे; आणखी इतका प्रयत्न करून निर्णय लागेलच असेंही नाहीं. अशा कित्येक प्रश्नांचा थोडाबहुत परामर्श पुढील भागांत घेऊन आपणांस ज्ञानदेवांच्या लौकिक चरित्राचा निरोप घ्यावयाचा आहे.

# भाग आठवा

## विवाद आणि शंका

झडकरी अनुमानाचेनि करतळें।
घेऊनि तियें वाक्यफळें।
प्रतीतिमुखीं एके वेळे। घालूं पाहे ॥ १९२
तंव विचाराचिया रसना न दाटती।
वरी हेतूच्या दशनीं न फुटती।
ऐसें जाणोनि सुभद्रापति। चुंबीचिना ॥ १९३

ज्ञानेश्वरी, ७

ज्ञानदेवांच्या चरित्रांतील प्रसिद्ध असलेले चमत्कार आधुनिक विचारसरणीच्या माणसाला चमत्कारिक वाटतात यांत कांहीं नवल नाहीं. चमत्कारांवरची श्रद्धा आतां धार्मिक म्हणविणाऱ्या माणसांतही फारशी उरलेली नाहीं व धर्मरक्षण करण्याच्या हेतूनें धर्मांतील चमत्कारांना स्थानबद्ध करण्याचें किंवा निदान त्या चमत्कारांचा विवेकाला पटेल असा अर्थ लावण्याचें धोरण बहुतेक शहाण्या धार्मिकांनीं पतकरलेलें आहे. अशा अलौकिक चमत्कारांसंबंधीं आम्हांस जें काय म्हणावयाचें होतें तें त्या त्या ठिकाणीं या ग्रंथांत आम्ही स्पष्टपणें म्हटलेलें आहे. सश्रद्ध माणसांची ज्या गोष्टीवर श्रद्धा बसलेली आहे तिचा विचार होतां होईतों हळुवारपणानें करावा हा सिद्धांत सामान्यपणें मान्य करूनच आम्ही या बाबतींत लिहिलेलें आहे हें सुज्ञ वाचकांच्या लक्षांत येईल. केव्हां केव्हां श्रद्धा ही अत्यंत अज्ञानमय असतें व प्रसंगविशेषीं ती स्वार्थमय असतें व हळुवारपणानें तिचें अंतस्थ स्वरूप लक्ष्यांत येत नाहीं; त्यावेळीं तिच्या स्वरूपावर कटु प्रहार करणें हाच एक उपाय ठरतो व त्याचा अवलंब सत्यप्रिय माणसांना करावा लागतो. ज्ञानदेवचरित्रांत त्यांनीं केलेले चमत्कार हाच एक विवाद्य प्रश्न नाहीं; अथवा चमत्कारांचा प्रश्न फारसा विवाद्य नाहीं असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. पण दुसरे कित्येक प्रश्न असे असतात कीं तें श्रद्धेच्या प्रांतांतच येऊं शकत नाहींत. त्यांचा निर्णय परंपरेच्या

समजुतीवरून न लावतां जीं निरनिराळीं प्रमाणें उपलब्ध असतील त्यांवरून लावावा लागतो. कालनिर्णय वगैरे गोष्टी अशा प्रकारच्या आहेत व या बाबतींत आपल्याकडे निश्चितपणें लिहिण्याचा प्रघात नसल्यामुळें व जें लिहावयाचें तेंही पुष्कळवेळां चमत्कारयुक्त म्हणजे चमत्कारिक असल्यानें अशा गोष्टींचा निर्णय करणें हें पुष्कळसें अवघड होऊन बसतें. ज्ञानदेवचरित्रांत "शके बाराशें बारोत्तरें" हें ज्ञानेश्वरींतील शेवटच्या वाक्यांपैकीं एक वाक्य तिथि वार कांहीं न देतां कां होईना पण प्रत्यक्ष कालदर्शक असें एक प्रमाण आहे व त्यानंतर त्यांची समाधितिथि कार्तिक वद्य त्रयोदशी शेकडों वर्षें चालत आली आहे म्हणून ती ग्राह्य मानण्यास हरकत नसावी. पण असे एक दोन प्रसंग सोडून या चरित्रांत कालनिर्णयाला साहाय्यक असा पुरावा मिळत नाहीं. आणि या बाबतींत ज्यांनीं शंका काढल्या त्यांना उत्तर प्रत्युत्तर करतांना शास्त्रीय दृष्टीपेक्षां गालिप्रदानाचा अधिक उपयोग झाला ही कष्टतर गोष्ट येथें नमूद केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. चांगदेव चौदाशें वर्षें जिवंत होते ही गोष्ट चौदाशें वर्षांच्या योग्याला पंधरा वर्षांच्या मुलानें किंवा बारा वर्षांच्या मुलीनें शहाणपण शिकविलें या दृष्टीनें मोठी आकर्षक आहे. त्यानें ज्ञानदेव व मुक्ताबाई यांच्या चरित्राला रंग चढतो; पण चांगदेवाच्या चौदाशें वर्षांच्या चरित्राची कोणती माहिती उपलब्ध आहे ? जी माहिती उपलब्ध आहे ती ज्ञानदेवचरित्रापुरतीच आहे ही गोष्ट थोडीशी चमत्कारिक नाहीं काय ? तेव्हां या बाबतींत शंका निघणें अनिवार्य आहे व त्या निघाल्यावर त्यांचा शांतपणानें विचार करणें, निर्णय लागल्यास तो लावणें, लागत नसल्यास तसें स्पष्ट सांगून टाकणें, हाच मार्ग सरळ व शहाणपणाचा आहे; व त्याचाच अवलंब विचारी माणसांनीं केला पाहिजे.

ज्ञानदेवचरित्रासंबंधीं परंपरेचा दुरभिमान बाळगणाऱ्या लोकांना अस्वस्थता वाटेल अशा प्रकारच्या शंका साधार प्रकट करण्याचा मान रा. रा. शिवराम एकनाथ भारदे या गृहस्थाकडे जातो. हे भारद्वाज या टोपण नांवानें लिहीत. यांचा जन्म सन १८६२ सालीं झाला व मृत्यु १९१९ सालीं झाला. हे अहमदनगरच्या मिशन हायस्कूलमध्यें शिक्षक होते. स्वदेशाभिमानी वृत्तीबद्दल यांची प्रसिद्धी होती व त्यापायीं त्यांना सरकारचा रोष सहन करून आपत्तीही सोसाव्या लागल्या. हे जुन्या तऱ्हेचे, जुन्या वळणाचे स्नानसंध्याशील ब्राह्मण

होते. कोणत्याही प्रकारें "सुधारक" म्हणून त्यांचें वर्णन लौकिक दृष्टया करतां आलें नसतें. पुण्याच्या सुधारक पत्रांत १८९८–९९ सालीं त्यांनीं ज्ञानदेवाबाबद आपली लेखमाला लिहिली व तीमुळें भाविक मंडळींत साहजिकच मोठी धांदल उडाली. त्यांचा मुख्य सिद्धांत "ज्ञानेश्वरीकर्ता ज्ञानदेव व अभंगकर्ता ज्ञानेश्वर हे दोन निरनिराळे संत होऊन गेले" हा आहे. या मुख्य सिद्धांताच्या अनुषंगानें त्यांनीं दुसरे कांहीं सिद्धांत काढले. (१) नामदेवाचा समकालीन अभंगकर्ता ज्ञानेश्वर होता, ज्ञानेश्वरीकर्ता ज्ञानदेव नव्हता. (२) नामदेवाचा काल शके तेराशेंनंतर म्हणजे ज्ञानेश्वरीनंतर कमींत कमी शंभर वर्षांनीं होता व अशा प्रकारें ज्ञानेश्वरीकर्ता ज्ञानदेव झाल्यानंतर शेंसवाशें वर्षांनीं अभंगकर्ता ज्ञानेश्वर झाला. (३) ज्ञानेश्वरीकर्ता ज्ञानदेव हा आपेगांवचा व निवृत्तिनाथाचा मुलगा; अभंगकर्ता ज्ञानेश्वर हा आळंदीचा ज्ञानदेव; हा शिवोपासक आणि नाथपंथी; ज्ञानेश्वर हा रामानुजपंथी व सगुणोपासक (विष्णूचा उपासक). मूळ सिद्धांत व त्यावरून काढलेले पुढील तीन सिद्धांत हे क्रांतिकारक स्वरूपाचे होते व त्यांनीं मोठें वादळ उत्पन्न करावें यांत कांहींच आश्चर्य नव्हतें. या शंकांना उत्तर त्या वेळीं वे. शा. सं. श्रीपतिबुवा भिंगारकर, श्री. बापूसाहेब कुरुंदवाडकर, केरळकोकिळकर्ते आठल्ये इत्यादिकांनीं देण्याचा प्रयत्न केला व वादविवादांत भारद्वाजांच्या प्रतिपक्ष्यांनीं त्यांच्यावर यथाशक्ति गालिप्रदानाचाही उपयोग केला. पण असे वाद गालिप्रदानानें संपत नाहींत. हा वाद तेव्हां मिटला नाहीं व अद्यापिही त्याचा निश्चित निर्णय लागला आहे असें म्हणवत नाहीं.

भिंगारकरबोवांनीं भारद्वाजांना दिलेलें प्रत्युत्तर म्हणजे या वादांतील उत्तर पक्षाची उत्तम कैफीयत आहे. त्यांनीं जे मुद्दे भारद्वाजांच्या शंकाखंडनार्थ दिले आहेत ते थोडक्यांत असेः—(१) ज्ञानेश्वरीचा कर्ता व अभंगकर्ता ज्ञानदेव निराळे नाहींत, एकच आहेत, आणि पंढरपुरास जाणारा संत ज्ञानेश्वर हाच ज्ञानेश्वरीकर्ता असून तो आळंदीस होता, वगैरे. (२) नामदेव हा ज्ञानदेवांचा समकालीन होता; म्हणजे तो ज्ञानेश्वरीच्या काळीं होता, त्यानंतर शंभर वर्षांनीं झालेला नाहीं. (३) ज्ञानदेव एकच असल्यामुळें दोघांचीं कुळें व मातापिता निराळीं ही गोष्ट शिल्लकच रहात नाहीं. (४) या ज्ञानेश्वरीकर्त्या व संत ज्ञानदेवाची समाधि आळंदीस आहे. याशिवाय भारद्वाजांनीं आपल्या मुख्य

सिद्धांताच्या समर्थनार्थ आणलेला महत्वाचा मुद्दा हा कीं ज्ञानेश्वरी व अभंग यांतील भाषा ठळकपणें भिन्न आहे ही गोष्ट भिंगारकर मुळींच मान्य करीत नाहींत. त्यांच्या मतें (५) भाषापद्धति दोन नाहींत. असे हे या वादांतील पूर्व पक्ष व उत्तर पक्ष आहेत. यांत अनुषंगानें सांगावयाची गोष्ट म्हणजे मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत नामदेव नांवाचे ग्रंथकार एकाहून अधिक झालेले आहेत. महानुभावांत एक नामदेव होऊन गेला व त्यानेंच महाभारत प्रथम मराठींत आणण्याचा प्रयत्न केला असे दिसलें. हा नामदेव व शतकोटी अभंग करण्याची प्रतिज्ञा करून बसलेल्या पंढरीच्या पांडुरंगाचा लाडका नामदेव एक नव्हत याबद्दल विद्वानांत एकमत आहे. तसेंच पंजाब प्रांतांत ज्याची ख्याति आहे तो नामदेव कोण, संत नामदेव कां महानुभावी नामदेव कां तिसराच कोणी, याही प्रश्नाचा समाधानकारक निर्णय लागलेला नाहीं. पंजाबांत गेलेला नामदेव व संत नामदेव हे एकच असें कित्येक संशोधकांचें म्हणणें आहे; पण त्यासंबंधीं असावा तितका बळकट पुरावा अद्यापि उपलब्ध झालेला आहे असें म्हणवत नाहीं. भारद्वाजांच्या म्हणण्याचा आपण थोडक्यांत विचार करूं. त्यांचें नांवसुद्धां घ्यावयाचें नाहीं व त्यांना अनुल्लेखानें पराजित करावयाचें ही कित्येक लेखकांची वृत्ति आम्हांस योग्य वाटत नाहीं व कोणाही विचारी माणसास योग्य वाटणार नाहीं.

२ भारद्वाजांच्या म्हणण्याप्रमाणें ज्ञानेश्वरी व अमृतानुभव लिहिणारा ज्ञानदेव आणि अभंग लिहिणारा ज्ञानदेव हे एक नव्हत. कारण या दोन ग्रंथांत प्रकट झालेली विचारसरणी आणि मनोवृत्ति व ज्ञानदेवांच्या नांवावर खपणाऱ्या बहुतेक अभंगांतील विचारसरणी व मनोवृत्ति यांत फारच फरक आहे; शिवाय दोहोंच्या भाषासरणींतही अतिशय भेद आहे. तसेंच नामदेव हा ग्रंथकार तेराव्या (शके) शतकांतला नसून चौदाव्या शतकांतील आहे तेव्हां त्याच्याबरोबर तीर्थयात्रेला गेलेला व पंढरपुरास (वरचेवर) जाणारा ज्ञानदेव हा ज्ञानेश्वरीचा कर्ता नव्हे. हीं विधानें करून मग भारद्वाजांनीं असें अनुमान बसविलें आहे कीं ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव लिहिणारा ग्रंथकार हा आपेगांवास होऊन गेला; त्याचा व पंढरपूरचा कांहीं म्हणण्यासारखा संबंध नाहीं; त्याची व नामदेवाची गांठ पडणें शक्य नव्हतें. तेव्हां नामदेवाचा मित्र अभंगाचा कर्ता, आणि पंढरपुरचा वारकरी हा ज्ञानदेव निराळा असला पाहिजे.

तो ज्ञानदेव आळंदीला होऊन गेला; चमत्कार वर्णन केलेले आहेत ते त्याच्या संबंधीं. ग्रंथकार ज्ञानदेव हा योगी होता, शिवोपासक होता, नाथपंथी होता, आणि पूर्ण अद्वैतवादी होता. संत ज्ञानदेव हा भक्तिमार्गी, विठ्ठलोपासक म्हणजे विष्णूची उपासना करणारा, म्हणजे वैष्णव, तेव्हां सगुणोपासक, म्हणून कोणत्या तरी प्रकारचा द्वैती. ज्ञानदेव दोन धरले म्हणजे अभंग, त्यांपैकीं जो संत होता त्यानें लिहिले, हें उघड होतें. अर्थात् या अनुमानाप्रमाणें ज्ञानेश्वरी नेवाशास लिहिली असें समजण्याचें कारण नाहीं. तो आपेगांव किंवा पैठण किंवा आणिक कोठें तरी लिहिली असें म्हणतां येईल. अशा प्रकारें भारद्वाजांनीं मुख्यतः ज्ञानेश्वरी, अमृतानुभव आणि ज्ञानदेवी अभंग यांतील फरक लक्षांत घेऊन हीं अनुमानें काढलेलीं आहेत.

आपल्या अनुमानाच्या पुष्टीकरणार्थ ज्ञानेश्वरींतील कित्येक ओंव्या घेऊन अंतर्गत पुरावा देण्याचा प्रयत्न भारद्वाज यांनीं केलेला आहे. भारद्वाजांच्या आक्षेपांना किंवा अनुमानांना एकंदरींत जीं उत्तरें आलीं त्यांत हरिभक्तिपरायण भिंगारकरबुवा यांचें "श्रीज्ञानेश्वरमहाराज यांचा काळनिर्णय व संक्षिप्त चरित्र" हें लहानसें पुस्तक विशेष महत्त्वाचें समजलें पाहिजे. त्यांच्या पुस्तकांतील पांच प्रकरणांचे मथळेच त्यांचें म्हणणें काय आहे तें दर्शवितात.

( १ ) नामदेव व ज्ञानदेव हे समकालीनच होते.

( २ ) ज्ञानेश्वरीचा कर्ता आळंदीचाच ज्ञानदेव होय.

( ३ ) कुलवृत्त व गुरुशिष्यपरंपरा दोन नाहींत.

( ४ ) भाषापद्धतीही दोन नाहींत.

( ५ ) ज्ञानेश्वरीकारांची समाधि आळंदीसच आहे.

यांपैकीं चौथ्या मुद्याचा विचार कोणाही ज्ञानेश्वरीच्या सुजाण वाचकास स्वतंत्रपणें करतां येईल; पण बाकी चार मुद्दे प्रत्यक्ष पुराव्यावर अवलंबून राहणार हें उघड आहे. या चार मुद्याबाबद भारद्वाज व भिंगारकरबोवा यांच्यांत स्पष्ट मतभेद आहे व दोघांनींही आपापलीं विधानें पुराव्यावरून सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. "निवृत्तिनाथसुतें" या ज्ञानेश्वरींतील शेवटच्यापैकीं एका ओवींतील शब्दाच्या आधारानें ज्ञानेश्वरीकर्ता ज्ञानदेव हा निवृत्तिनाथाचा मुलगा होता असें भारद्वाजांनीं म्हटलें आहे व त्यावरूनच या ज्ञानदेवाची कुळपरंपरा निराळी

होती असें अनुमान काढलें आहे. हा अर्थ काढतांना दूरान्वय फार जाहला आहे. शिष्य या अर्थीं सुत वापरत नाहींत असें नाहीं व तशाच अर्थानें हा शब्द येथें आहे. " महेशान्वयसंभूत " याचाही अर्थ शंकराच्या शिष्यपरंपरेंतील म्हणजे नाथपंथांतील असा होतो. तथापि असा शब्दच्छल सोडून दिल्यावर काल-निर्णयाच्या बाबतींत भारद्वाज व भिंगारकर दोघांनींही प्रत्यक्ष निर्णयात्मक असें कांहीं सिद्ध केलेलें आहे असें म्हणवत नाहीं.

ज्ञानदेव हे दोन होते कां एक होते या बाबतींत प्रत्यक्ष असा पुरावा भाषा-पद्धतीचा म्हणतां येईल. ज्ञानेश्वरीची भाषा आणि ज्ञानदेवी अभंगांची भाषा आणि विशेषेंकरून दोन्हींतील विचारसरणी यांत कित्येक ठिकाणीं पुष्कळ फरक आहे यांत शंका नाहीं. हा फरक नाहींच असें भिंगारकरबुवाही म्हणूं शकत नाहींत. त्यांच्या मतें विषयपरत्वें व प्रसंगानुरोधानें असा फरक होऊं शकेल; तेव्हां तिकडे विशेष लक्ष्य देण्याचें कारण नाहीं. आमच्या मतें, भाषापद्धति व विचारसरणी यांत फरक नाहीं असें म्हणणें धारिष्टाचें होईल; पण त्या फरकाचें कारण शोधतांना एका ज्ञानदेवाचे दोन ज्ञानदेव करण्याचें मात्र प्रयोजन नाहीं. भिंगारकरबुवांनीं हा फरक कां आहे याचें कारणही बरोबर दिलेलें आहे; पण तें कारण चुकीचें आहे असें मात्र त्यांचें मत आहे आणि म्हणून तें देतांना त्यांनीं वापरलेली भाषा हा फरक आहे असें म्हणणाऱ्यांना जरी पुष्टि देणारी आहे तरी त्यांच्याबद्दल अनादरयुक्त अशी आहे. भिंगारकरबुवा आपल्या उपसंहारांत म्हणतातः–" पांचव्या भागांत सांगितल्याप्रमाणें ज्ञानेश्वरीच्या समाधीबद्दलचे तंटे आजकालचे आहेत असें नाहीं; व ज्ञानेश्वरीकारांची खरी समाधि आळंदीस नाहीं असा जर कांहीं पुरावा केव्हांही दाखवितां आला असता तर आजपर्यंत उपस्थित होऊन निर्णय झालेल्या अनेक कज्जांत वादीच्या किंवा प्रतिवादीच्या तर्फे तो केव्हांना केव्हां तरी पुढें आल्यावांचून राहिला नसता. पण सहाशें वर्षांत जी गोष्ट करण्याचें कोणासही सुचलें नाहीं व शक्यही वाटलें नाहीं ती कल्पना १९ व्या शतकाच्या अखेरीस भारद्वाजांच्या डोक्यांत अचूक कशी उतरावी व क्षणभर तरी आपल्या अज्ञानविजृंभितानें शहाण्या-सुरत्या मंडळीस चकविण्याचा त्यांचा प्रयत्न थोडाबहुत तरी कसा सिद्धीस जावा याचें कांहीं तरी कारण असलें पाहिजे. एरवीं एवढा अपूर्व कुतर्कप्रबंध रचण्यास कोणी प्रवृत्त होणार नाहीं. अशा दृष्टीनें विचार केला असतां हा

अश्रुतपूर्व कुतर्क भारद्वाजांच्या डोक्यांत येण्यास भक्तिमार्ग व अद्वैतवाद यांच्या संबंधानें आलीकडील कांहीं लोकांच्या ज्या कल्पना झालेल्या आहेत त्या बऱ्याच अंशीं कारण झालेल्या असाव्या असें वाटतें. श्रीशंकराचार्यांनीं स्थापिलेल्या अद्वैत मार्गांत ज्याचें मन गढून गेलें आहे तो " ग्यानबा तुकाराम " म्हणून टाळ कुटण्यास कधींही प्रवृत्त होणार नाहीं अशी कित्येकांची समजूत झालेली आहे. तसेंच भक्तिमार्ग द्वैतमत स्वीकारल्याखेरीज सिद्ध होऊं शकत नाहीं किंवा ग्राह्य वाटणें शक्य नाहीं, अशीही कित्येकांची कल्पना आहे. वस्तुतः पहातां या दोन्ही कल्पना वेदांत व भक्तिमार्ग यांचें पुरें परिशीलन न केल्यामुळें अज्ञानानें उद्भवलेल्या आहेत. भक्ति आणि ज्ञान यांत दोहोंत कोणास अधिक प्राधान्य द्यावयाचें एवढाच काय तो भाष्यकारांचा खरा आशय आहे. भक्ति टाकावी असें कोणीही प्रतिपादन करीत नाहीं. इतकेंच नव्हे तर द्वैती किंवा अद्वैती दोघेही भक्तिमार्गाची उत्तम साधनांत गणना करतात.... ज्ञानी आणि टाळकुटे अथवा संत यांच्यामध्यें कित्येक मंडळीस जो विरोध भासत आहे तो प्रमाणसिद्ध नसून संप्रदायप्रवर्तक पुरुषांच्या आचरणा-वरून, लेखांवरून आणि पुढें निरनिराळ्या संप्रदायांत झालेल्या अनेक ज्ञानी पुरुषांच्या उदाहरणांवरून हा भेद वास्तविक नाहीं एवढें स्पष्ट कळून येण्या-सारखें आहे. यासंबंधानें अलीकडे कांहीं लोकांत प्रचलित असलेलें मत कदाचित् विरुद्ध असेल, परंतु जुन्या ग्रंथकारांचें आणि साधूंचें हें मत नव्हतें व ज्या कालाचा सध्यां आपण विचार करीत आहों त्या कालास हें मत लावणें म्हणजे आधुनिक विद्वानांच्या बूटष्टाकीण्या ज्ञानेश्वर महाराजांस चढविण्याइतकेंच हास्यास्पद आहे. " हा दीर्घ उतारा देण्याचा आशय चतुर वाचकांच्या लक्षांत येईल. ज्या " मता " वर भिंगारकरबोवा हल्ला चढवितात त्या मताचें खरें कारण त्यांनींच दिलें आहे. आधुनिक विद्वानांच्या बूटष्टाकिण्या ज्ञानदेवांस चढविण्याचा कोणाच आधुनिक सुज्ञाचा विचार नाहीं पण त्याचबरोबर ज्ञानदेवाचें व त्याच्या शिकवणीचें खरें स्वरूप झाकून त्याला नाटकी हरिदास किंवा गबाळ्या माळकरी बनविण्याचा प्रयत्नही कोणी सहन करणार नाहीं. भक्तिमार्ग व अद्वैत यांचा निर्णय ज्ञानदेवांनीं लावला आहे व त्यांना " टाळकुट्यां " त घालून चित्रपटांतील नायक बनविण्याचा उद्योग कोणाही सुज्ञाला व तज्ज्ञाला पटण्यासारखा नाहीं हें स्पष्टपणें सांगितलें पाहिजे.

३ ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी ही पंढरपूरच्या वारकरी मंडळींनीं जवळजवळ आपला धर्मग्रंथ म्हणून मान्य केली ही गोष्ट सर्वस्वी खरी आहे. पण ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव या दोन ग्रंथांत विठ्ठलनामाचा अत्यंताभाव आहे यांतही शंका नाहीं. शिवाय ज्ञानेश्वरींत ठिकठिकाणीं सगुण भक्ति ही साधन म्हणून सांगितली असून तिचा विपर्यास कसा होतो हे स्पष्ट केलेलें आहे. सगुणाच्या पलीकडे जाऊन निर्गुणाचा अनुभव येणें ही ज्ञान प्राप्त झाल्याची खूण; ज्ञान हें कर्मोत्तर होत असतें; कर्मशून्यता ही भगवद्गीतेंत कोठेंही सांगितलेली नाहीं, पण योगयुक्त होऊन कर्म केल पाहिजे असें सांगितकेलें आहे. योगयुक्तता म्हणजे समत्व; आणि समत्वाचा संदेश हा भगवद्गीतेचा म्हणून ज्ञानेश्वरीचा प्रमुख संदेश आहे. ज्ञानदेव भक्तिमार्गाविरुद्ध नव्हते; पूर्ण ज्ञान होण्याच्या पूर्वीचा तो मार्ग आहे व त्याची खूण आचरणांत आहे हें त्यांनीं वरचेवर स्पष्ट केलें आहे. ज्ञानी पुरुषांचीं आणि भक्तांचीं लक्षणें त्यांच्या आचरणावरून समजतात व ज्याच्या दैनंदिन आचरणांत समत्व नाहीं, भूतदया नाहीं, निरहंकारता नाहीं, निर्ममत्व नाहीं तो कितीही तात्विक ब्रह्मज्ञानांत संपन्न असला, किंवा पूजाअर्चा मोठ्या थाटामाटानें करीत असला तरी व्यर्थ आहे हेंही ज्ञानदेवांनीं स्पष्ट केलेलें आहे. कृष्णभक्तीच्या आधारानें दुराचरणाचें जें प्रदर्शन कित्येक ठिकाणीं होत होतें व अद्यापिही होत आहे त्या प्रकारच्या भक्तीचा निषेध ज्ञानदेवांनीं केलेला आहे व अशी "बुवाशाही" महाराष्ट्रांत न येऊं देण्याबद्दल ज्ञानदेवप्रभृति आमच्या थोर संतांनीं फार श्रम केले. पण उपरोक्त दुष्परिणाम सगुण भक्तीच्या मर्यादा व मर्म न ओळखणाऱ्यांच्या हातून होतात व त्यांची गय करण्याची प्रवृत्ति सनातनी म्हणविणाऱ्यांत बरीच आहे. ही प्रवृत्ति ज्ञानदेवांना मान्य नव्हती. परमेश्वराची उपेक्षा करून नागपंचमीला नागोबाची व गणेशचतुर्थीला गणोबाची पूजा करणाऱ्यांची त्यांनीं फार कानउघाडणी केली आहे. म्हणून उठल्या सुटल्या मूर्खपणाच्या व आचरटपणाच्या रूढींची तरफदारी करणारे व कितीही ज्ञान झालें तरी या रूढींचा विध्वंस न व्हावा म्हणून आटोकाट प्रयत्न करणारे म्हणजे ज्ञान आणि आचरण यांचा संबंध नसावा असें म्हणणारे हे ज्ञानदेवाचे अनुयायी नसून त्यांच्यासंबंधीं गैरसमज उत्पन्न करतात; आणि म्हणूनच भिंगारकरबोवा म्हणतात त्याप्रमाणें भक्ति व अद्वैत यांचें अतीव साहचर्य हें पुष्कळांना पटत नाहीं; व

त्यामुळें ज्ञानदेवाचें व त्याच्या शिकवणीचें शुद्ध स्वरूप मलीन होऊं नये ही त्यांची इच्छा आहे. ज्ञानेश्वरींत व कित्येक ज्ञानदेवी अभंगांत विचारांची भिन्नता आहे यांत मुळींच शंका नाहीं. पण ती भिन्नता कां आली हें सांगण्यासाठीं दोन ज्ञानदेव होते या कल्पनेची आवश्यकता नाहीं. आमच्या मतें ज्या अभंगांत ही भिन्नता विशेष स्पष्ट आहे ते दुसऱ्या कोणी तरी लिहून ज्ञानदेवाच्या नांवावर दडपले आहेत व ज्ञानदेवाला "आपल्यासारखा" करण्याचें श्रेय संपादिलें आहे. थोर पुरुषाच्या नांवावर स्वतःचे विचार दडपून देण्याची ही प्रथा पूर्वीं होती व आतांही आहे हें उघड आहे आणि ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे आपेगांवचा व आळंदीचा असे दोन ज्ञानदेव होते ही कल्पना केल्याशिवाय ही भिन्नता कशी उत्पन्न झाली याचा निर्णय होतो. नामदेवाचें मडकें म्हणजे डोकें कच्चें ठरविणाऱ्या गोरा कुंभारानें व तत्काल संतमंडळीनेंही भक्तीची, सगुणोपासनेची मर्यादाच स्पष्ट केलेली आहे; पण ही गोष्ट सगुणोपासनेला अमर्याद समजणारे विसरतात असें म्हटलें पाहिजे.

आमचें म्हणणें स्पष्ट करण्यासाठीं आणि सिद्धही करण्यासाठीं ज्ञानेश्वरींतील नवव्या अध्यायांतील उतारा फार उपयुक्त आहे. भगवद्गीतेंतील या अध्यायांतील अकरावा श्लोक पहाः—

अवजानंति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।
परं भावमजानंतो मम भूतमहेश्वरम् ॥

या महत्वाच्या श्लोकाच्या अनुरोधानें पुढील टीका आहे.

क्रिंबहुना भवा बिहाया । आणि साचें चाड आथी जरी मियां ।
तरी तूं गा उपपत्ति इया । जतन कीजे ॥ १४०
एऱ्हवीं दिठी वेधली कवळें । तै चांदणियातें म्हणे पिवळें ।
तेवी माझ्या स्वरूपीं निर्मळें । देखती दोष ॥ १४१
ना तरी ज्वरें विटाळलें मुख । तें दुधातें म्हणे कडू विख ।
तेंवी अमानुषा मानुष । मानिती मातें ॥ १४२
म्हणउनि पुढत पुढती धनंजया । झणें विसंबसी या अभिप्राया ।
जे इया स्थूलदृष्टि वायां । जाइजेल गा ॥ १४३
पैं स्थूलदृष्टि देखती मातें । तेंचि न देखणें जाण निरुतें ।
जैसें स्वप्नीचेनि अमृतें । अमरा नोहिजे ॥ १४४

एऱ्हवीं स्थूलदृष्टि मूढ । मातें जाणती कीर दृढ ।
परी तें जाणणेंची जाणणेया आड । रिगोनि ठाके ॥ १४५
जैसा नक्षत्राचिया आभासा-। साठीं घातु झाला तया हंसा ।
माजी रत्नबुद्धीचिया आशा । रिगोनियां ॥ १४६
सांगे गंगा या बुद्धि मृगजळ । ठाकोनि आलियाचें कवण फळ ।
काय सुरतरु म्हणोनि बाबुळ । सेविली करी ॥ १४७
हार निळयाचाचि दुसरा । या बुद्धि हातु घातला विखारा ।
कां रत्नें म्हणोनि गारा । वेंची जेवी ॥ १४८
अथवा निधान हे प्रकटलें । म्हणोनि खदिरांगार खोळे भरिले ।
कां साउली नेणतां घातलें । कुहां सिहें ॥ १४९
तेंवी मी म्हणोनि प्रपंचीं । जिहीं बुडी दिधली कृतनिश्चयाची ।
तिहीं चंद्रासाठीं जेंवी जळींची । प्रतिमा धरिली ॥ १५०
तैसा कृतनिश्चय वायां गेला । जैसा कोणी एकु कांजी प्याला ।
मग परिणाम पाहों लागला । अमृताचा ॥ १५१
तैसें स्थूलाकारीं नाशिवंतें । भरंवसा बांधोनि चित्तें ।
पाहती मज अविनाशातें । तरी कैचा दिसे ॥ १५२
अगा काइ पश्चिमसमुद्राचिया तटा । निगिजत आहे पूर्वेलिया वाटा ।
कां कोंडा कांडितां सुभटा । कणु आतुडे ॥ १५३
तैसें विकारले हें स्थूळ । जाणितलेया मी जाणवतसें केवळ ।
काइ फेन पितां जळ । सेविलें होय ॥ १५४
म्हणोनि मोहिलेनी मनोधर्में । हेंचि मी मानूनि संभ्रमें ।
मग येथींचों जियें जन्मकर्में । तियें मजचि म्हणती ॥ १५५
येतुलेनि अनामा नाम । मज अक्रियासी कर्म ।
विदेहासि देहधर्म । आरोपिती ॥ १५६
मज आकारशून्या आकारू । निरुपाधिका उपचारू ।
मज विधिवर्जिता व्यवहारू । आचारादिक ॥ १५७
मज वर्णहीना वर्णु । गुणातीतासी गुणु ।
मज अचरणा चरणु । अपाणिया पाणी ॥ १५८

मज अमेया मान । सर्वगतासी स्थान ।
जैसें सेजेमाजीं वन । निदेला देखे ॥ १५९
तैसें अश्रवणा श्रोत्र । मज अचक्षूसी नेत्र ।
अगोत्रा गोत्र । अरूपा रूप ॥ १६६
मज अव्यक्तासी व्यक्ति । अनार्तासी आर्ती ।
स्वयंतृप्ता तृप्ति । भाविती गा ॥ १६१
मज अनावरणा प्रावर्ण । भूषणातीतासी भूषण ।
मज सकळकारणा कारण । देखती ते ॥ १६२
मज सहजातें करीती । स्वयंभातें प्रतिष्ठिती ।
निरंतरातें आव्हानिती । विसर्जिती गा ॥ १६३
मी सर्वदा स्वतःसिद्धु । तो कीं बाळ तरुण वृद्धु ।
मज एकरूपा संबंधु । जाणती ऐसे ॥ १६४
मज अद्वैतासी दुजें । मज अकर्तयासी काजें ।
मी अभोक्ता कीं भुंजे । ऐसें म्हणती ॥ १६५
मज अकुळाचें कुळ वानिती । मज नित्याचें निधनें शिणती ।
मज सर्वांतरातें कल्पिती । अरि मित्र गा ॥ १६६
मी स्वानंदाभिरामु । तया मज अनेक सुखाचा कामु ।
आघवाची मी असे समु । कीं म्हणती एकदेशी ॥ १६७
मी आत्मा एक चराचरीं । म्हणती एकाचा कैपक्ष करी ।
आणि कोपोनि एकातें मारी । हेंचि वाढविती ॥ १६९
किंबहुना ऐसे समस्त । जे हे मानुष धर्म प्राकृत ।
तयाचि नांवें मी, ऐसें विपरीत । ज्ञान तयांचें ॥ १६९
जंव आकारु एक पुढां देखती । तंव हा देव येणें भावें भजती ।
मग तोचि विघडलिया टाकिती । नाहीं म्हणोनी ॥ १७०
मातें येणें येणें प्रकारें । जाणती मनुष्य ऐसेनी आकारें ।
म्हणउनी ज्ञानाचे तें आंधारें । ज्ञानासि करी ॥ १७१

**हा उतारा मोठा झाला परंतु तो मुद्दाम घेतला आहे. त्यावरून मूर्तिपूजा, सगुणोपासना व त्यांशीं संबंध असलेली भक्ति ( आणि सामान्य लोक हिलाच भक्ति समजतात ) यांविषयीं ज्ञानदेवाचा अभिप्राय स्पष्ट होतो. आतां आणखी**

**एक उतारा देतों. हा तेराव्या अध्यायांतील आहे व "अज्ञानं यदतोन्यथा" या पदावरील टीकेंत आहे. ही टीका विस्तृत आणि स्वतंत्र अशी आहे. पुढील उताऱ्यावरून भक्तीच्या रूढ कल्पनासंबंधीं ज्ञानदेवाची भूमिका स्पष्ट होते.**

आणि माझ्या ठायीं भक्ति । फलालागीं जया आर्ती ।
धनोद्देशें विरक्ति । नटणें जेवीं ॥ ८०८
ना तरी कांताच्या मानसीं । रिगोनि स्वैरिणी जैसी ।
राहाटे जारेंसीं । जावयालागीं ॥ ८०९
तैसी माते किरीटी । भजती गा पाउटीं ।
करोनि जो दिठी । विषो सूये ॥ ८१०
आणि भजिन्निलियासवे । तो विषो जरी न पावे ।
तरी सांडी म्हणे आघवें । टवाळ हें ॥ ८११
कुणबट कुळवाडी । आन आन देव मांडी ।
आदिलाची परवडी । करी तया ॥ ८१२
तया गुरुमार्गा टेके । जयाचा सुगरवा देखे ।
तरी तयाचा मंत्र शिके । येरु नेघे ॥ ८१३
प्राणिजातेसी निष्ठुरु । स्थावरी बहु भरु ।
तेवींचि नाहीं एकसरू । निर्वाहो जया ॥ ८१४
माझी मूर्ति निफजवी । ते घराचे कोनीं बैसवी ।
आपण देवोदेवी–। यात्रे जाय ॥ ८१५
नित्य आराधन माझें । काजीं कुळदेवता भजे ।
पर्वविशेषें कीजे । पूजा आना ॥ ८१६
माझें अधिष्ठान घरीं । आणि वोसे आनाचे करी ।
पितृकार्यावसरीं । पितरांचा होय ॥ ८१७
एकादशीच्या दिवशीं । जेतुला पाडु आम्हांसी ।
तेतुलाची नागासी । पंचमीशी ॥ ८१८
चौथ मोटकी पाहे । आणि गणेशाचाचि होये ।
चाउदशी म्हणे माये । तुझाचि वो दुर्गे ॥ ८१९
नवमीतें मांडी । मग बैसे नवचंडी ।
आदित्यवारीं वाढी । बहिरवां पात्रीं ॥ ८२०

पाठीं सोमवार पावे । आणि बेलेंसी लिंगा धांवे ।
ऐसा एकलाचि आघवे । जोगावी जो ॥ ८२१
ऐसा अखंड भजन करी । उगा नोहे क्षणभरी ।
अवघेन गांवद्वारीं । अहेव जैसी ॥ ८२२
तैसेनि जो भक्तु । देखसी सैरा धांवतु ।
जाण अज्ञाना मूर्तु । अवतार तो ॥ ८२३

ज्या "भक्तमंडळी" चा पक्ष घेऊन आमची कित्येक सनातनी म्हणविणारीं माणसें वाग्युद्ध चालवितात तिची ज्ञानदेवांनीं ही अशी संभावना केली आहे. "गांवद्वारींची अहेव" म्हणजे गांवाच्या वेशीजवळ राहणारी वेश्या अशी संज्ञा अशा "भक्तांना" दिलेली आहे. ज्याला लौकिकांत धर्म म्हणतात, ज्ञानदेवासारखे अद्वैती आणि महाज्ञानी झाले तरी या लौकिक धर्माचा त्यांनीं कधीं अव्हेर केला नाहीं असें ज्यासंबंधीं भिंगारकर आणि पांगारकर सांगतात त्या लौकिक धर्मावर केलेला हा भडिमार पाहून आगरकरासारख्या सुधारक वीराचें मस्तकही ज्ञानदेवापुढें नम्र होईल. आणि अशा प्रकारें शुद्ध धर्माचा, शुद्ध कर्तव्यमार्गाचा प्रसार करण्याचें कंकण ज्यांनीं बांधलें होतें, समाजांतील अज्ञान आणि ढोंग यांचें निर्मूलन करण्याचें व्रत ज्यांनीं स्वीकारलें होतें त्यांच्या कित्येक अभंगांत या व्रताशीं विपरीत असा अर्थ असला तर ते अभंग त्यांचे नव्हेत हें म्हणण्याशिवाय मार्ग कोणता उरला ? ज्ञानदेव एक होते कीं दोन होते हा प्रश्न देखील वरील विरोधानें खरोखर उत्पन्न झालेला आहे हें भिंगारकरबोवांनाही मान्य आहे. आणि हा विरोध अतिशय जबरदस्त आहे. नामदेवाला ज्ञानदेवाची भूमिका पटण्यासाठीं गुरु करून घ्यावा लागला हें सुप्रसिद्ध आहे आणि ज्ञानदेव हा "आमच्यासारखा" च म्हणजे खात्री पटली आहे एका प्रकारची पण प्रत्यक्ष वर्तन करतो दुसऱ्या प्रकारचें या वर्गांतील होता असें म्हणणारे ज्ञानदेवावर मोठी आग पाखडत आहेत हें स्पष्ट आहे. ज्ञानदेवाच्या नांवावर विकणारे आणि त्याच्या सुंदर तत्वज्ञानाशीं विसंगत असणारे अभंग त्याच्या नांवावर कोणी तरी "सैरा धांवतु" भक्तमणीनें दडपले असले पाहिजेत हीच गोष्ट यावरून सिद्ध होते. ही गोष्ट जे मान्य करीत नसतील ते अप्रत्यक्षपणें ज्ञानदेव दोन झाले या उपपत्तीला मान्यता देतात असें म्हणणें प्राप्त आहे.

४ याप्रमाणें ज्ञानदेव दोन असावेत ही उपपत्ति मान्य करणें आम्हांस योग्य वाटत नाहीं. अर्थात् त्यामुळें निरनिराळे पितृवंश वगैरे गोष्टींत शिरण्याचें प्रयोजनच उरत नाहीं. शिवाय या गोष्टीं केवळ अनुमानावर उभारलेल्या दिसतात; ज्याला कांहीं तरी प्रत्यक्ष म्हणतां येईल असा पुरावा उपलब्ध होईपर्यंत ज्ञानदेवाचे वडील आपेगांवाहून आळंदीला आले ही आज शेंकडों वर्षें लोकप्रसिद्ध असलेली कथाच वस्तुस्थितिनिदर्शक समजली पाहिजे. नामदेव किती होते हा वाद ज्ञानदेवचरित्रांत घालण्याची आवश्यकता नाहीं. आणि शिवाय आपेगांवकर व आळंदीकर असे दोन ज्ञानदेव नव्हते हें मान्य केल्यावर ज्ञानदेवाचा विशिष्ट मित्र नामदेव हा ज्ञानदेवचरित्रांत एकच असणार हें उघड आहे. त्याखेरीज जर कोणी नामदेव झाले असतील—आणि नामदेव नांवाचे कवि एकाहून अधिक म्हणजे निदान दोन तरी होऊन गेले असें दिसतें-तर त्यांचा ज्ञानदेवांशीं संबंध नाहीं. शुद्धिपत्राच्या वादाच्या बाबतींत असें म्हणावें लागतें कीं पैठणच्या ब्राह्मणांनीं दिलेलें म्हणून जें संस्कृत भाषेंत लिहिलेलें शुद्धिपत्र प्रसिद्ध आहे त मागाहून कोणीतरी तयार केलेलें आहे. निवृत्ति ज्ञानदेव यांना शुद्धिपत्र मिळालें नाहीं, त्यांनीं मुंजी केल्या नाहींत ही गोष्ट स्पष्ट आहे. " हरिचिंतन करून असावें " या संदेशाला शुद्धिपत्र म्हणतां येत नाहीं. शुद्धिपत्र मिळत नाहीं तर काय करावयाचें या प्रश्नाला तें उत्तर आहे. " हरिचिंतन करावें " असें सांगणें किंवा " लग्नकार्य करूं नका " असें सांगणें याला शुद्धिपत्र म्हणत नाहींत. त्या वेळच्या ब्राह्मणसमाजाच्या दृष्टीनें हीं चार भावंडें ब्राह्मणांच्या सोळा संस्काराला पात्र आहेत कीं नाहींत हा प्रश्न होता व त्याला उत्तर पैठणच्या ब्राह्मणांनी " नाहीं " असें स्पष्ट दिलें. तेव्हांच्या परिस्थितींत आणि प्रचलित असलेल्या धार्मिक नियमाप्रमाणें आणि रूढीप्रमाणें पैठणच्या काय किंवा कुठल्याही काय शास्त्रीपंडितांना दुसरा निर्णय देणें शक्य नसेल असेंही म्हणतां येईल. पण या चार भावंडांच्या " अलौकिक "-पणाची साक्ष पटूनही, डोळे दिपून गेले होते तरीसुद्धां, त्यांना शुद्धिपत्र मिळालें नाहीं ही गोष्ट विसरून चालणार नाहीं.

ज्ञानदेवांच्या चरित्रांत सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे त्यांनीं केलेले "अलौकिक" चमत्कारही नव्हे किंवा त्यांना न मिळालेलें शुद्धिपत्र ही नव्हे. संस्कृत भाषेतील ज्ञानभांडार सामान्य जनतेला खुलें नव्हतें; त्याच्या किल्ल्या

पंडितांच्या हातीं होत्या. तें भांडार फोडून त्यांतील उच्च ज्ञान सर्व लोकांना मोकळें करून देण्याची कामगिरी ज्ञानदेवांनीं केली व त्यामुळें तेव्हांच्या "क्षेत्रस्थ" ब्रह्मवृंदांना क्रोध यावा हें साहजिक होतें. ज्ञानदेव जरी संन्याशाची संतति नसते तरी स्त्रीशूद्रादिकांना ब्रह्मविद्येची देणगी दिल्याबद्दल आणि तांत्रिक धर्मांच्या बळावर उदरपोषण करणाऱ्यांच्याकडे गेल्याशिवाय जन्माचें सार्थक होऊं शकतें व मोक्ष मिळूं शकतो हें सर्व दुनियेला जाहीर केल्याबद्दल त्यांच्यावर हा क्रोध कोसळलाच असता. ज्ञानेश्वरीच्या कर्त्यावर कुभांड रचण्याला "तो संन्याशाचा पोर आहे" हें केवळ निमित्तमात्र कारण होतें; वास्तविक प्रचलित तांत्रिक धर्माला व त्याच्या "वृत्ती" ला ज्ञानदेवांच्या "अवतारा"मुळें जबरदस्त धक्का बसला यांत शंका नाहीं. हा धक्का ज्ञानदेवांनीं मोठ्या सहृदयपणानें व कधीं कधीं कोमलपणानें दिलेला आहे. ते खरे विवेकी असल्यामुळें, धर्मसमजुती स्थलकालावलंबी, वयोविद्यावलंबी असतात हें त्यांना माहीत होते आणि म्हणून त्यांनीं कोणाचाही (लबाड होते त्याखेरीज कोणाचाही) धिक्कार केला नाहीं. आगरकरांना ज्याप्रमाणें अज्ञान लोकांची करुणा येई, त्यांच्या अज्ञानाबद्दल त्यांना दुःख होई, त्याचप्रमाणें ज्ञानदेवांना अज्ञानी जनांची करुणा आली. पण दोघांनींही अज्ञानी लोकांना अज्ञानांत ठेवणाऱ्यांचा पूर्ण समाचार घेतलेला आहे; आणि ज्ञानदेवाचा "संत" करणाऱ्यांनीं ही गोष्ट झाकून ठेविली आहे. उच्च ज्ञान प्रकट करतांना सुद्धां लौकिक समजुती म्हणजे अज्ञान यांचा निषेध करावयाचा नाहीं हें एका कालच्या "जुन्या" पक्षाचें व्रत होतें. त्या व्रताला अनुकूल अशी ज्ञानदेवांची साक्ष सांगण्याचा प्रकार लबाडीचा नसेल कदाचित् पण पोरकटपणाचा निःसंशय आहे आणि ज्ञानेश्वरीचें वाचन करणारे सुजाण लोक त्यामुळें फसण्याचा संभव नाहीं.

पंढरपूर व ज्ञानदेव यांचा संबंध काय होता, किती होता यासंबंधीं निर्णयात्मक सांगणें कठीण आहे, पण जो संबंध नामदेव व पंढरपूरचा विठ्ठल यांच्यांत होता तो ज्ञानदेवांच्या बाबतींत नव्हता एवढें नक्की म्हणतां येईल. नामदेव बऱ्याच काळपर्यंत सगुण भक्तीला साध्य समजत होता, तींतील गोडी व रस (व हे दोन्हीही इंद्रियविषय आहेत) यांचा मोह त्याला जबरदस्त होता, व तो तसा असावा यांत मनुष्यस्वभावाला विरुद्ध असें कांहीं नाहीं.

पण इंद्रियविषयांच्या मोहाला मार्गे सारून वस्तूचें शुद्ध ज्ञान करून घेणें व तदनुसार वागणें याला माणुसकी म्हणतात, यालाच इंद्रियजय म्हणतात, यालाच योग म्हणतात. तो ज्ञानदेवांनीं प्राप्त करून घेतला होता. सगुण भक्ति ही साधनरूप असल्यानें तिचा कटु शब्दांत त्यांनीं धिक्कार केलेला नाहीं, पण वस्तुस्वरूप काय हें सांगतांना त्यांनीं भीडभाडही ठेविली नाहीं व कटु नसले तरी कडक शब्दांचा भडिमार करण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं. अकराव्या अध्यायांत अर्जुनाला विश्वरूप दर्शन दिल्यावर तें स्वरूप पाहून अर्जुन भ्याला. त्या वेळच्या प्रसंगाचें वर्णन या संबंधांत फार उद्बोधक होईल म्हणून त्यांतील कांहीं उतारे येथें देतों. अर्जुनानें हात जोडून प्रार्थना केली कीं कृष्णा, तुझें चतुर्भुज कोमल रूप मला दाखव.

> किंबहुना स्वामी । तें देखावयां उत्कंठित पां मी ।
> म्हणोनि आतां तुम्ही । तैसेया होवावें ॥ ६०५
> हे विश्वरूपाचे सोहळे । भोगूनि निवाले जी डोळे ।
> आतां होताति आंधळे । कृष्णमूर्तिलागीं ॥ ६०६
> ते साकार कृष्णरूपडें । वांचोनि पाहों नावडे ।
> तें न देखतां थोडें । मानिताति हे ॥ ६०७
> आम्हां भोगमोक्षाचिया ठायीं । श्रीमूर्तिवांचूनि नाहीं ।
> म्हणोनि तैसाचि साकारु होई । हें सांवरीं आतां ॥ ६०८

अशा प्रकारें विश्वरूपाला घाबरून साकार, गोंडस, मोहक कृष्णरूप पुनः धारण करण्याबद्दल अर्जुनानें विनंति केली. त्याच्यावर दिलेलें उत्तर ज्ञानदेवांच्या शब्दांत वाचावें म्हणजे या महाराष्ट्रकविकुलगुरूचें व तत्त्वज्ञाचें या बाबतींतील मत स्पष्ट होतें.

> या अर्जुनाचिया बोला । विश्वरूपा विस्मयो जाहला ।
> म्हणे ऐसा नाहीं देखिला । धसाळ कोणी ॥ ६०९

अर्जुनाला दिलेलें "धसाळ" विशेषण लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. श्रीकृष्ण म्हणतातः—

> कोण हे वस्तु पावला आहासी । तया लाभाचा तोषु न घेसी ।
> मा भेणें काय नेणों बोलसी । हेकाडु ऐसा ॥ ८१७

"कोणती विलक्षण गोष्ट तुला प्राप्त झालेली आहे, तिचा लाभ झाल्याबद्दल तुला आनंद व्हावा (तो तर दूर राहिला) पण उलट भयानें गांगरल्यामुळें तूं काय बोलतो आहेस हें देखोल तुला समजत नाहीं असें दिसतें. एवढा हेकाडा कसा झालास?" "धसाळ" नंतर "हेकाडु" या विशेषणाचा प्रसाद अर्जुनाला मिळाला. केवळ अर्जुनावरच्या प्रेमामुळे हें "गुह्याद्गुह्यतर" असें आत्मस्वरूप श्रीकृष्णानें प्रकट केलें. तेंच रूप वस्तुरूप आहे आणि त्याच्या प्राप्तीसाठीं, तें समजावें म्हणून, मोठमोठ्या लोकांचे आटोकाट प्रयत्न चालतात.

ऐसी काय नेणों तुझिये आवडी । जाहली प्रसन्नता आमुची वेडी ।
म्हणोनी गौप्याचीही गुढी । उभविली जगीं ॥ ६१३
हे तें अपारां अपार । स्वरूप माझें परात्पर ।
एथोनि ते अवतार । कृष्णादिक ॥ ६१४
हे ज्ञानतेजाचें निखिळ । विश्वात्मक केवळ ।
अनंत हें अढळ । आद्य सकळां ॥ ६१५
हें तुजवांचोनि अर्जुना । पूर्वीं श्रुत दृष्ट नाहीं आना ।
जें जोगें नव्हे साधना । म्हणोनिया ॥ ६१६
याची सोय पातले । आणि वेदीं मौनचि घेतलें ।
याज्ञिकही माघौते आले । स्वर्गौनिया ॥६१७
साधकीं देखिला आयासु । म्हणोनि वाळिला योगाभ्यासु ।
आणि अध्ययनें सौरसु । नाहीं येथ ॥ ६१८

म्हणून श्रीकृष्ण सांगतात:—

म्हणोनि विश्वरूपलाभे श्लाघ । येथींचें भय नेघ नेघ ।
हेंवांचोनि अन्य चांग । न मनीं कांहीं ॥ ६२३
हां गा समुद्र अमृताचा भरला । आणि अवसांत वरपडा जाहला ।
मग कोणीही आथी वोसंडिला । बुडिजेल म्हणोनी ॥६२४
तैसें ऐश्वर्य हें महातेज । आजि हातां आलें आहे सहज ।
कीं येथ तुज गजबज । होवावी कां ॥ ६२८
परी नेणसीच गांवढिया । काय कोपों आतां धनंजया ।
आंग सांडोनि छाया । आलिंगितोसी मा ॥ ६२९

" गांवढिया " म्हणजे गांवढळ हें आणखी एक विशेषण श्रीकृष्ण अर्जुनाला देतात. " तुझ्यावर रागावण्यांत देखील अर्थ नाहीं इतका तूं वेडा आहेस " असें त्याला ते सांगतात आणि विचारतातः—

हें नव्हे जो मी साचें । एथ मन करूनिया काचें ।
प्रेमें धरिसी अवगणियेचें । चतुर्भुज जें ॥ ६३०

हें जें माझें खरें स्वरूप आहे तें खरें नव्हे असें म्हणतोस; या खऱ्या स्वरूपाला पहातांना मन घट्ट करावयाचें तें तूं कच्चें, भित्रें करतोस आणि माझें जें हें नाटकी, वरवरचें चतुर्भुज ( सगुण ) स्वरूप त्या ठिकाणीं प्रेम ठेवतोस ? गांवढळ अगदीं तूं !

तरी आझुनिवरी पार्था । सांडीं सांडीं हें व्यवस्था ।
इयेंविषयीं आस्था । करिसी झणीं ॥ ६३१
हें रूप जरी घोर । विकृति आणी थोर ।
तरी कृतनिश्चयाचें घर । हेंचि करी ॥ ६३२

याच रूपावर निष्ठा ठेव. कारण चतुर्भुज ( सगुण ) रूप केवळ " बाह्य सख्यसुखापुरतें " आहे; पण त्यांत खरी अंतरंगांतील मौज नाही. म्हणून

जे इयें रूपाहूनि सद्भावा । नेदावें निघों ॥

या दिलेल्या ओव्यावरून मूळ साध्या श्लोकावर टीका करतांना ज्ञानदेवांच्या शब्दांत अर्जुनावर जे कोरडे श्रीकृष्णानें ओढलेले आहेत त्यांचा एकच अर्थ होतो; कीं ज्ञानदेव वस्तुज्ञानाला अत्यंत महत्त्व देतात. तेव्हां असा थोर पुरुष केवळ आंधळ्या भक्तीचा पाइक होईल हें शक्यच नाहीं. किंबहुना ज्ञानदेवापासून तुकारामापर्यंत महाराष्ट्रीय संतकवि सगुणाची मर्यादा जाणणारे व ठेवणारे होते. त्याचें अमर्याद स्तोम त्यांनीं केव्हांही माजविलें नाहीं. ज्ञानदेवांचा ग्रंथ पंढरपूरच्या यात्रेकरूंनीं शिरोधार्य केला पण ज्ञानदेव या यात्रेकरूपेक्षां किंबहुना पंढरपूरच्या देवाच्या लाडक्या नामदेवापेक्षां फार पुढें गेलेले होते ही गोष्ट उघड आहे व तशी कबुली नामदेवादिकच देतात. " ज्ञानियांचा राजा " " श्रीज्ञानराज भगवान् " अशा तऱ्हेचीं स्तुतिकुसुमें मराठी कवींनीं एकट्या ज्ञानदेवावरच उधळलेलीं आहेत. अशा ज्ञानदेवाला केवळ " टाळकुट्या " बनविण्याचा मोह जरी पुष्कळ वेळां पडला तरी तो आवरला पाहिजे. पंढरपूरचें देउळ ज्ञानदेवापूर्वी होतें पण पुढें त्याला विलक्षण महत्व ज्ञानदेवामुळें चढलें व सतराव्या शतकांत शूद्र-कवि

म्हणून कोणी उपहासानें व कोणी प्रेमानें ज्याला संबोधिलें आहे त्या तुकारामाची अभंगवाणी महाराष्ट्रांत खेळली तेव्हां तर पंढरपूर ही महाराष्ट्र-धर्माची राजधानी झाली. जेथें जेथें मराठी भाषा बोलतात तेथें तेथें "ज्ञानदेव तुकाराम" हे शब्द तार स्वरानें ऐकूं येतात. म्हणून आजकालचे पंढरपूर ज्ञानदेवाचें आहे; पण त्या काळीं, तेराव्या शतकांत, ज्ञानदेव नामदेवाप्रमाणें सर्वस्वी पंढरपूरचे होते असें म्हणणें धारिष्ट्याचें होईल. ज्ञानदेव नाथपंथी होते, योगमार्गी होते, अद्वैतानुयायी होते, केवळ टाळकुटीवर भरंवसा ठेवणारे नव्हते, केवळ नामस्मरणाचें स्तोम माजविणारे नव्हते, तर

तैसें हृदयींचेनि ज्ञानें । जियें देहीं उमटतीं चिन्हें ।

यावर पूर्ण विश्वास ठेवणारे होते. अंतःकरणांतील ज्ञानाचीं चिन्हें देहीं, दैनंदिन आचरणांत उतरलीं पाहिजेत हा त्यांचा स्पष्ट अभिप्राय होता. Doctrine पेक्षां works ला ते महत्व देत; पंथाच्या शिक्क्यापेक्षां आचरणाच्या शुद्धपणाला ते मान देत. आणि त्या शुद्धपणाचा पाया सदा आणि सर्वत्र "सर्वांभूतीं परमेश्वर पाहून सर्वत्र समत्व ठेवणें" हा होता. दुष्टांनांही ते मूर्ख समजत आणि मूर्खपणा ज्ञानाच्या प्रभावानें जातो या तत्त्वाचा त्यांनीं प्रचार केला. सिद्ध पुरुषाचें पुढील रसरशीत, आश्चर्यकारक वर्णन पहा--

तैसा आत्मत्वें वेष्टिला होये । तो जया जया दृश्यातें पाहे ।
तें दृश्य द्रष्टेपणेंसीं होत जाये । तयाचेंचि रूप ॥ १८-४१०

याच्यावर व्याख्या करणें म्हणजे निराळा ग्रंथ लिहिला पाहिजे. जाणते जाणतातच.

५ वस्तुज्ञान झाल्यानंतर रूढ धर्माचा म्हणजे रूढीवर अवलंबून असणाऱ्या धर्माचा म्हणजे धर्माचीं मूलतत्वें कित्येक बाबतींत (आणि एखादे वेळीं बहुतेक किंवा सर्व बाबतींत) विसरलेल्या धर्माचा, जो ज्ञानी पुरुष "ज्ञान हें आचरणावरून प्रत्ययाला येतें" या तत्त्वाचा डांगोरा पिटतो तो पुरस्कार करील कां? कां जेथें जेथें अज्ञान दिसेल, निर्दयत्व दिसेल तेथें तेथें तो हल्ला करून त्याचें निर्मूलन करील? या प्रश्नांचीं उत्तरें अगदीं उघड आहेत. तेव्हां ज्ञानदेव ज्ञानी झाले तरी रूढ धर्माला धक्का लावण्यास तयार नव्हते, त्यांनीं रूढ धर्माला उचलूनच धरले इत्यादि गोष्टी बोलणें हें व्यर्थ आहे. त्याचप्रमाणें त्यांनीं आपल्या काळीं रूढ धर्मांतील अन्याय्य गोष्टींबद्दल जें बंड केलें तें अगदीं

आजच्यासारखेंच होतें या म्हणण्यांतही अर्थ नाहीं. म्हणून एकनाथांना अस्पृश्यतानिवारक मंडळाचे सभासद करणें व ज्ञानदेवांना "माणुसकी"च्या विसाव्या शतकांतील नव्या धर्माची दीक्षा देण्याचा भास उत्पन्न करणें अशा गोष्टींची "अव्यापारेषु व्यापारां"तच गणना करणें प्राप्त आहे. आत्मरूपज्ञान झाल्याखेरीज समत्व येत नाहीं. स्वार्थबुद्धि आणि वर्गकलह या तत्त्वांचा पुरस्कार करणाऱ्यांनीं समत्वाच्या गोष्टी बोलण्यांत अर्थ नाहीं. वर्गावर्गांत, देशांदेशांत, द्वेष वाढविणें म्हणजे समत्व नव्हे हें स्पष्टच आहे. समत्व ही मनाची वृत्ति आहे; ती ज्ञानानें प्राप्त होते व आचरणांत प्रतीतीला येते. ती वृत्ति जितकी अधिक माणसांच्या ठिकाणीं येईल तितकी जगांत खरी समता वाढेल; नाहीं तर फक्त विषमतेचें एक नांव जाऊन तिला दुसरें नांव येईल. या बाबतींत पुढील ओव्या मनन करण्यासारख्या आहेत. त्या निरनिराळया पक्षाच्या, मताच्या, लोकांनीं निर्विकार अंतःकरणानें वाचाव्या, समजून घ्याव्या, आणि मग ज्ञानदेवांचें म्हणणें काय होतें हें त्यांना उत्तम प्रकारें समजेल. या ओव्या ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायांतून घेतलेल्या आहेत आणि त्यांत "माझा भक्त" म्हणजे सर्वत्र समदृष्टीनें पाहणारा हा कोणत्याही जातीचा किंवा धंद्याचा असला तरी उत्तम आहे असें प्रतिपादन केलेलें आहे.

तो मी पुससी कैसा । तरी जो सर्वांभूतीं सदा सरिसा ।
जेथ आपपरु ऐसा । भागु नाहीं ॥ ४०७

जे ऐसिया माते जाणोनि । अहंकाराचा कुरुठा मोडोनी ।
जे जीवकर्मेंकरूनी । माते भजले ॥ ४०८

ऐसें भजतेनि प्रेमभावें । जयां शरीरही पाठीं न पवे ।
तेणें भलतया व्हावें । जातीचिया ॥ ४१५

अगा कुळाचिया चोखटपणा न लगा । आभिजात्य झणें श्लाघा ।
व्युत्पत्तीचा वाउगा । सोसु कां वहावा ॥ ४३१

कां रूपवयसा माजा । आथिलेपणें कां गाजा ।
एक भाव नाहीं माझा । तरी पाल्हाळ तें ॥ ४३२

म्हणूनि कुळ उत्तम नोहावें । जाती अंत्यजही व्हावें ।
वरि देहाचेनि नांवे । पशूचेंही लाभो ॥ ४४१

पाहें पां सावजें हातिरूं धरिलें । तेणें तया काकुळती मातें स्मरिलें ।
कीं तयाचें पशुत्व वावो जाहलें । पावलिया मातें ॥ ४४२

**'मातें पावणें'' म्हणजे काय याची स्पष्ट व्याख्या वर ओवी ४०८ यांत झालेली आहे. तेंच पुढील ओव्यांत आणखी स्पष्ट करतात:—**

अगा नांवें घेतां वोखटीं । जे आघवेया अधमाचिये शेंवटीं ।
तिये पापयोनींही किरीटी । जन्मले जे ॥ ४४३
ते पापयोनि मूढ । मूर्ख जैसे कां दगड ।
परि माझ्याठायीं दृढ । सर्वभावे ॥ ४४४
जयांचिये वाचे माझे आलाप । दृष्टी भोगी माझेचि रूप ।
जयांचें मन संकल्प । माझाचि वाहे ॥ ४४५
माझिया कीर्तीविण । जयांचे रिते नाहीं श्रवण ।
जया सर्वांगीं भूषण । माझी सेवा ॥ ४४६
जयांचें ज्ञान विषो नेणे । जाणीव मज एकातेंचि जाणें ।
जया ऐसें लाभे तरी जिणें । एऱ्हवीं मरण ॥ ४४७
ऐसा आघवाचि परी पांडवा । जिहीं आपुलिया सर्वभावा ।
जियावयालागीं ओलावा । मीचि केला ॥ ४४८
ते पापयोनीही होतु का । ते श्रुताधीतही न होतु कां ।
परि मजसी तुकितां तुका । तुटी नाहीं ॥ ४४९

**आणि आतां समत्व कसें व कां उत्पन्न होतें याचें वर्णन करणाऱ्या कांहीं ओव्या लक्ष्यांत ठेवण्यासारख्या आहेत.**

राजाज्ञेचीं अक्षरे आहाती । तियें चामा एका जया पडती ।
तया चामासाठीं जोडती । सकळ वस्तु ॥ ४५३
वांचूनि सोनें रुपें प्रमाण नोहे । एथ राजाज्ञाचि समर्थ आहे ।
तेंचि चाम एक जै लाहे । तेणें विकती आघवीं ॥ ४५४
तैसें उत्तमत्व तैंचि तरे । तैंचि सर्वज्ञता सरे ।
जैं मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें ॥ ४५५
म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा अकारण ।
एथ अर्जुना माझेंपण । सार्थक एक ॥ ४५६

जैसे तंवचि वहाळ वोहळ । जंव न पवती गंगाजळ ।
मग होऊनि ठाकती केवळ । गंगारूप ॥ ४५८
कां खैर चंदन काष्ठें । हे विवंचना तंवचि घेटे ।
जंव न घापती एकवटे । अग्नीमाजीं ॥ ४५९
तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया ।
जाती तंवचि वेगळालिया । जंव न पवती मातें ॥ ४६०

ब्राह्मणांचेंही स्तुतिपर वर्णन ज्ञानदेवांनीं याच पुढील श्लोकावरील टीकेंत केलेलें आहे. मुळांत फक्त "ब्राह्मण" शब्द आहे. पुढील ओव्यांत केलेलें वर्णन ज्यांना लागू पडतें ते ज्ञानदेवांच्या मतें ब्राह्मण.

मग वर्णामाजीं छत्रचामर । स्वर्ग जयांचे अग्रहार ।
मंत्रविद्येसी माहेर । ब्राह्मण जे ॥ ४७५
जे पृथ्वीतळींचे देव । जे तपोवतार सावयव ।
सकळ तीर्थांसि दैव । उदयलें जे ॥ ४७६
जेथ अखंड वसिजे यागीं । जे वेदांची वज्रांगी ।
जयांचिये दिठीचिया उत्संगीं । मंगळ वाढे ॥ ४७७
जयांचिये आस्थेचेनि वोले । सत्कर्म पाल्हाळीं गेलें ।
संकल्पें सत्य जियालें । जयांचेनि ॥ ४७८

वृत्तीसाठीं म्हणजे विधींच्यामुळें मिळणाऱ्या उत्पन्नासाठीं किंवा नोकरीचाकरीसाठीं खटपट लटपट करणारे ते या वरील वर्णनाचा विषय होऊं शकत नाहींत हें उघड आहे. म्हणजे उदरभरणासाठीं खटपटी करणें यांत गैर आहे असें नव्हे; तर वैश्य धर्माची किंवा शूद्र धर्मांची कास धरून पुनः आपण उच्चवर्णीय म्हणून मिरवणें व वैश्यशूद्रांना हीन लेखणें हें मात्र सर्वस्वीं गैर आहे यांत शंका नाहीं.

तेराव्या शतकांतील परिस्थिति लक्षांत घेऊन ज्ञानदेवांच्या कार्याचा विचार करावा व त्या कार्यापासून आज आपल्यापुढें कठीण प्रश्न पडले आहेत ते सोडविण्याला स्फूर्ति मिळवावी. पण तेव्हांचे शब्द व आजचे शब्द यांचे विशिष्ट अर्थ ओळखावेत, त्यांची घालमेल करून घोटाळा उत्पन्न करूं नये. ज्ञानदेव हे भूतदयेचे पुरस्कर्ते होते व जग सुधारणें, अधिक चांगलें करणें, म्हणजे भूतदयाच

कोणत्या ना कोणत्या तरी रूपांत निःस्वार्थपणें आचरणें असें त्यांचें तत्त्व होतें. स्वार्थाच्या पायावर रचलेली तत्त्वें किती जरी गोंडस असलीं तरी केवळ त्यांचाच अभ्यास किंवा आचरण करणाऱ्यांना ज्ञानदेवाच्या शिकवणीचें रहस्य कळणार नाहीं, आचरणाचें मर्म ध्यानांत येणार नाहीं. त्यांच्या सर्व कार्याचा पाया " निःस्वार्थ " ( हा आजचा शब्द आहे ) म्हणजे परमार्थ होता. परमार्थाचा परलोकांशीं संबंध नाहीं; आपल्याच या जगाशीं, या जीविताशीं संबंध आहे. तो परमार्थ केवळ विवेकवादीही मान्य करतात व तोच ज्ञानदेवांनीं विशद केलेला आहे. त्यांची शिकवण ही त्यांच्या ग्रंथांत आहे; आणि त्याच ग्रंथांत त्यांची अपरंपार, आश्चर्यकारक काव्यसंपदा भरली आहे. त्या दोहोंचेंही निदान विहंगमावलोकन करण्यापूर्वीं आपण त्यांनीं वर्णन केलेल्या योगमार्गाचा व त्यानंतर त्यांच्या अमृतानुभव या अपूर्व ग्रंथाचा परिचय करून घेऊं.

---

# भाग नववा

## योगमार्ग–पंथराज

तेथ प्रवृत्तितरूच्या बुडीं । दिसती निवृत्तिफळांचिया कोडी ।
जिये मार्गींचा कापडी । महेश अर्जुनी ॥ ६–१५२ ॥
पाठीं महर्षि येणें आले । साधकांचे सिद्ध जाहाले ।
आत्मविद् थोरावले । येणेंचि पंथे ॥ ६–१५६ ॥
हा मार्गु जैं देखिजे । तैं ताहान भूक विसरिजे ।
रात्रिदिवसु नेणिजे । वाटे इये ॥ ६–१५७ ॥

ज्ञानेश्वर स्वतः योगमार्गांत निष्णात होते आणि संन्यास तोच योग असें त्यांचें स्पष्ट मत होतें. विषयानुरोधानें भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायांत चार पांच श्लोक योगमार्गाचें वर्णन करतात; त्यांच्यावर भाष्य करतांना ज्ञानेश्वरींत या मार्गाचें सविस्तर विवेचन केलेलें आहे. त्याचा विचार आपण या स्वतंत्र भागांत करणें हितावह होईल. संस्कृतांत योगशास्त्रावर पातंजलाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. पण पातंजलानें सांगितलेल्या उपपत्तींत प्रयोगरूपानें नवीन पुष्कळ गोष्टींची भर पडली. योगमार्ग आचरण करण्याला सोपा नव्हे. शेंकडों निरनिराळ्या तंत्रांनीं आणि क्रियांनीं आणि शारीर व्यायामपद्धतींनीं भरलेला असा तो मार्ग बनलेला आहे. योगसामर्थ्याबद्दल आपल्या देशांत अनेक नवलकथा प्रसिद्ध आहेत व चमत्कार करून दाखविणें हें योगसिद्धीचें एक लक्षण आहे असें सर्वत्र समजतात. चमत्कार करून दाखविणें हें ज्ञानदेव गौण समजतात व योगमार्ग हा ब्रह्मसाक्षात्काराचा, जीवन्मुक्तीचा, मोक्षाचा मार्ग आहे असें त्यांचें म्हणणें आहे. योगमार्गाला त्यांनीं "पंथराजु" असें म्हटलें आहे. त्यावरून त्याबद्दल त्यांना किती आदर वाटत होता हें स्पष्ट आहे. महादेवाला योग्यांचा राणा समजतात. त्यालाही या मार्गीचा "कापडी" म्हणून ज्ञानदेवांनीं या मार्गाची थोरवी प्रकट केली आहे. स्वतःच्या गुरुपरंपरेचें वर्णन करतांना "महेशान्वयसंभूतें । निवृत्तिनाथसुतें ' असा त्यांनीं उल्लेख केला आहे. महेश म्हणजे महादेव हा सर्व योग्यांचा परात्पर

गुरू; त्याचा अन्वय म्हणजे वंश म्हणजे त्याची गुरुपरंपरा; त्या गुरुपरंपरेंत मच्छींद्रनाथ, गोरखनाथ, गैनीनाथ व पुढें निवृत्तिनाथ अशी मंडळी झाली व निवृत्तिनाथानें आपल्या भावंडांना योगमार्गाचा गुरूपदेश दिला. तेव्हां महेशान्वयसंभूत या पदाशीं "निवृत्तिनाथसुत" याचा अन्वय लावला म्हणजे निवृत्तिनाथशिष्य हाच अर्थ संभवतो; दुसरा अर्थ संभवत नाहीं हें स्पष्ट आहे. तर या योगपरंपरेंत ज्ञानदेव समाविष्ट झालें होतें व योगमार्गाचा निवृत्तिनाथांनीं व त्यांनीं यथासांग अभ्यासही केला होता. ज्ञानमार्ग व योग-मार्ग म्हणजे ज्ञानमार्ग आणि कर्ममार्ग–कर्मठपणाचा मार्ग नव्हे. कर्मठपणाचा मार्ग ज्ञानदेवांनाही मान्य नव्हता; व पूर्वकालापासूनही जैन किंवा बुद्ध यांचींहीं बंडें वास्तविक कर्मठ मार्गाविरुद्ध झालीं. पण ज्ञानेश्वरींत वर्णन केलेला योगमार्ग यालाच ज्ञानदेव खरोखर कर्ममार्ग समजतात. शब्दांच्या सारखेपणामुळें कर्म-मार्गाचा अर्थ कर्मठपणापासून तो आलीकडे टिळकांच्या कर्मयोगरहस्यापर्यंत बदलत गेला आणि शब्दाचा प्रयोग अनेकार्थत्वानें झाल्यामुळें त्यासंबंधीं निरनिराळ्या गैरसमजुतीही पुष्कळ पसरल्या. पण ज्ञान व भक्ति यांच्याशीं ज्याची तुलना करतात व यांच्याशीं ज्याचा कांहींसा निराळेपणा दाखविलेला आहे तो कर्ममार्ग म्हणजे योगमार्गच आहे. या मार्गाचें सविस्तर वर्णन ज्ञानदेवांनीं भावार्थदीपिकेच्या सहाव्या अध्यायांत विशेषेंकरून व इतरत्रही थोडेंबहुत केलेलें आहे.

सहाव्या अध्यायाच्या सुरवातीसच सांगितलें आहे:–कर्मापासून मिळणाऱ्या फळाचा आश्रय न करतां म्हणजे त्यावर दृष्टि न ठेवतां, त्याची फिकीर न करतां, कर्माचें फळ मिळेल या आशेनें कर्म करण्यास प्रवृत्त न होतां, जो कार्य म्हणजे केलेंच पाहिजे म्हणजे कर्तव्य असें कर्म करतो त्यालाच संन्यासी म्हणावयाचें आणि त्यालाच योगी म्हणावयाचें; एखादा निरग्नि किंवा अक्रिय असला म्हणजे तो संन्यासी होत नाहीं किंवा योगी होत नाहीं. संन्यासी हा निरग्नि असतो; आश्रमधर्माप्रमाणें गृहस्थ व वानप्रस्थ हा साग्नि असतो. संन्यासी हा निरग्नि असतो याचा भावार्थ न ओळखल्यामुळें त्याचा तांत्रिक अर्थ असा झाला आहे कीं संन्याशानें अग्नीला स्पर्श करतां उपयोगी नाहीं; वेळीं प्रसंगीं सुद्धां त्यानें स्वयंपाक करतां उपयोगीं नाहीं. कारण अग्निसेवेशिवाय स्वयंपाक होऊं शकत नाहीं. म्हणून संन्याशाबरोबर त्याला स्वयंपाक करून घालणारा एखादा

ब्रह्मचारी बहुधा असावा लागतो. त्याचप्रमाणें संन्याशानें किंवा योग्यानें अक्रिय असावयाचें म्हणजे त्यानें सांसारिक विवादांत पडावयाचें नाहीं. पण य शब्दाचाही तांत्रिक अर्थ निष्क्रियत्वांत झाला आहे. सहाव्या अध्यायाच्य पहिल्या श्लोकांत या तंत्राचें स्वरूप उघड केलें आहे व तांत्रिक अर्थानें कोणीही संन्यासी किंवा योगी होऊं शकत नाहीं असें स्पष्ट बजाविलें आहे. संन्यास व योग याचें मुख्य लक्षण म्हणजे

अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।

हें आहे. हेंच ज्ञानदेवांनीं स्पष्ट केलेलें आहे इतकेंच नव्हे तर अग्निसेवा करणार व कर्मांचा अवलंब करणारा गृहस्थाश्रमीही संन्यासी व योगी असूं शकतो असेंही सांगितलें आहे:—

गृहस्थाश्रमाचें ओझें । कपाळीं आधींचि आहे सहजें ।
कीं तेचि संन्यासें वाढविजे । सरिसें पुढती ॥ ५०
म्हणूनी अग्निसेवा न सांडितां । कर्माची रेखा नोलांडिता ।
आहे योगसुख स्वभावता । आपणयांची ॥ ५१
जेथ संन्यासिला संकल्पु तुटे । तेथचि योगाचें सार भेटे ।
ऐसे हें अनुभवाचेनि धटें । साचें जया ॥ ५३

आतां हा योग साधण्याला खडतर कर्म करावें लागतें. योगरूपी पर्वताच्या माथ्यावर ज्याला जावयाचें असेल त्याला त्यासाठीं सांगितलेला कर्ममार्ग क्रमाक्रमानें, पायरीपायरीनें उत्तम प्रकारें आचरावा लागतो. योगाला अष्टांगयोग असें नांव आहे व हीं आठ अंगें पुढीलप्रमाणें क्रमाक्रमानें आहेत:- (१) यम (२) नियम (३) आसन (४) प्राणायाम (५) प्रत्याहार (६) धारणा (७) ध्यान आणि (८) समाधि. योगाला पर्वताची उपमा दिली व योगाचळ असे रूपक करून ज्ञानदेव म्हणतात; डोंगराला पायथा असतो; त्यालाच यमनियम म्हणावयाचें. पायथ्यावरही जो जाऊं शकत नाहीं तो पर्वतावर काय चढणार? तेव्हां यम आणि नियम हें आंगीं बाणल्याशिवाय योगमार्गाकडे पाहणें हें व्यर्थ आहे. यम म्हणजे आत्मसंयमन. आत्मसंयमनाची कल्पना यावी म्हणून याज्ञवल्क्य स्मृतींतील पुढील श्लोक लक्ष्यांत ठेवावा:—

ब्रह्मचर्यं दया शांतिर्दानसत्यमकल्कता ।
अहिंसास्तेयमाधुर्ये दमश्चेति यमाः स्मृताः ॥

नियम म्हणजे व्रतस्थपणा; कांहीं नियम ठरवून त्याप्रमाणें बिनचूक वागणें; याचाही अर्थ आत्मसंयमनच. पण यम म्हणजे सामान्य आत्मसंयम आणि नियम म्हणजे विशिष्ट आत्मसंयमः—

शौचमिज्या तपोदाने स्वाध्यायोपस्थनिग्रहः ।
व्रतमौनोपवासंच स्नानं च नियमा दश ॥

हा श्लोक नियमाच्या बाबतींत लक्षांत ठेवावा. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे नियम हें यमाचें ( संयमाचें ) तंत्र आहे. तें तंत्र कालस्थलानुसार थोडें बहुत बदलूं शकतें पण यमाचें स्वरूप बदलत नाहीं; तें अबाधित राहते. योगपर्वताचा पायथाच मुळीं यमनियमांचा आहे. यमनियम या पायथ्यापासून पुढें आसनाची पाऊलवाट लागते व ही पाऊलवाट प्राणायामाच्या कड्यावर पोहोंचते. आसनविधीला पाऊलवाट व प्राणायामाला कडा म्हटलें आहे. या कड्यावरून चाललें म्हणजे त्याचे टोंक येतें. याला "आवाडा" असें ज्ञानदेवांनीं म्हटलें आहे. या "आवाड्याला" माथेरान, महाबळेश्वर इत्यादि ठिकाणीं Point म्हणतात. हा आवाडा म्हणजे प्रत्याहार होय. या ठिकाणीं बुद्धीचेंही पाय निसरतात व अगदीं प्रतिज्ञा करून निघालेल्या हट्टी लोकांचा देखील कडेलोट होण्याचें भय असतें. तरी अभ्यासाच्या बळानें प्रत्याहाराचा हा अधांतरीं रस्ता चालला पाहिजे आणि वैराग्याच्या नखांचा आधार घेऊन हा रस्ता ओलांडला पाहिजे. मग पुढें पवनाचें, वाऱ्याचें पठार लागतें आणि पुढें धारणेचा विस्तीर्ण प्रांत येतो व त्याचें टोंक म्हणजे ध्यान. या ठिकाणीं पोहोंचल्यावर प्रवृत्तीची धाव संपते व साध्य साधनांची गांठ पडते आणि येथून पुढें गेल्यावर जेथें वाटच संपते तेथें समाधि आहे. यमनियम प्रथम साध्य झाले पाहिजेत; नंतर आसनविधि आत्मसात् करावयाचा. आसन म्हणजे व्यवस्थितपणें बसणें. साधा अभ्यास करतांनासुद्धां अशा प्रकारें बसावें कीं आळस येऊं नये, झोंप लागू नये, अभ्यासाकडे लक्ष लागावें. याच प्रकारांतून योगशास्त्रांतील आसनविधि उत्पन्न झाला व हठयोगांत तर त्याचें स्वरूप म्हणजे शारीरिक कसरतीचें झालें. पण या कसरती करणें म्हणजे योगसाधन नव्हे. आसनविधि साधल्यानंतर प्राणायाम म्हणजे शरीरांतर्गत वायूंचें नियमन करावयाचें आणि प्रत्याहार करावयास शिकावयाचें म्हणजे जाणून बुजून विषयापासून त्या त्या इंद्रियांना आवरून मागें आणावयाचें; इंद्रियांवर

विषयांची सत्ता चालूं न देतां तीं आपल्या ताब्यांत आणावयाची. प्रत्याहार साधला म्हणजे अंगीं वैराग्य बाणतें हें उघड आहे. त्यानंतर धारणा शिकावयाची. धारणा म्हणजे मन एकाग्र करणें, व नंतर ध्यान म्हणजे प्रथम (आवश्यक असेल तर) साकार व क्रमाक्रमानें निर्गुण, निराकार परब्रह्माचें चिंतन करणें, आणि योगमार्गाचें पर्यवसान म्हणजे समाधि लावणें, आपले विचार आणि परब्रह्म यांचें पूर्ण ऐक्य करणें. अशी ही योगमार्गाची सोपान-परंपरा आहे व ती ज्ञानदेवांनीं उत्तम प्रकारें परिस्फुटित केली आहे.

२ याप्रमाणें योगमार्ग वाटेल त्याला किंवा वाटेल त्या प्रकारें जमण्यासारखा नव्हे; बाकीचें सर्व कांहीं वाटेल तसें करून योगसाधन जमणार नाहीं. म्हणून योगमार्गाचें प्रत्यक्ष विस्तृत विवेचन देण्यापूर्वीं योगारूढ झालेला म्हणजे योगमार्गाला लागलेला किंवा योगी कसा असतो त्याचें वर्णन केलें आहे. पुढील ओव्या पहाः—

तरी जयाचिया इंद्रियांचिया घरां । नाहीं विषयांचिया येरझारा ।
जो आत्मबोधाच्या वोवरां । पहुडला असे ॥ ६–६२
जयाचें सुखदुःखाचेनि आंगें । झगटलें मानस चेवो नेघे ।
विषय पासींही आलीयां से न रिघे । हें काय म्हणऊनी ॥ ६३
इंद्रियें कर्माच्या ठायीं । वाढीन्नलीं परी कहीं ।
फळहेतूची चाड नाहीं । अंतःकरणीं ॥ ६४
असतेनि देहें येतुला । जो चेतुचि दिसे निदेला ।
तोची योगारूढु भला । वोळखें तूं ॥ ६५

ज्याच्या इंद्रियांच्या घरांत विषय येरझारा घालीत नाहींत म्हणजे ज्याचीं इंद्रियें विषयांच्या तडाख्यांत सांपडत नाहींत; जो आत्मबोधाच्या म्हणजे आत्मज्ञानाच्या ओवरीमध्यें म्हणजे खोलींत सुखानें झोंपलेला असतो म्हणजे जो आत्मज्ञानाच्या आनंदांत सर्वदा निमग्न असतो; सुखें व दुःखें जरी आंगाशीं येऊन लगटूं लागलीं तरी ज्याचें मन क्षुब्ध होत नाहीं; विषय जवळ आलें तरी सुद्धां त्यांची फिकीर जो करीत नाहीं; इंद्रियें कर्माच्या ठिकाणीं लागलेलीं असतात म्हणजे कर्माचरण करीत असतात परंतु कर्माचरण करूनसुद्धां त्याच्या फलाच्या हेतूची चाड ज्याच्या अंतःकरणांत नसते; आणि अशा प्रकारें देहधारणेपुरता जो असतो म्हणजे व्यवहारांत असतो आणि

( बाकी व्यवहाराच्या भानगडींत पडत नाहीं म्हणून ) तो जागा असतांनासुद्धां झोंपलेला आहे, बेफिकीर आहे असें दिसतें, असें सामान्य जनाला भासतें, तो पुरुष खरोखर योगारूढ आहे असें समजावें. तेव्हां योगारूढ होणें ही गोष्ट मजेत किंवा नाद म्हणून होण्यासारखी नव्हे हें उघड आहे.

या योगमार्गाची विशेष माहिती अध्याय सहावा श्लोक ११-१५ यांत दिलेली आहे. या पांच श्लोकांवर भाष्य लिहितांना ज्ञानदेवांनीं शास्त्रीय योग-मार्ग पूर्णपणें प्रकट केला आहे.

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।
नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥

आतां यावरील ज्ञानदेवांची टीका. ( शुचौ देशे ) योगाभ्यास करण्यासाठीं एक ( योग्य ) स्थान, ठिकाण पहावें लागेल. त्या ठिकाणीं स्वस्थता इतकी असावी कीं तेथें एकदां बसल्यावर तेथून जाण्याची इच्छाच होऊं नये. तें स्थान आणखी असें असावें कीं तें पाहतांच वैराग्य दुप्पट व्हावें. साहित्यशास्त्रांत रसांच्या बाबतींत जसे उद्दीपन विभाव सांगितले आहेत त्याचप्रमाणें येथें जें स्थान पहावयाचें तें वैराग्याचें उद्दीपन करणारें असावें. त्या ठिकाणीं सज्जन माणसें रहात असावींत आणि संतोषाची वाढ होत असावी आणि मनाला धारिष्ट उत्पन्न व्हावें. तें स्थान इतकें रम्य असावें कीं अभ्यास आपोआप व्हावा आणि त्या रम्यपणामुळच अंतःकरणाला आत्मानुभव पटावा. त्या ठिकाणीं गेल्यावर पाखंडवादी माणसालासुद्धां तपश्चर्या करण्याची इच्छा व्हावी. सहज एखादा सकाम मनुष्यही तेथें गेला तरी परत जाण्याची त्याला इच्छाच होऊं नये. जो कोठें रहात नाहीं त्यालाही ज्या ठिकाणीं रहावेंसें वाटेल, भटकणाऱ्यालाही जेथें स्थिर व्हावं अशी इच्छा होईल आणि विरक्ति जेथें जागृत होईल असें तें ठिकाण असावें. शृंगारी माणसाला सुद्धां तें स्थान पाहून राज्यसुद्धां सोडून येथें रहावें असें वाटावें. अशा प्रकारें तें स्थान मोठें सुंदर असावें.*

माधुर्य आणि शोभा यांत ज्ञानदेव जगन्नाथाची बरोबरी करतात हें रसिकांस सांगावयास नकोच.

---

* जगन्नाथ पंडितांनीं गंगालहरींत गंगातीराची पुढीलप्रमाणें प्रशंसा केलेली आहे तिची येथें आठवण होते. ( पुढील पृष्ठावर चालू )

शिवाय तें स्थळ असं असावें कीं तेथें योगसाधनाच्या मार्गांत असलेली साधक मंडळीच असावी, इतरेजनांची तिकडे वर्दळ नसावी. ज्ञानदेव सौंदर्याचे आणि आनंदाचे मोठे भोक्ते होते. वैराग्यशीलतेंतही त्यांची रसिकता कायम होती. या स्थलासंबंधीं त्यांच्या पुढील ओंव्याच येथें देतों:—

जेथ अमृताचेनि पाडें । मूळाहीसकट गोडें ।
जोडती दाटें झाडें । सदाफळतीं ॥ ६–१७३
पाउला पाउला उदकें । वर्षाकाळेंवीण अति चोखें ।
निर्झरें कां विशेखें । सुलभें जेथ ॥ १७४
हा आंतपुही अलुमाळु । जाणिजे तरी शीतळु ।
पवनु अति निश्चळु । मंद झुळके ॥ १७५
बहुतकरूनी निःशब्द । दाट न रिघे श्वापद ।
शुकें हन षट्पद । तेउतें नाहीं ॥ १७६
पाणिलगें हंसें । दोनी चारी सारसें ।
कवणे एके वेळे बैसे । तरी कोकीळही हो कां ॥ १७७
निरंतर नाही । तरी आलीं गेलीं कांहीं ।
होत कां मयूरही । आम्हीं ना न म्हणों ॥ १७८
परी आवश्यक पांडवा । ऐसा ठाव जोडावा ।
तेथ निगूढ मठ होवावा । कां शिवालय ॥ १७९

त्या ठिकाणीं ठिकठिकाणीं उत्तम पाणी असावें, सदोदित फळानें भरलेलीं झाडें असावींत, ऊन बेताचें असावें, वारा मंदमंद असावा, पोपट आणि भुंगे देखील येऊं नयेत अशी गर्द झाडी असावी; पाण्याच्या आश्रयानें एखादा दुसरा हंस, दोनचार पाणकोंबंड, एखादा कोकीळ तेथें असला तरी चालेल. एखादे

---

अपि प्राज्यं राज्यं तृणमिव परित्यज्य सहसा ।
विलोलद्वानीरं तव जननि तीरं श्रितवताम् ॥
सुधातः स्वादीयः सलिलभरमातृप्ति पिबताम् ।
नराणामानंदः परिहसति निर्वाणपदवीम् ॥

१ उन्ह. २ बेताचें. ३ वारा. ४ गर्द झाडी असलेले. ५ पोपट. ६ भृंग, भुंगा. ७ पाण्याजवळ. ८ सारसपक्षी. पाणकोंबडा.

वेळीं एक दोन मोर आले तरी ज्ञानदेवांची ना नाहीं. आणि तेथें एखादा मठ किंवा शिवमंदिर असेल तर फार उत्तम. अशा ठिकाणीं आसन रचावें. खालीं दर्भांकुर घालावेत, त्यावर धूत वस्त्र पसरावें आणि त्याच्यावर मृगाजिन घालावें. दर्भांची रचना ते सरळ आणि अखंड राहतील अशी असावी. हें आसन फार उंच किंवा फार जमिनीसरसें नसावें. त्यांतही समभाव ( सारखेपणा ) असावा.

वर सांगितल्याप्रमाणें आसन रचून त्यावर बसावें आणि एकाग्र अंतःकरणानें सद्गुरूचें स्मरण करावें. तें स्मरण केलें म्हणजे शरीराच्या आंतबाहेर सात्विक भाव भरून येतील आणि अहंभावामुळें, मोपणामुळें, दुरभिमानामुळें उत्पन्न झालेला मनाचा कठिणपणा, निगरगट्टपणा, विरून जाईल; विषयांचा विसर पडेल आणि इंद्रियांची कसमस, चुळबूळ बंद होईल आणि मनाची घडी अंतःकरणांत बसेल म्हणजे मन निश्चळ होईल आणि अंतःकरणांत विलीन होईल. ही स्थिति प्राप्त होईपर्यंत सद्गुरुस्मरण चालू ठेवावें आणि ती स्थिति उत्तम प्राप्त झाली म्हणजे आसनविधीला सुरवात करावी. त्या विधीला सुरवात झाली म्हणजे आंग आंगाला सांवरून धरीत आहे व शरीरांतील निरनिराळे वायु एकत्र, एकरूप होत आहेत असा अनुभव यावयास लागेल. मनाची प्रवृत्ति मागें फिरेल, समाधि जवळजवळ येईल म्हणजे मनाची एकाग्रता अधिकाअधिक होईल आणि बसल्याबसल्या योगाभ्यास साधावयास लागेल. या आसनांत मुद्रा कशी असावी हें सांगितलेलें आहे. मुद्रा म्हणे आसनमांडी घातल्यावर कमरेच्या वरच्या शरीराची रचना, शरीराची धाटणी. मांड्या पोटरीला खेटतील अशा प्रकारें ठेवाव्यात. पायांचे तळवे उताणे करून एकावर एक घालावेत व गुदस्थानाच्या बुडाशीं घट्ट बसवावेत. उजवा तळवा अगदीं तळाला ठेवावा आणि त्याचा दाब गुदस्थानाच्या मधोमध पडेल अशा प्रकारें तो ठेवावा म्हणजे मग त्याच्यावर डावा तळवा सहजच येईल. गुदस्थान आणि जननस्थान यांच्यांत चार अंगुलांचें अंतर असतें त्यापैकीं दोनी बाजूचें दीड दीड अंगुळ सोडल्यावर मधोमध जें एक अंगुळ राहतें तेथें, सर्व आंग सांवरून, टाचेचा मागला भाग जरा जोरानें रेटावा, वरचें शरीर उचललें आहे हें कळेल न कळेल अशा बेतानें पाठीच्या कण्याचें खालचें टोंक उचलावें आणि दोन्ही घोटे तसेच जरा उचललेल्या

स्थितींत ठेवावेत; म्हणजे सगळा शरीराचा सांचा पायांच्या घोट्यांवर स्थिर होईल. अशा तऱ्हेचें जें बसणें त्यालाच "मूळबंध" आसन किंवा वज्रासन असें नांव आहे. या आसनामुळें गुदस्थान व जननस्थान यांच्या मधोमध जें आधारचक्र आहे म्हणून योगांत कल्पिलेलें आहे त्याच्यावर मुद्रा म्हणजे शरीराचा वरचा भाग तोलून, सांवरून राहतो आणि शरीराच्या खालच्या भागाचा रस्ता बंद होऊन आंतड्यांमध्यें फिरणारा जो अपानवायु तो शरीराच्या आंतल्या भागांत मागेंमागें शिरतो. तेव्हां हातांचें तळवे डाव्या पायांवर टेंकतात आणि खांदे उंच होतात असें दिसतें. खांदे उंचावल्यामुळें डोकें खालीं गेल्यासारखें होतें आणि डोळे झांकतात कीं काय अशी स्थिति प्राप्त होते. डोळ्यांचीं वरचीं पातीं झांकतात पण खालचीं विस्तार पावतात आणि अशा प्रकारें दृष्टि अर्धोन्मीलित, अर्धी झांकलेली व अर्धी उघडलेली अशी होते; आणि ही दृष्टि बरोबर नासिकाग्रावर, नाकाच्या टोंकावर स्थिर होते; कारण त्या अर्धोन्मीलित दृष्टीला धड आंतही जातां येत नाहीं व बाहेरही धड पडतां येत नाहीं, आणि अशा स्थितींत इकडे तिकडे पहावें किंवा कांहीं आकार किंवा रूप पुढें आणावींत या इच्छाच नाहींशा होऊन जातात, दृष्टि नासिकाग्र झाली म्हणजे मान आखडल्यासारखी होते, हनवटी गळ्या-खालच्या पोकळींत शिरते आणि सगळी मान आवळून छातीला रेटावयास लागते आणि कंठाची नाळ, नरडीचें हाड, त्या मानेंत गुरफटून जाते, नाहींसें झाल्यासारखें दिसतें आणि हा जो बंध होतो त्याला जालंधर बंध असें म्हणतात. जेव्हां बेंबी वर येते, पोट सपाट होतें, आणि हृदयकोशाचा विस्तार होतो आणि नाभि व स्वाधिष्ठान म्हणजे लिंगमूळ यांच्या मध्यें जो बंध म्हणजे शरीररचना होते त्याला वोढियाणा बंध म्हणतात. (६–१८६ ते २१० ज्ञानेश्वरी).

यापुढील श्लोक १४ व १५ यांवर केलेल्या भाष्यांत ज्ञानदेवांनीं योगाचें सर्वस्व उकलून दाखविलें आहे. हे दोन श्लोक म्हणजे

> प्रशांतात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।
> मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ ६–१४
> युंजन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः ।
> शांतिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥ ६–१५

या श्लोकांचा सरळ अर्थः—

ज्याचें अंतःकरणांत पूर्ण शांतपणा आहे, जो निर्भय झालेला आहे, जो ब्रह्मचारिव्रतानें राहतो, मनाचें संयमन करून जो आपलें चित्त सर्वथा माझ्याकडे लावतो आणि योगयुक्त होऊन जो मत्पर होतो, ( १४ ) आणि याप्रमाणें नियतमानस होऊन ( मनाचें नियमन करून ) जो स्वतःला याप्रमाणें योजतो ( कामाला लावतो ) त्या योग्याला माझ्या ठिकाणीं स्थिर असलेली आणि निर्वाण म्हणजे मोक्ष देणारी असल्यामुळें जो परम म्हणजे अत्यंत श्रेष्ठ आहे अशी शांति ( असें समाधान ) प्राप्त होते.

या दोन साध्या श्लोकांवर भाष्य करतांना ज्ञानदेवांनीं योगमार्गाचें रहस्यच विशद केलें आहे. वरच्या श्लोकांच्या भाष्यांत आपण जालंधर बंध आणि वोढियाणा बंध येथपर्यंत आलों. आतां त्यापुढें ज्ञानदेव काय सांगतात तें आपण पाहूंः—

आसनविधि बरोबर करून जालंधर बंद किंवा वोढियाणा बंध साधला म्हणजे त्या बंधांचा ठसा शरीरावर बाह्य प्रकारें उठतो त्याचप्रमाणें मनोधर्माची त्राय ही मोडते. त्राय म्हणजे आश्रयाचें ठिकाणीं—म्हणजे जसा बाह्य शरीरबंध किंवा मुद्रा ही पहाणाऱ्यांना दिसण्यासारखी विशिष्ट किंवा निराळी होते त्याप्रमाणें अंतर्गतही मनोवृत्ति बदलते, मनाला वृत्तीच्या लहरी येण्याच्याच बंद पडतात. ज्ञानदेव म्हणतात—

> कल्पना निमे । प्रवृत्ति शमे ।
> आंग मन विरमे । सावियाची ॥ ६–२१२
> क्षुधा काय जाहाली । निद्रा केउती गेली ।
> हें आठवणही हारपली । न दिसे वेगां ॥ ६–२१३

अशी मानसिक स्थिति होते. असो. आतां मूळबंध किंवा वज्रासन केल्यामुळें अपानवायूला अपानद्वारानें बाहेर पडतां येत नाहीं. तो कोंडल्यामुळें माघारा वळतो आणि अडचणींत सांपडल्यामुळें तो वर जाऊं लागतो आणि अशा तऱ्हेनें त्याला फुगवटी येते. अशा प्रकारें तो फुगला म्हणतो तो क्षुब्ध होतो व त्याला मस्ती येते आणि तो कोंडल्या ठिकाणीं गुरगुरण्यास लागतो आणि नाभिस्थानाजवळ मणिपूर नांवाचें एक चक्र आहे अशी हठयोगांत कल्पना केलेली आहे त्या चक्राला तो धक्के द्यावयास लागतो. मग ती त्याची

दंगल थांबते पण तो सगळें शरीर ढवळून काढतो आणि अगदीं बाळपणापासून सांठलेली त्यांतील घाणसाण बाहेर काढून टाकतो. ( म्हणजे आसनविधीचा परिणाम शरीरांतील घाण बाहेर काढण्याच्या कामांत कोणत्याही रेचक औषधापेक्षां अधिक बलवत्तर होतो असें योगशास्त्र सांगतें. ) हा अपानवायु मग ( बाहेर न पडल्यामुळें ) पोटांत मावेनासा होतो आणि तो कोठ्यांत सर्वत्र संचार करतो आणि तेथील कफ व पित्त सर्व बाहेर काढून लावतो. शरीरांतील सप्त धातूंचे समुद्र उलथेपालथे करतो, मेदाचे ( लठ्ठपणाचे ) डोंगर तो फोडून काढतो आणि हाडांच्या आंत असलेली मज्जा बाहेर काढतो. नाडीची सोडवणूक करतो, सगळीं गात्रें बिघडून जातात कीं काय असें वाटूं लागते आणि अशा स्थितींत साधक भयभीत होतो. पण योगाच्या या सुरवातीला साधकानें या परिणामांना बिलकुल भिऊं नये. कारण या अपानवायूच्या खवळण्यामुळें व्याधि उत्पन्न झाल्यात असें वाटतें तरी त्या व्याधि तो वायूच नाहींसा करतो व शरीरांतील पृथ्वी आणि आप यांना तो एकत्र कालवतो. कफ, पित्त वगैरे आप व मेद, मांस, मज्जा ही पृथ्वी या दोघांची तो कालवाकालव करून टाकतो. ( जबर रेचक घेतल्यावरही भय दाखविणारे परिणाम होतात तसाच प्रकार योगमार्गाच्या आसनविधीनें होतो. )

३ याप्रमाणें आसनविधीचा परिणाम झाला म्हणजे कुंडलिनी नामक शक्ति जागृत होते. ही कुंडलिनी शक्ति योगशास्त्रांत निरनिराळ्या चक्रांप्रमाणेंच कल्पिलेली आहे व आधुनिक शरीरशास्त्राच्या दृष्टीनें हीं चक्रें व ही कुंडलिनी निश्चित करण्याचे प्रयत्न कित्येकांनीं केलेले आहेत पण ते सफल झाले आहेत असें म्हणणें धारिष्टाचें होईल. कुंडलिनीचें वर्णन ज्ञानेश्वरी अध्याय ६ ओवी २२१ पासून सुरू होते. या वर्णनांत अलंकारिकपणा बराच असल्यामुळें त्याचा अक्षरशः अर्थ करणें बरोबर होणार नाहीं. उपमा दृष्टांतादिकांनीं स्पष्टीकरणाला साहाय्य होतें पण अलंकारानें वर्णन करणें म्हणजे वस्तुमात्र वर्णन नव्हे हें सर्वमान्य सूत्र या ठिकाणीं लक्ष्यांत ठेवावें म्हणजे झालें. आसनविधीमुळें शरीरांत उष्णता उत्पन्न होऊन ती ज्याप्रमाणेंः—

बाळपणींची कुहीटुळी । बाहेर घाली ॥

त्याचप्रमाणें तीच उष्णता या कुंडलिनी शक्तीला जागी करते. ती कुंडलिनी कशी आहे तर

नागिणीचें पिलें । कुंकुमें नाहलें ।
वळण घेऊनि आले । सेजे जैसें ॥ ६–२२२
तैसी ते कुंडलिनी । मोटकी औट वळणी ।
अधोमुख सार्पिणी । निदेली असे ॥ ६–२२३

नागिणीचें पिलूं जसें काय कुंकवानें नाहूं घातलें आहे असें लालबुंद, तें वेटोळें घालून जसें झोंपावें त्याप्रमाणें ती कुंडलिनी जशी काय नागीणच आहे. ती कुंडलिनी नाडी लहानशी आहे आणि तिनें साडे तीन फेऱ्यांचें वेटोळें घातलेलें असतें. तिचें तोंड खालीं असतें व ती निजलेली असतें. ती जशी काय,

विद्युल्लतेची विडी । वन्हिज्वालांची घडी ।
पंधरेयाची चोखडी । घोंटीव जैशी ॥ ६–२२४

विजेची सुरळी किंवा अग्नीच्या ज्वालेची घातलेली घडी किंवा शुद्ध बावनकशी सोन्याची घोटलेली लगडी असावी त्याप्रमाणें तेजस्वी, लखलखीत दिसते. ही कुंडलिनी नाभिस्थानांत लहानशा पुटांत घट्ट बंधांनीं आवळलेली अशा स्थितींत असते. वज्रासनाच्या योगानें सर्व शरीरावर जसा भार पडावा तसा नाभिस्थानावरही पडला तेव्हां अशा प्रकारें वज्रासनानें चिमटल्यामुळें ती जागी झाली. आणि मग जसें काय नक्षत्र तुटून पडावें किंवा प्रत्यक्ष सूर्याचें आसनच मोडावें किंवा तेजाच्या बीजाला कोंभ फुटून तें वर यावें त्याप्रमाणें ती धगधगीत, प्रखर तेजस्वी अशी शक्ति आपले ते साडेतीन वेढे सोडते आणि आंगाला ( झोंपेंतून उठल्यावर करतात त्याप्रमाणें ) आळोखेपिळोखे देऊन जशी कांहीं नाभिकेंद्रावर, नाभीमूळावर उभीच राहिली आहे अशी दिसते. अगोदर तिला पुष्कळ दिवसांची भूक लागलेली; त्यांत तिला हालवून जागी केली हें निमित्त झालेलें; मग तिचें जें तोंड खालीं होतें तें ती उघडून सरळ वर करते; आणि हृदयकोशांत शिरलेला अपानवायु तो सर्वच्या सर्व गिळून टाकते. आपल्या मुखाच्या ज्वालांनीं ती त्या वायूला खालीवर सर्वत्र ग्रासून टाकते; आणि त्याला गिळल्यावर मांसाचे लचके तोडून खावयास लागते. जेथें जेथें मांस आहे तेथें ती घास घेते आणि हृदयाचे देखील एकदोन लचके ती घेते. मग पायाचे तळवे, तळहात, यांना ती खाऊं लागते, वरचे भागही फोडते आणि प्रत्येक अंगाचा झाडा घेते. खालच्या भागांना तर ती सोडीत नाहींच पण नखांतील सत्व देखील ती खाऊन टाकते आणि कातडी पिळून

काढून ती हाडांना जाऊन भिडते. हाडांच्या नळ्या ती ( वखवखलेल्या कुत्र्याप्रमाणें ) चोखून टाकते, शिरांच्या काड्या कोरून काढते आणि आंत याप्रमाणें स्थिति झाली म्हणजे बाहेरच्या बाजूला असणारे केसही करपून जातात. याप्रमाणें पुष्कळसे खाऊन झाल्यावर या कुंडलिनीला जबरदस्त तहान लागते आणि रक्त वगैरे सप्त धातू शरीरांत आहेत त्यांचा ती एकच घोट घेते आणि शरीरांत खडखडीत उन्हाळा होतो. नाकपुड्यांतून बारा अंगुळे वाहणारा वाराही ती आडविते व त्याला मागें खेंचून आंत घालते. याप्रमाणें शरीराच्या आंत अपान वायूला ती वर खेंचते आणि नाकांतून वाहणाऱ्या ऊर्ध्व वायूला ती खालीं खेंचते. मध्यें जीं चक्रें असतात त्यामुळें या दोन वायूंची भेट होत नाहीं. तीं चक्रें मध्यें आडवीं नसतीं तर ते दोन्ही वायु एकत्र झाले असते. त्यामुळें कुंडलिनी क्षणभर दुःखी होऊन म्हणते "तुम्हीच आतां फक्त शिल्लक उरलेले आहांत." या सर्वांचा अर्थ असा कीं कुंडलिनी शरीरांतील सर्व धातु ( पार्थिव भाग ) खाऊन टाकते आणि जलाचा भाग तर अगदीं पुसून टाकते आणि याप्रमाणें दोन महाभूतांचा घास केल्यावर तिचें समाधान होतें आणि मग तिचा रखरखीतपणा नाहींसा होतो, ती सौम्य होते आणि सुषुम्ना नांवाची नाडी कल्पिलेली आहे तिच्या जवळ जाऊन राहते. शरीरांत फक्त वायु राहतो. संतुष्ट झालेली ही सर्पिणीसारखी कुंडलिनी स्वस्थ पडल्यावर गरळ ओकावयास लागते आणि ते गरळच प्राणवायूला अमृतासारखें होते व याप्रकारें तो प्राणवायु जिवंत रहातो म्हणजे सगळें शरीर अस्थिपंजर झालें तरी प्राण असतो. तो प्राणवायु त्या गरळाच्या ज्वाळांतून बाहेर पडतो पण ( जरी तो ज्वाळांतून बाहेर पडलेला असला तरी ) सर्व शरीराला आंत बाहेर निववूं लागतो गारवा उत्पन्न करतो, आणि मग रोडावलेल्या आंगांत पुनः कस, जोर भरावयास लागतो. परंतु या मधल्या काळांत नाड्यांचे मार्ग बंद झालेले आणि शरीरांतील नऊही वायु फक्त प्राणवायूंत समाविष्ट झालेले असतात किंवा नवविध वायु नष्ट होऊन फक्त प्राणवायु उरतो; आणि म्हणून या स्थितींत शरीराचे धर्म रहात नाहींत. ( योगी मृतवत् दिसतो पण तो केवळ जिवंत असतो. ) या वेळीं इडा व पिंगळा ( अनुक्रमे डाव्या व उजव्या नाकपुडींतील नाड्या ) एकवटतात, तीन्ही गांठीं सुटतात आणि शरीरांतील

साही चक्रांचे पदर फाटून जातात. नाकपुड्यांतून वाहणाऱ्या वायूंना चंद्र आणि सूर्य अशीं उपमायुक्त नांवें दिलीं आहेत; त्यांपैकीं एकाही वायूचा पत्ता लागत नाहीं. येथें म्हटलें आहे:

तो वातीवरी पवनु । गिवसितां न दिसे ॥

म्हणजे हा वारा जरी वातीवर हुडकला तरी कळून येत नाही. वात म्हणजे दिव्याची वात. याचा अर्थ असा होईल कीं दिव्याची वात जरी या वायूसमोर धरली तरी ती वात जशीच्या तशी राहील. ( पहा, बा. अ. भिडे, ज्ञानेश्वरी, पृष्ठ १७० ). पण नाकांतल्या वाऱ्यासमोर दिव्याची वात म्हणजे ज्योत धरणें जरा कठीण काम आहे; तेव्हां दुसरा अर्थ वात म्हणजे सूत असा घ्यावा. ( वात सुताचीच केलेली असते. ) मनुष्य प्राणांतिक अवस्थेंत आला म्हणजे नाका-समोर सूत धरण्याचा प्रघात आहे व तीच कल्पना येथें दिसते. सूतसुद्धां हालत नाहीं असें पाहिलें म्हणजे प्राण गेला असें समजतात व योगीही त्याचप्रमाणें निष्प्राण झालेला दिसतो. बुद्धीची स्फूर्ति नाहींशी झालेली असते; आणि घ्राणांतील म्हणजे नाकांतील जो परिमळ म्हणजे परिमळ जाणण्याची शक्ति तीही मध्यमेंत लुप्त होऊन जाते. येथपर्यंत स्थिति आली म्हणजे पुढील चमत्कार होतो:

तंव वरिलेकडोनि ढाळें । चंद्रामृताचें तळें ।
कानवडोनि मिळे । शक्तिमुखीं ॥ ६–२४७

वरच्या बाजूला ( अर्थात् शरीराच्या ) चंद्रामृताचें तळें असतें. चंद्राची सत्रावी कळा म्हणजे अमृतकळा. हें तळें गळावयास लागतें आणि तें वांकडें होऊन कलंडतें व त्यांतील अमृत कुंडलिनीच्या तोंडांत शिरते. कुंडलिनीरूपी नळींत ( नाडींत ) भरलेला अमृतरस सर्व शरीरभर पसरतो आणि प्राणवायु जसा सर्वत्र मुरतो तसें हें अमृत सर्व शरीरभर मुरतें. तापलेल्या मुशींत जसें मेण निघून जाऊन धातूचा रसच राहतो त्याप्रमाणें शरीराच्या रूपानें सत्रावी कळा म्हणजे अमृतकळा अवतरलेली आहे कीं काय असें वाटतें म्हणजे सर्व शरीर अमृतरसमय झालेलें दिसतें व त्या अमृतरसानें, रसरूप शरीरानें, त्वचेचें, कातडीचें पांघरूण घेतलें आहे असें वाटतें. ढगांच्या बुरख्यांत सूर्य झांकलेला असतो. तो बुरखा निघाला म्हणजे तो जसा तेजस्वी असा बाहेर पडतो त्याप्रमाणें त्वचेचा कोरडा पापुद्रा या दिव्य अमृतमय शरीरावर असतो तोही

झडून जातो आणि मग सर्व शरीर नवीन व सुंदर दिसावयास लागते. योगाभ्यासानें जुन्या शरीराचा लोप करून अमृतकळेनें भरलेल्या नवीन शरीराला धारण करणारा योगी कसा दिसतो हें अनुवादरूपानें न सांगतां ज्ञानदेवांच्या शब्दांत देतों.

मग काश्मीरीचें स्वयंभ । कां रत्नबीजा निघाले कोंभ ।
अवयवकांतीची भांव । तैशी दिसे ॥ ६–२५३
ना तरी संध्यारागींचे रंग । काढूनि वळिलें ते आंग ।
कीं अंतर्ज्योतीचें लिंग । निर्वाळिलें ॥ २५४
कुंकुमाचें भरीव । सिद्धरसाचें वोतींव ।
मज पाहतां सावेव । शांतिचि ते ॥ २५५
ते आनंदचित्रींचे लेप । ना तरी महासुखाचें रूप ।
कीं संतोषतरूचें रोप । थावलें जैसें ॥ २५६
तो कनकचंपकाचा कळा । कीं अमृताचा पुतळा ॥
नाना सासिन्निला मळा । कोवळिकेचा ॥ २५७
हो का जे शारदियेचेनि वोलें । चंद्रबिंब पाल्हेलें ।
कां तेजचि मूर्त बैसलें । आसनावरी ॥ २५८
तैसें शरीर होये । जे वेळीं कुंडलिनी चंद्र पिये ।
मग देहाकृती बिहे । कृतांतु गा ॥ २५९

असें हें नवीन शरीर योगमार्गानें मिळविलें म्हणजे त्या शरीराला कृतांतही भितो म्हणजे त्याला मरणाचें भय रहात नाहीं. या नव्या शरीरांत म्हातारपण अर्थातच असत नाहीं. तारुण्य देखील मागें पडतें व बाळपणींची सर्व दशा प्राप्त होते. त्याचें वय लहान मुलाचें दिसतें पण त्याला–त्या योग्याला–सामर्थ्य फार मोठें असतें. (बालकाप्रमाणें तो सामर्थ्यहीन नसतो.) बाळ म्हणजे बळ असा अर्थ करावा लागण्यासारखें त्याच्याजवळ प्रचंड धैर्य असतें. नवीं नखें, नवे दांत, नवीन रोमपंक्ति, लहान मुलांसारखीं कोमल करचरणतळें, असे त्याला प्राप्त होतात. योग्याचें शरीर कांतीनें सोन्यासारखें पण वजनानें वायूसारखें असतें, कारण त्यांत आप आणि पृथ्वी यांचा अंशच नसतो. अशा स्थितींत योगी

मग समुद्रापैलीकडील देखे । स्वर्गींचा आलोचू आइके ।
मनोगत ओळखे । मुंगियेचें ॥ २६९

असे चमत्कार करूं शकतो व त्याला सिद्धि प्राप्त होतात. पण या सिद्धींचा नाद ज्याला लागला तो योगी फुकट गेला असें शास्त्रमत आहे. तेव्हां सिद्धींच्या मागें न लागतां योग्यानें पुढे गेलें पाहिजे. कुंडलिनी शक्ति प्राणवायूचा हात धरून, आधार घेऊन, हृदयकोशाला तळाची पायरी करून, मध्यमा म्हणजे सुषुम्ना नाडीचा जिना चढून हृदयाला पोहोंचते. आणि या ठिकाणी ती पोंचली म्हणजे

ते कुंडलिनी जगदंबा । जे चैतन्यचक्रवर्तीची शोभा ।
जया विश्वबीजाचिया कोंभा । साउली केली ॥ २७२
जे शून्यलिंगाची पिंडी । जी परमात्मया शिवाची करंडी ।
जे प्रणवाची उघडी । जन्मभूमि ॥ २७३

अशी ही कुंडलिनी हृदयांत समाविष्ट झाली कीं "अनुहत" किंवा "अनाहत" नांवाचा ध्वनि ऐकूं यावयास लागतो. या अनाहताचे नाद या शक्तीबरोबर आलेल्या बुद्धीच्या चैतन्याला ऐकूं यावयास लागतात. हे अनाहत नाद दहा आहेत ते क्रमाक्रमानें ऐकूं यावयास लागतात. हें सर्व कल्पनेनें जाणलें पाहिजे, पण तें कल्पनेला कल्पण्यालाही कठीण आहे असें ज्ञानदेव सांगतात. हृदयाकाशांतील आवाज तोच हा आवाज; त्या आवाजाच्या नादानें ब्रह्मरंध्र (म्हणजे मस्तक) त्याची खिडकी उघडते. हृदयाकाशाच्या वर महदाकाश म्हणजे ब्रह्मरंध्र आहे असें कल्पिलेलें आहे. तेथें चैतन्य असतें. त्या ब्रह्मरंध्रांत कुंडलिनी शिरते व तेथील चैतन्याला आपल्या तेजाचें भोजन घालते. बुद्धि हीच या भोजनांतील भाजी समजावयाची. हें भोजन झालें म्हणजे द्वैत अगदीं नाहींसें होतें. आणि अशा प्रकारें आसनविधीनें चाळविलेली ही कुंडलिनी शेवटीं प्राणरूप होऊन जाते. तेव्हां याप्रमाणें पिंडानें पिंडाचा ग्रास होतो. कुंडलिनी शक्ति म्हणजे प्राण असेंच शेवटीं ज्ञानदेवांनीं स्पष्ट केलें आहे व हेंच नाथसांप्रदायाचें–योगसांप्रदायाचें रहस्य आहे असेंही त्यांनीं म्हटलें आहे.

याप्रमाणें आसनविधीपासून कुंडलिनी शक्तीला जागृत करून नवीन शरीर संपादन करून योगी सिद्ध कसा होतो यासंबंधीं १४ व्या श्लोकांवर ज्ञानेश्वरींत ज्या ओंव्या आल्या आहेत त्यांपैकीं बहुतेकांचा अनुवाद वर दिलेला आहे. मच्छिंद्रनाथ, गोरखनाथ वगैरे योगीमंडळींच्या पंथांत निवृत्तिनाथ व ज्ञानदेव होते तेव्हां त्यांनीं येथें लिहिलेला सर्व प्रकार अनुभवगम्य केला होता असें

समजलें पाहिजे. योगमार्गाचें हें स्पष्ट विवरण केल्याबद्दल कित्येक योगमार्गी म्हणविणारीं माणसें ज्ञानदेवांना दोष देतात असें ऐकण्यांत आहे. पण "ब्रह्मविद्ये"चा जगाला सुकाळ करावयास निघालेल्या महंताला जगापासून चोरून कांहींच ठेवावयाचें नव्हतें हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. कारण हें विवरण तरी मुमुक्षूला व अधिकाऱ्यालाच समजणार; तेव्हां त्याचा दुरुपयोग होईल असें समजण्याचें कारण नाहीं. शिवाय योगाभ्यासापूर्वींचा जो पूर्वरंग भगवद्गीतेंत सांगितला आहे तोही लक्षांत ठेविला पाहिजे. ज्याच्या मनाला समता प्राप्त झाली आहे तोच योगी होऊं शकतो. तांत्रिक योग्याला-हठयोगाची कसरत करणाऱ्याला, ज्ञानदेव कवडीचीही किंमत देत नाहींत हें विसरून चालणार नाहीं. या कसरतवाल्यांचा आणि मोक्षधर्मांचा कांहींही संबंध नाहीं. कसरत करून पोटाची खळगी भरावयाची किंवा लोकांना खळग्यांत घालावयाचें एवढाच ज्यांचा योगमार्गाचा अर्थ त्यांच्याहून ज्ञानदेवांचा पंथ अगदीं निराळा होता. खुद्द भगवद्गीतेंत या योगमार्गाचें स्पष्टीकरण नाहीं. आणि म्हणूनच

> पिंडें पिंडाचा ग्रासु । तो हा नाथसंकेतींचा दंशु ।
> परी दाऊनी गेला उद्देशु । महाविष्णु ॥ २९१

असें ज्ञानदेव म्हणतात. नाथपंथाच्या संकेताचें-शास्त्राचें, तंत्राचें-रहस्य म्हणजे पिंडानें पिंडाचा ग्रास करावयाचा, शरीरानें शरीराला खाऊन टाकावयाचें-असा आहे. या शरीराच्या साहाय्यानेंच या शरीरांतील दोष नाहींसे करून नवीन शरीर म्हणजे निर्दोष शरीर, सामर्थ्यवान् शरीर, तेजस्वी शरीर याच शरीराच्या ठिकाणीं संपादन करावयाचें हा नाथमार्गाचा "गुप्त ठेवा" आहे. त्याचा श्रीकृष्णानीं फक्त उल्लेख केलेला आहे. पण

> तया ध्वनिताचें केणें सोडुनी । यथार्थाची घडी झाडुनी ।
> उपलविली म्यां जाणुनी । ग्राहीक श्रोते ॥ २९२

असें ज्ञानदेव सांगतात. श्रीकृष्णांनीं हें ध्वनिताचें गांठोडें बांधून ठेविलें होतें. तें येथें सोडलेलें आहे आणि त्यांतील खरा अर्थ अगदीं झाडून उघडा केलेला आहे. अर्थात् ही गोष्ट उघड आहे कीं या उघड्या केलेल्या अर्थाचा प्रयोग ज्यांना करावासा वाटेल त्यांनीं तो तज्ज्ञामार्फतच केला पाहिजे व "तज्ज्ञ" मंडळींत ज्ञानदेवांच्या मनोवृत्तीचा महंत सांपडणें ही मोठी दुर्लभ गोष्ट आहे. येथें सांगितलेल्या गोष्टी खऱ्या कां खोट्या हें अनुभवानेंच कळावयाचें आहे आणि

अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।

अशी पूर्वीची तयारी असणाऱ्याचाच अनुभव येथें जमेत धरावयाचा आहे. या अनुभवाची शेवटची पायरी म्हणजे कुंडलिनीचा ब्रह्मरंध्रांत प्रवेश होऊन द्वैताचा पूर्ण निरास होणें ही होय. तेव्हां कर्मफलत्यागी आणि द्वैतशून्य अश महंताच्याकडून ही प्रत्यक्ष जाणून घेण्याची गोष्ट आहे. तिचा शाब्दिक परिचय ज्ञानदेवांनीं स्वानुभवाच्या बळावर ज्ञानेश्वरींत करून दिलेला आहे.

४ सहाव्या अध्यायांतील १५ व्या श्लोकाचा अर्थ वर दिलेलाच आहे. आतां त्यावर ज्ञानेश्वरींतील भाष्य ओवी २९३ पासून सुरू होतें. तें येथें अनुवादित शब्दांत देण्याचा प्रयत्न करतों:—

( शक्ति म्हणजे कुंडलिनी शक्ति ही आत्मशक्तींतच मावळून जाते हें वर आलेंच आहे [२८७] ). शक्तीचें तेज जेव्हां नाहींसें होतें तेव्हां शरीराला आलेलें नवीन बाळसेदार रूपही नाहींसें होतें आणि मग तो योगी जगाला खरोखर असतो तसा दिसत नाहीं. खरोखर तो पहिल्यासारखाच म्हणजे शरीर धारण केलेला असा असतो, त्याचे सर्व अवयवही दृग्गोचर असतात, पण त्याचें शरीर जसें काय वाऱ्यानें वळलेलें, तयार केलेलें आहे असें भासतें. वरची सोपटें सोलल्यानंतर केळीचा गाभा जसा अत्यंत सूक्ष्म व कृश स्वरूपांत दिसावा किंवा आकाशाला जसे अवयव फुटावेत ( म्हणजे आकाशाच्या अफाटपणामुळें ते डोळ्यांना दिसणेंही कठीण ) त्याप्रमाणें त्याचें शरीर बनतें आणि मग त्या शरीराला खेचर म्हणजे आकाशांत संचार करणारें शरीर असें म्हणतात. ( अर्थात् तें फार हलकें असले पाहिजे. ) या पदवीला योगी आला म्हणजे त्या शरीराच्या योगानें जगांत तो चमत्कार करूं शकतो. हा साधक म्हणजे साधन करणारा ( सिद्ध नव्हे ) चालू लागल्यावर मागे जीं पाउलें उमटतात त्यांवर आणिमादिक अष्ट सिद्धि हात जोडून तो सांगेल तें काम करण्यास तयार असतात म्हणजे त्याला सिद्धि प्राप्त होतात. येथें ज्ञानदेव म्हणतात:—

तेणे काय काज आपणपयां ।

त्या सिद्धीबरोबर आपले काम काय आहे ? यावरून सिद्धींच्या नादीं लागणें व चमत्कार करून दाखविणें या भानगडींत खरा सिद्ध पुरुष पडत नाहीं एवढें आपण लक्षांत ठेवावयाचें. असो. योग्याच्या शरीरांत भूतत्रय म्हणजे पृथ्वी, आप आणि तेज या तत्वांचा लोप होतो. पृथ्वीचा अंश

जलांत, जलाचा तेजांत आणि तेजाचा हृदयांत संचार करणाऱ्या वायूंत होऊन वायु हें एकच तत्व त्या शरीरांत राहतें. हा पवन आहे हें तरी तेथें शरीर आहे म्हणून समजतें आणि शेवटीं तोही आकाश या महाभूतांत प्रविष्ट होतो. मग कुंडलिनी हें नांव नाहींसे होऊन मारुत हें नांव त्या शक्तीला मिळतें व हा मारुत म्हणजे वायु जोपर्यंत शिवरूप झाला नाहीं, ब्रह्मरूप झाला नाहीं, तोपर्यंत आपल्या शक्तिरूपानें राहतो. मग जालंधर बंधाचा तो त्याग करतो आणि सुषुम्ना नाडीचें तोंड फोडून गगनाच्या पहाडावर, पर्वतावर म्हणजे ब्रह्मरंध्रांत म्हणजे मस्तकांत शिरून तेथें तो आसन ठोकतो. त्यानंतर काय होतें हें ज्ञानदेवांच्याच मूळ शब्दांत देणें बरें:—

ते ॐकाराचिये पाठीं । पाय देत उठाउठी ।
पश्यंतीचिये पाउठीं । मागां घाली ॥ ३०३
पुढें तन्मात्रा अर्धवरी । आकाशाच्या अंतरीं ।
भरती गमे सागरीं । सरिता जेवीं ॥ ३०४
मग ब्रह्मरंध्रीं स्थिरावोनि । सोहंभावाच्या बाह्या पसरूनी ।
परमात्मलिंगा धांवोनि । आगा घडे ॥ ३०५
तव महाभूतांची जवनिका फिटे । मग दोहींसी होय झटें ।
तेथ गगनासकट आटे । समरसीं तिये ॥ ३०६
पैं मेघाचेनि मुखीं निवडला । समुद्र का वोघीं पडिला ।
तो मागुता जैसा आला । आपणपयां ॥ ३०७
तेवीं पिंडाचेनि मिषें । पदीं पद प्रवेशे ।
तें एकत्व होय तैसें । पांडुकुमरा ॥ ३०८
आता दुजें हन होतें । कीं एकचि हें आइतें ।
ऐशिये विवंचनेपुरतें । उरेचिना ॥ ३०९
गगनीं गगन लया जाये । ऐसें जे कांहीं आहे ।
तें अनुभवें जो होये । तो होऊनी ठाके ॥ ३१०
म्हणोनि तेथींची मातु । न चढेची बोलाचा हातु ।
जेणें संवादाचिया गांवाआंतु । पैठी कीजे ॥ ३११

हें जे शेवटीं ऐक्य होतें, द्वैत लयाला जातें तो प्रत्यक्ष अनुभवाची गोष्ट आहे; त्या गोष्टीला बोलाचा, शब्दांचा हात पोहोंचत नाहीं म्हणजे संवादांत

एकानें दुसऱ्याला ती समजावून द्यावी असे शब्दच मुळीं मिळत नाहींत. जेथें शब्दसृष्टीचे ईश्वर ज्ञानदेवच असें म्हणतात तेथें त्यांचे शब्दच पहावेत, त्यांचा विचार करावा, अनुवाद करण्याच्या फंदांत पडूं नये हेंच ठीक दिसतें. कारण—

म्हणना अखरांमाजी सापडे । की कानवरी जोडे ।
हे तेंग नव्हे फुडे । त्रिशुद्धी गा ॥ ३१६
जे कहीं दैवे । अनुभविले फावें ।
ते आपणचीं हे ठाकावें । होऊनिया ॥ ३१७
पुढती जाणणे ते नाहींची । म्हणोनी असो किती हेची ।
बोलावें आता वायांची । धनुर्धरा ॥ ३१८

या अनुभवानें महासुखाची प्राप्ति होते आणि जे थोर योगी आहेत ते या महासुखाचें प्रत्यक्ष स्वरूप होतात आणि त्याचें वर्णन शब्दांनीं करतां येत नाहीं. पण त्यांचें वर्णन ज्ञानदेव ज्या वाक्यांनीं करतात त्या वाक्यांची कोंवळीक आणि शोभा मोठी अद्‌भुत आहे:—

ऐसें शब्दजात माघौते सरे । तेथ संकल्पाचे आयुष्य पुरे ।
वाराही जेथ न शिरे । विचाराचा ॥ ३१९
जे उन्मनियेचें लावण्य । जे तुर्येचे तारुण्य ।
अनादि जे अगण्य । परम तत्व ॥ ३२०
जे विश्वाचें मळ । जे योगद्रुमाचे फळ ।
जे आनंदाचे केवळ । चैतन्य गा ॥ ३२१
जे आकाराचा प्रांतु । जे मोक्षाचा एकांतु ।
जेथ आदि आणि अंतु । विरोनि गेले ॥ ३२२
जे महाभूताचे बीज । जे महातेजाचे तेज ।
एवं पार्था जे निज–। स्वरूप माझें ॥ ३२३
ते अनिर्वाच्य महासुख । पै आपणची जहाले ते पुरुख ।
जयांचे का निष्कर्ख । प्राप्तिवेरीं ॥ ३२५

अशा प्रकारचे अनिर्वाच्य, शब्दांनीं वर्णन करतां येण्यासारखें नव्हे असें जें महासुख तें, जे आपण होतात म्हणजे आत्मस्वरूपाची प्राप्ति करून घेतात आणि ज्यांचे निष्कर्ष, प्रयत्नांचे परिणाम आत्मप्राप्ति होण्यांत होतात त्यांनाच

मिळतें. वर वर्णन केलेले योगाचे साधन ज्यांनीं करून शरीर सार्थकतेला लावले ते शुद्ध होऊन परमेश्वराच्या योग्यतेचे होतात, परमेश्वर होतात.

परब्रह्माचेनि रसें । देहाकृतीचियेनी मुसें ।
वोतींव जाहले तैसें । दिसती आंगे ॥ ३२७

हें वर्णन ऐकून अर्जुन आश्चर्यचकित झाला, थरारला आणि त्यानें एक खुबीदार प्रश्न श्रीकृष्णाला केला. तो म्हणालाः—“ आपण हा जो उपाय सांगितला त्यामुळें प्राप्ति ( आत्मप्राप्ति ) निश्चित होईल हें खरें आहे. या योगाभ्यासांत जे दृढ होतील, हा अभ्यास जे उत्तम करतील त्यांना ब्रह्मप्राप्ति अगदीं खात्रीनें होईल हें आपण जसें मला सांगितलें तसें तंतोतंत पटलें. या गोष्टीचें नुसतें वर्णन ऐकूनच मला बोध झाला, ज्ञान झालें, हा योग करावा असें वाटलें. नुसतें शाब्दिक वर्णन ऐकूनच माझें अंतःकरण गुंगून गेलें. मग ज्याला अनुभव येईल तो तल्लीन होईल, या जगाला, संसाराला, उपाधीला विसरेल यांत नवल काय ? पण देवा, ज्याच्या अंगीं योग्यता नाहीं, ज्यांना दृढपणा नाहीं, ज्यांना एवढा घट्टपणा नाहीं, त्यांना हा कसा साधणार ? ” आपल्या दुबळेपणाची आठवण होऊन उच्चतर ध्येयाची आवड असणाऱ्याचा हा करुणोद्गार अर्जुनाच्या तोंडीं ज्ञानदेवांनीं घातलेला आहे आणि त्याला उत्तर कृष्णांनीं दिलें तेंही मोठें सुंदर आहे.

हें काज कीर निर्वाण । परी आणीकही जे कांही साधारण ।
तेंही अधिकाराचे वोडवेवीण । काय सिद्धि जाय ॥ ३३९

ही परमार्थाची, योगसाधनाची, ब्रह्मप्राप्तीची, मोक्षाची गोष्ट तर निर्वाणीची, अतिशय अवघड अशी आहे. पण श्रीकृष्ण विचारतात, साधी गोष्ट देखील अधिकार प्राप्त झाल्याशिवाय साध्य होते काय ? तेव्हां योग्यता अंगीं आणणें या गोष्टीचा एवढा बाऊ करण्याचें कारण नाहीं. या बाबतींत अधिकारी होण्याला फार श्रम नकोतः—

नावेक विरक्तु । जाहला देहधर्मी नियतु ।
तरी तोची नव्हे व्यवस्थितु । अधिकारिया ॥ ३४२

थोडासा ( नावेक ) विरक्त होऊन देहाचीं विहित कर्मे (देहधर्म ) जर नियमितपणें ( नियत ) एखादा करूं लागेल तर तोच अधिकाराला प्राप्त होणार नाहीं कां ? मात्र जो अनियत आहे, ज्याच्या ठिकाणीं कसलाही नियमितपणा नाहीं

**त्याला मात्र योगाभ्यासाची गोष्ट जमणार नाहीं. सोळाव्या व पुढील श्लोकांमध्यें “नियत” शब्दाचा अर्थ श्रीकृष्णांनीं स्पष्ट केलेला आहे.**

जो रसनेंद्रियाचा अंकिला । कां निद्रेसीं जीवें विकला ।
तो नाहीं येथ म्हणितला । अधिकारिया ॥ ३४५

**जो रसनेंद्रियाचा, जिभेचा अंकित आहे, जो खादाड आहे, जो झोंपेच्या पूर्णपणें अधीन आहे, तिला विकलेला आहे, जिवाभावानें तिचा दासानुदास झालेला आहे, त्याला योगाभ्यासाच्या बाबतींत अधिकार नाहीं. त्याच्या हातून योगाभ्यास होणार नाहीं.**

अथवा आग्रहाचिये बांदोडीं । क्षुधा तृषा कोंडी ।
आहारातें तोडी । मारुनिया ॥ ३४६

**अथवा जो आग्रहानें (सत्याग्रहाच्या मिषानें सुद्धां) भूक व तहान यांना कोंडतो आणि भुकेला व क्षुधेला मारून जो आहार तोडतो,**

निद्रेचिया वाटा न वचे । ऐसे दृढिवेचेनि अवतरणें नाचे ।
तें शरीरची नव्हे तयाचें । मा योगु कवणाचा ॥ ३४७

**किंवा जो मुळीं झोंपच घेत नाहीं आणि आपण मोठे व्रतस्थ म्हणून नाचत असतो त्याच्या ताब्यांत मुळीं त्याचें शरीरच नसतें तर त्याला योग कसा जमणार? झोंपेच्या अधीन होणें हें जसें योगाला विरुद्ध आहे तसेंच झोंप तोडणें हही विरुद्ध आहे. भुकेच्या आहारीं जाणें हें जसें योगाला विरुद्ध तसें भुकेला मारणें हेंही योगाला विरुद्ध. अतिरेक हा योगाला जमत नाहीं.**

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७

**दुःखाचा नाश करणारा असा हा योग जे युक्ताहारविहार आहेत त्यांनाच प्राप्त होतो. ज्ञानदेव या श्लोकाचा अर्थ सांगतांना म्हणतातः—**

आहार तरी सेविजे । परी युक्तीचेनी मापें मविजे ।
क्रियाजात आचरिजे । तयाचि स्थिती ॥ ३४९
मितला बोलीं बोलीजे । मितलियां पाउलीं चालिजे ।
निद्रेही मानु दीजे । अवसरें एकें ॥ ३५०
जागणें जरी जाहलें । तरी व्हावें तें मितलें ।
येतुलेनी धातुसाम्य संचलें । असेल सहजें ॥ ३५१

ऐसे युक्तीचेनी हातें । जें इंद्रिया वोपिजे भातें ।
ते संतोषासी वाढतें । मनचि करी ॥ ३५२

खाल्लें पाहिजे, झोंपही घेतली पाहिजे, सर्व कांहीं केलें पाहिजे, पण सगळें मितस्थपणानें झालें पाहिजे, नियतपणें झालें पाहिजे; त्यांत अतिरेक उपयोगी नाहीं, जहालपणा उपयोगी नाहीं, तरच योग साध्य होतो, हा या विवरणाचा निष्कर्ष आहे. पुढें सुमारें चारशें वर्षांनीं रामदासांनीं बोलणें चालणें "नेमस्त" पाहिजे म्हणून जो उपदेश केलेला आहे तो वरील तत्त्वाचा अनुवाद होय हें समर्थ रामदासांच्या नांवाखालीं आपल्या अनियतपणाला, ज्याला ते जहालपणा हें नांव देत त्याला, झांकूं पहाणाऱ्या पढतशहाण्याखेरीज कोणालाही समजण्यासारखें आणि उमजण्यासारखें आहे. योग म्हणजेच युक्ति; आणि युक्ति म्हणजे कोणतीही गोष्ट योग्य, मित प्रमाणांत करणें; हा मितपणा, नेमस्तपणा, नियतपणा जेथें आहे तेथें मोक्षाचेंही राज्य प्राप्त होतें.

म्हणोनि युक्ति हे पांडवा । घडे जया सदैवा ।
तो अपवर्गीचीये राणिवा । अळंकारिजे ॥ ३५६

ज्या सदैवाला, भाग्यवंताला, युक्ति घडते, नेमस्तपणा साध्य होतो तो मोक्षाच्या ( अपवर्गाच्या ) राणिवेकडून ( राज्यलक्ष्मीकडून ) अलंकारितो, ती राज्यलक्ष्मी त्याला प्राप्त होते. तेव्हां योगसाधनाचा अधिकार प्राप्त होण्याला अतिरेकी माणूस चालत नाहीं. शरीराचे सर्व व्यापार नियमितपणें होत असले म्हणजेच शरीर निरोगी असतें व असें निरोगी शरीर ठेवण्यासारखी ज्याची नियत वृत्ति आहे त्यालाच या मार्गांत सिद्धता प्राप्त होते. कांहीं तरी आचरट-पणानें अचाट गोष्ट करणें किंवा उगीच निष्कारण देहदंड करणें याला योग म्हणत नाहींत. योगसाधन करणारा पुरुष युक्ताहारविहार असला पाहिजे, त्यक्ताहारविहार असावयास नको, हें सूत्र जर लक्षांत ठेविलें तर योगासंबंधीं दोन बाजूंनीं उद्भवणाऱ्या ज्या दोन प्रकारच्या गैरसमजुती त्यांचा निरास होण्यास हरकत नाहीं. वाटेल तें निर्लज्जपणें करणें म्हणजे योग नाहीं आणि उगीच उपासतापास, सोंवळेंओवळें यांचा अतिरेक करणें म्हणजेही योग नव्हे.

इंद्रियांवर स्वामित्व पाहिजे पण इंद्रियांचा निष्कारण छळ करणें म्हणजे कांहीं स्वामित्व नव्हे. हें स्वामित्व क्रमाक्रमानें साध्य करतां येतें. अभ्यासाला म्हणजे सतत प्रयत्नाला श्रीकृष्ण अतिशय महत्त्व देतात. इंद्रियांची ओढ

अभ्यासाला आड येते, नाहीं असें नाहीं, पण इंद्रियांना भिण्याचें कारण नाहीं. पुष्कळ वेळां हितकारक गोष्ट इंद्रियांना आवडत नाहीं, रुचत नाहीं; श्रेयस्कारक गोष्ट प्रिय, प्रेयसी, वाटत नाहीं. ज्या कडू औषधानें आयुष्य स्थिर राहतें व टिकतें किंबहुना अढळ होतें तें जिभेला आवडत नाहीं पण तें घशाखालीं ओतावें लागतें. त्याचप्रमाणें योग करण्यांत इंद्रियांची मिजास कमी होते पण त्यामुळें योग करण्यापासून परावृत्त होऊं नये. योगासारखे सोपें कांहीं नाहीं असें ज्ञानदेव निश्चयपूर्वक सांगतात. गाढ आसन घालून ज्या योगाला सुरवात करावयाची त्यामुळें चैनीला लांचावलेल्या इंद्रियांना प्रथम दुःख होईल हें खरें. पण इंद्रियांचा निग्रह झाल्याशिवाय, तीं ताब्यांत आल्याशिवाय आपणपेया, आत्मस्वरूपाला चित्त भेटू शकेल ही गोष्ट शक्य नाहीं. चित्ताला आत्मस्वरूपाची एकदां ओळख झाली कीं त्याला अत्यंत सुखाचा लाभ होतो व तें सुख भोगण्यांतच तें तल्लीन होऊन जातें. त्या सुखाहून अधिक असें दुसरें सुख नाहींच आणि ज्या सुखाची ओळख इंद्रियांना बिलकुल नसतें तें सुख मग त्याला प्राप्त होतें आणि तें सुख भोगीत असतां मेरूपर्वताहून मोठीं दुःखें जरी देहावर कोसळलीं तरी त्या चित्ताला त्यांची फिकीर वाटत नाहीं. तें चित्त महासुखांत इतकें गर्क होऊन गेलेलें असतें कीं शरीराला जरी शस्त्रांनीं तोडलें किंवा अग्नींत टाकलें तरी त्याला त्याची दादही नसतें. अशा तऱ्हेचें मोठें विलक्षण सुख या योगसाधनाच्या सिद्धतेने प्राप्त होतें. त्या सुखाची गोडी संसाराच्या तोंडांत अडकलेल्या, संसारसुखाला लांचावलेल्या, मनाला एकदां लागली कीं त्याला वासना म्हणून उद्भवत नाहीं. योगाच्या अभ्यासानें हें अपूर्व, विलक्षण, अलौकिक, असामान्य सुख प्राप्त होतें; तें सुख प्रत्यक्ष दिसावयास लागतें, आणि त्या सुखाशीं आपण सरूपता पावतों. तेव्हां मनाचें नियमन केलें कीं संकल्पविकल्पाचहीं नियमन झालेंच आणि नियमन होणें म्हणजेच वैराग्य उत्पन्न होणें; वैराग्य प्राप्त झाल्यावर बुद्धीच्या ठिकाणीं धैर्य उत्पन्न होईल आणि ती मनाला अनुभवाच्या वाटेनें आत्मभुवनांत, परमात्मभुवनांत, आणून सोडील. शब्दांनीं वर्णन न करतां येण्यासारख्या ज्या गोष्टी घडतात व ज्यांमुळें शरीराला, बुद्धीला समाधान होतें त्यांना अनुभव हें नांव दिलेलें आहे व या शब्दाला वेदांतशास्त्रांत मोठें महत्व आहे. हळूहळू उच्च सुखाचा अनुभव येऊं लागला म्हणजे मोठें उनाड असलेलें

मनसुद्धां ग्राम्य सुखांचा किंवा सुखकल्पनांचा त्याग करून तिकडे अधिकाधिक वळेल व तें शेवटीं आत्मस्वरूपाला जाऊन भिडेल. मन तेथपर्यंत गेल्यावर त्या पुरुषाचें बाह्य लक्षण म्हणजे

भूतांचेनि अनेकपणें । अनेक नव्हे अंतःकरणें ।
केवळ एकत्वचि माझें जाणें । सर्वत्र जो ॥ ३९४
जेणें ऐक्याचिये दिठी । सर्वत्र मातेंचि किरीटी ।
देखिला जैसा पटीं । तंतु एक ॥ ३९८
सुखदुःखादि वर्मे । कां शुभाशुभें कर्मे ।
दोनी ऐसीं मनोधर्मे । नेणेचि जो ॥ ४०५
म्हणोनि आपणपां विश्व देखिजे । आणि आपण विश्व होइजे ।
ऐसें साम्यचि एक उपासिजे । पांडवा गा ॥ ४०९

ही साम्यावस्था ही त्या योग्याचें लक्षण होय. या साम्यावस्थेला भगवद्गीतेंत, वेदांत तत्वज्ञानांत, ज्ञानेश्वरींत, महाराष्ट्रीय कवींच्या वाङ्मयांत फारच उन्नत स्थान दिलेलें आहे व तें यथायोग्य आहे. ही साम्यावस्था ज्याच्यांत नाहीं तो योगी नव्हे, तो ज्ञानी नव्हे, तो सत्पुरुष नव्हे, तो साधु नव्हे, तो संत नव्हे, तो सद्गुरू होण्याला लायक नाहीं, सच्छिष्य त्याच्याकडे वळणार नाहीं. अशा प्रकारें मनोजयाच्या मार्गानें आत्मस्वरूपदर्शनापर्यंत योगसाधन करून कसें जातां येईल त्याचें श्रीकृष्णानें विवरण केलें. त्यानंतर अर्जुनानें दुसरा प्रश्न केला. मनोजय करावा हें ठीक आहे, पण हें सोपें आहे कां? मन अतिशय चंचल, वाऱ्यासारखें, त्याला धरावें कसें आणि ताब्यांत ठेवावें कसें? आणि त्याचा निग्रह साधणार कसा?

५ मनाच्या चंचलतेचें वर्णन अर्जुनानें अगदीं निर्भीडपणानें केलेलें आहे. रोगाचा परिहार करून घ्यावयाचा असेल तर त्याचीं सर्व लक्षणें वैद्याला कांहींही मागें न ठेवतां सांगितलीं पाहिजेत. अर्जुन म्हणतोः—"श्रीकृष्णा, आमची दया येऊनच मनोजय करा म्हणून सांगतां; पण या मनाला जिंकणें आम्हांला मोठें कठीण दिसतें. हें मन केवढें आहे हें पहावें तर त्याचा पत्ताही लागत नाहीं आणि हें एकदां भटकावयास लागलें कीं त्याला त्रैलोक्यही पुरें पडत नाहीं. तेव्हां या मनाचें आकलन कसें करावयाचें? चेष्टा करीत राहणाऱ्या मर्कटाला स्वस्थ कसें करावयाचें? प्रचंड झंझावाताला थांब म्हणून सांगितलें

तर तो थांबेल कां? हें मन असें विलक्षण आहे कीं तें बुद्धीचा छळ करतें, तिला सतावून सोडतें; निश्चयाला टाळतें, निश्चय म्हणून करूं देत नाहीं; आणि धैर्याच्या हातावर टाळी देऊन केव्हांच निसटतें, प्रत्यक्ष विचाराला या मनामुळें भूल पडते, विचारी माणसें सुद्धां या मनांतील कल्पनातरंगामुळें उल्लू होतात; संतोषाच्या ठिकाणींही याच्यामुळें वासना उद्भवतात, संतुष्ट माणसें जर मनाच्या तावडींत सांपडतील तर संतोष टाकून भलभलत्या गोष्टींची प्राप्ती व्हावी म्हणून झुरणीला लागतील; आणि ज्याला स्वस्थपणें बसण्याची इच्छा झाली आहे अशा माणसालाही हें मन दाही दिशा धुंडावयास लावील. ज्याचा निरोध करावा तर जें उसळी घेतें, ज्याचा संयम करावयास जावें तो जें ज्यास्तच चेखाळतें, असें हें मन आपला स्वभाव कधीं सोडून देऊन स्वस्थपणानें राहील काय? मन जेव्हां निश्चळ व्हावें तेव्हां आम्हाला साम्यावस्था येणार आणि मन इतकें चंचल आहे कीं त्याला निश्चळ करणें म्हणजे दुरापास्त गोष्ट आहे." अर्जुनाची ही अडचण श्रीकृष्णांनीं ओळखली व "तूं म्हणतोस तें अगदीं खरें; बोलत आहासी तें तैसेंची। यया मनाचा कीर चपळची। स्वभावो गा॥" म्हणून त्यांस सांगितलें. तरीसुद्धां, श्रीकृष्ण म्हणतात,

परी वैराग्याचेनि आधारें। जरी लाविले अभ्यासाचिये मोहरें।
तरी केतुलेनि एकें अवसरें। स्थिरावेल॥ ४१९

वैराग्याचा आधार घेऊन योगाभ्यासाच्या मार्गाला लागलें तर कांहीं काळानें मन स्थिर होईल. वैराग्याचा ज्याला आधार नाहीं त्याला मात्र हा मनोजय होणार नाहीं. मनाला एकदां आंजारून गोंजारून आत्मसुखाची गोडी लावली पाहिजे; म्हणजे त्या अनुभवाचें सौंदर्य कळल्यावर मग तें क्षुल्लक गोष्टीकडे ढुंकूनही पहाणार नाहीं. ज्यांना विरक्ति बिलकूल नाहीं, जे अभ्यास करण्याचा प्रयत्न सुद्धां करीत नाहींत त्यांना मात्र हें मन आवरतां येणार नाहीं हें श्रीकृष्ण मान्य करतात. यम आणि नियम यांच्या रस्त्याकडेच जर आपण कधीं गेलों नाहीं आणि केवळ विषयरूप जलांत जर सारखी बुडी देऊन बसलों आणि युक्तीची, योगाची, नियमनाची तोसीस जर या मनाला कधीं लावली नाहीं तर मन तें निश्चळ होणार कसें? अर्थात् होणार नाहीं. म्हणून मनोनिग्रह करण्याचे जे उपाय आहेत त्यांना सुरवात केली पाहिजे म्हणजे यश आल्याशिवाय राहणार नाहीं. योगसाधन करतां येत नाहीं असें नाहीं

पण पुष्कळांची अडचण ही असते कीं अभ्यास करण्याचा मुळीं प्रयत्नसुद्धां करावयाचा नाहीं अशी त्यांची वृत्ति असते.

अंगीं योगाचे होय बळ । तरी मन केतुले चपळ ।

आंगीं जर योगसाधन करण्याचें सामर्थ्य असेल तर मनाच्या चपळपणाची प्रतिष्ठा काय ? पंचमहाभूतेंसुद्धां माणूस आपल्या बळानें ताब्यांत आणतो मग मन कां ताब्यांत येणार नाहीं ? अर्जुनाला हा युक्तिवाद मान्य झाला.

तेथ अर्जुन म्हणे निकें । देवो बोलती ते न चुके ।
साचची योगबळेंसी न तुके । मनोबळ ॥ ४२७

परंतु ज्यांना योगसाधनाची मुळींच ओळख नाहीं त्यांना मन अनावर वाटावें यांत नवल नाहीं. योगाचें वर्णन ऐकून अर्जुनालाही वाटलें, पटलें, कीं मनोजय करतां येईल व एकदां मनोजय झाला म्हणजे पुढच्या गोष्टी सर्व क्रमाक्रमानें साध्य होतील. पण वैराग्य आणि अभ्यास, योगाभ्यास, या दोन तत्वांची आठवण विसरतां कामा नये आणि या दोन तत्वांच्या जोरावर असाध्यही साध्य करतां येते. “ कारण अभ्यास तुका म्हणे. ”

योगाभ्यासाचा आणखी एकदां थोडक्यांत उल्लेख नवव्या अध्यायाच्या चौदाव्या श्लोकावर भाष्य करतांना ज्ञानदेव करतात. त्यांत “ नित्ययुक्ता उपासते ” असें म्हटलें आहे. ज्ञानदेव म्हणतात—“ कित्येक पंच प्राण आणि मन यांना मोठ्या काळजीपूर्वक आपल्या ताब्यांत ठेवतात. बाहेरून यमनियमाचें कुंपण लावतात आणि वज्रासनाची भिंत, तट उभा करून त्याच्यावर प्राणायामरूपी तोफा तयार ठेवतात. त्या ठिकाणीं कुंडलिनी शक्ति जागृत होऊन तिचा सर्वत्र लखलखाट होतो आणि मन व पवन ( शरीरांतील वायु ) हे अनुकूल होतात. अमृतकळेचें तळें ओसंडते. त्या ठिकाणीं प्रत्याहार म्हणजे इंद्रियांची एकाग्रता कळसाला पोहोंचते, विकारांचीं बोहलीं संपतात म्हणजे विकारांचें नाहीं नांव होतें आणि सर्व इंद्रियें जशीं काय बांधावींत त्याप्रमाणें अंतःकरणाच्या आंत येऊन राहतात. त्या ठिकाणीं धारणारूपी अश्वांची गर्दी होते, पंचमहाभूतें एकवटून आकाशांत समाविष्ट होतात आणि संकल्पविकल्पांच्या चतुरंग सैन्याचा धुव्वा उडतो. नंतर आपला विजय झाला अशी आरोळी ठोकीत ध्यानाचें निशाण उभें होतें आणि तन्मयत्वाचें, ब्रह्मपदाचें एकछत्री साम्राज्य सुरू होतें आणि आत्मानुभवाच्या साम्राज्याचा पट्टाभिषेक ( त्या योग्याला ) संपूर्णपणें

समाधिलक्ष्मीबरोवर होतो." अशा प्रकारें हें योगाभ्यासाचें व त्याच्या सुंदर परिणामांचें थोडक्यांत रूपकात्मक वर्णन या ठिकाणीं आहे. (९-२१२ ते २१८). येथें थोडक्यांत यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधि या सर्वांचा व शेवटीं अनुभवसुख यांचाही उल्लेख क्रमानें झालेला आहे. या अष्टांगयोगाचें आणखीही एकदोन ठिकाणीं थोडक्यांत उल्लेख ज्ञानदेवांनीं केलेले आहेत त्यावरून योगाभ्यासाकडे त्यांचें लक्ष्य विशेष होतें याबद्दल शंका रहात नाहीं. त्यांनीं केलेलें वर्णन हें त्यांच्या स्वतःच्या दैनंदिन अभ्यासाचें असलें पाहिजे हें उघड आहे आणि म्हणून त्याचें महत्व विशेष आहे. योगाभ्यासाचें जें तंत्र आहे तें एका दृष्टीनें पाहिलें तर शारीरिक कसरतीचें तंत्र आहे आणि हें तंत्र हस्तगत करण्याला कोणत्याही धर्मभावनेचा अम्मल मनावर असलाच पाहिजे असें नाहीं असें एका इंग्रज लेखकानें म्हटलें आहे. पण या अभ्यासांतून प्राप्त होणारी मनःस्थिति आणि अनुभव हीं आधिभौतिक गोष्टींपासून इतकीं निराळीं आहेत कीं त्यांना धार्मिक म्हटलें नाहीं तरी आध्यात्मिक म्हटलें पाहिजे. आणि आर्यधर्म-हिंदुधर्म-हा सूक्ष्मपणें लक्ष्य दिलें तर तंत्र किंवा ग्रंथ यांच्यासंबंधीं अभिनिवेशाचा धर्ममार्ग नसून आध्यात्मिक-आधिभौतिकापलीकडच्या-भूमिकेवर नेणारा असा धर्ममार्ग आहे हें पटल्याशिवाय राहणार नाहीं. म्हणूनच अनीश्वर तत्वज्ञान सांगणाऱ्या कपिलमहामुनींचा या धर्माच्या सर्व ग्रंथांत अत्यंत गौरवपर उल्लेख आहे. कपिलांचें तत्वज्ञान अनीश्वरवादी असलें तरी तें आधिभौतिक नाहीं, सुखं च मे शयनं च मे, या प्रणालींतील नाहीं, त्यालाही मनःसंयमन, इंद्रियजय आणि अध्यात्माची भूमिका या गोष्टी मुख्य वाटतात. याच कारणामुळें हिंदु धर्माच्या रूढींवर प्रबळ शस्त्रसंपात करणाऱ्या आगरकरांच्या लेखांत किंवा केशवसुताच्या कवितांत वेदांताचीच भूमिका आढळते. अशा प्रकारें योगशास्त्र हें जरी मूलतः धार्मिक स्वरूपाचें नाहीं तरी आध्यात्मिक मनोवृत्तीवाचून तें साध्य नाहीं व चमत्कार उत्पन्न करण्याकरितां जे त्याचा अभ्यास करूं पहातात त्यांचा धिक्कारच ज्ञानदेवप्रभृतींनीं केलेला आहे आणि सिद्धीच्या पाठीमागें लागणारे योगी भ्रष्ट होतात असें सांगितलेलें आहे. तथापि योगाभ्यासाच्या प्रथमावस्थेचें शरीरावर जे परिणाम होतात व शरीरांतील कित्येक व्याधींचा त्यामुळें जो बीमोड होतो तिकडेच आलीकडे प्रतीच्य देशांत किंवा येथेंही विशेष लक्ष

दिलें जातें व योग म्हणजे एक शारीर शिक्षणाचा भाग आहे (Physical Culture) या दृष्टीनें त्याचा पुष्कळ लोक विचार करूं लागले आहेत.

पतंजलीनें योगाची व्याख्या चित्तवृत्तिनिरोध अशी दिली आहे व ज्ञानदेवांनींही मनोजय हेंच योगाचें रहस्य सांगितलें आहे. चित्त एकाग्र करून परब्रह्मचिंतन करणें हा योगसाधनाचा हेतु आहे. चित्त उत्तम प्रकारें आणि शास्त्रीय रीत्या एकाग्र करतां येण्यासाठीं योगाचें सर्व तंत्र आहे. चित्ताची एकाग्रता होण्यापूर्वी (धारणा, ध्यान यांच्यापूर्वी) आसनविधीच्या योगानें आणि प्राणायामाच्या साधनानें शरीरांतर्गत वायूंचें निरोधन इष्ट आहे आणि शारीरशास्त्रदृष्ट्या त्याला महत्व मिळालें हें साहजिक आहे. शरीरांतील वायूचे निरोधन करून त्याला विशिष्ट मार्गानें चालावयास लावल्यामुळें शरीरांतील सर्व व्याधि नष्ट होतात व कांहीं सुप्त असलेल्या विलक्षण शक्ति जागृत होऊन शरीराकडून न होणारे चमत्कारही होऊं शकतात. हें सर्व युक्ताहारविहारत्वानें करणें यालाच राजयोग हें नांव आहे. राजयोग म्हणजे राजेलोकांचा, चैनी लोकांचा, सुखासीन लोकांचा योग असा एक लौकिक अर्थ होऊन बसला आहे तो सर्वस्वी चुकीचा आहे. राजयोग म्हणजे योगमार्गांतील राजमार्ग, आडमार्ग नव्हे. आडमार्ग म्हणजे हठयोग व तो नव्हे तो राजयोग. हठयोगानें शरीराची कसरत अधिक होते पण तो अध्यात्मापासून दूर राहतो. त्यांत मनोजय होत नाहीं म्हणून ताब्यांत आणलेलें शरीर केव्हां बंड करील याचा नियम नसतो. राजयोग किंवा योग हें अचाटपणाचे बंड नव्हें. पण मनुष्य एकदां त्रासला म्हणजे अतिरेक करतो तसा तो योगमार्गांतही अतिरेक करतो व या अतिरेकाच्या प्रकारांनाच सामुदायिक नांव हठयोग असें मिळालेलें आहे. जे योगमार्गांत तज्ज्ञ व अनुभवी आहेत व एकंदरींत जे विचारी आहेत ते हठयोगाला गौण समजतात. हठयोगाची तुलना शब्दचमत्कारयुक्त कवितेबरोबर करतां येईल. उत्तम रसिक व ज्ञानी शब्दचमत्कारांना व हठयोगाला गौण समजतात. पण अज्ञानी मूढांना शब्दचमत्कारांचें जसें कौतुक वाटतें तसेंच हठयोगाचें वाटतें. मूढांची बहुसंख्या असते. त्यांच्या डोळ्यांत शब्दचमत्कार करून, तंत्राचें चमत्कार करून आणि हठयोगाचे चमत्कार करून धूळ फेकतां येते. पण मेनकेची गांठ पडली कीं विश्वामित्र लटपटतो हें अज्ञ लोकांनाही कळतें व कवितेच्या तंत्राची कितीही कसरत केली तरी तींत तिचा खरा मंत्र, अर्थचमत्कार आणि रस, हे

मिळत नाहींत हे शेवटीं सामान्य लोकांनाही समजल्याशिवाय रहात नाहीं. ज्ञानदेवांनीं योगमार्गाचें केलेलें आविष्करण त्याचा जनतेला अधिक परिचय व्हावा या उद्देशानें केलेलें होतें हें स्पष्ट आहे. तेव्हां हा मार्ग "गुप्त" रहावा या मताचे ते नव्हते. "गुप्त" गोष्टीचा बाऊ करणाऱ्यांना लफंगे समजावेत व त्यांच्याकडे योगसाधनासाठीं जाऊं नये असा इषारा स्वामी विवेकानंद यांनींही आपल्या "राजयोग" या ग्रंथांत दिलेला आहे. आतां ज्ञानदेवांनीं वर्णन केलेल्या सर्व गोष्टी क्रमाक्रमानें होतात किंवा नाहीं हें पहाणें अनुभवाचें काम आहे. प्राणायामविधि साधून दोन्ही नाकपुड्यांतून वारा समान वाहू लागला म्हणजे निद्रेची फारशी आवश्यकता रहात नाहीं व नाकाला भोंवताली कशीही परिस्थिति असली तरी सुवास यावयास लागतात असें स्वामी विवेकानंद सांगतात. या सर्व गोष्टी अनुभवगम्य आहेत. तेव्हां त्या भागांत प्रवेश करावयाचा येथें विचार नाहीं. कुंडलिनीचा शारीरशास्त्रदृष्ट्या तपास लावण्याचे प्रयत्न सफळ झालेले नाहींत हें वर सांगितलेंच आहे. पण कुंडलिनी म्हणजे एक शक्ति आहे, उष्णता, प्रकाश, विद्युत् यासारखी शक्ति आहे व कांहीं विशिष्ट प्रयोगांनीं ती जागृत होते म्हणजे उत्पन्न होते आणि मग तिचे कांहीं विशिष्ट परिणाम होतात असें समजून चाललें तरी योगाच्या अभ्यासाला किंवा योगशास्त्राचें मर्म कळण्याला, कसलीही हरकत येण्याचें कारण नाहीं.

६ ज्ञानदेव हे गुरुपरंपरेनेंच योगाभ्यासांत निष्णात झाले होते. नाथसांप्रदायांत योगमार्गाचें महत्व फार होतें. भक्तिमार्गाचा प्रचंड पूर जो पुढे सर्व भरतखंडावर आला त्यांत योगमार्ग मागसला असें दिसतें. पण ज्ञानदेवांना जरी भक्तिसुख मान्य होतें तरी त्यांचा अधिक ओढा योगमार्गाकडे होता ही गोष्ट निर्विवाद आहे. शिवाय योगमार्गांत मनोजयाला जें प्राधान्य आहे तेंच भक्तिमार्गांतही ज्ञानदेव देतात आणि ज्ञानदेवाप्रमाणेंच नामदेव, एकनाथ, तुकाराम हे देतात ही लक्ष्यांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. भक्त म्हणजे समदर्शी व सदाचरणी असलाच पाहिजे हें ज्ञानदेवांचें ठाम तत्व होतें. "न कळतां पद अग्निवरी पडे" त्याप्रमाणें चुकून देवाचें नांव तोंडीं आलें तरी मोक्ष मिळतो या तत्वाचा पुरस्कार त्यांच्या ग्रंथांत कोठेंही नाहीं. वैराग्य हें पाहिजेच, योग्यास पाहिजे, भक्तास पाहिजे. परमार्थ हा स्वार्थापेक्षां--लौकिक स्वार्थापेक्षां--अनंत परीनें महत्वाचा, मोलाचा असल्यामुळें स्वार्थ साधून त्याबरोबर पुरवणीचें काम म्हणून

परमार्थ साधेल अशा मताचें प्रतिपादन त्यांनीं कोठेंही केलेलें नाहीं. मुमुक्षु–आहे या परतंत्र स्थितींतून सुटका व्हावी अशी इच्छा असणारा पुरुष–हाच फक्त योगाला काय, भक्तीला काय, अधिकारी आहे; आणि हें तत्त्व ज्यांनीं जाणलें त्यांनाच ज्ञानेश्वरी ग्रंथांतील रहस्य समजेल हें त्यांनीं स्पष्टपणें सांगितलेले आहे.

तैसें अध्यात्मशास्त्रीं इये । अंतरंगचि अधिकारिये ।

या त्यांच्या म्हणण्याचा कोणताही दुसरा अर्थ नाहीं. योगशास्त्र हा अध्यात्मशास्त्राचा भाग आहे, संसारशास्त्राचा नाहीं, विज्ञानाचा नाहीं हा विसरतां कामा नये. वैराग्याचें वर्णन ज्ञानलक्षणें सांगतांना ज्ञानेश्वरींत तेराव्या अध्यायांत केलेलें आहे. आठव्या श्लोकाच्या सुरवातीला "इंद्रियार्थेषु वैराग्यम्" असा शब्द आहे त्याचा अर्थ विशद करणाऱ्या बारा ओंव्या आहेत त्या येथें घेणें सयुक्तिक होईल.

आणि विषयांविखीं । वैराग्याची निकी ।
पुरवणी मानसीं कीं । जिती आथी ॥ १३–५१३
वमिलिया अन्ना । लाळ न घोटी रसना ।
का आंग न सूये आलिंगना । प्रेताचिया ॥ ५१४
विष खाणें नागवे । जळत घरीं न रिघवे ।
व्याघ्रविवरा न वचवे । वस्ती जेवीं ॥ ५१५
धडाडीत लोहरसीं । उडी न घालवे जैसी ।
न करवे उशीशी । अजगराची ॥ ५१६
अर्जुना तेणें पाडें । जयासी विषयवार्ता नावडे ।
नेदी इंद्रियांचेनि तोंडें । कांहीं जावों ॥ ५१७
जयाचे मनीं आलस्य । देहीं अतिकार्श्य ।
शमदमीं सौरस्य । जयासीं गा ॥ ५१८
तपोव्रतांचा मेळावा । जयाचे ठायीं पांडवा ।
युगांत जया गांवा–। आंतु येतां ॥ ५१९
बहु योगाभ्यासीं हांव । विजनाकडे धांव ।
न साहे जो नांव । संघाताचें ॥ ५२०

नाराचांचीं आंथरुणें । पूयपंकीं लोळणें ।
तैसें लेखी भोगणें । ऐहिकींचें ॥ ५२१
आणि स्वर्गातें मानसें । ऐकोनि मानी ऐसें ।
कुहिलें पिशित जैसें । श्वानाचें कां ॥ ५२२
ते हें विषयवैराग्य । जें आत्मलाभाचें भाग्य ।
येणे ब्रह्मानंदा योग्य । जीव होती ॥ ५२३
ऐसा उभयभोगीं त्रासु । देखसी जेथ बहुवसु ।
तेथ जाण रहिवासु । ज्ञानाचा तूं ॥ ५२४

ब्रह्मानंदायोग्य होण्याला वैराग्य पाहिजे. योगाभ्यासाचें फळही ब्रह्मानंद आहे. तेव्हां वैराग्याशिवाय योगाभ्यास नाहीं. आणि भक्तीचें पर्यवसान ब्रह्मानंदांत होतें. तेव्हां भक्तीच्या परीक्षेला बसण्यापूर्वींही वैराग्याची प्राथमिक परीक्षा उतरलेली असली पाहिजे. वैराग्य म्हणजे डोक्यांत राख घालणें ( अक्षरशः किंवा लाक्षणिक अर्थानें ) नव्हे. वैराग्य हें नेहमींच विवेकांतून निर्माण व्हावें लागतें या गोष्टीबद्दल सुजाण लोकांत मतभेद नाहीं.

योगमार्गालाच कर्ममार्ग असें नांव आहे. " ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेण योगिनाम् " इत्यादि वचनांवरून ही गोष्ट स्पष्ट आहे. योगमार्गाचा प्रसार व विस्तार होण्यापूर्वी वैदिक कर्ममार्ग म्हणजे यज्ञमार्ग होता. या यज्ञयुक्त कर्ममार्गाचा परलोकाशीं, पुनर्जन्माशीं प्रत्यक्ष संबंध होता. भगवद्गीतेंत परलोक, पुनर्जन्म यांचा कोठेंही प्रत्यक्ष निषेध नाहीं; किंबहुना, योगमार्गाला सुरवात केलेला पण मध्यंतरी मरण आल्यामुळें सिद्धि न पावलेला असा मनुष्य दुसऱ्या जन्मांत चांगल्या कुळांत जन्मास येऊन तो योगाभ्यास पुढें चालू ठेवतो असें वर्णन केलेलें आहे. तथापि " स्वर्गनरकसूचक " ज्ञानाला अज्ञानच म्हटलें आहे व योगमार्गातील सिद्धि, आनंद, समाधान, मनःस्थिति ही याच लोकीं, याच देहीं प्राप्त होतात ही गोष्ट सर्वत्र स्पष्ट केलेली आहे; आणि हेंही यज्ञविशिष्ट कर्ममार्ग व योगमार्ग यांतील फार महत्वाचें अंतर आहे. वेदांतांत ज्ञानमार्ग सांगितला आहे याचा अर्थ " अकर्म " असा नव्हे ही गोष्ट भगवद्गीतेंत आणि ज्ञानेश्वरींत वरचेवर स्पष्ट केलेली आहे. भगवद्गीतेंतच " अकर्म " ग्राह्य मानलेलें नाहीं तेव्हां शंकराचार्यांनाही तें मान्य नाहीं हें उघड आहे. परंतु कर्ममार्ग म्हणजे उद्योगमार्ग, उद्यममार्ग, राष्ट्रसुधारणामार्ग

इत्यादि नवीन अर्थ जे प्रतीत राजकारणशास्त्रांतून व तत्त्वज्ञानांतून निघालेले आहेत त्यांचा तंतोतंत पुरस्कार भगवद्गीता, शांकरभाष्य अगर ज्ञानेश्वरी यांत हुडकूं पाहणें व तो तेथें नाहीं म्हणून या पूर्व ग्रंथांना व आचार्यांना दोष देणें हें समंजसपणाचें नाहीं. खुद ज्ञानदेवांनीं "शृंगारोनी कर्म करावें" इत्यादि वचनांच्या द्वारां सर्व गोष्टी उत्तमपणें, प्रवणपणानें (efficiently) केल्या पाहिजेत हें अगदीं स्पष्ट केलेलें आहे. यज्ञमार्ग, योगमार्ग, कर्मयोग इत्यादि संज्ञा शास्त्रीय आहेत व त्यांचा अर्थ निश्चित झालेला आहे व त्याच अर्थानें त्यांचा विचार केला पाहिजे हें उघड आहे.

ज्याला पंथराज असें ज्ञानदेवांनीं नांव दिलें आहे तोच राजयोग किंवा योगराज होय. त्याच्या साहाय्यानें सर्व शरीर (मनासहित) आपल्या ताब्यांत आणावयाचें व खरें वैयक्तिक स्वातंत्र्य मिळवावयाचें आणि याप्रमाणें पिंड (म्हणजे आपलें शरीर) हें संपूर्ण आपल्या ताब्यांत आल्यावर जें पिंडीं तें ब्रह्मांडीं या न्यायानें ब्रह्मांडही आपल्या हातीं येतें असा या ठिकाणीं तर्कवाद आहे. योग्याला जें अपरंपार सामर्थ्य प्राप्त होतें त्याचा स्वार्थासाठीं किंवा वैयक्तिक लाभासाठीं उपयोग करावयाचा नाहीं तर त्या सामर्थ्यानें ब्रह्मानंद हस्तगत करावयाचा हें योगाचें साध्य, ध्येय आहे. या मार्गांत करावयाच्या गोष्टी कठीण असल्यामुळें त्या सामान्य माणसांना साध्य नाहींत व त्यांच्यासाठीं भक्तियोग आहे अशी सार्वत्रिक समजूत झालेली दिसते. पण वर भक्त कसा असला पाहिजे यासंबंधीं उल्लेख केला आहे त्यावरून तेंही कांहीं सोपें काम नाहीं हें स्पष्ट होतें. नुसतें "रामकृष्ण हरि गोविंद" म्हणून कांहींही होत नाहीं. नामोच्चाराचें तंत्ररूप जाऊन जेव्हां तो मंत्ररूप होईल तेव्हां तो करणाऱ्याची योग्यता विशेष असावी लागेल. स्वार्थ सोडणें, सर्वांभूतीं परमेश्वर पहाणें, अहंभाव नसणें, लोभ नसणें, कर्मफलत्याग करणें या गोष्टी ऐकण्याला सोप्या व गोड असल्या तरी करण्याला कठीण, फार दुर्घट आहेत. त्या इतक्या दुर्घट आहेत कीं कित्येक दांडगेश्वर पण स्वत:वर स्वामित्व नसणारीं माणसें त्या गोष्टी करतां न आल्यामुळें योगमार्गाची कसरत करण्याकडे लक्ष देतात. कित्येक एका पायावर वर्षभर उभे राहतील, पण जवळची कवडी कोणास देणार नाहींत. कित्येक एकवीस दिवस नाहींतर एकोंएक दिवस उपास करतील पण आपला हट्ट, अहंकार सोडणार नाहींत

आणि अहंकार नसणें हें तर जसें ज्ञान्याचें तसेंच भक्ताचें मुख्य लक्षण आहे. अशीं माणसें म्हणजे अहंकार सोडणें वगैरे न करणारीं माणसें योगाच्या कसरतींत शिरतात, त्यांत तरबेज होतात, त्यामुळें शरीर कमावतात, उत्तमोत्तम शक्ति प्राप्त करून घेतात व राजयोगाला हठयोगाचें रूप आणतात आणि "गुप्त" गोष्टींचें थोतांड माजवितात. पण त्यांना ब्रह्मप्राप्ति होत नाहीं व त्यांच्याकडे जाणारेही ब्रह्मप्राप्तीसाठीं जात नाहींत तर ते खरोखर लौकिक हासोसाठींच जात असतात. अशा प्रकारचे शिष्यही ठक आणि गुरूही ठक आणि अशाच मंडळींना उद्देशून श्रीकृष्णमुखानें ज्ञानदेव सांगतात.

येथे जाणीव करी तोचि नेणे । आथिलेपण मिरवी तेंचि उणे ।
आम्ही जाहलो ऐसे जो म्हणे । तो कांहींच नव्हे ॥ ९–३६८

तो येथें जाणता म्हणून मिरवतो त्यालाच कांहीं कळत नाही. जो मी आहें, पूर्ण आहे म्हणून बोभाटा करतो त्याचें तेंच उणें म्हणजे हा बोभाटा हेंच त्याचें उणेंपण, तो पूर्णत्वाला पोंचला नाहीं याची खूण; आणि आम्ही झालों, ब्रह्मरूप झालों असें म्हणणारे कांहींही झालेले नसतात, कोरडे ठणठणीत असतात. तेव्हां "मी ब्राम्ही स्थितींत असतों म्हणून वाटेल तसा वागतों" अशा अर्थाचें वाक्य बोलणारे गुरुपदवीला तर नालायख आहेतच पण साधा चांगला माणूस असेंही म्हणवून घेण्याला नालायख आहेत.

अथवा यज्ञदानादि किरीटी । कां तपें हन जे हुटहुटी ।
ते तृणा एकासाठीं । न सरे येथ ॥ ९–३६९

आपल्या यज्ञाची, दानाची, तपश्चर्येची जे घमेंड मारतात त्यांच्या यज्ञदान-तपाला येथें गवताच्या काडीचीही किंमत नाहीं. तेव्हां निर्णयः—

म्हणोनि थोरपण पर्‍हां सांडिजे । येथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे ।
जै जगा धाकुटें होइजे । तैं जवळीक माझी ॥ ९–३७८
या लागीं शरीर सांडोवा कीजे । सकळ गुणांचें लोण उतरिजे ।
संपत्ति मद सांडिजे । कुरवंडी करूनी ॥ ९–३८१

आणि असें करणारा तोच भक्त; आणि असा भक्त होणे हें पुष्कळ वेळेला योगाच्या कसरतीपेक्षांही कठीण आहे. तेव्हां भक्तिमार्ग हा दीनदुबळ्यांचा किंवा वाटेल तसल्या लफंग्यांचा मार्ग असा अर्थ करणें म्हणजे अर्थाचा अनर्थ करण्यासारखें आहे.

ज्ञानदेवाच्या या योगमार्गाचा निरोप घेण्यापूर्वी एक गोष्ट येथें सांगावीशी वाटते ती ही कीं या मार्गाकडे सध्यां प्रतीच्य देशांत पुष्कळांचें लक्ष वेधलें आहे. तें जरी बव्हंशीं आधिभौतिक कारणासाठीं वेधलेलें असलें तरी त्यामुळें त्या मार्गांत "कांहींतरी विशेष" आहे हें पुनःश्च सिद्ध होतें हें उघड आहे. हिंदुस्थानांतही योगी आहेत. ह्यांतील बहुतेक ब्रह्मप्राप्तीपेक्षां चमत्कारामुळेंच प्रसिद्ध आहेत. खुद्द ज्ञानदेवांच्या चरित्रांतही पशूकडून वेद बोलविणें आणि मृताला जिवंत करणें हे चमत्कार आलेले आहेत. पण पैठणच्या किंवा आळंदीच्या ब्राह्मणांकडून सरळ शुद्धिपत्र मिळविण्याचा चमत्कार कांहीं ज्ञानदेवांनासुद्धां करतां आला नाहीं, त्या ब्राह्मणांची मनोवृत्ति बदलणें हें त्यांनाही शक्य झालें नाहीं. यावरूनच हे चमत्कार घडले हें पुढें निघालें असें तरी म्हणावें किंवा चमत्कार कितीही चमत्कारिक असले तरी "बुद्धीचा पाकट" होणें या मानानें ते गौणच ठरतात. म्हणून स्वतः ज्ञानदेव आपल्या ग्रंथांत चमत्कारांना कोठेंही थारा देत नाहींत, "विवेक"च बोलतात. ज्ञानेश्वरी व अमृतानुभव हेच ज्ञानदेवांनी केलेले मोठे चमत्कार होत आणि आज सहाशें वर्षांवर महाराष्ट्राच्या बुद्धीला "पाकट" करावयास लावणारे हे महाग्रंथ कोणत्याही चमत्कारांपेक्षां आपुल्यापुढें कितीही उंच असणारें मस्तक ठेंगणें करतात.

# भाग दहावा

## अमृतानुभव

जें जाणणेयां विद्यांच्या गांवीं । गुरुत्वाची आचार्य पद्वी ।
जें सकळ गुह्यांचा गोसावी । पवित्रां रावो ॥ ४७
आणि धर्माचें निजधाम । तेवींचि उत्तमाचें उत्तम ।
पैं जया येतां नाहीं काम । जन्मांतराचें ॥ ४८
मोटकें गुरुमुखें उदैजत दिसे । आणि हृदयीं स्वयंभचि असे ।
प्रत्यक्ष फावों लागे तैसें । आपैसयाची ॥ ४९
तेवींच गा सुखाच्या पाउटीं । चढतां येइजे जयाच्या भेटी ।
मग भेटल्या कीर मिठी । भोगणेयाही पडे ॥ ५०
परी भोगाचिये ऐलीकडिलिये मेरे । चित्त उभें ठेलें सुखा भरें ।
ऐसें सुलभ आणि सोपारें । वरि परिब्रह्म ॥ ५१

ज्ञानेश्वरी, ९

शके १२१२ (इसवी सन १२९०) या वर्षीं ज्ञानेश्वरीचें लेखन पुरें झालें. शके ११९७ चा ज्ञानदेवांचा जन्म गृहीत धरून यावेळीं त्यांचें वय पंधरा वर्षांचें ठरतें. ज्ञानदेवांनीं समाधि कार्तिक वद्य १३ शके १२१८ (इ. स १२९६) या दिवशीं घेतली म्हणजे त्या वेळीं त्यांचें वय एकवीस वर्षांचें होतें. ज्ञानेश्वरीनंतर कांहीं दिवसांनीं अमृतानुभव हा अपूर्व ग्रंथ त्यांनीं लिहिला. याचा लेखनकाल बरोबर माहीत नाहीं पण तो १२१२ व १२१८ यांच्या दरम्यान आहे हें उघड आहे. ज्ञानेश्वरींत स्वतंत्र विवरण पुष्कळ आहे पण कांहीं झालें तरी तो ग्रंथ भगवद्गीतेवरचें भाष्य. अमृतानुभव किंवा त्या ग्रंथाच्या शेवटीं ज्ञानदेवांनीं म्हटल्याप्रमाणें अनुभवामृत हा ग्रंथ त्यांच्या प्रज्ञेचा केवळ स्वतंत्र उत्कर्ष आहे. हा आकारानें फार लहान व गुणानें अत्यंत मोठा असा ग्रंथ ज्ञानदेवांच्या कुशाग्र बुद्धीचे विलास दाखवितो असें म्हटलें तर त्यांना अनुभवानें कळलेल्या ज्ञानाला कसलाही कमीपणा येणार नाहीं. “बोलीं अरूपाचें रूप दावीन” ही प्रतिज्ञा अमृतानुभवांत उत्कृष्ट प्रतीतीला येते. जेथें शब्दही थकतात तेथें शब्दांच्या साहाय्यानें पोहों-

देवो देवी या शब्दांचा स्थूलार्थ शंकर पार्वती. ज्या नाथपंथांत ज्ञानदेव निवृत्तिनाथद्वारां समाविष्ट झाले होते त्या पंथाचा आदिगुरु श्रीशंकर; तेव्हां पहिल्या ओवींत शंकराला व त्याची अर्धांगी पार्वती यांना हा नमस्कार केला. त्याचप्रमाणें या विश्वाचें आदिकारण ( मूळिकें ) म्हणजे प्रकृति व पुरुष हा जो सिद्धांत तोही प्रकट केला आणि प्रकृति पुरुष एकच आहेत, दोन नाहींत, द्वैत नाहीं, अद्वैत आहे हा जो महासिद्धांत त्याचाही प्रस्ताव या ओवींत होतो. मूळिक–सर्वांची जेथून सुरवात झाली ते मूळिक; हें सर्व विश्व त्यांनीं निर्माण केलें म्हणून देवो देवी हीं जगाचीं जनकें, हे जगाचे मातापितर. पण अद्वैत सिद्धांतांतील जो महत्वाचा दंडक कीं जरी हीं विश्वरचना त्यांच्यामुळें झालेली आहे तरी त्यांना कोणत्याही प्रकारें त्या रचनेचा बंध नाहीं–कर्मबंध नाहीं–उपाधि नाहीं–तो दंडक "निरुपाधिकें" हें सुटसुटीत विशेषण देऊन स्पष्ट केलेला आहे. आणि "निरुपाधिकें" हें विशेषण "देवो देवी" या दोघांनाही लागलें म्हणून केवळ देवच नव्हे तर देवी सुद्धां, केवळ पुरुष नव्हे तर प्रकृतिसुद्धां, हीं निरुपाधिक, उपाधिरहित, कैवल्यमय आहेत हेंही दर्शविलें. हे देवोदेवी एक कसें आहेत हें पहिल्या प्रकरणांत निरनिराळ्या प्रकारें वर्णन केलेले आहे.

दोहोंचें एकपण आणि एकाचें दोनपण ही वेदांतांतील गुंतागुंत कायमची अंतःकरणांत शिरण्याला जरा कठीण आहे. ती सोडवण्याचा प्रयत्न अमृतानुभवानें केलेला आहे व तो कसा केलेला आहे हें आपण लौकरच पाहूं. पहिल्या प्रकरणांत देवी देव यांना अनहंकृतिपूर्वक नमस्कार केला. दुसऱ्या प्रकरणांत सद्गुरूला नमस्कार केला आहे. ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायांत सातव्या श्लोकांतील "आचार्योपासनम्" या ज्ञानगुणावर भाष्य करतांना ज्ञानदेवांनीं सद्गुरुप्रेमाचें काव्यमय वर्णन केलेले आहे. तसाच प्रकार या प्रकरणांत आहे; पण येथील भूमिका त्याहीपेक्षां उच्चतर आहे. ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायांत सुंदर काव्य आहे. या ठिकाणीं वर्णन करतांना ज्ञानदेवाची वाणी काव्याच्याही पलीकडे गेलेली आहे. काव्य जर ( न. चिं. केळकर म्हणतात त्याप्रमाणें ) सविकल्प समाधि असेल तर या प्रकरणांत सद्गुरूचें गीत गातांना ज्ञानदेव निर्विकल्प समाधीची कल्पना आणून देतात.

सामर्थ्याचेंनी बिकें । जो शिवातेंही गुरुत्वें जिंके ।
आत्मा आत्मसुख देखे । आरिसां जियें ॥ २–६

हा सद्गुरु सामर्थ्याच्या प्रभावानें प्रत्यक्ष श्रीशंकराला मोठेपणांत मागें सारतो. आणि या सद्गुरुरूप आरशांतच आत्म्याला आत्मसुख पहावयास मिळतें. किंवा

जो भेटलियाचि सवें । पुरती उपायांचि धावे ।
प्रवृत्तिगंगा स्थिरावें । सागरीं जिये ॥ २–८

रूपक अलंकाराचा उपयोग करून कठीण तत्वज्ञान दोन चार शब्दांच्या वाक्यांत ठेवून देण्याची ज्ञानदेवाची हातोटी कांहीं विलक्षण आहे. जो सद्गुरू भेटला कीं मोक्षप्राप्तीच्या उपायांची धावाधाव करण्याची जरूरी पडत नाहीं. प्रवृत्तिरूप गंगा ह्या सद्गुरुरूप सागरांत स्थिर होते; म्हणजे सद्गुरूची गांठ पडली कीं खरें वैराग्य निर्माण होऊन ममत्वाचा निरास होतो व मनुष्य निवृत्तीच्या शिखरावर जाऊन बसतो. अशा प्रकारें दुसऱ्या अध्यायांत हे सद्गुरुनमन आहे.

२ वाणीच्या साहाय्यानें ज्ञान होतें आणि ज्ञान झालें म्हणजे "यतो वाचो निवर्तंते" अशा वस्तूंची ओळख पटून वाणीची आवश्यकता रहात नाहीं, वाणी अधिक कांहीं सांगूं शकत नाहीं; आणि ज्याप्रमाणें अज्ञान, अविद्या ही ज्ञानप्राप्ति होतांच नाहींशी होते त्याप्रमाणेंच वाणीही नाहींशी होते. परा, पश्यंती, मध्यमा आणि वैखरी अशा चार वाचा समजतात. क्रमाक्रमानें या चारी वाणींच्या साहाय्यानें अविद्येचा निरास होतो; प्रथम नेणीव नाहींशी होते; मग जाणीव म्हणजे जाणतेपणाचा अभिमान उरतो. तो नाहींसा झाला, जाणीव नेणीव दोहोंचाही निरास झाला म्हणजेच मनुष्याला उत्कृष्ट, मोक्षदायक ज्ञान प्राप्त झालें असें समजावयाचें.

ये-हवीं परादिकी चौघी । जीव मोक्षाच्या उपेगी ।
अविद्येसवें आंगी । वेंचिती कीर ॥ ३–२

परादि चार वाणी जीवाला मोक्ष मिळवून देऊं शकतात. पण मोक्ष म्हणजे अविद्येचा नाश; आणि अविद्येच्या नाशाबरोबरच या चारी वाणीही विलय पावतात. चारी वाणी अनावश्यक झाल्यामुळें ज्ञानी पुरुषांत मौन उत्पन्न होतें. केवळ मौन आहे म्हणून कोणीही मनुष्य ज्ञानी होत नाहीं; पण सामान्य जनाला हा तोल रहात नाहीं. अत्यंत तपश्चर्येनें, मोठ्या कष्टानें जी स्थिति प्राप्त होते तिच्याचसारखी (पण ती नव्हे), इतर कारणानीं येणारी स्थिति ही तीच आहे असें समजून माणसें तिची वाहवा करतात व माणसांच्या या वेडेपणाचा फायदा घेऊन लफंगे लोक योग किंवा साधुत्व यांच्या बाह्य तंत्राचा अवलंब

**करून उदरंभरणाचा व चैन करण्याचा योग साधतात. या वाणीचें ऋण फेडण्याचा प्रयत्न अमृतानुभवाच्या तिसऱ्या प्रकरणांत आहे. गुरुस्तवनानें वाचाऋण फेडतां येतें असें दुसऱ्या प्रकरणाचे शेवटीं ज्ञानदेव सांगतात.**

**चौथ्या प्रकरणांत ज्ञान आणि अज्ञान यांतील भेद स्पष्ट करण्यासाठीं निरूपण केलेलें आहे. ज्ञानामुळें प्राप्त झालेलें मौन म्हणजे मुकेपणा नव्हे, त्याचप्रमाणें ज्ञानामुळें—**

जो निरंजनी निंदेला । तो आणिकी नाहीं देखिला ।
आपुलाही निमाला । आठऊ तया ॥ ४--३३

**अशी स्थिति झाली म्हणजे शून्यता आली असें नव्हे; शून्यवादाचें त्यामुळें समर्थन होत नाहीं. पांचव्या प्रकरणांत सच्चिदानंद या वेदांतांतील पारिभाषिक शब्दांतील सत्, चित्, आनंद या तीन पदांचें विवेचन केलेलें आहे. सच्चिदानंद हा संपूर्ण शब्द आत्मवाचक आहे.**

एवं सच्चिदानंद । आत्मा हा ऐसा शब्द ।
अन्यव्यावृत्तिसिद्ध । वाचक नव्हे ॥ ५--१३

**सहाव्या प्रकरणांत शब्दाचें खंडन हा विषय आहे. शब्दाच्या आंगच्या गुणांचें रसभरित वर्णन तिसऱ्या प्रकरणांत केलें. त्या वर्णनामुळें शब्दाची शक्ति अगाध आहे असें समजूं नये; त्याच्या शक्तीला अवधि आहे हें पटावें म्हणून या प्रकरणांतील विवेचन आहे. शब्द मोठा उपयुक्त यांत तर शंकाच नाहीं.**

विधि निषेधाचिया वाटा । दाविता हाचि दिवटा ।
बंध मोक्ष कळिकटा । शिष्टु हाचि ॥ ६--५

**विधिनिषेधाच्या वाटा हा शब्दच दाखवितो व बंध म्हणजे काय, मोक्ष म्हणजे काय हा तंटाही या शब्दानेंच उत्पन्न केला आहे. ( वेदालाही शब्द ही पारिभाषिक संज्ञा आहे व वरील वर्णन वेदालाही तंतोतंत लागू पडतें. ) परंतु शब्दाच्या पलीकडची जी आत्मवस्तु आहे तेथें शब्दाची शक्ति पांगळी पडते आणि म्हणून ज्ञानदेव सांगतात.**

एवं शब्दैकजीवनें । बापुडीं ज्ञानें अज्ञानें ।
साचेपणें वनें । चित्रींची जैसीं ॥ ६--१०२

**चित्रांतील कितीही यथातथ्य दिसणारीं वनें म्हणजे खरीं वनें नव्हेत तशींच केवळ शाब्दिक ज्ञानें म्हणजे अज्ञानें आहेत हें या प्रकरणांत स्पष्ट केलें आहे.**

सातवें प्रकरण हें या ग्रंथांतील सर्वांत मोठें असून त्याचा विषय अज्ञानाचें खंडन हा आहे. ज्ञान व अज्ञान हे योगी प्रतियोगी शब्द आहेत व जोपर्यंत ज्ञानाची जाणीव आहे तोंपर्यंत अज्ञान हें असणारच आणि म्हणूनच अज्ञान-खंडनानंतर ( आठव्या प्रकरणांत ) ज्ञानखंडन हा विषय आहे. अज्ञान इतकें नाहींसें झालें पाहिजे कीं त्याच्या विरुद्ध अर्थदर्शक ज्ञानशब्दाचीही आठवण बुजली पाहिजे. अत्यंत श्रीमंतीचें लक्षण म्हणजे श्रीमंतीचा विसर पडणें. मी श्रीमंत आहे अशी जाणीव ज्याला असते त्याची श्रीमंती मर्यादित असते हें उघड आहे. अज्ञान हा आत्म्याचा गुण असणें शक्य नाहीं हें तर उघडच आहे, पण त्याच कारणामुळें ज्ञान हाही गुण म्हणून त्याचा राहणार नाहीं. अशा तऱ्हेचें हें कळण्याला प्रथम थोडेसें कठीण असें विवरण या सातव्या व आठव्या प्रकरणांत आहे. अज्ञानखंडन करतांना ज्ञानदेवांची काव्यशक्ति आणि तर्कशक्ति यांची आपापसांत जशी काय अहमहमिका चालली आहे कीं काय असें वाटतें. तसेंच अज्ञानाचें कार्य म्हणजे अज्ञान नव्हे हाही सूक्ष्म सिद्धांत सातव्या प्रकरणांत विशद केलेला आहे. जें खरें नाहीं तें अज्ञान, आणि जें आहे तें खरें आहे, म्हणून अज्ञान नाहींच, त्याचें मुळीं अस्तित्वच खोटें असेंही सुचविलें आहे. अज्ञानाची सर्व प्रकारें चाचपणी करून तें नाहीं असें शेवटीं ठरविलें.

> म्हणोनी अज्ञान सद्भावो । कोणे परी न लाहो ।
> अज्ञान कीर वावो । पाहो ठेले ॥ ७--२९३

आणि अज्ञान नाहींसें झालें कीं मग ज्ञानाची ( अज्ञानच्छेदक तें ज्ञान ) आवश्यकता तरी कोठें उरली ? रात्रीं दिवे लावावे लागतात ( येथें रात्र म्हणजे अज्ञान, दिवे म्हणजे ज्ञान ) पण जेथें अक्षय्य सूर्यप्रकाश आहे तेथें अंधार हा शब्दच अस्तित्वांत नसणार; मग प्रकाश हा शब्दही अस्तित्वांत येण्याला कारण रहात नाहीं. हेंच आठव्या प्रकरणांत स्पष्ट केलें आहे.

> अज्ञानाचा प्रवर्तु । नाहीं जया गांवांआंतु ।
> तेथ ज्ञानाची तरी मातु । कोण जाणे ॥ ८--१०
> म्हणोन अज्ञान नाहीं । तेथेंचि गेलें ज्ञानही ।
> आतां निमिषोन्मिषा दोहीं । ठेली वाट ॥ ८--१२

आणि जाणे तोचि नेणें । नेणें तोचि जाणे ।
आतां कें असणे जिणें । ज्ञानाज्ञाना ॥ ८–१८

**"आतां" म्हणजे वस्तुस्वरूपता प्राप्त झाल्यावर ज्ञान आणि अज्ञान दोहोंचेही जीवन संपलें. वर दिलेल्या दोन ओंव्यावरून तर्कांची कसरत ज्ञानदेव कशी खेळतात हेंही लक्षांत येतें. नवव्या प्रकरणांत पूर्ण ज्ञानी होऊन जो जीवन्मुक्त झाला त्याच्या स्थितीचें वर्णन केलें आहे. ज्ञानेश्वरींत योगी होऊन कर्म करणारा तोच जीवन्मुक्त असें म्हटलें आहे व त्याच स्थितीचें विवरण येथें केलेलें आहे:—**

व्यापाराचे गाडे । मोडतांही अपाडे ।
अक्रियेचे न मोडे । पाऊल केंहीं ॥ ९--२०

**जीवन्मुक्ताचें अत्यंत आश्चर्यकारक आणि हृदयंगम वर्णन या नवव्या प्रकरणांत आहे व तें करतां करतां ज्ञानदेवांच्या दृष्टीपुढें आपले जीवन्मुक्त गुरु निवृत्तिनाथ उभे राहिले व त्यांचें त्यांनीं मोठ्या कौतुकानें वर्णन केलेलें आहे.**

गुरुत्वें जेव्हडा चांगू । तेव्हडाचि तारूनि लघू ।
गुरु लघु जाणे जो पांगु । तुझा करी ॥ ९--६७

**आणि शेवटच्या म्हणजे दहाव्या प्रकरणांत शब्दाचा परिहार करणाऱ्या ज्ञानदेवानें आपल्या ग्रंथाचाही परिहार केलेला आहे.**

आम्ही बोलिलो जें कांही । तें प्रकटचि असे ठाईं ।
मा स्वयंप्रकाशा कायीं । प्रकाशावे बोलें ॥ १०--८

**२ पुरुष हा सर्व उपाधीपासून अलिप्त आहे व तो प्रकृतीच्या ठिकाणीं अधिष्ठान करून म्हणजे प्रकृतीच्या स्वाधीन होऊन ही विश्वरचना करतो; ही प्रकृति म्हणजेच माया; प्रकृति ही अविद्यामय आहे; पुरुषाचें प्रकृतीच्या ठिकाणीं अधिष्ठान होतें हीही कल्पना मायामय आहे; एवंच प्रकृति ही पुरुषाहून अत्यंत भिन्न आहे. ती द्वैताचें, संसाराचें, कारण आहे इत्यादि वाक्यांनीं माणसें गोंधळतात व पुरुष आणि प्रकृति हे परस्परविरुद्ध आहेत, एक उत्तम तर दुसरी द्वाड अशी त्यांची समजूत होते. दुष्ट स्त्रीला तर "माया" किंवा "महामाया" म्हणण्याची प्रथा मराठींत आहे. माया खोटी, पुरुष, परमेश्वर खरा इत्यादि समज उत्पन्न झालेले आहेत. सर्व सामर्थ्यवान् परमेश्वर या मायेच्या नादाला कां लागतो हें मात्र कोणीही तत्त्वज्ञ सांगत नाहीं. अशा प्रकारें वेदांत तत्त्व-**

ज्ञानांत "माया" ही एक मोठी अडचण आहे. अगदीं त्रयस्थपणानें विचार करणाऱ्याला तें तत्त्वज्ञान पुष्कळ पटतें, तर्कशुद्ध वाटतें, पण वेदांताच्या भव्य प्रासादाला मायेचा पाया आहे व त्यामुळें तेथें पुष्कळांचें समाधान होत नाहीं. अमृतानुभवाच्या सुरवातीलाच ही अडचण ज्ञानदेवांनीं नाहींशी केलेली आहे. पुरुष आणि प्रकृति यांचें विस्तृत वर्णन करून ते दोघेही एकस्वरूप आहेत, त्यांच्या द्वैताच्या पोटीं त्यांचें ऐक्यच बलवत्तर आहे हें प्रथम प्रकरणांत निःशंकपणें सिद्ध केलें आहे. किंबहुना असेंही म्हणावें कीं पुरुष आणि प्रकृति हीं दोन रूपें परमेश्वरच घेतो—परमात्मा घेतो असें म्हणणें विशेष शास्त्रशुद्ध होईल. विषयाचा प्रस्ताव पहा—

> जो प्रियूची प्राणेश्वरी। उलथे आवडीचिये सरोभरीं।
> चारु स्थळीं एका हारीं। एकांगांचा ॥ १--२

जो प्रिय म्हणजे पुरुष तोच प्रिया म्हणजे प्रकृति. अशा प्रकारें द्वैताचा भास उत्पन्न झाला. आणि असें करण्याचें कारण "उलट्या आवडीच्या" भरीस तो पडला. परब्रह्माला आपली थोडीशी करमणूक व्हावी असें वाटलें म्हणून त्यानें वेष बदलला, रूप बदललें, पण त्यामुळें हे (आम्हांला दिसणारे) दोन भिन्न आहेत असें मात्र नाहीं. ते एकांगाचे आहेत, एका हारीं म्हणजे एकाच पंक्तींत आहेत, आणि अत्युन्नत अशा ठिकाणीं (चारु स्थळीं) ते आहेत. म्हणजे या दोघांत सरसनीरसपणा, कमी अधिकपणा हा नाहींच.

> आवडीचेनि वेगें। येकमेकां गिळिती आंगें।
> कीं द्वैताचेनि पांगें। उगळिते आहाती ॥ ३

ते जरी दोन निराळे दिसले तरी त्यांचें परस्पर प्रेम इतकें विलक्षण आहे कीं ते एकमेकांना अगदीं पूर्णपणें गिळून टाकतात आणि एकरूप होतात, आणि जेव्हां द्वैताची आवड उत्पन्न होते (कारण आवड ही दोघांतच असूं शकते, एकांत असत नाहीं) तेव्हां ते निरनिराळे होतात.

> जे एकचि नव्हे एकसरें। मा दोघां दोनीपण कैचे पुरे।
> काय नेणों साकारें। स्वरूपें जियें ॥ ४

जीं हीं दोन आकाराला आलेलीं भिन्न भिन्न स्वरूपें आहेत तीं खरोखर कशीं आहेत, साकारच कां निराकार, दोन कां एक, हें कांहींच कळत नाहीं. कारण ज्याला आपण एक म्हणतो तें एक तरी आहे काय? (एक म्हटलें कीं

दोन हा शब्द आढळतो आणि द्वैताला सुरवात होते; ज्याप्रमाणें ज्ञान म्हटलें कीं अज्ञान हा शब्द आठवतो. केवळ ज्ञान तें कीं ज्यांत ज्ञान हाही शब्द शिल्लक राहूं शकत नाहीं. केवळ अद्वैत तें कीं ज्यांत द्वैत हा शब्द तर नाहींच नाहीं पण एक हा शब्दही नाहीं. तेव्हां ) जेथें एकाला एकपण पुरत नाहीं, जें एक म्हणून आपण म्हणतों तेंच सर्व आहे; अनेकाची ही परमावधि आहे, तेथें दोघांना दोनीपण कसें पुरणार ? म्हणजे एक, दोन, तीन ही जी मर्यादित वस्तूंना मोजण्याची पद्धति ती या अमर्यादित आणि अमेय अशा वस्तुतत्वाला लागू पडत नाहीं. पुरुषाप्रमाणेंच प्रकृति हीही वस्तुतत्वांतच आहे. दिसण्यांत दोन पण खरोखर एक असें हें वस्तुतत्व आहे.

हें एकाचें दोन झालेलें ( म्हणजे आमच्या स्थूल दृष्टीला दोन दिसणारे ) वस्तुतत्व हें खरोखर एकरूपच आहे; देह भिन्न पण आत्मा एक अशी स्थिति आहे.

जया एकसत्तेचें बैसणें । दोघां एका प्रकाशाचें लेणें ।
जे अनादि एकपणे । नांदती दोघे ॥ ८

त्याचप्रमाणें

देवें संपूर्ण देवी । तियेवीण कांहीं तो ना गोसावी ।
किंबहुना एकोपजीवीं । एकमेकां ॥ १०

देवाच्यामुळें देवीला, पुरुषाच्यामुळें प्रकृतीला, संपूर्णता आलेली आहे. आणि तो म्हणजे पुरुष हा गोसावी म्हणजे मालक, ती मालकीण आहे म्हणून, झालेला आहे. दोघे एकमेकांना पूरक आहेत; दोघांमुळें दोघे एक आहेत, एकवस्तुतत्व आहे. एकमेकांवर दोघेही उपजीवी अवलंबून राहणारे आहेत. ही ओवी वेदांत विषयावर आहे; पण उत्कृष्ट दांपत्यधर्माचें, संसारसुखाचें, पतिपत्नीसंबंधाचेंही रमणीय चित्र तींत आपणांला चित्रित केलेलें दिसून येतें. आतां हे दोन असून एक, हा काय शब्दच्छल आहे ? हें काय गौडबंगाल आहे ? तें उकलून दाखविण्यासाठीं दोन तीन उपमांचा काव्यमय उपयोग ज्ञानदेव करतात.

दो दांडीं एक श्रुति । दो फुलीं एक द्रुति ।
दोहो दिवीं दीप्ति । एकीच जेंवि ॥ १८
दो ओठीं येक गोठीं । दो डोळां येकचि दिठी ।
तेंवी दोघीं जिहीं सृष्टि । एकीच जेवि ॥ १९

**दोन टिपऱ्यांचा मिळून एकच आवाज होतो; दोन फुलें घेतलीं तरी सुगंध एकच येतो; दोन दिवे लावले तरी प्रकाश एकच पडतो; दोन ओठ मिळून बोलतात पण शब्द एकच; दोन डोळ्यांनीं पाहतात तरी दृष्टि एकच; त्याप्रमाणें हे दोघे आहेत; इतकेंच नव्हे तर या दोघांमुळें उत्पन्न झालेली सृष्टि देखील (त्यांच्याशींच) एकस्वरूप आहे. सर्वांभूतीं परमेश्वर—आणि परमेश्वर म्हणजे " माया " नव्हे, कारण माया म्हणजेही परमेश्वर हें तत्वही येथें सांगितलेलें आहे. हें जें दांपत्य आहे तें अनादि कालापासून एकपणाच्या रसाचें भोजन करीत आलेलें आहे. पुढील तीन ओव्यांत वेदांत आहेच पण सांसारिक माणसांनाही काव्यमय, अत्यंत आनंदमय संसाराचें चित्र त्यांत मिळेल.**

दाउनी दोनीपण । एकरसाचें आरोगण ।
करित आहे मेहुण । अनादि जें ॥ २०
जे स्वामिचिया सत्ता—। वीण असों नेणें पतिव्रता ।
जियेवीण सर्व कर्ता । कांहींच ना जो ॥ २१
जे कीं भर्ताराचे दिसणें । भर्तार जियेचे असणें ।
नेणिजती दोघेजणे । निवडूं जियें ॥ २२

**दोघांचे एकपण सिद्ध करण्यासाठीं आणखी कांहीं समर्पक उपमा ज्ञानदेव देतात आणि या समर्पकपणामुळें " उपमा कालिदासस्य " ही संस्कृत महाकवीची ख्याति सुद्धां या आमच्या महाराष्ट्र कविराजराजेश्वरानें मागें पाडली. उपमांची समर्पकता व त्यांचा थाट पहाः—**

गोडी आणि गुळु । कापूर आणि परिमळु ।
निवडू जातां पांगळू । निवाडू होय ॥ २३

**गुळापासून गोडी विभक्त करतां येत नाहीं आणि कापरापासून सुवास निराळा काढतां येत नाहीं.**

समग्र दीप्ति घेतां । जेवीं दीपचि ये हातां ।
तेवि जियेचिया तत्वतां । शिवची लाभे ॥ २४

**प्रकाशाचें ज्ञान झालें कीं दिव्याचें ज्ञान होतें त्याप्रमाणें प्रकृतीचें तत्व कळलें कीं पुरुषाचेंही तत्व कळतें.**

जैसा सूर्य मिरवे प्रभा । प्रभे सूर्यचि गाभा
तेवीं भेद गिळीत शोभा । एकीच जे ॥ २५

कां बिंब प्रतिबिंबा द्योतक । प्रतिबिंब बिंबा अनुमापक ।
तेंसें द्वैतमिसें एक । बरवतसे ॥ २६ ॥

द्वैताच्या मिषानें येथें एकपणाच शोभत आहे. अशा प्रकारें उपमादि अलंकारांच्या साहाय्यानें अत्यंत कठीण विषय शक्य तितका सोपा करण्याची ज्ञानदेवांची हातोटी आश्चर्यकारक आहे. पहिल्या प्रकरणांत याप्रमाणें शिवशक्तीची, पुरुषप्रकृतीची एकरूपता, एकात्मता स्पष्ट केलेली आहे.

आतां या दांपत्याचा संसार म्हणजे ही विश्वरचना कशी चालली हें मोठ्या मजेंत वर्णन केलें आहे. परमात्मा, परब्रह्म, म्हणजे सर्व गुणातीत, केवळ निरुपाधिक; म्हणजे तसेंच पाहिलें तर केवळ शून्य. पण या ( प्रकृति ) बाईनें त्याचा पुरुष करून त्याला या संसारांत घातला. ( दोघांच्या ऐक्याचा सिद्धांत स्थापित करून दोघेपणाचा आविर्भाव आणून ही विश्वरचना ते कशी करतात हें सांगितलें आहे. )

सर्व शून्याचा निष्कर्षु । तो जिया बाईला केला पुरुषु ।
जेणें दादलेनी सत्ताविशेषु । शक्ति जाली ॥ १—२७

सर्व शून्यांचा शेवट, महाशून्य, म्हणजे कशांतही न पडणारा, निर्लेप, निरुपाधिक, पण या प्रकृतीनें त्याला संसारांत घातला. त्याला सर्व भानगडींत पडावयास लावलें. या प्रकृतीला टवळीला, एकटीला कोण विचारीत होतें ? हे लग्न जमण्यापूर्वी ही कोणाच्या खिसगणतींतही नव्हती पण हा असला थोर दादला, पति, मिळाल्यामुळें तिला विशेष सत्ता, विशेष वैभव प्राप्त होऊन तिला प्रकृतीच्या जागीं शक्ति हें नांव मिळालें. ती प्रकृतीची शक्ति झाली. प्रकृति म्हणजे निष्क्रिय; पण शक्ति म्हणजे सक्रिय. वेदांताच्या उच्च भूमिकेचें वर्णन करतांना सांसारिक परिस्थिति व्यंजित करून श्रोते किंवा वाचक यांची समजूत पटवून देण्याची हातोटी ज्ञानदेवासारखी अन्यत्र क्वचित् पहावयास मिळते. ज्ञानदेवांनीं "सांसारिक" लोकांच्या भूमिकेकडे मुळींच पाहिलें नाहीं असें म्हणणाऱ्यांनीं ज्ञानेश्वरींतील काय पण अमृतानुभवांतील सुद्धां उपमा दृष्टांतांच्या पोटीं भरलेलें व्यवहारज्ञान पाहिलेलें नाहीं. हीच ओवी सर्व बाजूंनीं पाहिली म्हणजे तींत प्रतीत होणारें व्यवहाराचें ज्ञान आल्हाद उत्पन्न करतें. नवऱ्याच्या जिवावर मोठ्या झालेल्या पण त्याच नवऱ्याला मुठींत ठेवणाऱ्या स्त्रियांचें चरित्र वरील ओवी लिहितांना ज्ञानदेवांना आठवलें आहे

हें स्पष्ट दिसतें. पण या दांपत्यांत परस्पर प्रेम मात्र अपूर्व होतें. त्याचें वर्णन मोठें सुंदर केलें आहे.

जियें प्राणेश्वरीविण । शिवींही शिवपण ।
थारो न शके. ते आपण । शिवें घडिली ॥ १--२८

जी प्राणेश्वरी नसेल तर शिवाच्या ठिकाणीं शिवपण राहूं शकत नाहीं; आणि तिला तर शिवानेंच घडलेला आहे, निर्माण केलेली आहे; म्हणजे शिवाशिवाय तिला अस्तित्व असें नाहींच.

ऐश्वर्यसी ईश्वरा । जियेनें आंग संसारा ।
आपलाही उभारा । आपणचि जे ॥ १--२९

परब्रह्माचा तिनें ऐश्वर्ययुक्त ईश्वर बनविला व त्याचा संसार तिनें उभा केला तो आपल्या अंगानें, आपल्या गुणांनीं, आणि स्वतःची उभारणी तर तिनें स्वत.वरच केलेली आहे.

पतीचेनी अरूपपणें । लाजोनि आंगाचे मिरवणें ।
केलें जगाएवढें लेणें । नामरूपाचें ॥ १- ३०

तिचा पति म्हणजे अरूप, अनाम, निराकार, निर्गुण. येथें ज्ञानदेवांनीं मोठी गोड कोटी केली आहे व स्मित हास्य उत्पन्न होईल असा गोड विनोद निर्माण केला आहे. पति तर अरूप, रूपहीन; हिला तर आपलें शरीर भूषित करून मिरवावयास पाहिजे; पतीजवळ ना नाम ना रूप; तेव्हां कशावर मिरवावयाचें? तिला पतीच्या अरूपपणाची लाज वाटूनच कीं काय त्याला आणि आपल्यालाही मिरवण्याला साधन म्हणून तिनें या प्रचंड विश्वाएवढें नामरूपाचे लेणें, दागिना करून घेतला. विश्वाचें पृथक्करण केलें म्हणजे नामरूप उरतें; आणि हें लेणें केलें तर केलें पण जगाएवढें मोठें केलें.

जेथें ऐक्याचा दुकाळा । तेथें बहुपणाचा सोहळा ।
जिये सदैवेचिया लीळा । दाखविला ॥ १--३१

ज्याच्याजवळ एकपणाचा देखील दुष्काळ (कां? यांचें विवेचन वर केलेलें आहे ) तेथें बहुपणाचा सोहळा या भाग्यशील स्त्रीच्या लीलेमुळें पहावयास मिळतो. हें वर्णन वाचून ज्ञानदेवांची प्रसन्न वृत्ति, आणि गोड विनोदबुद्धि हे गुण लक्ष्यांत आल्याशिवाय रहात नाहींत.

या पतीचेंही पत्नीवरचें प्रेम कांहीं विलक्षण होतें.

कांतेचिया भिडा । आवरला होय जगाएवढा ।
आगवला उघडा । तियेविण ॥ १--३४

**कांतेच्या भिडेमुळें ("कांता" शब्दांतील मर्म ध्यानांत घ्यावें) हा दिगंबरवृत्ति असूनही यानें या विश्वासारखें विस्तीर्ण पांघरूण लपेटून घेतलें आहे आणि जर कांता नसेल तर तो उघडा होऊन राहतो, मग त्याला वस्त्रप्रावणांची शुद्ध रहात नाहीं, त्याची तो फिकीर करीत नाहीं. प्रकृतीचा संकोच झाला कीं विश्वाची आटणी होते.**

**आणि असें दोनपणाचें वर्णन वाचून वाचकाची दिशाभूल होऊं नये म्हणून सांगतात:—**

जैसी कां गमीरासगट गति । का सोनयासगट कांति ।
तसी शिवेशीं शक्ति । आघवीच जे ॥ १--४१
का कस्तूरीसगट परिमळ । उष्मेसगट अनळ ।
तैसा शक्तीसी केवळ । शिवचि जो ॥ १--४२

**पहिल्या ओवींत पुरुषाबरोबर स्त्री अशा अर्थाच्या दोन उपमा योजिल्या तर दुसऱ्या ओवींत स्त्रीच्याबरोबर पुरुष अशा दोन उपमा योजिल्या. हे दोघे दोन वाटतात, पण एक आहेत हा सिद्धांत. त्याचें वर्णन करतांना, विवरण करतांना विवेचनशक्ति दमून जाते, थांबते, तिचें पाऊल पुढे पडत नाहीं.**

जयाच्या स्वरूपनिर्धारीं । गेली परेसी वैखरी ।
सिंधूसी प्रलयनीरीं । गंगा जैसी ॥ १--४७

**परा वगैरे वाणी ज्यांच्या स्वरूपांचा निर्णय करतां करतां थकली, गंगा ज्याप्रमाणें सिंधूसहित प्रलयकाळाच्या जळांत प्रविष्ट होते त्याप्रमाणे वैखरीही गेली आणि परा वाणीही गेली. तेव्हां अशा प्रकार सर्वत्र अद्वैताचें साम्राज्य असतांना, सहजच एखादा बुद्धिवान् श्रोता विचारील कीं अद्वयानंदांत तुम्ही नमस्कार करणार व दुसरे कोणी नमस्कार घेणारे हा भेदाभेद तरी कसा राहिला आणि असा भेदाभेद राहिला तर तत्त्वनाश ( लिंगभेद ) होत नाहीं काय ?**

तेथ मी नमस्कारां— । लागीं उरों दुसरा ।
तऱ्ही लिंगभेद पऱ्हा । जोडूं जावों ॥ १--५१

**तथापि या शंकेचें निराकरण ज्ञानदेव करतात.**

परी सोनेनसी दुजे । नहोनी लेणे सोना भजे ।
हे नमन करणे माझे । तैसे आहे ॥ १--५२

सोन्याचा दागिना जेव्हां सोन्याची पूजा करतो त्या वेळीं तो कांहीं सोन्याहून निराळा नसतो. ( दागिना हें सुवर्णच आहे ) त्याप्रमाणें माझा हा नमस्कार आहे. म्हणजे मी हा नमस्कार केला म्हणून द्वैतस्थिति उत्पन्न होत नाहीं किंवा द्वैतप्रतिपादन होऊं शकत नाहीं. ज्ञानेश्वरीच्या प्रारंभीं परब्रह्माला गणेश कल्पून त्या गणेशाला नमस्कार केलेला आहे; त्याच्यावर वामनपंडितांनीं यथार्थ-दीपिकेंत जी विद्वत्ताप्रचुर पण हास्यास्पद झोड उठविली आहे ती अद्वैत-सिद्धांताचा यथायोग्य अभ्यास न केल्यामुळें असें म्हणणें धारिष्टाचें होईल; तेव्हां अद्वैतसिद्धांत यथायोग्य न कळल्यामुळें पंडितांनीं तसें केलें असें म्हणावें लागेल पण वर दिलेल्या ओवीवरून अद्वैताचें हृद्गत सहज लक्षांत येतें. मूर्तिपूजेचा निषेध याचा अर्थ मूर्तीतच देव आहे या वृत्तीचा निषेध; पण प्रतीक म्हणून मूर्ति पूजण्याला हरकत नाहीं हा न्याय न कळल्यामुळें मूर्तिभंजन करणें किंवा तसबिरींना अगर नांवांना हरकत घेणें ( तुकारामाच्या अभंगांत या बाबतींत प्रार्थनासंगीत या पुस्तकांत प्रार्थनासमाजवाल्यांनीं केलेले फेरफार पहा) या गोष्टी माणसाच्या हातून घडतात. नामरूपानें असें गोंधळून जातां उपयोगी नाहीं, निदान शहाण्या माणसाला तरी नामरूप यांच्या पलीकडचें तत्त्व दिसलें पाहिजे

सिंधु आणि गंगेची मिळणी । स्त्रीपुरुष नामाची मिरवणी ।
दिसतसे, तरी पाणी । काय द्वैत होईल ॥ १-५४
म्हणूनि भूतेश भवानी । न करूनि सिनानी ।
मी निघालो नमनी । ते हे ऐसे ॥ १-६०

४ दुसऱ्या प्रकरणांत सद्गुरूला नमस्कार केला आहे व हें प्रकरण वाचतांना सद्गुरु म्हणजे काय हेंही स्पष्ट होतें. सद्गुरु आणि आजकालच्या बुवाशाहींतला गुरु यांचा एकमेकांशीं कांहीं संबंध नाहीं. ज्ञानदेवापूर्वी शंभर वर्षे होऊन गेलेले आणि ज्यांना आद्य मराठी कवि म्हणतां येईल ते मुकुंदराज आपल्या विवेकसिंधूंत लबाड गुरूंचा धिक्कार करतात व त्यांच्या वेळेपासून ते अठराव्या शतकाच्या शेवटच्या लावणीकारापर्यंत लबाड गुरूंचा किंवा गुरुपणाचा धंदा करणाऱ्यांचा, बाजार भरविणाऱ्यांचा सर्वांनींच धिक्कार केलेला आहे.

हीं काय गळ्यांत घालुनि तुळशीचीं लाकडे ।
हीं काय भवाला दुर करितील माकडें ॥

हे रामजोशीबुवांचे खणखणीत शब्द मराठी वाचकांच्या कानांत घुमून राहिलेले आहेत. "अडक्याला तीन" विकत मिळणाऱ्या गुरूवर रामदासांनीं कोरडे ओढलेले आहेत. "ऐसें संत झाले कळी" म्हणणाऱ्या तुकारामबुवांनीं बुवाशाहीला तर "मोजुनि माराव्या पैजारा" असा शब्दप्रयोग करून पायपोसाखालीं झोडपून काढले आहे. ज्ञानदेवएकनाथांच्या ग्रंथांत तर ढोंगी गुरूंचा निषेध अगदीं स्पष्ट आहे. तेव्हां "सद्गुरू"बद्दल प्रेम दाखविणारे महाराष्ट्रीय संतकवि बुवाशाहीला उत्तेजन देणारे होते असे म्हणणाऱ्यांनीं मराठी प्राचीन वाङ्मयाचें अध्ययन केलेलें नाहीं ही गोष्ट अगदीं स्पष्ट आहे.

ज्ञानदेवांचे गुरु म्हणजे त्यांचे ज्येष्ठ बंधु निवृत्तिनाथ. त्यांचें प्रत्यक्ष नांव घालून वर्णन दुसऱ्या प्रकरणाच्या शेवटीं केलें आहे. संपूर्ण प्रकरणाकडे पाहण्यापूर्वीं तिकडे प्रथम दृष्टि वळविली तर अनुचित होणार नाहीं. ज्ञानदेव म्हणतातः–

निवृत्ति जया नांव । निवृत्ति जया बरव ।
जया निवृत्तीची राणीव । निवृत्तीची ॥ २–७०

माझ्या सद्गुरूंचें नांव निवृत्ति (नाथ); संसारापासून निवृत्ति हीच त्यांची शोभा (बरव, बरवेपणा;) आणि ज्या निवृत्तीची राणीव म्हणजे राजसत्ता ही देखील निवृत्तीची, निवृत्तिमय, सांसारिक नव्हे. राणीव, राजसत्ता म्हणजे लोकांना लुटणारी, दुसऱ्याचे घेणारी, सामान्य संसारापेक्षां सांसारिक (आजकालची बुवाशाही तशी आहे) पण निवृत्तिनाथांची राणीव तशा प्रकारची नव्हे. त्यांची सत्ता घेत नाहीं, देते, मोक्ष देते, आनंद देते, निवृत्ति देते.

वाचूनि प्रवृत्तिविरोधें । का निवृत्तीचेनी बोधें ।
आणिजे तैशा वादें । निवृत्ति नव्हे ॥ २–७१

ही ओवी जरा आंत शिरून पाहिली पाहिजे. माझ्या सद्गुरूच्या ठिकाणीं जी निवृत्ति आहे, जें समाधान आहे, तें त्यांचें आंगिक आहे, उसने आणलेलें नाहीं. कोणाला प्रवृत्तीचा विरोध करून निवृत्ति मिळाली असें म्हणतात. (म्हणजे प्रथम ते प्रवृत्तीनें बुजबुजलेले होते. ) कोणाला निवृत्ति समजली, उमजली, पटली म्हणून ती प्राप्त झाली म्हणतात (म्हणजे तो निवृत्तीचा बोध प्रथम त्यांना नव्हता, ते अज्ञानांत होते हें उघडच झालें) अशा प्रकारें वादविवादानें,

लटपटीनें आणि खटपटीनें निवृत्ति प्राप्त करून घेणाऱ्यांची निवृत्ति ही माझ्या सद्गुरूची निवृत्ति नव्हे. हेंच जरा दृष्टांतानें स्पष्ट करतातः—

आपणा देऊनि राती । दिवसा आणी उन्नति ।
आणिका वारी निवृत्ति । नव्हे तैसा ॥ ७२

रात्र आपणाला देऊन म्हणजे रात्रीचा नाश करून ( सूर्य ) दिवसाला उदयाला आणतो; त्याप्रमाणें इतराची ( प्रवृत्ति ) वारून, त्यांच्या प्रवृत्ति सर्व आपणाला देऊन मग आपण निवृत्ति म्हणून उरतो असा हा निवृत्ति नव्हे. निशेचा नाश करावा तेव्हां दिवसाचा उदय सूर्य करतो त्याप्रमाणें आपल्या प्रवृत्तीला जिकावें तेव्हां निवृत्तिपणा येणार तसा याला ( माझ्या सद्गुरूला ) आलेला नव्हे.

वोपसरयाचे वळ । घेऊनि मिरवी कीळ ।
तैसें रत्न नव्हे, निखळ । चक्रवर्ती हा ॥ ७३

वोपसराचें म्हणजे कोंदणाचें बळ मिळाल्यावर तेज मिरविणारें रत्न असतें तसा हा ( कोंदण असेल तरच प्रकाशित होणारा ) नव्हे. हा चक्रवर्ती आहे, स्वयंप्रकाश आहे, याचें तेज निरुपाधिक आहे.

गगनही सूनि पोटी । जें चंद्राची पघळे पुष्टि ।
तें चांदणें तेणें उठी । आंग जयाचें ॥ ७४

सर्व गगन पोटांत घालून मग चंद्राची पुष्टि म्हणजे चांदणें जसें पघळतें म्हणजे पसरतें; त्या चांदण्याची शोभा त्या आकाशरूप उपाधीला व्यापून उरते आणि म्हणून चांदणें हें चंद्राचें आंगच होय.

तैसें निवृत्तिपणासी कारण । हाचि आपणया आपण ।
घेयावया फुलचि झालें घ्राण । आपुली द्रुती ॥ ७५

तसा निवृत्तिपणाला हा स्वतःच कारण आहे, त्याला बाह्य कारणाची, उपाधीची आवश्यकता नाहीं. जसें फूल स्वतःचा सुवास घेण्याला घ्राणरूप व्हावें त्याप्रमाणें हा सद्गुरु स्वतःची निवृत्ति ( ती त्याच्या ठिकाणीं होतीच ) प्रकट करण्यापुरता सद्गुरूच्या भूमिकेंत गेला आहे. तो निवृत्तीमुळें सद्गुरु झालेला नव्हे; तर त्याच्या निवृत्तीनें दुसऱ्यांचें हित होतें, जगाचें कल्याण होतें, मुमुक्षूंचा उद्धार होतो. सद्गुरूंची निवृत्ति ही स्वयंभू आहे.

ऐसे करणियाविण । स्वयंभ जे निवृत्तिपण ।
तयाचे श्रीचरण । वंदिले ऐसे ॥ ७९

सद्गुरूचें निवृत्तिपण हें करणियाविण आहे. करणीचें म्हणजे कृत्रिम, करणियाविण म्हणजे अकृत्रिम. तेव्हां सारांश हा कीं, या निवृत्तिपणांत कृत्रिमता बिलकुल नाहीं. प्रकरणाच्या सुरवातीसच म्हटलें आहे:—

मोडोनी मायाकुंजर । मुक्तिमोतियांचा वोगर ।
जेववितां सद्गुरु । निवृत्ति वंदु ॥ ३

मायारूपी हत्तीचा मोड करून मुक्तिरूप मोत्यांचें जेवण आपणांस जेवावयास देणारा सद्गुरु निवृत्तिनाथ त्यांना मी वंदन करतों.

साम यांचेनि थिके । जो शिवातेंही गुरुत्वें जिंके ।
आत्मा आत्मसुख देखे । आरिसा जिये ॥ ६

सामर्थ्याचा प्रभाव पाहिला तर गुरुत्वांत ( मोठेपणांत ) शिवालाही निवृत्तिनाथ जिंकतो. प्रत्यक्ष आत्म्याला जेव्हां आत्मसुख ( स्वतःकडे पहाण्याचें सुख ) घेण्याची इच्छा होते तेव्हां ते त्याला निवृत्तिनाथरूपी आरशांत पहावयास मिळते. आतां सद्गुरूचें एक फार मोठें लक्षण सांगतात:—

राखों जातां शिष्यातें । गुरुपणही धाडिलें यितें ।
तरी गुरुगौरव जयातें । सांडीच ना ॥ १२

शिष्याचें रक्षण करण्यासाठीं, शिष्याच्या कल्याणासाठीं आपल्याजवळ स्थिर होऊन राहिलेलें गुरुपण देखील देऊन टाकण्याला जो मागें पुढें पहात नाहीं, तरीपण सद्गुरुत्वाचा मोठेपणा ज्याच्यापासून यत्किंचितही निघून जात नाहीं. " शिष्यात् इच्छेत् पराजय " ही वृत्ति सद्गुरूची असते शिष्याची बोलबाला म्हणजे आपल्या गुरुत्वाचें सार्थक ही त्याची वृत्ति असते. गुरु शिष्याला निराळा किंवा कमी मानीतच नाहीं.

एकपण नव्हे सुसास । म्हणूनि गुरुशिष्याचें करूनि मिस ।
पाहणेंचि आपली वास । पाहतसे ॥ १३

या सद्गुरूला गौरव कसें प्राप्त होतें पहा:—

लघुत्वाचेनि मुदलें । बैसला गुरुत्वाचें सेलें ।
नासूनि नाथिलें । मैंदव जो ॥ २०

बुवाशाहींतले गुरु जाहिरातीचा भपका करतात, आपला मोठेपणा मिरवितात.

या सद्गुरूला जें गुरुत्व प्राप्त झालें आहे तें लघुत्वाच्या मुद्दलावर–आपणाकडे लहानपणा घेऊन प्राप्त झालेलें आहे. त्यामुळें गुरुत्वाच्या अग्रभागीं त्याला स्थान प्राप्त होतें. तो सदैव आहे, भाग्यशील आहे ( तें बायाबापड्यांना, भोळयांखुळयांना चकवून फसवूनही नव्हे तर ) जें नाथिलें, जें नाहींच, जे भ्रांतिमय, जें मायिक तें नासून, त्याचा नाश करून. पोटभरू गुरु असतात ते जे "नाथिलें" त्याच्याच पाठीमागें लागलेले बेरड असतात. दुसऱ्यांच्या स्त्रिया गोळा करून आपण ब्राह्मी स्थितींत असल्याच्या गोष्टी ते बोलत असतात. तेव्हां असले उदरंभरू आणि शरीरपरायण लफंगे आमच्या संतकवींना मान्य नव्हते हें अगदीं उघड आहे. खरी ब्राह्मी स्थिति या सद्गुरूची असते. त्याचें वर्णन सुंदर अलंकारिक भाषेत ज्ञानदेव करतातः––

जीवपणाचेनि त्रासें । यावया आपुलीये दशे ।
शिवही मुहूर्त पुसे । जया जोशियाते ॥ २४

जीवपणाचा ( त्या उपाधीचा सुद्धां ) कंटाळा येऊन जेव्हां आत्मस्थिति प्राप्त करून घेण्याची इच्छा प्रत्यक्ष श्रीशंकराला उत्पन्न होते त्यावेळीं त्या आत्मस्थितीप्रत जाण्याचा मुहूर्त विचारण्यासाठीं याच श्रीनिवृत्तिनाथरूप जोशाकडे–ज्योतिषाकडे श्रीशंकर जातात. अशा प्रकारें प्रत्यक्ष शंकरापेक्षां अधिक मुक्त स्थितींत सद्गुरु निवृत्तिनाथ आहेत असें ज्ञानदेव सांगतात.

५ वाणी, भाषा, वाङ्मय यांच्या साहाय्यानें ज्ञानाला सुरवात होते आणि तेंच ज्ञान परा कोटीला पोंचलें कीं तेथें वाणीची धांव जाऊं शकत नाहीं, पण सुरवातीला वाणीचें ऋण मोठें असतें अशा प्रकारचें विवेचन तिसऱ्या प्रकरणांत करून चौथ्या प्रकरणांत ज्ञान आणि अज्ञान यांतील भेद सांगितला आहे. हा भेद सांगतांना अज्ञान, ज्ञान आणि ज्ञानमात्र असे तीन शब्द योजिले आहेत. अज्ञान पिऊन ज्ञान वाढतें पण अज्ञानाचा विनाश करण्याच्या कामांत गुंतलेले ज्ञान कोठवर वाढत जाणार? त्याचें जीवन मुळीं अज्ञानाच्या नाशावर. तेव्हां अज्ञान संपलें कीं हें ज्ञानही संपुष्टांत आलेंच. म्हणून म्हटलें आहे.

तैसें पिऊनि अज्ञान । तंववरी वाढे ज्ञान ।
जंव आपुलें निधन । निःशेष साधे ॥ ४–१०

आणि असें झाल्यावर जें ज्ञान प्राप्त होतें त्याला वर्णनाच्या सोईसाठीं ज्ञानमात्र किंवा केवळ ज्ञान किंवा निखळ ज्ञान असें नांव दिलेलें आहे. त्याला

दृष्टांत देतांना म्हटलें आहे कीं चंद्राच्या सतराव्या कळेला ( अमृतकळेला ) पौर्णिमेला वाढण्याची व अमावास्येला मरण्याची भीति नाहीं; त्या कळेला क्षय नाहीं, वृद्धि नाहीं; पौर्णिमेनंतर वद्य प्रतिपदेची कळा येणारच; पण सतराव्या कळेनंतर वद्य प्रतिपदाही नाहीं आणि शुद्ध चतुर्दशीही नाहीं, पुनव नाहीं आवस नाहीं. तसें हें केवलज्ञान आहे, पण या ज्ञानाचें अधिक वर्णन करणें कठीण आहे, अशक्य आहे. तेजाला, प्रकाशाला अंधार जसा दिसतच नाहीं तसा या केवलज्ञानाला अज्ञानाचा पत्ताही नसतो. आणि जेथें सर्वत्र प्रकाशच भरला आहे तेथें त्याला प्रकाश म्हणून तरी काय म्हणावयाचें ? पण तसें म्हणतां येत नाहीं म्हणून तो प्रकाशाचा अभाव नव्हे, म्हणून अभाव-शून्य-सिद्धांत, मात्र खरा ठरणार नाहीं. शून्यवाद खोटा आहे.

पांचव्या प्रकरणांत सच्चिदानंद या संयुक्त शब्दाची फोड करून सांगितली आहे व ती मोठी मार्मिक आहे.

सत्ता प्रकाश सुख । या तिही उणे लेख ।
जैसे विखपणेंचि विख । विखा नाहीं ॥ १

सत्ता ( सत् ) प्रकाश ( चित् ) आणि सुख ( आनंद ) मिळून हा सच्चिदानंद शब्द परमात्म्याला लावतात. पण या तिहींनाही तूं ( उणे लेख ) कमी समज; म्हणजे या शब्दांनीं परमात्म्याची यथार्थ कल्पना होत नाहीं. असत् याचा नाश करणारी ती सत्ता, जडाच्या उलट तें चित् आणि दुःखाच्या उलट तो आनंद या तीन्हीं शब्दांना उणे, कमी, पूर्ण अर्थ न दाखविणारे समजण्याचें कारण या तीन्हीमुळे त्यांचे प्रतियोगी शब्द ध्यानांत येतात आणि, ते नव्हेत ते हे, असे जरासे अभावरूप वर्णन या शब्दांच्या साहाय्यानें होतें. पण परमात्म्याचें असें वर्णन हें कांहीं पूर्ण नव्हे; त्याच्या वर्णनाचा हा प्रयत्न आहे. तीन गोष्टी सांगितल्या असल्या तरी त्यांनीं दर्शविलेला वस्तुपदार्थ हा एकरूपच आहे. विषाला विष बाधत नाहीं, तें दुसऱ्याला बाधतें, त्याप्रमाणें परमात्मा एक आहे त्याला हे अनेकरूप वर्णन बाधत नाहीं. अनेकरूप वर्णन हें उणें आहे, पण तें एकरूप परमात्म्याला बाधत नाहीं; त्यानें परमात्म्याला उणेंपणा येत नाहीं. याला दृष्टांत मोठा समर्पक असा कापूराचा दिला. त्यांतील मर्म वाचकांच्या लक्षांत येईलच.

उजाळ द्रुति मार्दव । या तिहीं तिही उणीव ।
हे देखिजे सावेव । कापुरीं एके ॥ ३
आणि कीर उजाळ । की उजाळ तोचि मवाळ ।
कीं दोन्ही ना परिमळ— । मात्रचि जे ॥ ४
ऐसे एके कापूरपणीं । तिन्ही इये तिन्हीं उणीं ।
यापरी आटणी । सत्त्वादिकांची ॥ ५
एऱ्हवीं सच्चिदानंदभेदें । चाळिलीं तिन्ही पदें ।
परी तिन्ही उणी आनंदें । केलीं येणें ॥ ६

आणि हेंही स्पष्ट करण्यासाठीं सांगतातः-

सत्ताचि सुखप्रकाशु । प्रकाशचि सत्ता उल्हासु ।
हे न निवडे, मिठासु । अमृतीं जेवीं ॥ ७

सत्ता म्हणजे सुख आणि प्रकाश ( सत् म्हणजेच आनंद आणि चित् ); प्रकाश ( चित् ) म्हणजेच सत्ता ( सत् ) आणि उल्हास ( आनंद ) या तीन्हींत निरनिराळीं निवड करतां येत नाहीं; ज्याप्रमाणें अमृतांत मिठांश, म्हणजे गोडपणा (खारटपणा नव्हे; हिंदी शब्द मिठा, मिठाई, हा लक्ष्यांत घ्यावा) हा निराळा काढतां येत नाहीं. आणखी दोन दृष्टांत देऊन पुढें सांगतातः—

तैसे असताचिया व्यावृत्ति । सत म्हणों आले श्रुति ।
जडाचिया समाप्ति । चिद्रूप ऐसे ॥ १०
दुःखाचेनि सर्व नाशें । उरलें तें सुख ऐसें ।
निगदिले निःश्वासें । प्रभूचेनि ॥ ११

तेव्हां हा सच्चिदानंद शब्द अन्यव्यावृत्तिसिद्ध असल्यामुळें परमात्म्याचा वाचक होऊं शकत नाहीं.

म्हणोनि सच्चित्सुख । हे बोल वस्तुवाचक ।
नव्हेति, हे शेष । विचारांचे ॥ १९

तेव्हां हे तीन्ही शब्द परमात्म्याचे वाचक नव्हेत पण त्याचा विचार करावयास लावतात आणि मग ते मौन धारण करतात. कां ? कारण फार मजेदार आहे.

जें जें बोलिजे तें तें नव्हे । होय तें तंव न बोलवे । २६

अभावरूप वर्णन तें भावरूप कसें होणार ? पण भावरूप जें आहे तें अनुभवाचें

**लागते, शब्दांनीं त्याचें वर्णन करावें तर आमच्या बिचाऱ्या मानवी शब्दांना तें करतांच येत नाहीं.**

मुखाआंतोनि निघणे । तें मुखिये सुखें तेणें ।
हे सुखमात्रचि मा कोणें । अनुभवावें ॥ ३५

**कांहीं सुखें कशीं असतात तें सांगतांच येत नाहीं.**

रूप नाहीं तें लावण्य । अंग नुठी तें तारुण्य ।
क्रिया न फुटे तें पुण्य । कैसें असे ॥ ४६
कां वाद्यविशेषाची सृष्टि । जे जन्म नेघे दृष्टी ।
तें नादु ऐसी गोष्टी । नादाचिजोगी ॥ ४८

**अशा प्रकारं या शब्दाच्या पलीकडच्या गोष्टी आहेत त्यांच्याचसंबंधीं श्रुति नेति नेति म्हणतात.**

**पांचव्या प्रकरणाचे शेवटीं शब्दाबद्दल सामान्यपणें म्हटलें आहे.**

आणि पुढिला कां आपणापें । वस्तु विसराचेनि हातें हारपे ।
मग शब्देंचि घेपे । आठऊनिया ॥ ६७

**आपली स्वतःची ( आपणापें ) वस्तु किंवा दुसरी ( पुढील ) वस्तु जेव्हां विस्मरण होऊन नाहींशी होते त्या वेळीं शब्दाच्याच साहाय्यानें तिचें स्मरण होऊन ती परत आपल्या हातीं येते.**

येतुलियाही परौतें । चागावें नाहीं शब्दातें ।
जरी स्मारकपणें कीर्तातें । मिरवी हा जगीं ॥ ६८

**यापलीकडे ( स्मरण करून देण्यापलीकड ) शब्दाच्या ठिकाणीं कसलाही चांगुलपणा नाहीं. परंतु स्मारकपणामुळें ( स्मरण करून देण्याच्या शक्तीमुळें, शब्दावरून शब्द आठवतो ) हा जगांत कीर्तिमान् होऊन मिरवतो. असा हा शब्द त्याचें खंडन किंवा निरसन सहाव्या प्रकरणांत केलें आहे.**

बाप उपेगी वस्तु शब्दु । स्मरणदानी प्रसिद्धु ।
अमूर्ताचा विशदु । आरिसा नव्हे ॥ ६-१

**शब्द हो अतिशय ( बाप ) उपयोगी वस्तु आहे. कारण स्मरण करून देण्याबद्दल त्याची प्रसिद्धी आहे. परंतु स्मरणदानापलीकडे त्याला महत्व नाहीं अमूर्ताचा, परब्रह्माचा, शब्द कांहीं आरसा होऊं शकत नाहीं; शब्दानें परब्रह्म आकळता येत नाहीं. आणि याच सिद्धांताचें स्पष्टीकरण या सहाव्या प्रकरणांत**

विस्तृतपणें केलेलें आहे. शब्द शक्तिमान् आहे पण त्याच्या शक्तीला मर्यादा आहे.

विधि निषेधाचिया वाटा । दाविता हाचि दिवटा ।
बंध मोक्ष कळिकटा । शिष्टु हाचि ॥ ५

विधि आणि निषेध दाखविणारा दिवा म्हणजे हा शब्द; बंध आणि मोक्ष यांचें कळिकट म्हणजे भांडण यानेंच उपस्थित केलेलें आहे. ( तो सर्व शाब्दिक वाद आहे. ) याच्या साहाय्यानें हुशार लोक केवढाले चमत्कार करतात, खऱ्याचें खोटें करतात, खोट्याचें खरें करतात. ( वकीलीचें चातुर्य आणि अर्थ लावण्याचें चातुर्य इत्यादि गोष्टी येथें लक्षांत घ्याव्या ) शब्दाची गंमत पहाः—

हा अविद्येचिया आगीं पडे । तें नाथिलें ऐसें रूढे ।
न लाहिजे तीन कवडे । साच वस्तु ॥ ६

जेव्हां हा ( शब्द ) अविद्येचा पक्ष घेतो तेव्हां जें खरोखर नाहीं ( नाथिलें ) तें रूढ करतो, त्यालाच महत्त्व येतें, खोट्याला किंमत चढतें आणि जी खरी ( साच ) वस्तु आहे तिची तीन कवड्याही कोणी किंमत करीत नाहीं. तथापि

साहाय्य आत्मविद्येचें । करावया आपण वेचे ।
गोमटें काय शब्दाचें । एकैक वानूं ॥ ११

आत्मविद्येचें, आत्मज्ञानाचें साहाय्य करण्यासाठीं, हा शब्द स्वतःचें शरीर वेंचतो, म्हणजे आत्मविद्या प्राप्त झाली कीं शब्दाचें काम संपलें, असे या शब्दाचे एकेक उत्तम ( गोमटे ) गुण किती वर्णन करावेत? आत्मविद्येजवळ शब्दाचें काम नाहीं आणि अविद्या शब्दानें नासण्याची गरज नाहीं

अहो हें किती बोलावें । अविद्या रचिली अभावें ।
आतां कायी नाशावें । शब्दें येणें ॥ ५५

अविद्या मुळीं अभावावर रचिलेली आहे. तेव्हां अविद्या म्हणजे जें खरोखर नाहीं त्याचें ज्ञान. नाहीं तें नाहींसें करण्याला शब्द तरी हवेत कशाला? तेव्हां जेथें खरोखर केवळ ज्ञान आहे तेथें शब्दाला वाव नाहीं. ज्ञानमात्राव्यतिरिक्त ज्ञानें आणि अज्ञानें जीं आहेत तीं शब्दांवर अवलंबून आहेत पण केवलज्ञानापुढें त्यांना किंमत नाहीं. चित्रांत काढलेलें अरण्य जसें खरें अरण्य नव्हे त्याप्रमाणें शाब्दिक ज्ञान म्हणजे ज्ञान नव्हे;

एवं शब्दैकजीवनें । बापुडीं ज्ञानें अज्ञानें ।
साचपणें बनें । चित्रींचीं जैशीं ॥ १०१

**सहाव्या प्रकरणांतील हें शब्दखंडन फारच मार्मिक आणि ग्रंथकाराच्या कुशाग्रबुद्धीचें निदर्शक आहे.**

**६ ज्ञानेश्वरींतील तेरावा अध्याय जसा ज्ञानदेवाच्या ग्रंथकर्तृत्वाचा, कवित्वाचा, आणि तत्वज्ञानपारंगततेचा अत्युत्कृष्ट नमुना आहे तसेंच अमृतानुभवांतील सातवें प्रकरण आहे. यांत अज्ञानाचें खंडन केलेलें आहे. त्याची ज्ञानदेवाच्या शब्दांत येथें थोडी दिशा दाखविण्याचा प्रयत्न करतों. तत्वजिज्ञासूंनीं हें प्रकरण वरचेवर वाचून त्याचें अंतरंग आत्मसात् केलें पाहिजे. प्रकरणाची प्रस्तावना पहाः—**

आणि ज्ञानही जे म्हणिजे । ते अज्ञानचि पा दुजे ।
एक लपवूनि दाविजे । एक नव्हे ॥ ६

**यापुढें "अज्ञान" शब्दावर मोठी मजेदार कोटी केली आहे. ज्ञान आणि अज्ञान एकत्र असणें शक्य नाहीं. कारण जेथें अज्ञान असेल तेथें सर्वच अज्ञान ( नेण ) असलें पाहिजे**

अज्ञानें जेथ असावें । तेणें सर्व नेण व्हावें ।
ऐसी जाति स्वभावें । अज्ञानाची ॥ ९

**तेव्हां जेथें अज्ञान आहे तेथें अज्ञान आहे असें जर कळेल तर तें ज्ञान होईल आणि त्याला अज्ञान म्हणणें म्हणजे विरोधात्मक होईल.**

या लागीं जरी अज्ञान । करील आपुलें ज्ञान ।
हे म्हणतखेवों घेववी मौन । विरोधचि ॥ १३ ॥

**आणि म्हणून आत्म्याच्या ठिकाणीं अज्ञानाचा संभव नाहीं आणि ( आठवें प्रकरण ) अज्ञानाची कल्पना ज्यामुळें उद्भवली त्या ज्ञानाचाही संभव नाहीं; तर आत्मा केवळ ज्ञानमय आहे; अज्ञानसूचक ज्ञान त्याच्या ठिकाणीं आहे असें म्हणणें आणि त्याच्या ठिकाणीं अज्ञान आहे असें म्हणणें सारखेंच. आत्मा आणि अज्ञान यांचा संबंधच नाहीं. हें तत्व अनेक सुंदर दृष्टांत देऊन स्पष्ट करतातः—**

एऱ्हवीं तरी आत्मया-। माजी अज्ञान असावया ।
कारण म्हणतां न्याया । चुकी येईल कीं ॥ २४

अज्ञान तममेळणी । आत्मा प्रकाशाची खाणी ।
आतां दोहीं मिळणी । एकी कैशी ॥ २५
स्वप्न आणि जागर । आठव आणि विसर ।
इये युग्मे एका हार । चालती जरी ॥ २६
शीता तापा एकवट । वाहे वस्तीची वाट ।
कां तमे बांधिजे मोट । सुर्य रश्मींची ॥ २७ ॥
नाना राती आणि दिवो । येती एके ठायीं राहो ।
ते आत्मा जिये जीवो । अज्ञानाचेनी ॥ २८ ॥
हे असो मृत्यु आणि जिणे । इये शोभती काय म्हुणे ।
तरी आत्मेनि असणे । अज्ञानेसीं ॥ २९

अज्ञानाच्या या अत्यंत तार्किक विवेचनांत, ज्या वस्तूच्या ठिकाणीं अज्ञान आहे ती वस्तु अज्ञान आहे असें म्हणतां येणार नाहीं ( कारण ती वस्तु स्वतःच अज्ञान असेल तर ती आहे असें "ज्ञान" कसें होणार ? ) आणि अज्ञानाचें कार्य ( परिणाम ) म्हणजे अज्ञान म्हणतां येणार नाहीं, हे दोन सिद्धांत मोठ्या कुशलतेनें प्रस्थापित केलेले आहेत; म्हणजे अज्ञान हें काय हें त्याच्या कार्यापासून किंवा कारणापासून समजावयाचें असें धरलें तर तें कारण किंवा कार्य अज्ञानरूप असतां उपयोगी नाहीं. तत्वज्ञानविवेचनांत शब्दार्थाची कसरत करण्याची ज्यांना संवय आहे त्यांनाच या विवरणांत खोल जातां येईल पण येथें फक्त उल्लेखापलीकडे त्यासंबंधीं अधिक कांहीं म्हणणें अप्रासंगिक होईल. असो. अशा प्रकारें अज्ञान म्हणून वस्तु आहे हें समजणें हा ज्ञानाचा भाग असल्यामुळें, अज्ञान ही जी वस्तु तिचें विवेचन केलें तर ती प्रत्यक्ष हातीं लागत नाहीं, कारण ती अभावरूप आहे, असें ज्ञानदेवांचें म्हणणें आहे. खालील ओवी या बाबतींत लक्षांत ठेवावी:—

तैसा चिन्मात्रीं चोखडा । भलतैसा अज्ञानाचा झाडा ।
घेतला तऱ्ही पवाडा । येईल काई ॥ ७३

अमृतानुभवाच्या उच्च भूमिकेवरून नव्हे तर सामान्य व व्यावहारिक भूमिके-वरून केलेलें अज्ञानाचें वर्णन ज्ञानेश्वरी अध्याय १३ ( ६५६ ते ८४७ ) येथें वाचकांनीं पहावें.

अज्ञानाचा प्रतियोगी शब्द ज्ञान हाही आत्मरूपाच्या ठिकाणीं संभवत नाहीं अशी आठव्या प्रकरणाची ( ज्ञानखंडन ) सुरवात केली आहे.

तेसें आमुचेनि नांवें । अज्ञानाचें ज्ञानही नव्हे ।
आम्हांलागीं गुरुदेवें । आम्हीच केलों ॥ १

आणि केवळ ज्ञान जे आहे तें शब्दांनीं कसें सांगावें ? पुढील रसरशीत ओवी वाचून अंतःकरण आश्चर्यानें थक्क होऊन जातें:—

किंबहुना श्रीनिवृत्ति । ठेविलें अगो जया स्थिति ।
ते काय देऊं हातीं । वाचेचिया ॥ ८ ॥

आमचे सद्गुरु निवृत्तिनाथ यांनीं ज्या स्थितीचा अनुभव आम्हांला आणून दिलेला आहे ती वाचेच्या हातीं आम्ही कशी द्यावी ? शब्दांच्या साहाय्यानें तिचें वर्णन कसें करावें ? तें अशक्य आहे. ती स्थिति अशी आहे कीं तेथें अज्ञानाची उभे राहण्याची छाती नाहीं.

अज्ञानाचा प्रवर्तु । नाहीं जया गावाआंतु ।
तेथ ज्ञानाची तन्ही मातु । कोण जाणे ॥ १०
म्हणोनि अज्ञान नाहीं । तेथेंचि गेलें ज्ञानही ।
आता निमिषोन्मिषा दोहीं । ठेली वाट ॥ १२

येथें निमेष, उन्मेष म्हणजे अज्ञान व ज्ञान असा अर्थ लक्षणेने घ्यावयाचा. जेथें अज्ञान नाहीं तेथें ज्ञानही नाहीं आणि म्हणून ज्ञानही नाहीं आणि अज्ञानही नाहीं.

आणि जाणे तोचि नेणे । नेणे तोचि जाणे ।
आतां कें असणें जिणें । ज्ञानाज्ञाना ॥ १८

अशा प्रकारें हें थोडक्यांत ज्ञानखंडनाचें प्रकरण आहे. सातव्या प्रकरणांत अज्ञानाचें विस्तृत खंडन केलेलें आहे त्यांतच ज्ञानखंडनाचें कार्य बहुतेक साधलें आहे म्हणून आठवें प्रकरण येवढें छोटें झालेलें आहे हें विचारी वाचकांच्या लक्ष्यांत आल्यावांचून राहणार नाहीं.

नवव्या प्रकरणांत जीवन्मुक्त स्थितीला पोहोंचलेल्या परमहंसांचें वर्णन केलेलें आहे आणि तें मोठें प्रसन्न आणि आल्हाददायक आहे. या स्थितीचें वर्णन करणेंही किती कठीण आहे तें पुढील ओवींत सांगितलें आहे.

वाच्यजात खाऊनी । वाचकत्वही पिऊनि ।
ठाकली निंदजोनी । परा येथ ॥ ६४

**वाच्य आणि वाचक दोहोंनाही खाऊन पिऊन टाकल्यामुळें ( वाच्य ही उरलें नाहीं व वाचकही उरलें नाहीं म्हणून ) परा वाणी निराश्रित होऊन या ठिकाणीं झोंप घेत पडली आहे. आणि अशा या स्थितींत सद्गुरूनें आपणांला पोंचविलें म्हणून ज्ञानदेव आनंदोद्गार काढतातः—**

शिवा शिवा समर्था स्वामी । येवढीये आनंदभूमी ।
घेंप दीजे एके आम्ही । ऐसे केलें ॥ ६५

**आणि अशा आनंदभूमीवर आणून सोडणाऱ्या सद्गुरूला ज्ञानदेव अभिवादन करून हें नववें प्रकरण संपवितात. दहावें म्हणजे शेवटचें प्रकरण, लिहिलेल्या ग्रंथाचें कर्तृत्व आपलें नव्हे हें सांगण्यासाठीं, ब्रह्मार्पणमस्तु म्हणण्यासाठीं, ग्रंथपरिहारासाठीं लिहिलेलें आहे. या ग्रंथाची रचना निवृत्तिनाथाच्या कृपेमुळें झाली, त्यांत माझें कांहीं नाहीं हें ज्ञानदेव वरचेवर सांगतात. पण सद्गुरूच्या कृपेमुळें हें अमृतानुभव जगालाही लाभलें यांत शंका नाहीं. ज्ञानदेव म्हणतात, मी नवीन कांहीं सांगितलेलें नाहीं. आणिक नवीन सांगावयाचें तरी काय ?**

आम्ही बोलिलो जे कांहीं । ते प्रकटचि असे ठाईं ।
मा स्वयंप्रकाशा काई । प्रकाशावे बोलें ? ॥ ८

**जें स्वयंप्रकाश आहे त्याला शब्द काय प्रकाशांत आणणार ?**

या कारणे मियां । गौप्य दाविलें बोलोनिया ।
ऐसे नाहीं आपसया । प्रकाशुचि ॥ १४ ॥

**आम्ही कांहीं हें गुप्त असें सांगितलेलें नाहीं. हें सर्व उघड आहे. विचार केला कीं आपोआप पटण्यासारखें आहे. आमची स्थिति कशी आहे ?**

आणि पूर्ण अहंता वेठलो । सेंघ आम्हीच दाटलों ।
मा लोपलों ना प्रकटलों । कोणा होउनी ॥ १५

**येथील " पूर्ण अहंता " हा शब्द फार गंभीर आहे. अहंचें रूपांतर ब्रह्मास्मि या महावाक्यांत होणें. पूर्ण अहंतेच्या ताब्यांत जाणें अशी कोटी ज्ञानदेव या ठिकाणीं करतात. आपले ( म्हणजे आत्म्याचें, परमात्म्याचें ) वर्णन आपणच कशाला करावयाचें ? म्हणूच उगेपणा, मौन उत्तम. ज्ञानदेव सांगतात.**

म्हणोनी माझी वेखरी । मौनाचेंही मौन करी ।

आणि अशा प्रकारें जेथें दशोपनिषदें पुढें उभीं राहण्याला भितात अशा तऱ्हेचें आश्चर्यकारक आत्मज्ञान या अपूर्व ग्रंथांत ज्ञानदेवांनीं मराठी वाचकांना त्यांनीं जीवन्मुक्त व्हावें म्हणून दिलेलें आहे

ज्ञानदेवो म्हणे श्रीमंत । हें अनुभवामृत ।
सेवोनि जीवन्मुक्त । हेचि होतु ॥ १९

अशा प्रकारें अनुभवामृत

परी अमृताही उठी लाळ । अमृतें येणे ॥

असें आहे. अमृताच्या तोंडालाही पाणी सुटेल असें हें अनुभवामृत आहे हें वर्णन खरोखर अगदीं यथार्थ आहे. या अमृतानुभवांत ज्ञानदेवांचा प्रत्यक्ष अनुभव आहे.

यया लागीं हें बोलणें । अनुभवामृतपणें ।
स्वानुभूतिपरिगुणे । वोगरलें ॥ २४

जोंपर्यंत याचा स्वाद घेतला नाहीं तोंपर्यंतच

आणि मुक्त मुमुक्षु बद्ध । हें तंववरी योग्यताभेद ।
अनुभवामृतस्वाद । विरुद्ध जंव ॥ २५

याचा स्वाद घेतला आणि हें अंगांत मुरलें कीं मग मुक्त स्थिति हीच नित्य स्थिति होऊन राहील.

अशा प्रकारें ज्ञानदेवांच्या या अलौकिक ग्रंथाचा परिचय करून देण्याचा हा प्रयत्न केला. हा ग्रंथ ज्ञानेश्वरीच्याही वरच्या भूमिकेवर आहे आणि त्या अद्भुत ग्रंथावरही उज्वलता मिरवतो असें म्हणण्यापलीकडे त्याचें वर्णन करणें अशक्य आहे. आमच्या जवळ तर याचें यथोचित वर्णन करण्याला शब्द नाहींत हें प्रांजळपणें सांगितलें पाहिजे. हा ग्रंथ मराठी वाङ्मयाच्या रत्नभांडारांतील कोहिनूर आहे हें म्हणणेंही उणें पडेल कारण कोहिनूर कितीही मूल्यवान् असला तरी निर्जीव आहे. तेव्हां याचें वर्णन करावयाचें म्हणजे अमृतानुभवासारखा अमृतानुभव असेंच करावयाचें. मराठी वाङ्मयाला या ग्रंथानें थोर पदवी आणून दिलेली आहे. ज्ञानेश्वरी हा मराठी वाङ्मयाचा हिमालय पर्वत समजला तर अमृतानुभव हें त्या हिमालयावरचें अत्युच्च असें गौरीशंकर शिखर आहे. हा ग्रंथ सर्व तीर्थयात्रा संपवून परत आल्यावर ज्ञानदेवांनीं लिहिला

आणि निवृत्तिनाथांचेही धन्यवाद घेतलें. अमृतानुभवाचें श्रवण केलेल्या लोकांनीं ज्ञानदेवाला "अकरावा अवतार" मानलें यांत नवल करण्यासारखें कांहीं नाहीं. ज्ञानेश्वरीच्या रचनेनें ज्ञानदेवांची योग्यता अत्यंत थोर आहे हें सर्वांना पटलें. अमृतानुभवाच्या रचनेमुळें ते खरोखर सिद्ध पुरुष आहेत अशी सर्वांची खातरजमा झाली. या ग्रंथाचा अभ्यास अधिक झाला पाहिजे. याची उज्वलता आपल्या अंतःकरणांत प्रकाशाची ज्योत कायमची उत्पन्न करण्याला समर्थ आहे. या ग्रंथाच्या रचनेनंतर थोड्याच कालानें ज्ञानदेवांनीं समाधि घेण्याचा विचार केला; तो विषय अन्यत्र वर्णन केलेला आहे.

# भाग दहावा

## ज्ञानदेवांची काव्यसंपदा

माझा मराठाचि बोलु कौतुकें । परि अमृतातेंही पैजा जिंके ।
ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥ ज्ञा. ६—१४

जिये कोंवळिकेचेनि पाडें । दिसती नादींचे रंग थोडे ।
वेधें परिमळाचें बीक मोडे । जयाचेनी ॥ १५ ॥

ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणींचि होती जिभा ।
बोलें इंद्रियां लागे कळंभा । एकमेकां ॥ १६ ॥

सहजें शब्दु तरी विषो श्रवणाचा ।
परी रसना म्हणे रसु हा आमुचा ।
घ्राणासि भावो जाय परिमळाचा । हा तोचि होईल ॥ १७ ॥

नवल बोलतीये रेखेची वाहणी ।
देखतां डोळयांही पुरों लागे धणी ।
ते म्हणती उघडली खाणी । रूपाची हे ॥ १८ ॥

जेथ संपूर्ण पद उभारे । तेथ मनचि धांवे बाहिरें ।
बोलु भुजांहीं आविष्करे । आलिंगावया ॥ १९ ॥

ऐशीं इंद्रियें आपुलालिया भावीं ।
झोंबती परि तो सरिसेपणेंचि बुझावी ।
जैसा एकला जग चेववी । सहस्रकरु ॥ २० ॥

तैसें शब्दाचें व्यापकपण । देखिजे असाधारण ।
पाहातयां भावज्ञां फावती गुण । चिंतामणीचे ॥ २१ ॥

हें असो तया बोलांचीं ताटें भलीं । वरी कैवल्यरसें वोगरलीं ।
ही प्रतिपत्ति मियां केली । निष्कामासी ॥ २२ ॥

ज्ञानी, योगी, द्रष्टा, सत्पुरुष, या सर्व नात्यांनीं ज्ञानदेवांची योग्यता अपूर्व आहे व गेल्या साडेसहाशें वर्षांत तीं पिढ्यानूपिढ्या मान्य झालेली आहे. महाकवींचीं नांवें घेतलीं तर त्यांत ज्ञानदेवाचा नामनिर्देश अवश्य झाला

पाहिजे. " भावाची संपत्ति " आणि " रसाची उन्नति " ही त्यांनी आपल्या ज्ञानेश्वरी ग्रंथांत फार उत्कृष्टपणें प्रकट केलेली आहे. शांत रसासारखा रस शृंगारापेक्षां मधुर करून दाखविण्याचा आश्चर्यकारक पराक्रम तर त्यांनींच केलेला आहे. " आठां रसांची वोवाळणी " करावी अशा थाटाचा शांत रस त्यांनीं उभा केलेला आहे; आणि त्याबरोबरच इतर आठही रसांचा सन्मान केला आहे. आणि हें सर्व त्यांनीं तेराव्या शतकांत मराठींत केलें. मराठी अक्षरें अशीं रसयुक्त त्यांनीं गुंफिलेलीं आहेत कीं माधुर्यांत काय आणि अमरत्व देण्यांत काय त्यांनीं प्रत्यक्ष अमृताशीं पैज जिंकावी. ज्ञानेश्वरी ग्रंथ वाचल्यावर कोणत्याही संस्कृत पंडितानें किंवा दुसऱ्या भाषेंतील पंडितानें आदरानें मस्तक नम्र करावें अशी काव्य-संपत्ति आणि विचारसंपत्ति तींत ज्ञानदेवांनीं ओतलेली आहे. या दोन्ही संपदेंत ज्ञानदेव हे कुबेर आहेत. काव्यसंपदेकडे दृष्टि फेकली तर रस आणि भाव, गुण आणि रीति, शब्दालंकार आणि अर्थालंकार, आणि काव्याला महत्त्व देणारा ध्वनि या सर्वांत त्यांचें असामान्य प्रभुत्व दिसून येतें.

निर्दूषणा गुणवती रसभावपूर्णा । सालंकृतिः श्रवणकोमलवर्णराजिः ।

हें त्यांच्या काव्यकन्येचें निःसंशय वर्णन होईल.

निर्दोषं गुणवत्काव्यमलंकारैरलंकृतम् ।
रसान्वितं कविः कुर्वन्कीर्तिं प्रीतिंच विंदति ॥

हें भोजदेवानें दिलेलें काव्यवर्णन ज्ञानदेवांना लागू पडते इतकेंच नाहीं तर जरासें फिकट वाटतें. कारण ज्ञानेश्वरींत जो थाट आहे, जी प्रसन्नता आहे, जें प्रकाशबाहुल्य आहे, अंतःकरणाला खळबळवून टाकण्याचें जें सामर्थ्य आहे त्याचा समावेश या शास्त्रीय व्याख्यांत होणार कसा ? संस्कृतांत कालीदास किंवा त्यानंतर झालेला जयदेव आणि ज्ञानदेवानंतर झालेला जगन्नाथ पंडित यांच्या वाणींत जें माधुर्य आहे त्याचें स्मरण ज्ञानेश्वरी वाचतांना पदोपदीं होतें. त्यांच्या विचारसंपदेचा, तत्त्वज्ञानाचा, शिकवणीचा, संदेशाचा विचार अन्यत्र या ग्रंथांत केलेला आहे. या भागांत त्यांच्या काव्यसंपदेचें निदान ओझरतें दर्शन वाचकांना व्हावें असा प्रयत्न केलेला आहे. काव्य या दृष्टीनें ज्ञानेश्वरीचें महत्त्व प्रकट करण्याला निराळा ग्रंथ एखाद्या साहित्यकोविदाला लिहावा लागेल. विचार-संपदेंत तर त्यांच्या शेंकडों ओव्या अशा आहेत कीं त्या प्रत्येकीवर विवेचनात्मक निबंध लिहितां येतील. ज्ञानदेवांना आपल्या काव्यशक्तीची जाणीव होती व

**ग्रंथाचें अंतरंग म्हणजे विचार व अनुभव यांची संपदा न कळणारे या काव्यामुळें आनंदित होतील असा स्पष्ट उल्लेखही त्यांनीं केलेला आहे.**

**ज्ञानदेवांना साहित्यशास्त्र उत्तम अवगत होतें हें अगदीं स्पष्ट दिसतें. ज्ञानेश्वरींत मुख्य रस शांत हा आहे व हा रस रंगवितांना आपण शृंगारालही मागें पाडलें आहे असें ज्ञानदेव सांगतात आणि तें सर्वथैव सत्य आहे. अकराव्या अध्यायांतील पुढील सुरवातीच्या ओव्या या संबंधांत उल्लेखनीय आहेत.**

आतां यावरी एकादशीं । कथा आहे दोन्ही रसीं ।
येथ पार्था विश्वरूपेंसीं । होईल भेटी ॥ १
जेथ शांताचिया घरा । अद्भुत आला आहे पाहुणेरा ।
आणि येरांही रसां पांतिकरां । जाहला मानु ॥ २

**यावरून ज्ञानेश्वरी हें शांत रसाचें घर असून अकराव्या अध्यायांत त्याकडे अद्भुत रस हा पाहुणा आलेला आहे, आणि पंक्तीला ( जेवणाचे वेळीं ) बसलेल्या इतर रसांचाही योग्य मान ठेवलेला आहे असें होतें. पाहुणेर आणि पांतिकर या शब्दांवरून पुढील दृष्टांत सहजच सुचला:—**

अहो वधूवरांचिये मिळणीं । जैशी वऱ्हाडियांही लुगडीं लेणीं ।
तैसे देशियेच्या सुखासनीं । मिरवले रस ॥ ३

**देशीयेच्या म्हणजे मराठीच्या सुखासनावर नऊ रस मिरवत आहेत असें ज्ञानदेव सांगतात. शांत आणि अद्भुत या दोन्ही रसांची सिद्धता या अध्यायांत कशी झाली आहे त्याचें वर्णन पहा.**

परि शांताद्भुत बरवे । जे डोळीयांच्या अंजळीं घ्यावे ।
जैसे हरिहर प्रेमभावें । आले खेवां ॥ ४
ना तरी अंवसेच्या दिवशीं । भेटली बिंबे दोन्ही जैशीं ।
तेवीं एकवळा रसीं । केला येथ ॥ ५
मीनले गंगेयमुनेचे ओघ । तैसें रसां जाहलें प्रयाग ।
म्हणोनि सुस्नात होत जग । आघवें येथ ॥ ६
माजीं गीता सरस्वती गुप्त । आणि दोनी रस ते ओघ मूर्त ।
यालागीं त्रिवेणी हे उचित । फावली बापा ॥ ७
एथ श्रवणाचेनि द्वारें । तीर्थी रिघतां सोपारें ।
ज्ञानदेव म्हणे दातारें । माझेनि केलें ॥ ८

तीरें संस्कृताचीं गहने । तोडोनि मऱ्हाठिया शब्दसोपानें ।
रचिलीं धर्मनिधानें । श्रीनिवृत्तिदेवें ॥ ९

[ **अन्वयः—श्री निवृत्तिदेवें संस्कृताचीं गहनें तीरें तोडोनि धर्मनिधानें मऱ्हाठिया शब्दसोपानें रचिलीं.** ]

म्हणोनि भलतेणें येथ सद्भावें नाहावें । प्रयागमाधव विश्वरूप पहावें ।
येतुलेनि संसारासी यावे । तिळोदक ॥ १०

**येथें केलेलें प्रयागमाधव हें रूपक किती हृद्य व सांग आहे हें रसिक वाचकांच्या लक्ष्यांत येईलच. अशा प्रकारें रससिद्धता या ज्ञानेश्वरींत उत्तम झालेली आहे.**

हें असो. ऐसे सावयव । एथ सासिन्नले आर्थी रसभाव ।
तेथ श्रवणसुखाची राणीव । जोडली जगा ॥ ११
जेथ शांताद्भुत रोकडे । आणि येरां रसां पडप जोडे ।
हें अल्पचि परी उघडें । कैवल्य येथ ॥ १२

**ज्ञानेश्वरींत मुख्य असलेल्या शांत रसाच्या परिपोषासंबंधीं चौथ्या अध्यायाच्या शेवटीं म्हटलें आहेः—**

जयाचिया बरवेपणीं । कीजे आठां रसांची वोवाळणी ।
जो सज्जनाच्यिये आयणी । विसांवा जगीं ॥ २१२
तो शांतुचि अभिनवेल । ते परियसा मऱ्हाठे बोल ।
जे समुद्राहूनि सखोल । अर्थभरित ॥ २१३

**अशा तऱ्हेनें काव्यांत जसा एक रस मुख्य असतो तसा ज्ञानेश्वरींतही एका रसाचा अत्यंत हृदयंगम परिपोष झालेला आहे. रसाच्या साहाय्यानें विवेक शिकविणें हेंच काव्याचें कार्य आहे आणि म्हणून ज्ञानेश्वरी हें अत्यंत उत्कृष्ट काव्य आहे.**

सहजे मलयानिलु मंदु सुगंधुं । तया अमृताचा होय स्वादु ।
आणि तेथेंचि जोडे नादु । जरी दैवगत्या ॥ २१९
तरी स्पर्शें सर्वांग निववी । स्वादें जिव्हेतें नाचवी ।
तेवींच कानांकरवीं । म्हणवी बापु माझा ॥ २२०
तैसें कथेचें इये ऐकणें । एक श्रवणासि होय पारणे ।
आणि संसारदुःख मूळवणें । विकृतीविणें ॥ २२१

तैसा मनाचा मारु न करितां । आणि इंद्रियां दुःख न देतां ।
एथ मोक्ष असे आयता । श्रवणाचिमाजीं ॥ २२३

तेव्हां अशा या आश्चर्यकारक काव्योद्यानांत आपण कांहीं वेळ भ्रमण करूंया.

२ ज्ञानदेवांनीं वरचेवर नऊ रसांचा उल्लेख केलेला आहे. शांत रसाबद्दल बोलतांना "कीजे आठा रसांची वोवाळणी" असा तो आपण वर्णन केल्याचें ते सांगतात. तेव्हां भक्ति हा दहावा रस ते समजत नव्हते हें स्पष्ट आहे. हा रस निराळा समजावा असा आजकाल कित्येकांचा हट्ट आहे. हा हट्ट सर्व संस्कृत साहित्यपंडित आणि ज्ञानदेव, रघुनाथ पंडित इत्यादिकांच्या अभिप्राया-विरुद्ध आहे. भक्ति हा शृंगाराचा प्रकार आहे. पण शृंगार रसाकडे पाहून नाकें मुरडणाऱ्यांना भक्ति म्हणजे शृंगार असें म्हणणें आवडत नाहीं. शृंगार रसाला नाकें मुरडणाऱ्यांना काव्य समजत नाहीं हें उघड आहे. शृंगार म्हणजे चावटपणा, फाजीलपणा, बीभत्सता किंवा अश्लीलता नव्हे ही गोष्ट काव्यशास्त्रज्ञांना पूर्ण संमत आहे. भक्ति निराळा रस समजत नसाल तर निदान त्याला शांत रसांत घाला असा कित्येकांचा हेका आहे. शांत रसाचा स्थायी भाव निर्वेद ( वीट येणें, कंटाळा येणें, संसार सोडण्याची त्यामुळें इच्छा होणें ) हा आहे. भक्तीचा स्थायी भाव अनुराग, भक्ति, प्रेम आहे. म्हणजे भक्ति व शृंगार यांचा स्थायी भाव खरोखर एकच आहे. भक्ति ही नेहमीं साकार देवाची किंवा मनुष्याची किंवा मूर्तीची ( म्हणजे निष्प्राण तरी साकार देवाची ) असते. त्या देवाबद्दल किंवा गुरूबद्दल वल्लभावल्लभ यांच्यासारखीच विलक्षण आतुरता भक्ताला असते. शृंगार रसाचा विप्रलंभ शृंगार म्हणून महत्वाचा प्रकार आहे त्यांत नायक नायिका दूर असतात; तेव्हां शृंगाराचा विशेष आकुंचित अर्थ करणें योग्य नाहीं. नामदेव व तुकाराम यांच्या कित्येक अभंगावरून "भक्तीं"त शृंगारा-सारखाच अनुरागात्मक स्थायी भाव आहे हें स्पष्ट होतें. या प्रश्नासंबंधीं अधिक विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे. ज्ञानेश्वरींत नायक नायिका यांच्यावर उभारलेला शृंगार नाहीं हें उघड आहे. पण " भक्ति " या नांवाखालीं दिसणारा शृंगार उत्तम रंगविलेला आहे; व तो वाचला म्हणजे भक्ति हा शृंगाराचा प्रकार आहे, शांत रसाचा नाहीं, हें आपोआप लक्ष्यांत येते. तेराव्या अध्यायांतील आचार्योपास्ति या ज्ञानगुणावरील टीका हें आम्ही म्हणतों याचें अगदीं

**ठळक उदाहरण आहे. पुढील ओव्या भक्तियुक्त शृंगार रसाचा उत्कृष्ट परिपोष करतात. उपमा दृष्टांतही शृंगार रसांत देतात तसेच आहेत.**

तरी सकळ जळसमृद्धी । घेऊनि गंगा निघाली उदधी ।
कीं श्रुति हे महापदीं । पैठी जाहाली ॥ ३७२
नाना वेंटाळूनि जीवितें । गुणागुण उखितें ।
प्राणनाथा उचितें । दिधलें प्रिया ॥ ३७३
तैसें सबाह्य आपुलें । जेणें गुरुकुळीं वोपिलें ।
आपणपे केलें । भक्तीचें घर ॥ ३७४
गुरुगृह जये देशीं । तो देशुचि वसे मानसीं ।
विरहिणी कां जैसी । वल्लभातें ॥ ३७५
तियेकडोनि येतसे वारा । देखोनि धांवे सामोरा ।
आड पडे म्हणे घरा । बीजें कीजो ॥ ३७६
साचा प्रेमाचिया भुली । तया दिशेसीचि आवडे बोली ।
जीव थानापति करूनि घाली । गुरुगृहीं जो ॥ ३७७
परि गुरूआज्ञा धरिलें । देह गांवीं असें एकलें ।
वांसरूवां लाविलें । दावें जैसें ॥ ३७८
म्हणे कैं हे बिरडे फिटेल । कै तो स्वामी भेटेल ।
युगाहूनि वडिल । निमिष मानी ॥ ३७९
ऐसेया गुरुग्रामींचें आलें । कां स्वयें गुरुंनींचि धाडिलें ।
तरी गतायुष्या जोडलें । आयुष्य जैसें ॥ ३८०

**शेक्सपीयरच्या रोमिओज्युलियट या अत्यंत मधुर अशा नाटकांतील नायक-नायिकांचा परस्पर अनुराग किंवा बाणभट्टाच्या रमणीय कादंबरींतील चंद्रापीड कादंबरी यांचा अनुराग असाच वर्णिलेला नाहीं काय? भक्ति आणि वात्सल्य या दोहोंचाही समावेश शृंगार रसांत होतो, शांत रसांत होणें शक्यच नाहीं. याच गुरुभक्तिवर्णनांतील पुढील ओव्या हाच अभिप्राय यासंबंधीं निर्णायक असल्याबद्दल शंका म्हणून ठेवीत नाहींत. या सर्व ओव्या शृंगार रस उत्कृष्टपणें वर्णन करतात.**

आणि अभ्यंतरीलियेकडे । प्रेमाचेनि पवाडें ।
श्रीगुरूचें रूपडें । उपासी ध्यानीं ॥ ३८५

हृदय शुद्धीचिया आवारीं । आराध्यु तो निश्चल ध्रुव करी ।
मग सर्व भावेंसीं परिवारीं । आपण होय ॥ ३८६
कां चैतन्याचिया पोवळी–। माजीं आनंदाचिया राउळीं ।
श्रीगुरुलिंगा ढाळी । ध्यानामृत ॥ ३८७
उदैजतां बोधार्का । बुद्धीची डाळ सात्विका ।
भरोनिया त्र्यंबका । लाखोली वाहे ॥ ३८८
काळशुद्धी त्रिकाळीं । जीवदशा धूप जाळी ।
ज्ञानदीपें वोंवाळीं । निरंतर ॥ ३८९
सामरस्याची रससोय । अखंड अर्पितु जाय ।
आपण भराडा होय । गुरु तो लिंग ॥ ३९०
ना तरी जीवाचिये सेजे । गुरु कांतु करूनि भुंजे ।
ऐसी प्रेमाचेनि भोजें । बुद्धि वाहे ॥ ३९१
कोणे एके अवसरीं । अनुरागु भरे अंतरीं ।
कीं तया नाम करीं । क्षीराब्धि ॥ ३९२
तेथ ध्येयध्यान बहु सुख । तेंचि शेषतुळिका निर्दोख ।
वरी जळशयन देख । भावी गुरु ॥ ३९३
मग वोळगती पाय । ते लक्ष्मी आपण होय ।
गरुड होऊनि उभा राहे । आपणची ॥ ३९४
एकाधिये वेळे । गुरु माय करी भावबळें ।
मग स्तन्यसुखें लोळे । अंकावरी ॥ ३९६
गुरुकृपास्नेहसलिलीं । आपण होय मासोळी ।
कोणे एके वेळीं । हेंचि भावी ॥ ३९८

**याच्यापुढें बाह्य सेवेचें वर्णन केलें आहे. त्यांतील नमुन्यादाखल दोन तीन ओंव्या येथें देतों.**

गुरुस्नेहाचिये वृष्टी । मी पृथ्वी होईन तळवटीं ।
ऐसिया मनोरथांचिया सृष्टी । अनंता रची ॥ ४१४
निर्गमागमीं दातारें । जे वोलांडिजती उंबरे ।
ते मी होईन आणि द्वारें । द्वारपाळु ॥ ४१६

होईन गुरूचें आसन । अळंकार परिधान ।
चंदनादि होईन । उपचार ते ॥ ४२१
ताट मी काढीन । सेज मी झाडीन ।
चरणसंवाहन । मीचि करीन ॥ ४२४
श्री गुरूचे डोळे । अवलोकनें स्नेहाळें ।
पाहती तिये सकळे । होईन रूपें ॥ ४२८
इये शरीरींची माती । मेळवीन तिये क्षिति ।
जेथ श्रीचरण उभे ठाती । श्रीगुरूचे ॥ ४३२

**वल्लभवल्लभाप्रेमाच्या अतिरेकांत हाच प्रकार होतो; गुरुशिष्य, (साकार) देवभक्त यांच्या संबधांत हें रसयुक्त वर्णन आलें म्हणजे त्याला भक्ति हें निराळें नांव द्यावयाचें; पण दोहोंतही रस तोच. अठराव्या अध्यायांतील शेवटचा प्रसंग पहा:—**

ऐसे सर्वरूपरूपसे । सर्वदृष्टिडोळसें ।
सर्वदेशनिवासें । बोलिलें श्रीकृष्णें ॥ १४१७
मग सांवळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु ।
आलिंगिला स्वशरणु । भक्तराजु तो ॥ १४१८
न पवतां जयाते । काखे सूनि बुद्धि ते ।
बोलणें मागौते । वोसरलें ॥ १४१९
ऐसे जें कांहीं एक । बोला बुद्धीसीही अटक ।
ते द्यावया मिख । खेवाचें केले ॥ १४२०
हृदया हृदय एक जहालें । ये हृदयींचें तें हृदयीं घातलें ।
द्वैत न मोडितां केले । आपणांऐसें अर्जुना ॥ १४२१
दीपें दीप लाविला । तैसा परिष्वंगु तो झाला ।
द्वैत न मोडितां केला । आपणपें पार्थ ॥ १४२२
तेव्हां सुखाचा मग तया । पूर आला जो धनंजया ।
तेथ वाडु तरी बुडोनिया । गेला देवो ॥ १४२३
तैसें तया दोघांचें मिळणें । दोघां नावरे जाणावें कवणें ।
किंबहुना नारायणें । विश्व कोंदलें ॥ १४२५

**ज्या प्रेमसुखांत एवढा वाडु, मोठा, देव बुडून गेला त्या ठिकाणीं वर्णनांत**

निर्वेद या भावावर उभारलेला रस नाहीं; असो. अशी प्रेमळपणामुळें रसाळ झालेलीं वर्णनें ज्ञानेश्वरींत आहेत; तीं प्रसंगानुरोधानें आलेलीं आहेत. पण ज्ञानदेव जर एखादें महाकाव्य लिहिते तर उज्वल आणि विशुद्ध शृंगार रसाचा उठाव त्यांनीं फार सुंदर केला असता एवढें वाटल्यावांचून रहात नाहीं.

३ वीर रसाचा स्थायी भाव उत्साह हा आहे व जेथें जेथें या स्थायी भावाचा उत्कृष्ट परिपोष झाला असेल तेथें हा रस निर्माण होतो. विशेषेंकरून युद्धादिकांत या रसाचा आविर्भाव होण्यास संधि मिळते. भगवद्गीता ही युद्धप्रसंगीं श्रीकृष्णाच्या मुखांतून स्रवली, आणि सुरवातीला अर्जुनानें धनुष्य-बाणाचा त्याग केला तेव्हां त्याच्या अंतःकरणांत उत्साह उत्पन्न होण्यासाठी भगवान् श्रीकृष्णानें प्रयत्न केला; व नंतर तत्त्वज्ञानाचा उपदेश केला. या उत्साह उत्पन्न करण्याच्या अनुषंगानें वीर रसाचा आविष्कार करण्याची संधि कवीला मिळाली व तिचा उपयोग ज्ञानदेवांनीं उत्तम केलेला आहे.

पहिल्या अध्यायांत दुर्योधन आपल्या सैन्याचें वर्णन करीत आहे. त्यांत त्याच्या अंतःकरणाची प्रसन्नता व उत्साहातिरेक दिसून येतात. म्हणून वीर रसाचा उद्भव तेथेंही उत्तम झाला आहे.

आतां आमुच्या दळीं नायक । जे रूढवीर सैनिक ।
ते प्रसंगीं आइक । सांगिजती ॥ १०३
हा भीष्म गंगानंदनु । जो प्रतापें तेजस्वी भानु ।
रिपुगजपंचाननु । कर्ण वीरु ॥ १०५
या एकेकाचेनि मनोव्यापारें । हे विश्व होय संहरे ।
हा कृपाचार्यु न पुरे । एकलाची ? ॥ १०६
एथ विकर्ण वीरु आहे । हा अश्वत्थामा पैल पाहें ।
याचा आडदरु सदा वाहे । कृतांतु मनीं ॥ १०७
जे शस्त्रविद्यापारंगत । मंत्रावतार मूर्त ।
हो कां जें अस्त्रजात । एथूनि रूढ ॥ १०९
हे अप्रतिमल्ल जगीं । पुरता प्रतापु अंगीं ।
परि सर्व प्राणें मजचिलागीं । आराइले ॥ ११०
पतिव्रतेचें हृदय जैसें । पतीवांचुनी न स्पर्शे ।
मी सर्वस्व यां तैसें । सुभटांसी ॥ १११

आमचिया काजाचेनि पाडें । देखती आपुलें जीवित थोकडें ।
ऐसे निरवधि चोखडे । स्वामिभक्त ॥ ११२
झुंजती कुळकणी जाणती । कळे कीर्तीसी जिती ।
हे बहु असो क्षात्रवृत्ति । एथोनिया ॥ ११३
वरी क्षत्रियांमाजीं श्रेष्ठु । जो जगजेठी जगीं सुभटु ।
तया दळवैपणाचा पाटु । भीष्मासि पैं ॥ ११५
आतां याचेनि बळें गवसलें । हें दुर्ग जैसें पन्नासिलें ।
येणें पाडें थेकुले । लोकत्रय ॥ ११६
आधींचि समुद्र पाहीं । तेथ दुवाडपण कवणा नाहीं ।
मग वडवानळु तैसेयाही । विरजा जैसा ॥ ११७
ना तरी प्रलयवन्हि महावातु । या दोघां जैसा सांघातु ।
तैसा हा गंगासुतु । सेनापति ॥ ११८

**आतां दुसऱ्या अध्यायांत श्रीकृष्ण प्रथम अर्जुनाच्या ठिकाणीं उत्साह उत्पन्न होण्यासाठीं कसें बोलतात पहाः—**

म्हणे अर्जुना आधीं पाहीं । हें उचित काय इयें ठायीं ।
तूं कवण, हें कायी । करीत आहासी ॥ ६
तूं अनुचिता चित्त नेदिसी । धीरु कंहीं न संडिसी ।
तुझिया नामें अपयशीं । दिशा लंघिजे ॥ ८
तूं शूरवृत्तीचा ठावो । क्षत्रियांमाजी रावो ।
तुझिया लाठेपणाचा आवो । तिहीं लोकीं ॥ ९
तुवां संग्रामीं हरु जिंकिला । निवातकवचांचा ठावो फेडिला ।
पवाडा तुवां केला । गंधर्वांसी ॥ १०
पाहता तुझेनि पाडें । दिसे त्रैलोक्यही थोकडे ।
ऐसे पुरुषत्व चोखडे । पार्था तुझे ॥ ११
तो तूं कीं आजि येथें । सांडूनिया वीरवृत्तीतें ।
अधोमुख रुदनातें । करीतु आहांसी ॥ १२
विचारीं तूं अर्जुनु । कीं कारुण्यें कीजसी दीनु ।
सांग पां अंधकारें भानु । ग्रासिला आथी ॥ १३

ना तरी पवनु मेघासी बिहे । कीं अमृतासि मरण आहे ।
पाहें पां इंधनचि गिळोनि जाये । पावकातें ॥ १४
कीं लवणेंचि जळ विरे । संसर्गे काळकूट मरे ।
सांग पां महाफणी दर्दुरें । गिळिजे कायी ॥ १५
सिंहासि झोंबे कोल्हा । ऐसा अपाडु आथि कें जाहला ।
परी तो त्वां साच केला । आजि येथ ॥ १६
सांडी हें मूर्खपण । उठी घे धनुष्यबाण ।
संग्रामीं हें कवण । कारुण्य तुझें ॥ १८
हें असतिये कीर्तीसी नाशु । आणि पारत्रिकासी अपभ्रंशु ।
म्हणे जगन्निवासु । अर्जुनातें ॥ २०

**दुसऱ्या अध्यायांतील दुसऱ्या श्लोकांवर ही उभारणी ज्ञानदेवांनीं केलेली आहे. तेव्हां जातां जातां त्यांच्या स्वतंत्र रचनेचाही हा नमुना म्हणून ध्यानांत ठेवावा. ज्ञानेश्वरी हें गीतेचें भाषांतर नव्हे; हा गीताशास्त्रावर रचलेला स्वतंत्र ग्रंथ आहे हें लक्ष्यांत ठेवणें आवश्यक आहे. येथें वीर रसाचा परिपोष करण्यासाठीं दिलेल्या उपमा वाचून ज्ञानदेवांच्या अलंकारवैपुल्याचा चमत्कार वाटतो. असो. पुढें श्रीकृष्ण म्हणतात:—**

म्हणोनी तूं पाहीं । क्षत्रियां आणीक कांहीं ।
संग्रामावांचूनि नाहीं । उचित जाणें ॥ १८९
निष्कपटा होवावें । उसिणा घाई झुंजावे ।
हे असो काय सांगावें । प्रत्यक्षावरी ॥ १९०
अर्जुना झुंज देखें आतांचें । हें हो कां जे दैव तुमचे ।
कीं निधान सकळ धर्माचें । प्रकटलें असे ॥ १९१
हा संग्रामु काय म्हणिपे । कीं स्वर्गचि येणें रूपें ।
मूर्त कां प्रतापें । उदो केला ॥ १९२
ना तरी गुणाचेनि पतिकरें । आर्तीचेनि पडिभरें ।
हे कीर्तिच स्वयंवरें । आली तुज ॥ १९३
क्षत्रियें बहुत पुण्य कीजे । तै झुंज ऐसें लाहिजे ।
जैसें मार्गे जातां आडळिजे । चिंतामणि ॥ १९४

ना तरी जांभया पसरे मुख । तेथ अवचट पडे पीयूख ।
तैसा संग्राम हा देख । पातला असे ॥ १९५
पूर्वजाचे जोडलें । आपणचि होय धाडिलें ।
जरी आजि शस्त्र सांडिलें । रणीं इयें ॥ १९७
असती कीर्ति जाइल । जगचि अभिशापु देईल ।
आणि गिवसित पावतील । महादोष ॥ १९८
तूं निर्मत्सरु सदयता । येथूनि निघसील कीर माघौता ।
परी ते गति समस्तां । न मनेल ययां ॥ २०३
हे चहूंकडूनि वेढतील । बाणवरी घेतील ।
तेथ पार्था न सुटिजेल । कृपाळुपणें ॥ २०४
ते म्हणती गेला रे गेला । अर्जुन आम्हां बिहाला ।
हा सांगे, बोलु उरला । निका कायी ॥ २०८
लोक सायासे करुनि बहुतें । कां वेचिती आपुलीं जीवितें ।
परी वाढविती कीर्तीतें । धनुर्धरा ॥ २०९
ते तुज अनायासें । अनकळित जोडिली असे ।
हें अद्वितीय जैसें । गगन आहे ॥ २१०
तैसी कीर्ति निस्सीम । तुझ्या ठायीं निरुपम ।
तुझे गुण उत्तम । तिहीं लोकीं ॥ २११
दिगंतींचे भूपति । भाट होउनी वाखाणिती ।
ते ऐकिलिया दचकती । कृतांतादिक ॥ २१२
ऐसी महिमा घनवट । गंगा तैसी चोखट ।
जया देखीं जगीं सुभट । जाणते झाले ॥ २१३
तें पौरुष तुझें अद्भुत । आइकोनियां हे समस्त ।
जाहले आथि विरक्त । जीवितेंसी ॥ २१४
जैसा सिंहाचिया हांका । युगांतु होय मदमुखा ।
तैसा कौरवां अशेखां । धाकु तुझा ॥ २१५
जैसे पर्वत वज्रातें । ना तरी सर्प गरुडातें ।
तैसे अर्जुना हे तूतें । मानिती सदा ॥ २१६

तें अगाधपण जाईल । मग हीणावो अंगा येईल ।
जरी मागुता निघसील । न झुंजतचि ॥ २१७

**याही उताऱ्यांत उचित उपमांचा उपयोग करून वीर रस विशेष परिपुष्ट केलेला आहे. "उपमा कालिदासस्य" ही म्हण ज्ञानदेवापूर्वी रूढ होती म्हणूनच क्षम्य आहे. आतां याच्यापुढें वीर रसाचें थोडेसें निराळ्या प्रकारचें वर्णन ज्ञानेश्वरींत मिळण्यासारखें आहे तिकडे पाहूं. मनोजय करणारे महात्मे हे युद्ध जिंकणाऱ्या वीरांपेक्षांही महावीर होत. त्यांचे वर्णन युद्धाच्या रूपकात्मक परिभाषेंत नवव्या अध्यायांत चौदाव्या श्लोकावरच्या व्याख्यानांत मिळतें.**

मग आणिक ते अर्जुना । साविया बहुवा जतना ।
पंचप्राण मना । पाढाउ घेउनी ॥ २१२
बाहेरी यमनियमांची कांटी लाविली ।
आंतु वज्रासनाची पौळी पन्नासिली ।
वरी प्राणायामाचीं मांडलीं । वाहातीं यंत्रें ॥ २१३
तेथ उल्हाटशक्तीचेनि उजिवडें । मनपवनाचेनि सुरवाडें ।
सतरावियेचें पाणियाडें । बळियाविलें ॥ २१४
तेथ प्रत्याहारें ख्याति केली । विकारांची संपिली बोहिलीं ।
इंद्रियें बांधोनि आणिलीं । हृदयांआंतु ॥ २१५
तंव धारणावारू दाटिन्नले । महाभूतांतें एकवटिलें ।
मग चतुरंग सैन्य निवटिलें । संकल्पाचें ॥ २१६
तयावरी जैत रे जैत । म्हणोनि ध्यानाचें निशाण वाजत ।
दिसे तन्मयाचें झळकत । एकछत्र ॥ २१७
पाठीं समाधिश्रियेचा अशेखा । आत्मानुभवराज्यसुखा ।
पट्टाभिषेको देखा । समरसें जाहला ॥ २१८

**यांतील रूपकांत योगशास्त्रांतील परिभाषेचा उपयोग कवीनें करून कांहींसा दुर्बोधपणा आणलेला आहे. तथापि गीता वाचणाऱ्याला योगशास्त्राची परिभाषा माहीत असावी हें गृहीत धरलेलें आहे हें येथें विसरतां कामा नये. अशाच प्रकारचें वीररसात्मक वर्णन बाराव्या अध्यायांत आहे; तेंही फार आल्हाददायक आहे म्हणून येथें देतों. चौथ्या श्लोकावर हें उभारलेलें आहे.**

आणि येर तेही पांडवा । जे आरूढोनि सोहंभावा ।
झोंबती निरवयवा । अक्षरासी ॥ ४०
मनाची नखी न लगे । जेथ बुद्धीची दृष्टि न रिगे ।
इंद्रियां कीर जोगे । काइ होईल ॥ ४१
परी ध्यानाही कुवाडें । म्हणोनि एके ठायीं न संपडे ।
व्यक्तीसी माजिवडें । कवणेंही नोहे ॥ ४२
जया सर्वत्र सर्वपणें । सर्वांही काळीं असणें ।
जें पावूनि चिंतवणें । हिपुटी जाहलें ॥ ४३
जें होय ना नोहे । जें नाहीं ना आहे ।
ऐसें म्हणोनि उपायें । उपजतीचना ॥ ४४
जें चळे ना ढळे । सरे ना मैळे ।
तें आपुलेनि बळे । आंगविलें जिहीं ॥ ४५
पै वैराग्य महापावकें । जाळूनि विषयांचीं कटकें ।
अधपलीं तवकें । इंद्रियें धरिलीं ॥ ४६
मग संयमाची धाटी । सूनि मुरडिलीं उफराटीं ।
इंद्रियें कोंडिलीं कपाटीं । हृदयाचिया ॥ ४७
अपानाचिया कवाडा । लावोनि आसनमुद्रा सुहाडा ।
मूळबंधाचा हुडा । पन्नासिला ॥ ४८
आशेचे लाग तोडिले । अधैर्याचे कडे झाडिले ।
निद्रेचें शोधिलें । काळवखें ॥ ४९
वज्राग्नीचिया ज्वाळीं । करूनि सप्तधातूंची होळी ।
व्याधीच्या सिसाळीं । पूजिलीं यंत्रें ॥ ५०
मग कुंडलिनियेचा टेंभा । आधारीं केला उभा ।
तया चोजवले प्रभा । निमथावरी ॥ ५१
नवद्वारांचिया चौचकीं । बाणूनि संयतीची आडवंकी ।
उघडिली खिडकी । ककारांतींची ॥ ५२
प्राणशक्तिचामुंडे । प्रहारूनि संकल्प मेंढे ।
मनोमहिषाचेनि मुंडें । दिधला बळी ॥ ५३

चंद्रसूर्या बुझावणी । करूनि अनाहताची सुडावणी ।
सतरावियेचें पाणी । जितिले वेगीं ॥ ५४
ऐसे जे समबुद्धि । गिळावया सोहंसिद्धि ।
आंगवितति निरवधि । योगदुर्गे ॥ ५७
आपुलिया साटोवाटी । शून्य घेती उठाउठी ।
तेही मातेंचि किरीटी । पावती गा ॥ ५८

**या योगवीरांच्या वर्णनांतही योगशास्त्राची परिभाषा आलेली आहे. योगवीराचें हें वर्णन सामान्य कवींच्या काव्यांत मिळणार नाहीं; त्यासाठीं ज्ञानदेवासारख्याच महाकवीकडे गेलें पाहिजे. बाराव्या अध्यायांत ज्ञानी भक्तांचीं जीं वर्णनें आहेत त्यांत वीर रसाचा स्थायी भाव उचंबळलेला आहे. त्या ज्ञानवीरांना उद्देशून श्रीकृष्ण म्हणतातः—**

म्हणोनि गा नमस्कारूं । तयातें आम्ही माथां मुकुट करूं ।
तयाची टांच धरूं । हृदयीं आम्ही ॥ २२१
तयांचियां गुणाची लेणीं । लेववूं आपुलिये वाणी ।
तयाचि कीर्ति श्रवणीं । आम्ही लेऊं ॥ २२२
तो पाहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसि मज डोळे ।
हातिंचेनि लीलाकमळें । पुजूं तयाते ॥ २२३
दोंवरी दोनी । भुजा आलों घेवोनि ।
आलिंगावयालागोनि । तयाचें आंग ॥ २२४
तया संगाचेनि सुरवाडें । मज विदेहा देह धरणें घडे ।
किंबहुना आवडे । निरुपमु ॥ २२५
तेणेंसी आम्हां मैत्र । एथ कायसें विचित्र ।
परि तयाचें चरित्र । ऐकिती जे ॥ २२६
तेही प्राणापरौते । आवडती हे निरुतें ।
जे भक्तचरित्रातें । प्रशंसिती ॥ २२७

**या सुंदर रसरसीत ओंव्यांत कोणता रस प्रतीत होतो हें वाचक जाणतीलच. वीर रसाच्या पार्श्वभूमीवरच शृंगार रसाचा उठाव उत्तम होत असतो.**

**४ करुण रसाचे प्रसंग ज्ञानेश्वरींत बहुतेक नसावे यांत आश्चर्य नाहीं. तरीसुद्धां पहिल्या अध्यायांत अर्जुनाचें अंतःकरण कृपेनें, दयेनें भरून गेलें हें**

**सांगतांना करुण रसाचा उद्भव झालेला आहे व अकराव्या अध्यायांत त्या रसाचें थोडेसें दर्शन होतें. पहिल्या अध्यायांत समोर सर्व आप्तजन पाहून अर्जुनाचें अंतःकरण कळवळलें व या कळवळयांतूनच करुण रसाचा उद्भव होत असतो. पुढील वर्णन पहाः—**

तंव तेथ पार्थ सकळ । पितृपितामह केवळ ।
गुरु बंधु मातुळ । देखता जाहला ॥ १–१८०
इष्ट मित्र आपुले । कुमरजन देखिले ।
स्यालक असती आले । तयांमाजीं ॥ १८१
सुहृज्जन सासरे । आणीकही सखे सोयरे ।
कुमर पौत्र धनुर्धरें । देखिलें तेथ ॥ १८२
ऐसें गोत्रचि दोहीं दळीं । उदित जाले असे कळी ।
हे अर्जुनें तिये वेळीं । अवलोकिलें ॥ १८४
तेथ मनीं गजबज जाहली । आणि आपैसी कृपा आली ।
तेणें अपमानें निघाली । वीरवृत्ति ॥ १८५
तैसें अर्जुना तेथ जाहलें । असतें पुरुषत्व गेलें ।
जें अंतःकरण दिधलें । कारुण्यासी ॥ १८९

**आणि करुणावृत्तीचा जोर असा आहे कीं**

जेणें संग्रामीं हरु जिंतिला । निवातकवचांचा ठावो फेडिला ।
तो अर्जुन मोहें कवळिला । क्षणामाजीं ॥ २००

**आणि मग अर्जुन कृष्णाला म्हणतो, "नसिजे येथ," येथून आपण जाऊं या; मला हें पाहवत नाहीं, मला हा विजय नको.**

तया विजयवृत्ति काहीं । मज सर्वथा काज नाहीं ।
येथ राज्य तरी कायी । हें पाहूनियां ॥ २१०
या सकळातें वधावें । मग जे भोग भोगावे ।
ते जळोत आघवे । पार्थु म्हणे ॥ २११
तेणें सुखेंविण होईल । तें भलतैसें साहिजेल ।
वरी जीवितही वेंचिजेल । यांचिलागीं ॥ २१२
परि यांसी घातु कीजे । मग आपण राज्यसुख भोगिजे ।
हे स्वप्नींही मन माझें । करूं न शके ॥ २१३

तरी आम्ही कां जन्मावें । कवणालागीं जियावें ।
जरी वडिलां यां चितावें । विरुद्ध मनें ॥ २१४
पुत्रातें इच्छी कुळ । तयाचें कायी हेंचि फळ ।
जें निर्दळिजे केवळ । गोत्र आपुलें ॥ २१६

अशा प्रकारें त्या गोत्रजांना समोर पाहून कारुण्यभावानें अर्जुनाच्या अंतःकरणांत खळबळ उडाली; व त्याचें वर्णन विषयाच्या अनुषंगानें ज्ञानेश्वरींत आलेलें आहे. अकराव्या अध्यायांत विश्वरूपाच्या प्रचंड मुखांत भीष्मद्रोणासारखे वीर शिरतांना पाहूनही अर्जुन शोकविव्हळ झाला. जरी या प्रकरणांत रस भयानक आहे तरी करुणाचा उद्रेकही तेथें मधून मधून पहावयास मिळतो. अर्जुन दुःखित होऊन शोक करीत करीत म्हणतोः—

नोहेति हे कौरवकुळींचे वीर । आंधळिया धृतराष्ट्राचे कुमर ।
हे गेले गेले सहपरिवार । तुझिया वदनीं ॥ ३९२
हां गा भीष्माऐसा कवणु । सत्यशौर्यनिपुणु ।
तोही आणि ब्राह्मण द्रोणु । ग्रासिलासि कटकटा ॥ ३९८
अहा सहस्रकराचा कुमरु । एथ गेला गेला कर्णवीरु ।
आणि आमचिया आघवयांचा केरु । फेडिला देखें ॥ ३९९

अशा प्रकारें जेथें करुण रसाचा उद्रेक आहे अशीं कित्येक स्थळें ज्ञानेश्वरींत सांपडतात; पण रसाचा आविर्भाव होण्यास त्याचा स्थायी भाव वर्णनांत प्रमुख असला पाहिजे. तसा करुण रसाचा स्थायी भाव जो शोक तो प्रमुख असण्याची ज्ञानेश्वरींत शक्यता नाहीं. म्हणून या रसाचीं भरदार उदाहरणें तेथें मिळत नाहींत. तथापि तशा वर्णनाचा प्रसंग आला असतां तर ज्ञानदेवानें तो रसही उत्तम सिद्ध करून दाखविला असता असें वर दिलेल्या एक दोन उदाहरणां-वरून वाटल्याशिवाय रहात नाहीं.

ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथांत हास्य रसाच्या प्रकर्षाला फारसा अवकाश असण्याचा संभव नाहीं. पण हास्य रसाच्या मुळाशीं असणारी विनोदबुद्धि ज्ञानदेवांत विपुल होती आणि बऱ्याच ठिकाणीं स्मित हास्य रसिकाच्या ठिकाणीं उत्पन्न व्हावें अशीं वर्णनें किंवा अलंकार त्यांनीं साधलेलें आहे. ज्ञानदेवांची वृत्ति अत्यंत प्रसन्न होती आणि प्रसन्न वृत्तींतून उद्भवणारा विनोद हाच अत्युत्कृष्ट

**विनोद होय. उदाहरण म्हणून मृत्युलोकाचें वर्णन ज्ञानेश्वरींत नवव्या अध्यायांत आहे तिकडे आपण दृष्टिक्षेप करूं.**

अगा विषाचे कांदे वाटोनी । जो रसु घेइजे पिळुनी ।
तया नाम अमृत ठेवूनी । जैसें अमर होणें ॥ ४९८

तेवि विषयांचे जें सुख । ते केवळ परम दुःख ।
परि काइ कीजे मूर्ख । न सेवितां न सरे ॥ ४९९

कीं शीस खांडोनि आपुलें । पायींच्या खतीं बांधिलें ।
तैसें मृत्युलोकींचें भले । आहे आघवें ॥ ५००

म्हणोनी मृत्युलोकीं सुखाची काहाणी । ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं ।
कैची सुखनिद्रा अंथरुणीं । इंगळांच्या ॥ ५०१

जियें लोकींचा चंद्रु क्षयरोगी । जेथ उदयो होय अस्तालागीं ।
दुःख लेऊनि सुखाची आंगीं । सळित जगातें ॥ ५०२

जेथ मंगळाचिया अंकुरीं । सवेंचि अमंगळाची पडे पोहरी ।
मृत्यु उदराचिया परिवरीं । गर्भु गिंवसी ॥ ५०३

जें नाहीं तयातें चिंतवी । तंव तेंचि नेइजे गंधर्वी ।
गेलियाची कवणे गांवीं । शुद्धि न लगे ॥ ५०४

अगा गिंवसतां आघवां वाटीं । परतलें पाउलचि नाहीं किरीटी ।
सैंध निमालियाचिया गोठी । तिथें पुराणें जेथींची ॥ ५०५

जेथिंचिये अनित्यतेची थोरी । करितया ब्रह्मयाचे आयुष्यवेरी ।
कैसें नाहीं होणें अवधारीं । निपटूनियां ॥ ५०६

ऐसी लोकींची जिये नांदणूक । तेथ जन्मले आथी जे लोक ।
तयांचिये निश्चितीचें कौतुक । दिसत असे ॥ ५०७

पै दृष्टादृष्टाचिये जोडी—। लागीं भांडवल न सुटे कवडी ।
जेथ सर्वस्वें हानि तेथ कोडी । वेंचिती गा ॥ ५०८

जो बहुवे विषयविलासें गुंफे । तो म्हणती उवाई पडला सापें ।
जो अभिलाषभारें दडपे । तयातें सज्ञान म्हणती ॥ ५०९

जयाचें आयुष्य धाकुटें होय । बळ प्रज्ञा जिरौनि जाय ।
तयाचे नमस्कारिती पाय । वडिल म्हणूनी ॥ ५१०

**तेराव्या अध्यायांतील अज्ञानी ( ज्ञानदेवांनीं हा अत्यंत सौम्य शब्द वापरलेला आहे ) माणसांच्या वर्णनांतील कांहीं ओव्या पहा:—**

तरी संभावने जिये । जो मानाची वाट पाहे ।
सत्कारें होये । तोषु जया ॥ ६५७
आणि स्वधर्माची मांगळी । बांधे वाचेच्या पिंपळीं ।
उभिला जैसा देऊळीं । जाणोनि कुंचा ॥ ६५९
घाली विद्येचा पसारा । मुथे सुकृताचा डांगोरा ।
करी तेतुलें मोहरा । स्फीतीचिया ॥ ६६०
कौतुकें जें जें जल्पे । तें साबळाहूनि तीख रुपे ।
विषाहूनि संकल्पे । मारकु जो ॥ ६६३
आणि फुंके भाता फुगे । रेचिलिया सवेंचि उफगे ।
तैसा संयोगवियोगें । चढे ओहटे ॥ ६६५
निंदा मोटकी आइके । आणि कपाळ धरोनि ठाके ।
थेवें विरे वारेनि शोखे । चिखलु जैसा ॥ ६६७
तरी आंगें कर्मे ढिला । जो मनें विकल्पे भरला ।
अडवींचा अवगळला । कुहा जैसा ॥ ६७८
तया तोंडीं कांटिवडे । आंतु नुसधीं हाडें ।
अशुचि तेणें पाडें । सबाह्य जो ॥ ६७९
जैसें पोटालागीं सुणें । उघडें झांकलें न म्हणे ।
तैसें आपलें परावें नेणें । द्रव्यालागीं ॥ ६८०
इया ग्रामसिंहाचिया ठायीं । जैसा मिळणी ठावो अठावो नाहीं ।
तैसा स्त्रीविषयीं कांहीं । विचारीना ॥ ६८१

**मायानदींत पडलेल्यांचें व त्यांतून निघण्यासाठीं धडपडणाऱ्यांचें वर्णन सातव्या अध्यायांत केलेलें आहे. त्यांतील कांहीं भागांतही मार्मिक विनोद दिसतो.**

येथ एक नवलावो । जो जो कीजे तरणोपावो ।
तो तो अपावो । होय तें ऐक ॥ ८२
एक स्वयंबुद्धीच्या बाहीं । रिगाले तयांची शुद्धीचि नाहीं ।
एक जाणिवेचे डोहीं । गर्वेचि गिळिले ॥ ८३
एकीं वेदत्रयांचिया सांगडीं । घेतल्या अहंभावाचिया धोंडी ।

ते मदमीनाच्या तोंडीं । सगळेचि गेले ॥ ८४
एकीं वयसेचे जाड बांधिलें । मग मन्मथाचिये कासे लागले ।
ते विषयमगरीं सांडिलें । चघळूनिया ॥ ८५
एकीं यजनक्रियेची पेटी । बांधोनि घातली पोटी ।
ते स्वर्गसुखाच्या कपाटीं । शिरकोनि ठेले ॥ ८९
एकीं मोक्षीं लागावयाचिया आशा । केला कर्मबाह्यांचा भरंवसा ।
परी ते पडिले वळसां । विधिनिषेधांच्या ॥ ९०
म्हणवूनि गा पांडुसुता । जैसी सकामा न जिणवेचि वनिता ।
तेवीं मायामय हे सरिता । न तरवे जीवां ॥ ९६

**याशिवाय लहान लहान वाक्यांतून कवीचा सूक्ष्म आणि मार्मिक विनोद दिसून येतो. वर दिलेले उतारे या बाबतींत ज्ञानदेवाच्या शक्तीची साक्ष देतात.**

**भयानक रसाचा स्थायी भाव भीति हा आहे. त्याचें एक सुंदर उदाहरण ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायांत मिळतें.**

तेणें महाघोषनिर्घातें । शेषकूर्म अवचितें ।
गजबजोनि भूभारातें । सांडूं पहाती ॥ १५४
तेथ तिन्ही लोक डळमळीत । मेरुमंदर आंदोळित ।
समुद्रजल उसळत । कैलासवेरी ॥ १५५
पृथ्वीतळ उलथों पहात । आकाश असे आसुडत ।
तेथ सडा होत । नक्षत्रांचा ॥ १५६
सृष्टि गेली रे गेली । देवां मोकळवादी जाहली ।
ऐशी एक टाळी पिटिली । सत्यलोकीं ॥ १५७
दिहाचि दिन थोकला । जैसा प्रळयकाळ मांडला ।
तैसा हाहाकारु उठिला । तिहीं लोकीं ॥ १५८

**रौद्र रसाचा स्थायी भाव क्रोध हा आहे. त्याचें उदाहरण अकराव्या अध्यायांत मिळतें. त्यांतील कांहीं ओव्या—**

ठेलीं महाकाळेंसीं हटेंतटे । तैसीं कितीएके मुखें रागिटें ।
इहीं वाढोनियां धाकुटें । आकाश केलें ॥ ३५३
गगनाचेनि वाडपणें नाकळे । त्रिभुवनींचियाही वारिया न वेंटाळे ।
ययाचेनि वाफा आगी जळे । कैसें धडाडीत असे ॥ ३५४

जयाचिये आंगीची दीप्ति येवढी । जें त्रैलोक्य कीजे राखोंडी ।
कीं तयाही तोंडे आणि तोंडीं । दांत दाढा ॥ ३५६
कैसा वारया धनुर्वात चडला । समुद्र कीं महापुरीं पडिला ।
विषाग्नि मारा प्रवर्तला । वडवानळासी ॥ ३५७
हळाहळ आगी पियाले । नवल मरण मारा प्रवर्तलें ।
तैसें संहारतेजा या जाहले । वदन देखा ॥ ३५८
तैसा वक्त्रांचा विकाशु । माजीं जिव्हाचा आगळचि आवेशु ।
विश्व न पुरे म्हणोनि घांसु । न भरीचि कोडे ॥ ३६१
आणि पाताळव्याळाचिया फूत्कारी । गरळज्वाळा लागती अंबरीं ।
तैसे पसरलिये वदनदरी–। माजीं हे जिव्हा ॥ ३६२

**इत्यादि वर्णन रौद्र रसाचा परिपोष करणारें आहे.**

**बीभत्स रसाचा स्थायी भाव जुगुप्सा म्हणजे चिळस येणें हा आहे. जी वस्तु निषिद्ध आहे तिची चिळस आली म्हणजे आपण तिचा आपोआप त्याग करतो; म्हणून जुगुप्सा उत्पन्न होणें हाही मनुष्याचा धर्म आहे व त्यांतून हा रस उद्भवलेला आहे. या रसाच्या साहाय्यानें दुष्ट किंवा त्याज्य गोष्टीचा त्याग करणें हें विशेष परिणामकारक रीतीनें सांगतां येतें. पुढील वर्णन पहाः—**

तरी जयाची प्रीति पुरी । गुंतली देखसी घरीं ।
नवगंधकेसरी । भ्रमरी जैसी ॥ ज्ञा. १३–७८२
साकरेचिया राशीं । बैसली नुठे माशी ।
तैसेनि स्त्रीचित्त आवेशीं । जयाचें मन ॥ ७८३
ठेला बेडूक कुंडीं । मशक गुंतला शेंबुडीं ।
जैसा ढोरु सवुडवुडी । रुतला पंकीं ॥ ७८४
तैसें घरींहूनि निघणे । नाहीं जीवें मनें प्राणे ।
जया साप होऊनि असणे । भाटीं तिये ॥ ७८५

**ज्ञानेश्वरीच्या सतराव्या अध्यायांत राजस व तामस आहाराचें वर्णन करतांनाही बीभत्स रसाचा आविष्कार केलेला आहे. तामस ज्ञानाचें वर्णन अठराव्या अध्यायांत केलेलें आहे. तेथेंही या रसाचा आविर्भाव दिसून येतो. त्यांतील पुढील दोन ओव्या जरा लक्षांत ठेवण्यासारख्या दिसतात.**

तयाचिपरी खाद्याखाद्य । न म्हणे निंद्यानिंद्य ।

तोंडा आवडे तें मेध्य । ऐसाचि बोधु ॥ ५६०
आणि स्त्रीजात तितुकें । त्वचेंद्रियेंचि ओळखे ।
तियेविषयीं सोयरीके । एकची बोधु ॥ ५६१

यांतील दुसऱ्या ओवीकडे वाचकांनीं विशेष लक्ष द्यावें. "स्त्रीबरोबर सोयरीक-म्हणजे मैत्री–याचा अर्थ एकच–( त्वचेंद्रियेंची ओळख )–" हें तामस ज्ञानानें पछाडलेल्यांचें मत असतें. यावर ज्यास्ती चर्चा करण्याची आवश्यकता नाहीं. ज्ञानदेवांचें व्यवहारज्ञान किती सूक्ष्म होतें हें यावरून कळतें व दांभिक किंवा तामसी लोकांवर ते कसे कोरडे ओढतात हेंही समजतें.

असो. याप्रमाणें शृंगार, वीर, करुण, हास्य, रौद्र, भयानक आणि बीभत्स या सात रसांची थोडीबहुत उदाहरणें आपण पाहिलीं. आतां अद्भुत व शांत यांचा थोडासा परामर्श घेऊन मग अलंकारांकडे वळूं.

५ शांत आणि अद्भुत या रसांचा उत्कर्ष अकराव्या अध्यायांत ( ज्ञानेश्वरी ) झालेला आहे असें कवि स्वतःच सांगतो.

आतां यावरी एकादशीं । कथा आहे दोन्ही रसीं ।
येथ पार्था विश्वरूपेंसी । होईल भेटी ॥ १
जेथ शांताचिया घरा । अद्भुत आला आहे पाहुणेरा ।
आणि येरांही रसां पांतिकरां । जाहला मानु ॥ २

ज्ञानदेवांच्या म्हणण्याप्रमाणें संपूर्ण ज्ञानेश्वरींत मुख्य रस शांत आहे व तो त्यांनीं "शृंगाराच्या माथ्यावरही पाय ठेवील" इतका सुंदर वर्णन केलेला आहे. अकराव्या अध्यायांत प्राधान्य अर्थात् अद्भुत रसाला आहे. या रसांत स्थायी भाव विस्मय, आश्चर्य वाटणें, चकित होणें हा आहे. मला विश्वरूप दाखव अशी अर्जुनानें प्रार्थना करतांच त्याच्या सामान्य दृष्टीला तें दिसेल कां नाहीं याचाही विचार न करतां कृष्णानें तें प्रकट केलें. पण पुढें अर्जुन निश्चल आहे असें पाहून त्याला दिव्य दृष्टि देण्याची कृपा श्रीकृष्णानें केली व मग तें रूप पाहून अर्जुन भ्याला असा कथाभाग अकराव्या अध्यायांत आहे. पांचव्या श्लोकावर लिहिलेल्या ओव्या ( १२३ ते १४० ) अद्भुत रसाच्या परिपोषाची सुरवात करतात. सर्वच रूपें एकदम दिसल्यामुळें तीं विस्मयाला कारण झालीं.

अर्जुना तुवां एक दावा म्हणितलें । आणि तेंचि दावूं तरी काय दाविलें ।
आतां देखें आघवें भरिलें । माझ्याचि रूपीं ॥ १२३

एकें कृशें एकें स्थूलें । एकें ऱ्हस्वें एकें विशाळें ।
पृथुतरें सरळें । अप्रांतें एकें ॥ १२४
एकें अनावरें प्रांजळें । सव्यापारें एकें निश्चळें ।
उदासीनें स्नेहाळें । तीव्रें एकें ॥ १२५
एकें साभिलाषें विरक्तें । उन्निद्रित एकें निद्रितें ।
परितुष्टें एकें आर्तें । प्रसन्नें एकें ॥ १२८
एकें अतिलावण्य साकारें । एकें स्निग्धवपु मनोहरें ।
शृंगारश्रियेचीं भांडारें । उघडिलीं जैसीं ॥ १३८
एकें पीनावयव मांसाळें । एकें शुष्कें अतिविक्राळें ।
एकें दीर्घकंठें विताळें । विकटें एकें ॥ १३९
यापरी एकेकाचिये लीळे । जन्मतीं सुरसिद्धांचीं कुळें ।
ऐसीं अपारें आणि विशाळें । रूपें इये पाहीं ॥ १४५

**अर्जुनाला तें विश्वरूप दिसलें तेव्हां त्याची स्थिति वर्णन करतातः—**

एकसरें ऐश्वर्यतेजें पाहलें । तया चमत्काराचें एकार्णव जहालें ।
चित्त समाजीं बुडोनि गेलें । विस्मयाचिया ॥ १८६
जैसा आब्रह्म पूर्णोदकीं । पव्हे मार्कंडेय एकाकी ।
तैसा विश्वरूपकौतुकीं । पार्थु लोळे ॥ १८७
म्हणे केवढें गगन एथ होतें । ते कवणें नेलें पां केउतें ।
तीं चराचरें महाभूतें । काय जहालीं ॥ १८८
दिशांचे ठावही हारपले । अधोर्ध्व काय नेणों जाहले ।
चेइलिया स्वप्न तैसे गेले । लोकाकार ॥ १८९
नाना सूर्यतेजप्रतापें । सचंद्र तारांगण जैसें लोपे ।
तैसी गिळिली विश्वरूपें । प्रपंचरचना ॥ १९०
तेव्हां मनासी मनपण न स्फुरे । बुद्धि आपणपें न सांवरे ।
इंद्रियांचे रश्मी माघारे । हृदयवरी भरले ॥ १९१
तेथ ताटस्थ्या ताटस्थ्य पडिलें । टकासी टक लागलें ।
जैसें मोहनास्त्र घातलें । विचारजाता ॥ १९२
तैसा विस्मितु पाहे कोडें । तंव पुढां होतें चतुर्भुज रूपडें ।
तेंचि नानारूप चहूंकडे । मांडोनि ठेलें ॥ १९३

**अशा प्रकारें तें विश्वरूप पाहून अर्जुन विस्मयानें अगदीं भरून गेला आणि कांहीं वेळानें भयानें गांगरला; त्या वेळीं कवीनें रौद्र व भयानक या रसांचा मसाला कथानकाला लावला आहे. अर्जुनानें " अपाराचें साद्यतपण " देखिलें.**

जयाची सोय वेदा नाकळे । तयाचे सकळावयव एकेचि वेळे ।
अर्जुनाचे दोन्ही डोळे । भोगिते जहाले ॥ २०९
आपण आंग आपण अलंकार । आपण हात आपण हतियार ।
आपण जीव आपण शरीर । देखे चराचर कोंदले देवें ॥ २१५
जयाचिया किरणांचे निखरपणें । नक्षत्रांचे होत फुटाणे ।
तेजें खिरडला वन्हि म्हणे । समुद्रीं रिघों ॥ २१६
अनावरे मुखें समोर देखे । तयाभेणे पाठीमोरा जंव ठाके ।
तंव तयाहीकडे श्रीमुखे । करचरण तैसेची ॥ २२८
आघवयाचि विजूंचा मेळावा कीजे । आणि प्रळयाग्नीची सर्व सामग्री आणिजे ।
तेवीचि दशकुही मेळविजे । महातेजाचा ॥ २३९
तरी तियें अंगप्रभेचेनि पाडे । हे तेज कांहीं कांहीं होईल थोडे ।
आणि तयाऐसे कीर चोखडें । त्रिशुद्धी नोहे ॥ २४०

**वाचकांनीं अकरावा अध्यायच वाचावा म्हणजे झालें.**

**शांत रसाचा स्थायी भाव निर्वेद हा आहे. विवेकाच्या योगानें सांसारिक स्वार्थां-पासून मन परावृत्त होणें याला निर्वेद म्हणतात. त्या रसाचा परिपोष ज्ञानेश्वरींत ठायीं ठायीं आहे. तेराव्या अध्यायांत ज्ञानलक्षणांचें निरूपण करतांना या रसाचा उत्कर्ष विशेषच झालेला आहे. ओवी ५३६ ते ५८७ यांत केलेलें वर्णन तर विशेष विचार करावयास लावणारें आहे. त्यांतील कांहीं ओव्या येथें घेतों.**

आणि मृत्यु पुढां आहे । तोचि कल्पांतीं कां पाहे ।
परी आजीच होये । सावधु जो ॥ ५४५
म्हणोनी समर्थेसीं वैर । जया पडिले हाडखाईर ।
तो जैसा आठही पाहर । परजूनि असे ॥ ५५१
पैं गा जो ययापरी । जन्मेंचि जन्म निवारी ।
मरणें मृत्यु मारी । आपण उरे ॥ ५५३
आणि तयाचियापरी जरा । न टेकतां शरीरा ।
तारुण्याचिया भरा-। माजीं देखे ॥ ५५५

म्हणे आजिच्या अवसरीं । पुष्टि जे शरीरीं ।
ते पाहे होईल काचरी । वाळली जैसी ॥ ५५६
पद्मदळेंसी इसाळें । भांडताती हे डोळे ।
ते होती पडवळें । पिकलीं जैसीं ॥ ५६०
जैसें बाभुळीचें खोड । गिरबडूनी जाती सरड ।
तैसे पिचडी तोंड । सरकटिजेल ॥ ५६२
तांबुले वोंठ राऊं । हांसतां दांत दाऊं ।
सनागर मिरवूं । बोल जेणें ॥ ५६४
तयाची पाहे या तोंडा । येईल जळंबटाचा लोंढा ।
इया उमळती दाढा । दांतांसहित ॥ ५६५
ऐसी वार्धक्याची सूचणी । आपणिया तरुणपणीं ।
देखे मग मनीं । विटे जो गा ॥ ५७६
म्हणे पाहे हें येईल । आणि आतांचे भोगतां जाईल ।
मग काय उरेल । हितालागीं ॥ ५७७
म्हणोनि नाइकणें पावे । तंव आइकोनि घाली आघवें ।
पंगू न होतां जावें । तेथ जाय ॥ ५७८
दृष्टि जंव आहे । तंव पाहावें तेतुलें पाहे ।
मूकत्वा आधीं वाचा वाहे । सुभाषितें ॥ ५७९
हात होती लुळे । हें पुढील मोटकें कळे ।
तंव करोनि घाली सकळें । दानादिकें ॥ ५८०
ऐशी दशा येईल पुढें । तै मन होईल वेडें ।
तंव चितूनि ठेवी चोखडें । आत्मज्ञान ॥ ५८१

**याच प्रकारें ज्ञानेश्वरींतील अनेक उतारे घेतां येतील. वरील उताऱ्यांत शांत रस मुख्य आहे व त्याचा परिपोष करण्यासाठीं कोठें बीभत्स तर क्वचित् हास्य याही रसांचा उपयोग केलेला आहे. आणखी एक उतारा अठराव्या अध्यायांतील रजोगुणात्मक सुखासंबंधीं म्हणजे सांसारिक सुखाविषयीं आहे तो येथें देतों.**

आणि विषयेंद्रियां । मेळु होतां धनंजया ।
जें सुख जाय थडिया । सांडूनि दोन्ही ॥ ७९४

अधिकारिया रिगतां गांवो । होय जैसा उत्साहो ।
कां रिणावरी विवाहो । विस्तारिला ॥ ७९५
ना ना रोगिया जिभेपासीं । केळें गोड साखरेंसी ।
कां बचनागाची जैसी । मधुरता पहिली ॥ ७९६
संवचोराचें मैत्र । हाटभेटीचें कलत्र ।
कां लाघवियाचे विचित्र । विनोद ते ॥ ७९७
तैसें विषयेंद्रियदोखी । जें सुख जीवातें पोखी ।
मग उपडिला खडकी । हंमु जैसा ॥ ७९८
ऐसे आपत्ति जें सुख । ऐहिकीं परिणमे देख ।
परत्रीं कीर विख । होउनी परते ॥ ८०१
पार्था तें सुख साचें । वळिलें आहे रजाचे ।
म्हणोनि न शिवं तयाचे । आंग कहीं ॥ ८०५

शांत रसाचे अधिक उतारे देण्याचें कारण नाहीं. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ शांत रसाचा महासागर आहे. तेथें कोठेंही डुंबावें आणि या रसाचा आस्वाद घ्यावा. येथें सर्व रसांचा उल्लेख करण्याचा प्रयत्न केला आहे त्याचें कारण उघड आहे. ज्ञानदेव हे थोर तत्त्वज्ञ आणि महाकवि होते व निरनिराळ्या रसांचा परिपोष त्यांनीं कसा केलेला आहे याची दिशा वाचकांच्या लक्ष्यांत यावी आणि त्यांचें हें तत्त्वज्ञानानें भरलेलें काव्य रसांचें व अलंकारांचेंही मोठें भांडार आहे हें त्यांच्या लक्षांत यावें हेंच तें कारण होय. त्याचा पूर्ण परिचय होण्यास स्वतंत्र ग्रंथ पाहिजे. ज्ञानेश्वरींतील कांहीं ठळक अलंकार आपण आतां पाहूं.

६ ज्ञानेश्वरींतील अलंकार आणि त्या कित्येक अलंकारांतून निघणारें तत्त्वज्ञान आणि व्यवहारज्ञान हा खरोखर स्वतंत्र अभ्यासाचा विषय आहे. येथें कांहीं ठळक अलंकाराची उदाहरणें दिलेलीं आहेत. “उपमा कालीदासस्य” अशी संस्कृतांत म्हण आहे. ज्ञानदेव या बाबतींत कालीदासाबरोबर “पैजा जिंकणारे” आहेत. रूपक, उत्प्रेक्षा, दृष्टांत इत्यादि अलंकारांचीं सुंदर उदाहरणें ज्ञानदेवांच्या ग्रंथांत मिळतात. त्याचप्रमाणें माधुर्य हा गुण ज्ञानदेवांत विशेष आहे व ज्ञानेश्वरींतील आणि अमृतानुभवांतील कित्येक वर्णनें आपणांला आनंदानें भरून टाकतात. ज्ञानेश्वरीच्या सुरवातीलाच महाभारताचें वर्णन पहाः—

म्हणोनी हा काव्यां रावो । ग्रंथ गुरुवतीचा ठावो ।

एथोनि रसां झाला आवो । रसाळपणाचा ॥ १-३३
तेवींची आइका आणीक एक । एथूनि शब्दश्री सच्छास्त्रिक ।
आणि महाबोधीं कोंवळीक । दुणावली ॥ ३४
एथ चातुर्य शहाणे झालें । प्रेम रुचीस आलें ।
आणि सौभाग्य पोखलें । सुखाचें एथ ॥ ३५
माधुर्या मधुरता । शृंगारा सुरेखता ।
रूढपण उचितां । दिसले भले ॥ ३६
एथ कलाविदपणा कलां । पुण्यासी प्रतापु आगळा ।
म्हणवूनि जनमेजयाचे अवलीला । दोष हरिलें ॥ ३७
आणि पहातां नावेक । रंगी सुरंगतेची आगळिक ।
गुणा सुगुणपणाचें बिक । बहुवस येथ ॥ ३८

**आणि याच वर्णनाची परिपूर्ति करण्यासाठीं पुढील सहा ओव्यांत सहा सुंदर आणि अर्थपूर्ण उपमा व्यासग्रंथाला दिलेल्या आहेत.**

भानुचेनि तेजें धवळलें । जैसें त्रैलोक्य दिसे उजळिले ।
तैसे व्यासमती कवळिलें । मिरवे विश्व ॥ ३९
कां सुक्षेत्री बीज घातलें । ते आपुलियापरी विस्तारलें ।
तैसें भारतीं सुरवाडलें । अर्थजात ॥ ४०
ना तरी नगरांतरीं वासिजे । तरी नागरचि होईजे ।
तैसें व्यासोक्तितेजें । धवळत सकळ ॥ ४१
कीं प्रथम वयसाकाळीं । लावण्याची नव्हाळी ।
प्रकटे जैसी आगळी । अंगना अंगीं ॥ ४२
ना तरी उद्यानीं माधवी घडे । तेथ वनशोभेची खाणी उघडे ।
आदिलापासोनि अपाडें । जियापरी ॥ ४३
नाना घनीभूत सुवर्ण । जैसें न्याहाळितां साधारण ।
मग अलंकारीं बरवेपण । निवाडु दावी ॥ ४४
तैसें व्यासोक्ति अळंकारिलें । आवडतें बरवेपण पातलें ।
तें जाणोनि काय आश्रयिलें । इतिहासीं ॥ ४५

**दुसऱ्या अध्यायांत अर्जुन युद्धविन्मुख झालेला पाहून श्रीकृष्ण त्याला आपलेपणाची आठवण देतात.**

म्हणे अर्जुना आधी पाहीं । हे उचित काय इये ठायीं ।
तूं कवण हें कायी । करीत आहासी ॥ ६
तुज सांगे काय झालें । कवण उणें आलें ।
करितां काय ठेलें । खेदु कायिसा ॥ ७
तूं अनुचिता चित्त नेदिसी । धीरु कंहीं न संडिसी ।
तुझिया नामें अपयशी । दिशा लंघिजे ॥ ८
तूं शूरवृत्तीचा ठावो । क्षत्रियांमाजी रावो ।
तुझिया लाठेपणाचा आवो । तिहीं लोकीं ॥ ९
तुवां संग्रामीं हरु जिंकिला । निवातकवचांचा ठावो फेडिला ।
पवाडा तुवां केला । गंधर्वासी ॥ १०
पहातां तुझेनि पाडें । दिसे त्रैलोक्यही थोकडें ।
ऐसें पुरुषत्व चोखडें । पार्था तुझें ॥ ११

**आतां हेंच स्पष्ट करण्यासाठीं दृष्टांतामागून दृष्टांत देतातः—**

विचारीं तूं अर्जुनु । कीं कारुण्यें कीजसी दीनु ।
सांग पां अंधकारें भानु । ग्रासिला आथी ॥ १३
ना तरी पवनु मेघासी बिहे । कीं अमृतासी मरण आहे ।
पाहे पां इंधनचि गिळोनि जाये । पावकाते ॥ १४
कीं लवणेंचि जल विरे । संसर्गें काळकूट मरे ।
सांग पां महाफणी दर्दुरें । गिळिजे कायी ॥ १५
सिंहासि झोंबे कोल्हा । ऐसा अपाडु आथि कें जाहला ।
परी तो त्वां साच केला । आजि एथ ॥ १६

**तेराव्या अध्यायांत सर्वच वर्णन सुंदर आहे. त्यांतील "शुचित्व" या गुणाचें स्पष्टीकरण करणाऱ्या कांहीं ओव्या येथें देतों. यांतही उपमांची नुसती गर्दी आहे व त्यांतील समर्पकपणा पाहून आपण थक्क होतों.**

म्हणे शुचित्व गा ऐसें । जयापाशीं दिसे ।
आंग मन जैसें । कापुराचें ॥ ४६२
कां रत्नाचें दळवाडें । जैसें सबाह्य चोखडें ।
आंत बाहेरि एकें पाडें । सूर्यु जैसा ॥ ४६३
बाहेरी कर्में क्षाळला । भीतरी ज्ञानें उजळला ।

इहीं दोहीं परी आला । पाखाळा एका ॥ ४६४
मृत्तिका आणि जळें । बाह्य येणें मेळें ।
निर्मळु होय बोले । वेदांचेनि ॥ ४६५
भलतेथ बुद्धि बळी । रस आरिसा उजळी ।
सौदणी फेडी थिगळी । वस्त्रांचिया ॥ ४६६
किंबहुना इयापरी । बाह्य चोख अवधारीं ।
आणि ज्ञानदीपु अंतरी । म्हणोनि शुद्ध ॥ ४६७
एऱ्हवी तरी पाडुसुता । आंत शुद्ध नसतां ।
बाहेरी कर्म, तो तत्वतां । विटंबु गा ॥ ४६८
मृत जैसा शृंगारिला । गाढव तीर्थी न्हाणिला ।
कडुदुधिया माखिला । गुळें जैसा ॥ ४६९
वोस गृहा तोरण बांधिले । कां उपवासीं अन्नें लिपिलें ।
कुंकुमसेंदुर केलें । कांतहीनेनें ॥ ४७०
कळस ढिमाचे पोकळ । जळो वरील ते झळाळ ।
काय करूं चित्रींव फळ । आंतु शेण ॥ ४७१
तैसे कर्म वरिचिलेकडा । न सरे थोर मोलें कुडा ।
नव्हे मदिरेचा घडा । पवित्र गंगें ॥ ४७२
म्हणोनी अंतरीं ज्ञान व्हावें । मग बाह्य लाभेल स्वभावें ।
वरी ज्ञान कर्मे संभवे । ऐसे कें जोडे ॥ ४८३
यालागीं बाह्य भागु । कर्मे धुतला चांगु ।
ज्ञानें फिटला वंगु । अंतराचा ॥ ४७४
तेथ अंतरबाह्य गेले । निर्मळत्व एक जाहलें ।
किंबहुना उरलें । शुचित्वचि ॥ ४७५

**याही पुढें नऊ ओव्यांत शुचित्वाचें वर्णन केलेलें आहे. त्यावरून ज्ञानदेवाच्या वर्णनाचा थाट आणि उपमा देण्याचें चातुर्य दिसून येतें. आणखी एक वर्णन पंधराव्या अध्यायांतून पांचव्या श्लोकावरच्या भाष्यांतील थोडेंसें देतों. यांतही उपमा फार सुंदर आहेत.**

जया पुरुषाचें कां मन । सांडोनि गेले मोहमान ।
वर्षांती जैसें घन । आकाशानें ॥ २८५

निकवड्या निष्ठुरा । उबगिजे जेवि सोयरा ।
तैसे नागवती विकारां । वेटाळूं जे ॥ २८६
फळली केळी उन्मूळें । तैसी आत्मळाभें प्रबळें ।
त्याची क्रिया ढाळेंढाळें । गळती आहे ॥ २८७
आगी लागलीया रुखीं । देखोनि सैरा पळती पक्षी ।
तैसें सांडिलें अशेखीं । विकल्पी जे ॥ २८८
आइके सकळ दोष तृणीं । अंकुरिजती जिये मेदिनी ।
तिये भेदबुद्धीची कहाणी । नाहीं जयाते ॥ २८९
सूर्योदयासरिसी । रात्रि पळोनि जाय अपैसी ।
गेली देह अहंता तैसी । अविवेसवें ॥ २९०
पैं आयुष्यहीना जीवातें । शरीर सांडी जेंवीं अवचितें ।
तेंविं निदसुरें द्वैतें । सांडिले जे ॥ २९१
लोहाचें सांकडे परिसा । न जोडे अंधारु रवि जैसा ।
द्वैतबुद्धीचा तैसा । सदा दुकाळ जया ॥ २९२
अगा सुखदुःखाकारें । द्वंद्वें देहीं जियें गोचरें ।
तियें जयां कां सामोरें । होतिचि ना ॥ २९३
स्वप्नींचें राज्य कां मरण । नोहे हर्षशोकांसि कारण ।
उपवढलिया जाण । जियापरी ॥ २९४
तैसे सुखदुःखरूपीं । द्वंद्वीं जे पुण्यपापीं ।
न घेपिजती सर्पी । गरुड जैसें ॥ २९५
आणि अनात्मवर्गु नीर । सांडूनि आत्मरसाचें क्षीर ।
चरताति जे सविचार । राजहंस ॥ २९६
जैसा वर्षोनि भूतळीं । आपुला रसु अंशुमाळी ।
मागौता आणी रश्मिजाळीं । बिंबासीची ॥ २९७
तैसें आत्मभ्रांतीसाठीं । वस्तु विखुरली बारा वाटीं ।
ते एकवटिती ज्ञानदृष्टि । अखंड जे ॥ २९८
किंबहुना आत्मयाचा । निर्धारीं विवेकु जयांचा ।
बुडालु बोधु गंगेचा । सिंधुमाजीं जैसा ॥ २९९

अशा प्रकारें सुंदर उपमांचा वर्षाव करण्याचें सामर्थ्य ज्ञानदेवांत आश्चर्यकारक

आहे. या अलंकाराच्या साहाय्यानें आपलें म्हणणें वाचकांला उत्तम प्रकारें कळेल असें करणें, त्याला पटविणें, त्याच्या गळीं उतरविणें हें ज्ञानदेव फार उत्कृष्ट प्रकारें करतात. काव्यदृष्टीनें पहाणाऱ्या रसिकांचा आनंद तर त्यामुळें निःसंशय दुणावतो.

अमृतानुभवाच्या दुसऱ्या अध्यांत सद्गुरूला नमन केलें आहे त्याचा थाट पहाः—

आतां उपायवनवसंतु । जो आज्ञेचा आहेवतंतु ।
अमूर्तचि परि मूर्तु । कारुण्याचा ॥ १
अविद्येचे आडवें । भुंजीत जीवपणाचे भवे ।
तया चैतन्याचे धांवे । कारुण्यें जो कीं ॥ २
मोडूनि मायाकुंजरू । मुक्तिमोतियाचा वोगरू ।
जेवविता सद्गुरू । निवृत्ति वंदूं ॥ ३
जयाचेनि अपांगपातें । बंध मोक्षपणीं आते ।
भेटे जाणतया जाणते । जयापाशीं ॥ ४
कैवल्यकनकाचिया दाना । जो न कडसी थोरा साना ।
द्रष्टयाचिया दर्शना । पाठाऊ जो ॥ ५
सामर्थ्याचेनि बिकें । जो शिवातेही गुरुत्वें जिंके ।
आत्मा आत्मसुख देखें । आरिसां जिये ॥ ६
बोधचंद्राचिया कळा । विखुरलिया येकवळा ।
कृपा पुनीवलीळा । करी जयाची ॥ ७
जो भेटलियाच सवे । पुरती उपायांचे धांवे ।
प्रवृत्तिगंगा स्थिरावे । सागरीं जिये ॥ ८
अविद्येचें काळवखें । स्वबोधसुदिने फांके ।
शिवतलें प्रसादार्के । जयाचेनि ॥ १०
राखों जातां शिष्यातें । गुरुपणही धाडिलें थितें ।
तरी गुरुगौरव जयातें । सांडीच ना ॥ १२
लघुत्वाचेंनि मुद्दलें । बैसला गुरुत्वाचे सेले ।
नासूनि नाथिलें । सदैव जो ॥ २०
चंद्राऐशी सुशीतळें । घडिलीं जयाचेनि मेळे ।

सूर्य जयाचेनि उजाळें । कडवसेनि ॥ २३
जीवपणाचेनि त्रासें । यावया आपुलिये दसे ।
शिवही मुहूर्त पुसे । जया जोशियातें ॥ २४

**वरील कित्येक ओव्यांत रूपक अलंकार फार प्रसन्न साधलेला आहे हें रसिक वाचकांच्या लक्षांत येईल. विशेषतः ३, ७, ८, १० या ओव्यांत हा अलंकार सुंदर दिसतो. वर्णनप्रकाराचा आणखी एक नमुना म्हणून ज्ञानेश्वरी अठराव्या अध्यायांतील पुढील ओव्या हृदयंगम आहेतः–यत्र योगेश्वरः कृष्णः या गीतेंतील शेवटच्या श्लोकांवर भाष्य करतांना ज्ञानदेवांच्या कवित्वाला मोठा भर आलेला आहे. त्यांतील या सुरवातीच्या ओव्या आहेत.**

चंद्र तेथें चंद्रिका । शंभु तेथें अंबिका ।
संत तेथें विवेका । असणें कीं जी ॥ १६३२
रावो तेथें कटक । सौजन्य तेथें सोयरीक ।
वन्हि तेथें दाहक । सामर्थ्य कीं ॥ १६३३
दया तेथें धर्मु । धर्मु तेथें सुखागमु ।
सुखी पुरुषोत्तमु । असे जैसा ॥ १६३४
वसंत तेथें वनें । वनें तेथ सुमनें ।
सुमनीं पालिंगनें । सारंगांचीं ॥ १६३५
गुरु तेथें ज्ञान । ज्ञानीं आत्मदर्शन ।
दर्शनीं समाधान । आथी जैसें ॥ १६३६
भाग्य तेथें विलासु । सुख तेथें उल्हासु ।
हें असो तेथ प्रकाशु । सूर्य जेथें ॥ १६३७
तैसे सकळ पुरुषार्थ । जेणें स्वामी कां सनाथ ।
तो श्रीकृष्णरावो जेथ । तेथ लक्ष्मी ॥ १६३८

**या सुंदर वर्णनांत उत्प्रेक्षा उपमारूपकांची गर्दी आहे. भगवद्गीतेच्या सातशें श्लोकांचे वर्णन करतांनाही या महाकवीचा प्रतिभावृक्ष उपमारूपकफलांनीं नुसता लगटून गेलेला आहे; आणि त्यांतील कित्येक उपमा खरोखर अमृतोपम आहेत.**

ऐसे श्लोक शतें सात । गीतेचीं पदें आंगें वहात ।
पदें म्हणों कीं परमामृत । गीताकाशींचें ॥ १६६४

की आत्मराजाचिये सभे । गीते ओडवले हे खांबे ।
मज श्लोक प्रतिभे । ऐसे येत ॥ १६६५
कीं गीता हे सप्तशती । मंत्रप्रतिपाद्य भगवती ।
मोहमहिषा मुक्ति । आनंदली असे ॥ १६६६
कीं अविद्यातिमिररोखें । श्लोक सूर्यातें पैजा जिंके ।
ऐसे प्रकाशिले गीतामिखें । रायें श्रीकृष्णें ॥ १६६८
कीं श्लोकाक्षरद्राक्षलता । मांडव जाली आहे गीता ।
संसारपथश्रांता । विसंवावया ॥ १६६९
कीं सभाग्य संतीं भ्रमरीं । केले ते श्लोककल्हारीं ।
श्रीकृष्णास्यसरोवरीं । सामिनली हे ॥ १६७०
कीं श्लोक नव्हती आन । गमे गीतेचें महिमान ।
वाखाणिते बंदीजन । उदंड जैसे ॥ १६७१
कीं श्लोकांचिया आवारा । सात शतेंकरुनि सुंदरा ।
सर्वांगम गीतापुरा । वसों आले ॥ १६७२
कीं निजकांता आत्मया । आवडी गीता मिळावया ।
श्लोक नव्हती बाह्या- । पसरु वां जो ॥ १६७३

**अशीं सुंदर वर्णनें ज्ञानेश्वरींत पदोपदीं मिळतात आणि त्यांच्या उज्वल सौंदर्यानें डोळे आणि अंतःकरण दोन्हीं तृप्त होतात.**

**७ विस्तृत स्वरूपाच्या सुंदर रूपकांचीं कित्येक उदाहरणें ज्ञानेश्वरींत आहेत. ग्रंथाच्या सुरवातीला गणेशस्वरूपावर शब्दब्रह्माचें सांग रूपक केलेलें आहे तें फारच आल्हाददायक आहे.**

देवा तूंचि गणेशु । सकलार्थमतिप्रकाशु ।
म्हणे निवृत्तिदासु । अवधारिजो जी ॥ १-२
हें शब्दब्रह्म अशेष । तेचि मूर्ति सुवेष ।
तेथ वर्णवपु निर्दोष । मिरवत असे ॥ ३
स्मृति तेचि अवयव । रेखा आंगीकभाव ।
तेथ लावण्याची ठेव । अर्थशोभा ॥ ४
अष्टादश पुराणें । तींचि मणिभूषणें ।
पदपद्धति खेंवणें । प्रमेयरत्नांचीं ॥ ५

पद्यबंध नागर । तेंचि रंगाथिलें अंबर ।
जेथ साहित्य वाणें सपूर । उजाळाचें ॥ ६
देखा काव्यनाटका । जें निर्धारितां सकौतुका ।
त्याचि रुणझुणती क्षुद्रघंटिका । अर्थध्वनि ॥ ७
नाना प्रमेयांची परी । निपुणपणे पाहतां कुसरी ।
दिसतीं उचित पदे माझारीं । रत्नें भलीं ॥ ८
तेथ व्यासादिकांचिया मती । तेचि मेखळा मिरवती ।
चोखाळपणें झळकती । पल्लवसडका ॥ ९
देखा षड्दर्शनें म्हणिपती । तेचि भुजांची आकृति ।
म्हणवुनि विसंवादे धरिती । आयुधें हातीं ॥ १०
तरी तर्क तोचि परशु । नीतिभेदु अंकुशु ।
वेदांतु तो महारसु । मोदकु मिरवे ॥ ११
एके हातीं दंतु । जो स्वभावतां खंडितु ।
तो बौद्धमतसंकेतु । वार्तिकांचा ॥ १२
मग सहजें सत्कारवादु । तो पद्मकरु वरदु ।
धर्मप्रतिष्ठा तो सिद्धु । अभयहस्तु ॥ १३
देखा विवेकवंतु सुविमळु । तोचि शुंडादंडु सरळु ।
जेथ परमानंदु केवळु । महासुखाचा ॥ १४
तरी संवादु तोचि दशनु । जो समता शुभ्रवर्णु ।
देवो उन्मेषसूक्ष्मेक्षणु । विघ्नराजु ॥ १५
मज अवगमलिया दोनी । मीमांसा श्रवणस्थानीं ।
बोधमदामृत मुनी । अली सेविती ॥ १६
प्रमेयप्रवालसुप्रभ । द्वैताद्वैत तेचि निकुंभ ।
सरसेपणे एकवटत इभ–। मस्तकावरी ॥ १७
उपरि दशोपनिषदें । जियें उदारें ज्ञानमकरंदें ।
तियें कुसुमें मुकुटीं सुगंधें । शोभती भलीं ॥ १८
अकार चरणयुगुल । उकार उदर विशाल ।
मकार महामंडल । मस्तकाकारें ॥ १९

हे तिन्ही एकवटले । तेथ शब्दब्रह्म कवळलें ।
तें मियां श्रीगुरुकृपा नमिलें । आदिबीज ॥ २०

**सातव्या अध्यायांत चौदाव्या श्लोकावर व्याख्यान करतांना मायेला नदीचें रूपक दिलें आहे. तेंही असेंच अर्थपूर्ण व समस्तवस्तुविषयक आहे. तो उतारा जसाचा तसा येथें देणें इष्ट आहे.**

आतां महदादि हे माझी माया । उतरोनियां धनंजया ।
मी होइजे हें आया । कैसेनि ये ॥ ६८
जिये ब्रह्माचळाचा आघाडा । पहिलिया संकल्पजळाचा उभडा ।
सर्वेंचि महाभूतांचा बुडबुडा । साना आला ॥ ६९
जे सृष्टिविस्ताराचेनि वोघें । चढत काळकळनेचेनि वेगें ।
प्रवृत्तिनिवृत्तींचीं तुंगें । तटें सांडी ॥ ७०
जे गुणघनाचेनि वृष्टिभरें । भरलीं मोहाचेनि महापूरें ।
घेऊनि जात नगरें । यमनियमांचीं ॥ ७१
जे द्वेषाच्या आवर्ती दाटत । मत्सराचे वळसे पडत ।
माजीं प्रमादादि तळपत । महामीन ॥ ७२
जेथ प्रपंचाचीं वळणें । कर्माकर्मांचीं वोभाणें ।
वरी तरताती वोसाणें । सुखदुःखांचीं ॥ ७३
रतीचिया बेटा । आदळती कामाचिया लाटा ।
जेथ जीवफेनसंघटा । सैघ दिसे ॥ ७४
अहंकाराचिया चळिया । वरी मदत्रयाचिया उकळिया ।
जेथ विषयोर्मीच्या आकळिया । उल्लाळ घेती ॥ ७५
उदयास्तांचे लोंढे । पाडीत जन्ममरणांचे चोंढे ।
जेथ पांचभौतिक बुडबुडे । होती जाती ॥ ७६
संमोह विभ्रम मासे । गिळिताती धैर्याचीं आंविसें ।
तेथ देव्हडे भोंवत वळसे । अज्ञानाचे ॥ ७७
भ्रांतीचेनि खडुळें । रेवले आस्थेचे अवगाळे ।
रजोगुणाचेनि खळाळें । स्वर्ग गाजे ॥ ७८
तमाचे धारसे वाड । सत्वाचें स्थिरपण जाड ।
किंबहुना हे दुवाड । मायानदी ॥ ७९

**सोळाव्या अध्यायाला सुरवातीस श्रीगुरूंना त्यावर चंडांशु म्हणजे सूर्य याचें रूपक करून नमस्कार केलेला आहे.**

मावळवीत विश्वाभासु । नवल उदयला चंडांशु ।
अद्वयाब्जिनीविकाशु । वंदूं आतां ॥ १
जो अविद्याराती रुसोनियां । गिळी ज्ञानाज्ञान चांदणियां ।
जो सुदिनु करि ज्ञानियां । स्वबोधाचा ॥ २
जेणें विवळतिये सवळे । लाहोनि आत्मज्ञानाचे डोळे ।
सांडिती देहाहंतेचीं अविसाळें । जीवपक्षी ॥ ३
लिंगदेह कमळाचां । पोटीं वेचतया चिद्भ्रमराचा ।
बंदिमोक्षु जयाचा । उदैला होय ॥ ४
शब्दाचिया आसकडीं । भेदनदीच्या दोहीं थडीं ।
आरडाते विरहवेडीं । बुद्धिबोधु ॥ ५
तया चक्रवाकांचें मिथुन । सामरस्याचें समाधान ।
भोगवी जो चिद्गगन– । भवनदिवा ॥ ६
जेणें पाहालिये पाहांटें । भेदाची चोरवेळ फिटे ।
रिघती आत्मानुभववाटे । पांथिक योगी ॥ ७
जयाचेनि विवेककिरणसंगें । उन्मेखसूर्यकांतफुणगे ।
दीपले जाळिती दांगे । संसाराचीं ॥ ८
जयाचा रश्मिपुंज निबरु । होता स्वरूप उखरीं स्थिरु ।
ये महासिद्धीचा पूरु । मृगजळ तें ॥ ९
जो प्रत्यग्बोधाचिया माथया । सोहंतेच्या मध्यान्हीं आलिया ।
लपे आत्मभ्रांतिछाया । आपणपां तळीं ॥ १०
ते वेळीं विश्वस्वप्नासहितें । कोण अन्यथामति निद्रेतें ।
सांभाळी नुरेचि जेथें । मायाराती ॥ ११
म्हणोनि अद्वयबोधपाटणीं । तेथ महानंदाची दाटणी ।
मग सुखानुभूतींचीं घेणीं देणीं । मंदावों लागती ॥ १२
किंबहुना ऐसैसें । मुक्तिकैवल्य सुदिवसें ।
सदा लाहिजे कां प्रकाशें । जयाचेनि ॥ १३
जो निजधामव्योमींचा रावो । उदैलाचि उदैजतखेंवो ।

फेडि पूर्वादि दिशांसि ठावो । उदोअस्तूचा ॥ १४
न दिसणें दिसणेंनसी मावळवी । दोहीं झांकिलें तें सेंघ पालवी ।
काय बहु बोलों ते आघवी । उखाचि आनी । १५
तो अहोरात्रांचा पैलकडु । कोणे देखावा ज्ञानमार्तंडु ।
जो प्रकाशेवीण सुरवाडु । प्रकाशाचा ॥ १६
तया चित्सूर्या श्रीनिवृत्ति । आतां नमो म्हणों पुढतपुढती ।
जे बाधका येइजतसे स्तुति । बोलाचिया ॥ १७

**अठराव्या अध्यायांत भगवद्गीतेवर प्रासादाची कल्पना करून रूपक केलेलें आहे तेंही अर्थपूर्ण आहे.**

व्यासु सहजें सूत्री बळी । तेणें निगमरत्नाचळीं ।
उपनिषदार्थाची माळी । माजीं खांडिली ॥ ३५
तेथ त्रिवर्गाचा अणुआरु । आडऊ निघाला जो अपारु ।
तो महाभारतप्राकारु । भोवता केला ॥ ३६
माजीं आत्मज्ञानाचे एकवट । दळवाडे झाडूनि चोखट ।
घडिले पार्थवैकुंठ– । संवादकुसरी ॥ ३७
निवृत्तिसूत्र सोडवणिया । सर्व शास्त्रार्थ पुरवणिया ।
आवो साधिला मांडणिया । मोक्षरेखेचा ॥ ३८
ऐसेनि करितां उभारा । पंधरा अध्यायांत पंधरा ।
भूमी निर्वाळलिया पुरा । प्रासादु जाहला ॥ ३९
उपरि सोळावा अध्यायो । तो ग्रीवघंटेचा आवो ।
सप्तदशु तोचि ठावो । पडघाणिये ॥ ४०
तयाहीवरी अष्टादशु । तो अपैसा मांडला कळसु ।
उपरि गीतीदिकीं व्यासु । ध्वजे लागला ॥ ४१

**आणखी एक उतारा दुसऱ्या अध्यायांतून घेतों:—**

ऐसें अर्जुन तेथ बोलिला । जंव क्षणएक भ्रांति सांडिला ।
मग पुनरपि व्यापिला । उर्मी तेणें ॥ ६९
कीं मज पहातां उर्मी नोहे । हें अनारिसें गमत आहे ।
तो ग्रासिला महामोहें । काळसर्पे ॥ ७०
सवर्महृदयकल्हारीं । तेथ कारुण्यवेळेच्या भरीं ।

लागला म्हणोनि लहरीं । भांजेचि ना ॥ ७१
हे जाणोनि ऐशी प्रौढी । जो दृष्टिसवेंचि विष फेडी ।
तो धांवया श्रीहरि गारुडी । पातला कीं ॥ ७२
मग देखा तेथ फाल्गुनु । घेतला असे भ्रांति कवळुनु ।
जैसा घनपडळीं भानु । आच्छादिजे ॥ ७५
तयापरी तो धनुर्धरु । जाहलासे दुःखें जर्जरु ।
जैसा ग्रीष्मकाळीं गिरिवरु । वणवला कां ॥ ७६
म्हणोनि सहजे सुनीळु । कृपामृते सजळु ।
तो बोळला श्रीगोपाळु । महामेघु ॥ ७७
तेथ सुदर्शनांची द्युति । तेचि विद्युल्लता झळकती ।
गंभीर वाचा ते आयती । गर्जनेची ॥ ७८

**उपमा, उत्प्रेक्षा, रूपक इत्यादि अनेक अलंकारांचें वरील ओव्यांत दर्शन होतें.**

**पुढील उतारा आठव्या अध्यायांतील आहे. त्यांतील अलंकार रसिकांना आनंद देतीलच पण त्यांत दिलेलें शरीराचें वर्णन खरोखर मोठें मार्मिक आहे. माझ्या भक्तांच्या तनुत्यागाचें वेळीं त्यांची मी परिचर्या करतो, त्यांची सेवा सुश्रूषा करतों असें प्रथम श्रीकृष्ण सांगतात आणि नंतर त्यांना पुनर्जन्म होणार नाहीं, शरीरयातना सोसाव्या लागणार नाहींत हें सांगतांना त्या शरीराचें वर्णन करतात.**

मग क्लेशतरूची वाडी । ते तापत्रयाग्नीची सगडी ।
जे मृत्युकाकासि कुरोंडी । सांडिली आहे ॥ १४०
जें दैन्याचें दुभते । जें महाभयातें वाढवितें ।
जें सकळ दुःखाचें पुरतें । भांडवल ॥ १४१
जें दुर्मतीचें मूळ । जें कुमार्गाचें फळ ।
जें व्यामोहाचें केवळ । स्वरूपचि ॥ १४२
जें संसाराचें बैसणें । जें विकाराचें उद्यानें ।
जें सकळ रोगांचें भाणें । वाढिलें आहे ॥ १४३
जें काळाचा खिचउशिटा । जें आशेचा आंगवठा ।
जन्ममरणाचा वोलिंवटा । स्वभावें जें ॥ १४४
जें भुलीचें भरीव । जें विकल्पाचें ओतींव ।
किंबहुना पेंव । विंचवांचें ॥ १४५

जें व्याघ्राचें क्षेत्र। जें पण्यांगनेचें मैत्र।
जें विषयविज्ञानयंत्र। सुपूजित ॥ १४६
जें लाबेचा कळवळा। निवालिया विषोदकाचा गळाळा।
जें विश्वासु आंगवळा। संवचोराचा ॥ १४७
जें कोढियाचें खेंव। जें काळसर्पाचें मार्दव।
गोरियेचें स्वभाव। गायन जें ॥ १४८
जें वैरियाचा पाहुणेर। जें दुर्जनाचा आदर।
हें असो जें सागर। अनर्थाचा ॥ १४९
जें स्वप्नीं देखिलें स्वप्न। जें मृगजळें सासिन्नलें वन।
जें धूम्ररजांचें गगन। ओतले आहे ॥ १५०
ऐसें जें हें शरीर। तें ते न पवतीचि पुढती नर।
जे होउनी ठेले अपार। स्वरूप माझें ॥ १५१

**अशा प्रकारें वर्णनांची आणि अलंकारांची हवीं तितकीं मनोरम उदाहरणें ज्ञानेश्वरींत आहेत आणि त्यामुळें तत्त्वज्ञान हें जसें ज्ञानेश्वरीचें अंतरंग आहे त्याप्रमाणें उत्कृष्ट कवित्व हें तिचें बाह्यांग आहे आणि त्यामुळें तिची शोभा अतुल झालेली आहे.**

**८ आतां रत्नांप्रमाणें उज्ज्वल आणि सुंदर अशीं कित्येक ज्ञानदेवी वाक्यें पाहून आपण या मधुर विषयाचा निरोप घेऊं. शिव आणि शक्ति हे भिन्न नाहींत, एकच आहेत हें सांगतांना ( अमृतानुभव, १ ) म्हणतातः—**

स्त्रीपुरुष नामभेदें। शिवपण येकलें नांदे।
जग सगळें आधार्धे-। पणें जिहीं ॥ १७
दो दांडी येक श्रुति। दो फुलीं एक द्रुति।
दोहीं दिवीं दीप्ति। एकीच जैंवि ॥ १८
दो ओठीं येक गोठी। दो डोळां येकचि दिठी।
तेविं दोघीं जिहीं सृष्टि। एकीच जेवीं ॥ १९
गोडी आणि गुळु। कापूर आणि परिमळु।
निवडूं जातां पांगळु। निवाडु होये ॥ २३
समग्र दीप्ति घेतां। जैवीं दीपचि ये हाता।
तेविं जियेचिया तत्त्वतां। शिवाचि लाभे ॥ २४

जैसा सूर्यी मिरवे प्रभा । प्रभे सूर्यत्वचि गाभा ।
तेवीं भेद गिळीत शोभा । एकीच जे ॥ २५
कां बिंब प्रतिबिंबा द्योतक । प्रतिबिंब बिंबा अनुमापक ।
तैसें द्वैतमिसें येक । बरवतसे ॥ २६

**यांतील उपमा किती समर्पक व अर्थ स्पष्ट करणाऱ्या आहेत हें वाचक ध्यानांत घेतीलच. असो. गीता सांगून झाली व कृष्णानें अर्जुनाला आलिंगन दिलें त्या प्रसंगाचें वर्णन:--**

या कारणें पुढती । हे आधि न वाहे चित्तीं ।
मज येथासि ये सुमती । जाणोनि शरण ॥ ज्ञा. १८-१४१६
ऐसें सर्वरूपरूपसें । सर्वदृष्टिडोळसें ।
सर्वदेशनिवासें । बोलिले श्रीकृष्णें ॥ १४१७
मग सांवळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु ।
आलिंगिला स्वशरणु । भक्तराजु तो ॥ १४१८
न पवतां जयातें । काखे सूनि बुद्धीतें ।
बोलणें मागौते । वोसरलें ॥ १४१९
ऐसें जें कांहीं येक । बोला बुद्धीसीही अटक ।
ते द्यावया मिख । खेवाचें केलें ॥ १४२०
हृदया हृदय येक जालें । ये हृदयींचें ते हृदयीं घातलें ।
द्वैत न मोडितां केले । आपणाऐसें अर्जुना ॥ १४२१
दीपें दीपु लाविला । तैसा परिष्वंगु तो जाला ।
द्वैत न मोडितां केला । आपणपें पार्थु ॥ १४२२

**समजावून देण्याची धाटणी या दृष्टीनें तेराव्या अध्यायांतील अहंकार व बुद्धि यांचीं वर्णनें पहा. प्रथम अहंकार घेऊं.**

आणि जागतिये दशे । स्वप्न लपाले असे ।
ना तरी अंवसे । चंद्र गूढु ॥ ७७
नाना अप्रौढ बाळकीं । तारुण्य राहे थोकीं ।
कां न फुलतां कळिकीं । आमोदु जैसा ॥ ७८
किंबहुना काष्ठीं । वन्हि जेविं किरीटी ।
तेविं प्रकृतीचिया पोटीं । गोप्यु जो असे ॥ ७९

जैसा ज्वरु धातुगतु । अपथ्याचें मिष पहातु ।
मग जालिया आंतु–। बाहेरी व्यापी ॥ ८०
तैसी पांचांही गांठी पडे । जै देहाकारु उघडे ।
तै नाचवी चहूंकडे । तो अहंकारु गा ॥ ८१
नवल अहंकाराची गोठी । विशेषे न लगे अज्ञानापाठीं ।
सज्ञानाचे झोबे कंठा । नाना संकटी नाचवी ॥ ८२

**त्यानंतर "बुद्धि" हें तत्व समजावून सांगतात.**

आतां बुद्धि जे म्हणिजे । ते ऐशिया चिन्हीं जाणिजे ।
बोलिलें यदुराजें । तें आइकें सांगों ॥ ८३
तरी कंदर्पाचेनि बळें । इंद्रियवृत्तीचेनि मेळें ।
विभांडूनि येति पाळे । विषयांचे ॥ ८४
तो सुखदुःखांचा नागोवा । जेथ उगाणों लागे जीवा ।
तेथ दोहींसी बरवा । पाडू जे धरी ॥ ८५
हें सुख हें दुःख । हें पुण्य हे दोख ।
कां हें मैळ हें चोख । ऐसें जे निवडी ॥ ८६
जिये अधमोत्तम सुझे । जिये सानें थोर बुझे ।
जिया दिठी पारखिजे । विषो जीवें ॥ ८७
जे तेजतत्त्वाची आदि । जे सत्त्वगुणाची वृद्धि ।
जे आत्मया जीवाची संधि । वसवीत असे जे ॥ ८८
अर्जुना ते गा जाण । बुद्धि तूं संपूर्ण ।

**या ठिकाणीं ८८ ओवीतील शेवटच्या दोन ओळी विशेष लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. बुद्धीमुळें जीव आणि आत्मा यांचा संधि होतो, जीवाला आत्मतत्त्व उमजतें व त्याशीं एकरूप होता येतें. आणि म्हणून ज्ञानदेव हे बुद्धीला, विवेकाला महत्व देणारे म्हणजे Rationalist होते असें म्हणण्यास हरकत नाहीं.**

**पुढील वाक्यें ज्ञानेश्वरींतून घेतलेलीं आहेत.**

जै यमनियम ठाकती । तेथ इंद्रियें सैरा राहाटती ।
म्हणऊनि व्यभिचार घडती । कुळस्त्रियांसी ॥ १–२४९

**सध्यां नवनीतीच्या नांवाखालीं व्यभिचार हा शब्दच कोशांतून काढून**

**लावण्याचा प्रयत्न चालू आहे. पण व्यभिचाराचें मूळ यम नियम ठाकण्यांत, निष्क्रिय होण्यांत आहे, हें मान्य केलेंच पाहिजे.**

ना तरी महासिद्धिसंभ्रमें । जितला तापसु भ्रमें ।
मग आकळोनि कामें । दीनु कीजे ॥ १–२७०

**अर्जुनासारख्या थोर वीराला उपमा द्यावयाची ती क्षुद्र असतां कामा नये. येथें तापसाची उपमा फार समर्पक आहे.**

तूं जाणता तरी म्हणविसी । परी नेणिवेतें न सांडिसी ।
आणि शिकवूं म्हणों तरी बोलसी । बहुसाल नीति ॥ २–९२

**या ठिकाणीं**

अज्ञःसुखमाराध्यः सुखतरमाराध्यते विशेषज्ञः ।
ज्ञानलवदुर्विदग्धं ब्रह्मापि नरं न रंजयति ॥

**या भर्तृहरीच्या श्लोकाची आठवण होते.**

येथ नेणावया हेंचि कारण । जें इंद्रियां आधीनपण ।
तिहीं आकळिजे अंतःकरण । म्हणऊनि भ्रमे ॥ २–१११

**मनुष्यांत अज्ञान उत्पन्न होतें याचें कारण तो इंद्रियांच्या आधीन असतो हें होय. इंद्रियावर जय मिळवणें यांत माणुसकी आहे, त्यालाच संस्कृति म्हणतात.**

अर्जुना समत्व चित्ताचें । तोंचि सार जाण योगाचें ।
जेथ मन आणि बुद्धीचे । ऐक्य आथी ॥ २–२७३

**" ऐक्य आथी " याचा अर्थ ऐक्य आहे. योगाची ही व्याख्या जितकी यथार्थ तितकीच सुटसुटीत आहे.**

तोचि तूं जाण । योगनिष्ठेसी कारण ।
जयाचें विषयसुखें अंतःकरण । झकवेना ॥ २–३१६

**योग कोणाला साध्य होईल ? ज्याच्या अंतःकरणाला विषयसुख फसवूं शकणार नाहीं त्याला. त्याच अर्थाची आणखी एक ओवीः—**

म्हणोनि अयुक्तपण मनाचें । तोंचि सर्वस्व दुःखाचें ।
याकारणें इंद्रियांचें । दमन निकें ॥ २–३४७

**स्थितप्रज्ञाची थोडक्यांत व्याख्या दिलेली आहे.**

तैसीं इंद्रियें आपैतीं होती । जयाचें म्हणितलें करिती ।
तयाची प्रज्ञा जाण स्थिति । पावली असे ॥ २–३५३

**ज्याला ब्रह्मसुखाची गोडी मिळाली आहे तो ऋद्धिसिद्धींची परवा करीत नाहीं. त्याचें वर्णन करण्याचा थाट पहाः—**

देखे ऋद्धि सिद्धि तयापरी । आली गेली से न करी ।
तो विगुंतला असे अंतरीं । महासुखीं ॥ २–३६२
जो आपुलेनि नागरपणें । इंद्रभुवनातें पाबळें म्हणे ।
तो केवि रंजे पालिवणें । भिल्लांचेनि ॥ २–३६३
जो अमृतामी ठी ठेवी । तो जैसा कांजी न सेवी ।
तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धि ॥ २–३६४

**प्राप्त झालेल्या संपत्तीबद्दल दृष्टि काय असावी हें सांगतातः—**

हें संपत्तिजात आघवें । हवनद्रव्य मानावें ।
मग स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं ॥ ३–१३०

**आत्मज्ञानाचा विसर कां पडतो हें सांगतात.**

जे प्राणिया कामीं भरु । देहाचिवरी आदरु ।
म्हणोनि पडिला विसरु । आत्मबोधाचा ॥ ४–२०

**परमेश्वर अवतार घेऊन काय करतो व त्याचा अवतार झाला म्हणजे काय होते याचें वर्णनः—**

ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें । मी साकरु होऊनि अवतरें ।
मग अज्ञानाचें आंधारें । गिळूनि घाली ॥ ४–५१
अधर्माची अवधि तोडीं । दोषांची लिहिली फेडीं ।
सज्जनाकरवीं गुढी । उभवीं मी ॥ ४–५२
दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूंचा मान गिंवशीं ।
धर्मासी नीतीशीं । शेंस भरीं ॥ ४–५३
मी अविवेकाची काजळी । फेडूनी विवेकदीप उजळीं ।
तै योगियां पाहे दिवाळी । निरंतर ॥ ४–५४
सत्सुखें विश्व कोंदे । धर्मचि जगीं नांदे ।
भक्तां निघती दोंदें । सात्त्विकाचीं ॥ ४–५५
तै पापांचा अचळु फिटे । पुण्याची पहांट फुटे ।
जै मूर्ति माझी प्रगटे । पांडुकुमरा ॥ ४–५६

**सुभाषितांचे दोन चार नमुनेः—**

आवडी आणि लाजवी । व्यसन आणि शिणवी ।
पिसें आणि न भुलवी । तरी तें काई ॥ ६–१२४
पाहा पां अनुरागें भजे । जे प्रियोत्तमें मानिजे ।
ते पतीहुनि काय न वानिजे । पतिव्रता ॥ ६–१२९
तैसें आस्थेच्या महापूरीं । रिघताती कोटिवरी ।
परी प्राप्तीच्या पैलतीरीं । विपाइला निगे ॥ ७–१३
जें अपत्य थानीं निगे । तयाची भूक ते मातेसीचि लागे ।
एऱ्हवी तें शब्दें काय सांगे । मग स्तन्य दे येरी ॥ ८–१३
देखा बालकाचिया धणी धाइजे । कां शिष्याचेनि जाहलेपणें होइजे ।
हें सद्गुरूचि एकलेनि जाणिजे । कां प्रसवतिया ॥ ८–५५
आपुली तहानभूक नेणें । तान्हया निकें तें माउलीसिचि करणें ।
तैसें अनुसरले जे मज प्राणें । तयांचें सर्व मी करीं ॥ ९–३४०
म्हणोनि थोरपण पऱ्हां सांडिजे । एथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे ।
जैं जगा धाकुटें होइजे । तैं जवळीक माझी ॥ ९–३७८
जैसें बाळका लेवविजे लेणें । तें शृंगारातें काई जाणे ।
परी ते सुखाचे सोहळे भोगणें । माउलिये दिठी ॥ १०--५८
एऱ्हवीं तरी माझिया भक्तां । आणि संसाराची चिंता ।
काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ॥ १२-८५
नामरूपसंबंधु । जातिक्रियाभेदु ।
हा आकारासचि प्रवादु । वस्तूसि नाहीं ॥ १३–९०५
तरी विरक्तीवांचूनि कंहीं । ज्ञानासि तगणोंचि नाहीं ।
हें विचारूनि ठाईं । ठेविलें देवें ॥ १५-३६

**याप्रमाणें किती वचनें काढतां येतील त्यांना अंत नाहीं. ज्ञानदेवी वाङ्मयाच्या या उद्यानांत सुंदर, सुवासिक फुलांचें, फळांचें वैपुल्य आहे. त्यांत जितकें हिंडावें तितकें थोडेंच आहे, व त्यापासून मिळणारा आनंद विलक्षण आहे. तेव्हां कसल्याही क्रमाची अपेक्षा न करतां आणखी विस्तार न व्हावा म्हणून या विषयाचा येथेंच निरोप घेणें प्राप्त आहे.**

---

# भाग अकरावा

## ज्ञानदेवांची विचारसंपदा

खेचराचियाही मना । आणी सात्त्विकाचा पान्हा ।
श्रवणासवें सुमना । समाधि जोडे ॥ ज्ञा. १३-११५९
तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थैसीं विश्व भरूं ।
आनंदाचें आवारूं । मांडूं जगा ॥ ११६०
फिटो विवेकाची वाणी । हो काना मना जिणी ।
देखों आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ॥ ११६१
दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा ।
रिघो महाबोधसुकाळा-। माजीं विश्व ॥ ११६२

ज्ञानेश्वरीचा समारोप करतांना ज्ञानदेवांनीं म्हटलें आहे:—"तैसें अध्यात्मशास्त्रीं इये । अंतरंगचि अधिकारियें । परी लोक वाक्चातुर्यें । होईल सुखिया" त्यांपैकीं वाक्चातुर्याकडे मागील भागांत आपण थोडीशी नजर फेकिली. ग्रंथांतील अंतरंग हें ज्याला अधिकार असेल त्यालाच मिळणार असें त्यांनीं सांगितलें आहे. हा अधिकार म्हणजे काय याचेंही विवेचन आपणांस केलें पाहिजेच. त्या अंतरंगाकडे आपणांस वळावयाचें आहे. वाक्चातुर्यानें लोक सुखी होतील पण अंतरंगाच्या दर्शनानें ब्रह्मानंद होईल यांत संशय नाहीं. अंतरंगाकडे पाहातांना ज्ञानदेव हें कोणत्याही विशिष्ट पंथाचे नसून सर्व जगाचे आहेत ही दृष्टि प्रथम ठेविली पाहिजे आणि ज्ञानदेव काय म्हणतात हें कोणत्याही पंथाच्या चष्म्यांतून न पाहतां प्रत्यक्ष त्यांच्या ग्रंथाच्या अभ्यासानें पाहिलें पाहिजे. सर्वांना ज्ञान व्हावें म्हणून ज्ञानदेवांनीं "अमृताशीं पैजा" जिंकणारें वाङ्मय मराठींत लिहिलें व त्यांच्याच शब्दांच्या आधारानें त्या शब्दांचा व त्यापासून सूचित होणारा अर्थ आपण ओळखला पाहिजे व स्वतःला महाबोधसुकाळ केला पाहिजे.

ज्ञानदेवाच्या विचारसंपदेचा परिचय करून घेतांनाच त्यांची तत्त्वज्ञान-विषयक भूमिका समजून घेतली पाहिजे. ज्ञानदेव हे अद्वैत मताचे अनुयायी होते, योगमार्गांत प्रविष्ट झालेले होते, आणि भगवद्गीतेंत श्रीकृष्णानें अर्जुनाला

सांगितलेलें तत्त्वज्ञान आणि व्यवहारमार्ग यांना त्यांची पूर्ण संमति होती. योगासंबंधीं विस्तृत विवेचन मागें एका भागांत केलेलें आहे. त्या मार्गाची आणि अद्वैत सिद्धांताची व ज्ञानमार्गाची सांगड घातल्यावर पहिली गोष्ट स्पष्ट होते ती ही कीं ज्ञानदेव हे, जिला आंधळी भक्ति म्हणतात तिचें अवलंबन करा असें म्हणणारे नव्हते. ते अद्वैतमार्गाचे अनुयायी होते. अद्वैताचा यथातथ्य अर्थ आपण समजावून घेण्याचा प्रयत्न करूंच, पण सुरवातीला एवढें सांगणें योग्य होईल कीं हें जग व त्यांत चाललेला सर्व व्यवहार ही केवळ माया आहे, त्याशीं आपला खरोखर कांहीं संबंध नाहीं, तिकडे आपण पहाण्याची मुळींच आवश्यकता नाहीं, गृहस्थाश्रम सोडावा व संन्यास स्वीकारावा, आणि भ्रांतिमय जग टाकून गिरिकंदरीं ध्यानधारणेंत किंवा दिगंबर वृत्तींत काळ कंठावा, देह-विसर्जनानंतर मुक्ति गांठावी अशी मात्र त्यांची शिकवण नाहीं. समाजाला सामाजिक व्यवहारांतून दूर ओढून त्याला मोक्षमार्गाला लावण्यासाठीं निर्व्यवहार आणि निष्क्रिय बनवावयाचें या प्रकारास त्यांची यत्किंचितही संमति नाहीं. ज्या वेदांतानें राष्ट्राला दुर्बलता येते त्याचा उपदेश त्यांनीं कोणासही केलेला नाहीं; ज्ञानप्राप्तीनंतर निष्क्रिय व्हावें असें ते कोठेंही सांगत नाहींत; इहलोकांबद्दल त्यांची अनास्था नाहीं. "लोकसंस्था रक्षणीय सर्वथा" या तत्त्वाचा ते पूर्ण पुरस्कार करणारे आहेत. तेव्हां त्यांच्या विचाराची भूमिका आपण विचारपूर्वक लक्षांत घेतली पाहिजे.

"अमृतानुभव" या ग्रंथासंबंधीं आलेल्या भागांत ज्ञानदेवांची वेदांत-विषयक भूमिका स्पष्टपणें सांगण्याचा प्रयत्न केलेला आहे. जीव हा शिवरूप आहे व अज्ञानामुळें त्याला आलेलें जीवस्वरूप–ज्याला जन्म आहे आणि म्हणून मृत्यु आहे, ज्याला आकृति आहे आणि म्हणून विकृति आहे, त्याचा ज्ञानाच्या साहाय्यानें निरास करून त्याचें शिवरूपत्व पटणें यालाच अद्वैत सिद्धांत असें म्हणतात. सर्वांभूतीं परमेश्वर हें त्या सिद्धांताचें मराठींत लौकिक स्वरूप आहे. हा अद्वैत सिद्धांत वास्तविक अत्यंत बलदायक, स्फूर्तिदायक, उज्वल, पराक्रमाला साहाय्य करणारा असा आहे. तसा प्रयत्न होईल, तशी तपश्चर्या घडेल, तसा स्वार्थत्याग होईल, तसा परोपकार होईल, तसा यज्ञ होईल तर आपण परमेश्वरच आहोंत, परमेश्वराचें सामर्थ्य आणि ऐश्वर्य आपलेंच आहे अशी ज्या सिद्धांताची शिकवण आहे तो दुर्बलतेला कसा परिपोषक होईल?

जर दुर्बलतेचा प्रचार कोणी केला असेल तर ज्यांना हा सिद्धांत समजला नाहीं त्यांच्याच हातून तें पातक घडलेलें असणार. पण ज्यांना या अद्वैत सिद्धांताचें रहस्य समजलें तो ज्ञानदेवाची अमृतानुभवांतील पुढील ओवी मोठ्या उल्लसित अंतःकरणानें वरचेवर गुणगुणला तर त्यांत आश्चर्य नाहीं.

शिवा शिवा समर्था स्वामी । येवढीये आनंदभूमि ।
घेपे दीजे एकें आम्ही । ऐसें केलें ॥ ९–६५

आणि ज्ञानदेवाच्या विचारांची पार्श्वभूमि म्हणजे हा अद्वैत सिद्धांत आहे. त्याला जोड उत्कृष्ट अशा आत्मसंयमनाची, राजयोगाची मिळालेली आहे. त्याचें विस्तृत विवेचन योगमार्ग–पंथराज या भागांत केलेलें आहे. अद्वैत म्हणजेही साम्यावस्था–समःसर्वेषु भूतेषु, आणि योग म्हणजेही साम्यावस्था–समत्वं योग उच्यते, अशा प्रकारें अद्वैत सिद्धांत हें ज्ञान, योग हें कर्म आणि यासंबंधीं आस्था हीच भक्ति अशा या त्रयीयुक्त पार्श्वभूमीवर ज्ञानदेवाचें विचारसौंदर्य खुलून दिसतें.

आतां या विचारसंपत्तीचा कोष आपण स्वस्थ चित्तानें परिचित करून घेतला पाहिजे. चित्ताला अति हळुवारपणा आणूनच या कार्याला प्रवृत्त झालें पाहिजे. अर्जुनापुढें त्याचें कर्तव्य, युद्ध करणें, हें उभें होतें. तें कर्तव्य कठोर होतें. विचारानें तें निश्चित झालें होतें. पण प्रसंगच असा आला कीं विचारावर विकाराचा, भावनेचा, स्नेहाचा पगडा बसला. स्नेह आणि द्वेष या भावना निरनिराळ्या कालीं जें कर्तव्य करावयाचें असेल त्याप्रमाणें स्वीकारावयाच्या किंवा त्यागावयाच्या असतात. भलत्या वेळीं भलती भावना उत्पन्न होणें हें दुबळेपण आहे. रणांगणांत जाणूनबुजून उभें राहिल्यावर

हृदयाचें ढिलेपण । येथ निकयासी नव्हे कारण ॥

पण अर्जुनाचें हृदय ढिलें झालें. कारण त्याच्या त्या हृदयांत स्नेह उत्पन्न झाला, विचारावर विकाराचा अम्मल बसला आणि त्याचें ते क्षत्रियाचें, शिपायाचें अंतःकरण असूनही त्या विकारापुढें गडबडलें.

जें वज्रापासोनि कठिण । दुर्धर अतिदारुण ।
तयाहूनि असाधारण । हें स्नेह नवल ॥ १–१९९

अर्जुनाचें अंतःकरण हें वज्रापेक्षां कठिण होतें, दुर्धर होतें, अत्यंत दारुण होतें, पण त्या स्नेहवृत्तीनें, त्या भावनातिरेकानें त्याही अंतःकरणाला चीत केलें हें

केवढें आश्चर्य ! पण असें ढिलेपण त्या प्रसंगीं निकें नव्हते, बरोबर नव्हतें. शस्त्रक्रिया करण्यास उभ्या राहिलेल्या भिषग्वरानें अंतःकरण भावनार्त होऊ दिलें तर तो आपल्या कामाला अपात्र होईल. भावना याचसाठीं विचाराच्या स्वाधीन पाहिजे. अर्जुनालाही पटलें होतें कीं आपण कांहीं तरी प्रमाद करीत आहों, पण तो प्रमाद त्याला दिसत नव्हता; म्हणून तो म्हणतो,

तरी उचित काइ आम्हां । जें व्यभिचरेना धर्मा ।
तें झडकरी पुरुषोत्तमा । सांगे आतां ॥ २–६३

ही विनंति करतांना सुद्धां "जें व्यभिचरेना धर्मा" ही अट अर्जुन घालतो ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. अर्जुनाचीही इच्छा धर्माच्या बाबतींत व्यभिचार व्हावा, धर्माला म्हणजे कर्तव्यकर्माला सोडून वागावें, अशी नव्हती. तो धर्म हें काय हें मात्र त्या प्रसंगीं त्याला नीट समजलें नव्हतें; आणि त्याचें स्पष्टीकरण, त्याचें निःसंशय निरूपण, श्रीकृष्णानें केलें. धर्म अगदीं बरोबर कळला कीं माणसाचें निम्में अधिक काम होतें. श्रीकृष्णानें जें सांगितलें तें किती उत्कृष्ट होतें याचें वर्णन एका गोड उपमेच्या साहाय्यानें ज्ञानदेव करतात–

ना तरी असाध्य देखोनि व्याधि । वैद्य सूची निरवधि ।
अमृतासम दिव्य औषधी । निदानींची ॥ २–८६

तेव्हां ज्ञानदेवांनीं गीतेच्या आधारें केलेल्या उपदेशाची योग्यता निदानींच्या दिव्य औषधीप्रमाणें, अमृताप्रमाणें आहे. ज्ञान प्राप्त होण्याला योग्य मनोभूमिका म्हणजे फाजील शहाण्याची किंवा अर्धवट शहाण्याची नसून ती जिज्ञासूचीच पाहिजे.

तूं जाणता तरी म्हणविसी । परी नेणिवेतें न संडिसी ।
आणि शिकवूं म्हणों तरी बोलसी । बहुसाल नीति ॥ २–९२

तेव्हां अशा वृत्तीनें ज्ञान प्राप्त होत नाहीं. "प्रज्ञावादांश्च भाषसे" या श्लोकार्धावर वरील संपूर्ण ओवीची उभारणी झालेली आहे. हें नेणतेंपण, अज्ञान उत्पन्न कां होतें याचें कारणही, सुरवातीलाच सांगून टाकलेलें आहे व गीताधर्माचा आणि म्हणून ज्ञानदेवप्रणीत महाराष्ट्रधर्माचा हा अगदीं पाया आहे.

येथ नेणावया हेंचि कारण । जे इंद्रियां आधीनपण ।
तिहीं आकळिजे अंतःकरण । म्हणऊनि भ्रमे ॥ २–१११

आपण इंद्रियांच्या आधीन होणें, आपली विचारशक्ति गुंडाळून इंद्रियें सांगतील तें करणें, याला इंद्रियांचें आधीनपण म्हणतात. ह्याच्या तडाक्यांत जो सांपडला त्याचें व्यक्तिस्वातंत्र्य गेलें, व्यक्तित्वही गेलें. उपजतबुद्धि बळवत्तर आहे व सर्व माणसें तदधीन असतात ( तदधीन असावें असा आदेश मानल्यामुळें तो सिद्ध होत नाहीं ) पण तदधीन होणारीं माणसें सामान्य पशुत्वाच्या बाहेर नसतात. या उपजतबुद्धीवर आपलें म्हणजे आपल्या विचारशक्तीचें स्वामित्व प्रस्थापित करण्यांत मनुष्याचें माणूसपण किंवा माणुसकी आहे. आणि म्हणून "इंद्रियां आधीनपण" हें जें आपल्या नेणिवेचें कारण तें आपण नाहींसें केलें पाहिजे. "म्हणोनि हा अपभ्रंशु । विषयसंगु"; इंद्रियांच्या आधीन होणें, म्हणजे इंद्रियांचे जे विषय आहेत त्यांच्या आधीन होणें, आणि या आधीनपणालाच संग म्हणतात आणि निःसंगपणाला या विचारसरणींत इतकें महत्त्व आहे याचें कारण निःसंगपणा असणें म्हणजे संग नसणें, म्हणजे इंद्रियां आधीनपणा नसणें, हा आहे. म्हणूनच ज्ञानदेव ज्याप्रमाणें या आधीनपणाचा धिक्कार करतात त्याप्रमाणें आधुनिक कवींत नवीन विचारसरणीची प्रथा पाडणारे म्हणून प्रख्यात झालेले केशवसुतही

धरा जरा निःसंगपणा ।

हाच उपदेश करतात. शरीराच्या आधीन होतां उपयोगी नाहीं. शरीर आपल्या स्वाधीन असलें पाहिजे. श्रीकृष्णाच्या संपूर्ण शिकवणीचें सार तरी निःसंग होऊन, निरुपाधिक होऊन, निःस्वार्थ होऊन, कर्म करणें, कर्तव्य करणें, हेंच आहे. निःसंगपणाबरोबर दुसरें जें महत्त्वाचें तत्त्व सांगितलें आहे तें पुढील दोन ओव्यांत आहे.

या उपाधिमाजीं गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।
तें तत्त्वज्ञ संत । स्वीकारिती ॥ २–१२६
देखें सारासार विचारितां । भ्रांति ते पाहीं असारता ।
तरी सार तें स्वभावतां । नित्य जाणे ॥ २–१३३

उपाधि म्हणजे शरीर. त्या शरीराहून "आपण" म्हणून कांहीं तरी निराळें आहे व त्यालाच चैतन्य, परमेश्वरतत्त्व, शिवत्व असें नांव दिलेलें आहे. तें सार आहे, नित्य आहे, जन्ममरणापासून, विकृतीपासून अलिप्त आहे. बाकी जें उपाधियुक्त आहे तें असार आहे, भ्रांतिमय आहे, अनित्य आहे, विकृतीच्या

तडाख्यांत सांपडलेलें आहे. हें सर्व योग्य प्रकारें समजून घेणें यालाच सारासार विचार असें नांव दिलेलें आहे.

२ हें जन्ममृत्यूचें चक्र, रहाटगाडगें, सारखें चाललेलें आहे. त्यासंबंधीं विचार करण्याचें दोन मार्ग. एक, त्या बाबतींत आपणांला कांहीं निश्चित ज्ञान आहे असें गृहीत धरणें. शरीर ही उपाधि आहे. ती नष्ट झाली तरी त्याच्या आंत जें गुप्त असें चैतन्य आहे तें नष्ट होत नाहीं. पण हा विचार ज्यांना पटत नाहीं, खरोखर तसें आहे कीं नाहीं याबद्दल ज्यांना शंका आहे, त्यांच्यावर अर्थात् जबरदस्तीनें तो विचार लादणें योग्य नाहीं. तेव्हां दुसरा मार्ग पहावा लागतो. तो मार्ग म्हणजे अपरिहार गोष्टीचा शोक न करणें. पहिल्या मार्गाचें थोडक्यांत वर्णनः—

तैसें शरीराच्या लोपीं । सर्वथा नाशु नाही स्वरूपीं ।
म्हणऊनि तूं हे नारोपीं । भ्रांति बापा ॥ २–१४३
जैसी जीर्ण वस्त्रे सांडिजे । मग नूतनें आणिकें वेढिजे ।
तैसे देहांतरातें स्वीकारिजे । चैतन्यनाथें ॥ २–१४४
हा अनादि नित्यसिद्धु । निरुपाधि विशुद्धु ।
म्हणऊनि शस्त्रादिकीं छेदु । न घडे यदा ॥ २–१४५
हा गुणत्रयरहितु । व्यक्तीसी अतीतु ।
अनादि अविकृतु । सर्वरूप ॥ २–१५०

तेव्हां या देहाच्या उपाधीच्या आंत निरुपाधिक आत्मा आहे हा एक सिद्धांत; पण जेथें विचारस्वातंत्र्य आहे तेथें तो प्रत्येकाला पटेल असें नाहीं. त्यांच्यासाठीं दुसरा मार्ग सांगितला आहे.

अथवा ऐसा नेणसी । तूं अंतवंतचि मानिसी ।
तरी शोचूं न पवसी । पांडुकुमरा ॥ २–१५२
जो आदि स्थिति अंतु । हा निरंतर असे नित्यु ।
जैसा प्रवाहो अनुस्युतु । गंगाजळाचा ॥ २–१५३
म्हणोनि हें आघवें । येथ तुज नलगे शोचावें ।
जे स्थितीचि हे स्वभावें । अनादि ऐसी ॥ २–१५६

तेव्हां जन्ममृत्यूचा प्रवाह निरंतर चाललेला आहे, तो स्वाभाविक आहे, आणि तो थांबविणें आपल्या हातीं नाहीं. आणि हेंही नीटसें पटत नसेल तर शेवटीं

ना तरी हें अर्जुना । नयेचि तुझिया मना ।
जे देखोनि लोकु आधीना । जन्मक्षया ॥ २–१५७
तरी येथ कांहीं । तुज शोकासि कारण नाहीं ।
हे जन्ममृत्यु पाहीं । अपरिहर ॥ २–१५८

**म्हणजे एक आत्मतत्त्व परमेश्वर यांवर विश्वास; किंवा दुसरें, सृष्टीच्या नित्यक्रमावर विश्वास; किंवा तिसरें, जें चाललें आहे तें सर्व अपरिहर आहे, ही खात्री. या तिसऱ्या गोष्टीबद्दल कोणालाही शंका असण्याचें कारण नाहीं. जें झाल्याशिवाय रहात नाहीं व जें कोणत्याही प्रकारें आपल्या हातचें नाहीं ते अपरिहर. तेव्हां अपरिहर गोष्टीविषयीं विचारी माणसांनीं सुखदुःख करूं नये.**

उपजे तें नाशे । नासले पुनरपि दिसे ।
हें घटिकायंत्र जैसे । परिभ्रमे गा ॥ २–१५९

**किंवा "हे जन्ममरण तैसे । अनिवार जगीं" आणि म्हणून "हा न परिहरे । आदिअंतु"; पण आदि अंत आहे, विकृति आहे यांत कांहीं शंका नाहीं. आणि या विकृतीच्या, चंचलतेच्या, अशाश्वतेच्या पाठीमागें कांहीं तरी शाश्वत असावें अशी मनुष्याला तळमळ लागून राहिलेली आहे यांतही शंका नाहीं. तें काय आहे तें जोपर्यंत कळलेलें नाहीं तोपर्यंत तें अमुक आहे म्हणून सांगण्यांत अर्थ नाहीं. आणि म्हणूनच "यतो वाचो निवर्तते अप्राप्य मनसा सह" अशा प्रकारचे उद्गार बाहेर पडतात. पण अव्यक्त, स्थूल दृष्टीला म्हणजे आमच्याजवळ जी दृष्टि आहे तिला अव्यक्त, अशा त्या तत्त्वाचा शोध लावण्याची मात्र बुद्धिवान् माणसाला मोठी आकांक्षा आहे ही गोष्ट निर्विवाद आहे.**

जयाचि आर्तीचि भोगित । विषयीं त्यजिले संत ।
जयालागिं विरक्त । वनवासिये ॥ २–१७०
दृष्टि सूनि जयातें । ब्रह्मचर्यादि व्रतें ।
मुनीश्वर तपातें । आचरताती ॥ २–१७१

**संत, विरक्त आणि मुनीश्वर हे त्याचा शोध लावण्यांत निरनिराळ्या मार्गांनीं गुंतलेले आहेत. साध्या गोष्टीचा शोध लावण्याला देखील मनाची एकाग्रता, निःसंगता लागते; मग या सर्वांत महत्त्वाच्या विषयासंबंधीं विचार करण्याला संत, विरक्त आणि मुनीश्वर अशींच माणसें पाहिजेत हें सांगावयास नकोच.**

या अव्यक्ताचा शोध लावण्यासाठीं हीं मोठमोठालीं माणसें काय काय विलक्षण प्रयत्न करतात हेंही या ठिकाणीं श्रीकृष्णांनीं स्पष्ट केलेलें आहे; म्हणजे ज्ञानदेवांनीं केलेलें आहे. ते त्यांच्याच शब्दांत देतोः—

एक अंतरीं निश्चल । जे निहाळितां केवळ ।
विसरले सकळ । संसारजाल ॥ २–१७२
एकां गुणानुवादु करितां । उपरति होऊनि चित्ता ।
निरवधि तल्लीनता । निरंतर ॥ २–१७३
एक ऐकतांचि निवाले । ते देहभावीं सांडिले ।
एक अनुभवें पातले । तद्रूपता ॥ २–१७४

आणि या सर्वांचा परिणाम पुनरावृत्ति न होण्यांत, जन्ममृत्यूच्या यातायातींत पुनः न सांपडण्यांत व्हावयाचा असतो. हें जें अव्यक्त तें कोणत्या प्रकारचें असतें याबद्दल ज्ञानदेव निःशंक आहेत.

जें सर्वत्र सर्वही देहीं । जया करितांही घातु नाहीं ।
तें विश्वात्मक तूं पाहीं । चैतन्य एक ॥ २–१७७

विश्वात्मक असें एक तत्त्व आहे कीं ज्याला विकृति नाहीं, ज्याला निश्चलपणा आहे आणि त्यालाच चैतन्य हें नांव देतात. या तत्त्वाच्या गृहीत आस्तित्वावर जरी अद्वैत तत्त्वज्ञानाची आणि ज्ञानदेवांच्या तत्त्वज्ञानाची उभारणी झालेली आहे तरी त्याच्या स्वरूपाचा पूर्ण निर्धार होतो असें तेही म्हणत नाहींत. तथापि असें कांहीं तरी असावें असें गृहीत धरण्याची मनुष्याची प्रवृत्ति आहे हें निःसंशय. पण हें सर्व विवेचन मरणाची भीति नाहींशी करण्यासाठीं उपस्थित होतें. कोणत्या प्रकारें वागावें याचें शास्त्र या अव्यक्त तत्त्वावर किंवा व्यक्त देवतांवर ज्ञानदेव ठेवीत नसून ते आपल्या मनःस्थितीवर ठेवतात. म्हणून प्रत्यक्ष ज्ञानदेवांचें आदिकारणासंबंधीं कांहींही मत असलें तरी त्यांनीं आचार-तत्त्व त्या बाबतींत निरपेक्ष ठेविलेलें आहे व नीतिमत्तेची म्हणजे योग्य आचाराची सर्व इमारत वेदांत शास्त्राप्रमाणें कोणत्याही अव्यक्त तत्त्वावर किंवा शक्तीवर अवलंबून नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

यानंतर आणखी एका अतिशय महत्त्वाच्या तत्त्वाचा उपन्यास सुरवातीलाच करतात. तें तत्त्व म्हणजे "स्वधर्म" होय. स्वधर्म हा शब्द संस्कृतांत ज्या अर्थानें वापरतात तो अर्थ Religion या इंग्रजी शब्दांत नाहीं. स्वधर्म म्हणजे

हिंदुधर्म, महंमदीधर्म, खिस्तीधर्म असा अर्थ नव्हे. स्वधर्म किंवा धर्म म्हणजे माणसाचें निश्चित ठरलेलें कर्तव्य किंवा निरनिराळया परिस्थितींत विचारानें निश्चित होणारें कर्तव्य. विद्यार्थ्यांचें कर्तव्य अभ्यास करणें, म्हणजे त्याचा धर्म अध्ययन करणें हा होय. सैनिकाचा धर्म सेनापतीच्या आज्ञेप्रमाणें युद्ध करणें हा होय. अशा प्रकारें धर्म हा शब्द घेतलेला आहे. ज्याचा जो धर्म निश्चित झाला, मग तो कोणत्याही एक अथवा अनेक कारणांमुळें झालेला असो, तो धर्म, तें कर्तव्य, त्यानें पाळलें पाहिजे. अर्जुन युद्धांत पडला होता तो कांहीं कोणाच्या थापेला बळी पडून, फसून, पडलेला नव्हता. कौरवाशीं युद्ध करण्याच्या घनघोर प्रतिज्ञा त्यानें व त्याचा बंधु भीम यानें केलेल्या होत्या, तेव्हां युद्ध करणें हें त्याचें कर्तव्य होतें. शिवाय तो क्षत्रिय असल्यामुळें युद्ध हें त्याच्या पांचवीला पुजलेलें होतें. आणि म्हणून व्यक्त आणि अव्यक्त, चैतन्य आणि पुनर्जन्म, या सर्व गोष्टी बाजूला ठेविल्या तरी जें काम त्यानें करण्याचा पतकर घेतला होता आणि जें करणें त्याच्या वाट्याला आलेलें होतें तें त्यानें करणें, त्यांतून निसटून न जाणें, हें अत्यंत आवश्यक होतें. युद्ध म्हटलें कीं तेथें कृपाळुपणाला जागा नाहीं. शस्त्रवैद्याचा व्यवसाय ज्यानें पतकरला याला उठल्या सुटल्या कळवळा येऊं लागेल तर तो त्या कार्याला, व्यवसायाला नालायख होईल.

> तरी स्वधर्मु एक आहे । तो सर्वथा त्याज्य नोहे ।
> मग तरिजेल काय पाहें । कृपाळुपणें ॥ २-१८२
> अर्जुना तुझें चित्त । जरी जाहलें द्रवीभूत ।
> तरी हें अनुचित । संग्रामसमयीं ॥ २-१८३

क्षत्रियाचा पेशा पतकरल्यावर "द्रवीभूत" होण्याची संवय उपयोगी नाहीं. अंतःकरण कोमल असणें हा दोष नाहीं पण "संग्रामसमयीं" तें खचीत "अनुचित." गाईचें दूध उत्तम पण तें विषम ज्वरांत देतां उपयोगी नाहीं. प्रत्येक गोष्ट स्थलकालावलंबी आहे. आणि म्हणून "आनी आन करतां । नाशु होईल हिता" असा स्पष्ट इशारा श्रीकृष्ण अर्जुनाला देतात. हें कर्तव्य ओळखणें, धर्म निश्चित करणें हा खरोखर गीताशास्त्राचा अत्यंत महत्त्वाचा भाग आहे व त्याच अनुषंगानें तिला कर्मयोगशास्त्र हें नांव देतां येतें. अर्जुनानें संग्रामांत पाऊल टाकल्यावर लढणें हाच त्याचा धर्म होता. तें कसें लढावें.

त्या वेळीं मनःस्थिति कशी असावी, प्रत्येक कर्माच्या वेळींच मनःस्थिति काय असावी, याचें विवेचन गीताशास्त्रांत आहेच. पण सुरवातीची प्रस्तावना म्हणून श्रीकृष्ण सांगतातः—

निष्कपटा होआवें । उसिणां घाई झुंजावें ॥

निष्कपट अशी चित्तवृत्ति करून मोठ्या आवेशानें झुंजावें. पण झुंजलें पाहिजेच; कारण तो क्षत्रियाचा, या ठिकाणीं अर्जुनाचा, स्वधर्म आहे. स्वधर्मशून्य माणसाला, म्हणजे आपलें कर्तव्य न करणाऱ्या माणसाला, ज्ञानदेव उपमा काय देतात पहा:—

जैसी भातारेंहीन वनिता । उपहति पावे सर्वथा ।
तैशी दशा जीविता । स्वधर्मेंवीण ॥ २–१९९

वैधव्य आणि कर्तव्यच्युति यांची तुलना ज्ञानदेव करतात. त्याचा पूर्ण अर्थ ज्यांना हिंदु समाजांतील जुन्या काळच्या विधवेच्या करुणास्पद स्थितीची कल्पना आहे त्यांनाच कळेल. स्वधर्म हा लौकिक किंवा कांहीं विशिष्ट दृष्टीनें सदोष वाटला तरी तो निर्दोष आहे, निर्दोष वाटलाच पाहिजे. कारण स्वधर्मात जो दोष येतो तो हेतुकपणानें येतोः—

अमृतें तरीच मरिजे । जरी विखेंसीं सेविजे ।
तैसा स्वधर्मीं दोषु पाविजे । हेतुकपणें ॥ २-२२४

या ठिकाणीं उपमा देतांना जरा प्रमाद झाला आहे काय? अमृतांत विषाच्या परिणामाचा नाश करण्याची शक्ति असते. मग अमृतांत विष मिसळलें तर मरण कसें येईल? म्हणजे उपमान व उपमेय यांत जो सामान्य धर्म पाहिजे तो येथें अमृताच्या ठिकाणीं संभवत नाहीं. हेतुकपणा आणि विषयांची तुलना बरोबर आहे व तेवढीच येथें घ्यावी हेतुकपणा म्हणजे स्वतःचा हितसंबंध, स्वार्थ. स्वार्थाच्या पूर्ततेसाठीं स्वधर्म आचरणें म्हणजे सदोषता येते. स्वार्थ नसला कीं दोष गेला. शस्त्रवैद्यानें एखाद्या ठिकाणीं स्वार्थानें शस्त्रक्रिया केली तर परिणाम इष्ट होणार नाहीं तसें या ठिकाणीं समजावें. म्हणून

म्हणूनिया पार्था । हेतु सांडूनि सर्वथा ।
तुज क्षात्रवृत्ति झुंजतां । पाप नाहीं ॥ २–२२५

येथें अटी दोन. एक निःस्वार्थीपणा पाहिजे, अहेतुकपणा पाहिजे आणि दुसरें क्षात्रवृत्तीनें झुंजलें पाहिजे, पशुवृत्तीनें झुंजून चालणार नाहीं. झुंजण्याचेही नियम

आहेत ते जे मोडतात ते स्वार्थासाठीं किंवा पशुवृत्तीमुळें. या दोन्ही गोष्टी चालणार नाहींत. स्वधर्म पाळण्याचा, कर्तव्य करण्याचा, निर्दोष, चोख मार्ग पुढीलप्रमाणें:—

सुखीं संतोषा न यावें । दु:खीं विषादा न भजावे ।
आणि लाभालाभ न धरावें । मनामाजीं ॥ २–२२६
एथ विजयपण होईल । कीं सर्वथा देह जाईल ।
हे आधींचि कांहीं पुढील । चितावें ना ॥२–२२७
आपणयां उचिता । स्वधर्मे राहाटतां ।
जें पावें तें निवांता । साहोनि जावे ॥ २–२२८
ऐसेया मनें होआवें । तरी दोषु न घडे स्वभावें ।
म्हणोनि आतां झुंजावे । निभ्रांत तुवां ॥ २–२२९

असें निर्हेतुक मन करून झुंजावें, कर्तव्य करावें.

कर्माधारें तरीं राहाटिजे । परी कर्मफल न निरीक्षिजे ।
जैसा मंत्रज्ञु न बाधिजे । भूतबाधा ॥ २–२३४

या ओव्यांत तत्त्वज्ञान अपरंपार भरलेलें आहे.

३ हें सर्व यथास्थित होण्यास बुद्धीचा निश्चय पाहिजे, बुद्धि निश्चयात्मक पाहिजे. ही निश्चयात्मक बुद्धि म्हणजे केवळ इंद्रियांच्या इच्छेप्रमाणें वागून परतंत्र बनण्याची बुद्धि नव्हे तर सामान्य इंद्रियसुखापलीकडे कांहीं उच्च, अनिर्वाच्य सुख आहे त्या सुखाची प्राप्ति करून घेण्याची बुद्धि; तें सुख इंद्रियजयानें, शरीरावर आपलें स्वामित्व प्रस्थापित करूनच मिळणारें असतें आणि त्याच सुखाला, आनंदाला, ईश्वर असें नांव दिलेलें आहे. त्या अनुरोधानें पुढील ओव्या पहा:—

तैसी दुर्लभ ते जे सद्बुद्धि । जिये परमात्माचि अवधि ।
जैसा गंगेसी उदधि । निरंतर ॥ २–२४१
तैसें ईश्वरावांचूनि कांहीं । जिये आणीक लाणी नाहीं ।
ते एकचि बुद्धि पाहीं । अर्जुना जगीं ॥ २–२४२
येर ते दुर्मति । जे बहुधा असे विकरती ।
तेथ निरंतर रमती । अविवेकिये ॥ २–२४३

म्हणोनि तया पार्था । स्वर्ग संसार नरकावस्था ।
आत्मसुख सर्वथा । दृष्ट नाहीं ॥ २-२४४

**परमेश्वर, परमात्मा, आत्मसुख हे वेदांत शास्त्रांतील शब्द सामान्य लौकिक धर्मांपासून अगदीं स्वतंत्र आहेत आणि म्हणूनच गीतेच्या शेवटीं**

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।

**असें श्रीकृष्ण सांगतात व त्यावर व्याख्यान करतांना ज्ञानदेव म्हणतातः—**

तैसे स्वर्गनरकसूचक । अज्ञान व्यालें धर्मादिक ।
तें साडूनि घाली अशेख । ज्ञाने येणें ॥ १८-१३९१
तैसे धर्माधर्माचे टवाळ । दावी अज्ञान जें कां मूळ ।
तें त्यजूनि त्यजीं सकळ । धर्मजात ॥ १८-१३९५

**तेव्हां लौकिक धर्माधर्मांच्या कल्पनांपलीकडचे हें विवरण आहे हें स्पष्ट होतें. मग "वेदाज्ञा" वगैरे गोष्टींबद्दल काय करावयाचें? वेदांनीं, स्मृतींनीं पुराणांनीं, रूढींनीं घालून दिलेल्या मार्गांबद्दल काय करावयाचें? त्यासंबंधीं गीतेचा आणि ज्ञानदेवांचा अभिप्राय निःशंक आहे.**

वेदाधारें बोलती । केवळ कर्म प्रतिष्ठिती ।
परी कर्मफळीं आसक्ती । धरूनियां ॥ २-२४५
म्हणती संसारीं जन्मिजे । यज्ञादिक कर्म कीजे ।
मग स्वर्गसुख भोगिजे । मनोहर ॥ २-२४६
एथ हेंवांचूनि कांहीं । आणिक सर्वथा सुखचि नाहीं ।
ऐसें अर्जुना बोलती पाहीं । दुर्बुद्धि ते ॥ २-२४७
देखें कामनाअभिभूत । होऊनि कर्मे आचरत ।
ते केवळ भोगीं चित्त । देऊनियां ॥ २-२४८
क्रियाविशेषे बहुतें । न लोपती विधीतें ।
निपुण होउनी धर्मातें । अनुष्ठिती ॥ २-२४९
परि एकचि कुडें करिती । जे स्वर्गकाम मनीं धरिती ।
यज्ञपुरुषा चुकती । भोक्ता जो ॥ २-२५०
दैवें अमृतकुंभ जोडला । तो पायें हाणोनि उलंडिला ।
तैसा नासिती धर्मु निपजला । हेतुकपणें ॥ २-२५२

**तेव्हां लौकिक धर्मांला हेतुकपणाचें स्वरूप आहे व तें सदोष आहे; आणि म्हणून**

**आचरण निर्हेतुक, अहेतुक, निःस्वार्थी असलें पाहिजे हें कर्मयोगाचें रहस्य आहे. वेदाज्ञेच्या प्रश्नासंबधीं ज्ञानदेव स्पष्ट लिहितातः—**

जरी वेदें बहुत बोलिले । विविध भेद सूचिले ।
तरी आपण हित आपले । तेंचि घेपें ॥ २–२६०
जैसा प्रकटलिया गभस्ती । अशेषही मार्ग दिसती ।
तरी तेतुलेही काय चालिजती । सांगें मज ॥ २–२६१
तैसे ज्ञानी जे होती । ते वेदार्थातें विचारिती ।
मग अपेक्षित तें स्वीकारिती । शाश्वत जें ॥ २–२६३

**शहाण्या माणसानें वेदाज्ञेचा विचार करून (स्वतःच्या) बुद्धीनें अपेक्षित, इष्ट असेल तें करावें; पण तें शाश्वत स्वरूपाचें असावें. येथें कार्याची भूमिका उच्च आहे, 'मनःपूतं समाचरेत्' या वचनाच्या लौकिक अर्थाची ती नाहीं. वेदधर्मांतही सहेतुकपणा फार आहे, तोही टाळला पाहिजे, हें स्पष्ट केलेलें आहे; आणि वेदापेक्षां श्रेष्ठ असें हें आचरणशास्त्र पुढील ओव्यांत दिलेलें आहेः—**

आम्हीं समस्तही विचारिलें । तंव ऐसेंचि हें मना आलें ।
जे न सांडिजे तुवां आपुले । विहित कर्म ॥ २–२६५
परी कर्मफळीं आस न करावी । आणि कुकर्मी संगति न व्हावी ।
हे सत्क्रियाचि आचरावी । हेतूविण ॥ २–२६६
तूं योगयुक्त होउनी । फळाचा संगु टाकुनी ।
मग अर्जुना चित्त देउनि । करीं कर्मे ॥ २–२६७
अर्जुना समत्व चित्ताचें । तेंचि सार जाण योगाचें ।
जेथ मन आणि बुद्धीचें । ऐक्य आथी ॥ २–२७३

**योगाचें सार म्हणजे मन आणि बुद्धि यांचें ऐक्य म्हणजे मनावर बुद्धीचा ताबा. मन हें मोठें चंचल आहे तेव्हां तें बुद्धीनें आकळून घ्यावयाचें. फळहेतूचा अव्हेर मनानें केला, फळाचा हेतु मनांत नसला, म्हणजे बुद्धियोग साधला. बुद्धियोग म्हणजेच ज्ञानयोग. ज्ञानावर आधारलेलें कर्म झालें कीं त्या कर्मांत सदोषता म्हणून रहात नाहीं; व ज्ञानाची प्रत्यक्ष खूण म्हणजे अहेतुकता. जे या बुद्धियोगाचा आश्रय करतात.**

ते कर्मी तरी वर्तती । परी कर्मफळा नातळती ।
आणि यातायाती लोपती । अर्जुना तया ॥ २–२७८

मग निरामयभरित । पावती पद अच्युत ।
ते बुद्धियोगयुक्त । धनुर्धरा ॥ २-२७९

**आणखी अशा प्रकारें बुद्धियोगयुक्त झाल्यावर,**

इंद्रियांचिया संगती । जिये पसरु होतसे मती ।
स्थिर होईल मागुती । आत्मस्वरूपीं ॥ २-२८३
समाधिमुखीं केवळ । जै बुद्धि होईल निश्चळ ।
तै पावसी तूं सकळ । योगस्थिति ॥ ३-२८४

**आणि अशी निश्चळ योगस्थिति ज्याला प्राप्त झाली त्याला स्थितप्रज्ञ म्हणावयाचें. कर्में सर्व करावयाचीं तीं स्थितप्रज्ञतेनें करावयाचीं. योगस्थ होणें म्हणजे स्थितप्रज्ञ होणें ( हठयोगाच्या कसरतीनें स्थितप्रज्ञ होतां येत नाहीं ) आणि " योगस्थः कुरु कर्माणि " अशी गीतेची मुख्य शिकवण आहे. स्थितप्रज्ञाचीं लक्षणें दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीं दिलेलीं आहेत.**

तो कामु सर्वथा जाये । जयाचे आत्मतोषीं मन राहे ।
तोचि स्थितप्रज्ञु होये । पुरुष जाणे ॥ २-२९३
नाना दुःखीं प्राप्तीं । जयासी उद्वेगु नाहीं चित्तीं ।
आणि सुखाचिया आर्ती । अडपैजेना ॥ २-२९४
अर्जुना तयाच्या ठायीं । कामक्रोधु सहजें नाहीं ।
आणि भयातें नेणें कहीं । परिपूर्णु तो ॥ २-२९५
जो सर्वत्र सदा सरिसा । परिपूर्ण चंद्र कां जैसा ।
अधमोत्तम प्रकाशा- । माजीं न म्हणे ॥२-२९७
तैसीं इंद्रियें आपैतीं होती । जयाचें म्हणितलें करिती ।
तयाची प्रज्ञा जाण स्थिति । पातली असे ॥ २-३०२

**इंद्रियाला व मनाला ताब्यांत ठेवणें, स्थितप्रज्ञ होण फार कठीण आहे. इंद्रियांच्या बळकटपणाला कमी लेखण्याचें या ठिकाणीं मुळींच कारण नाहीं. त्या बळकटपणासंबंधीं पूर्ण इशारा ज्ञानदेव देतात.**

जयातें अभ्यासाची घरटी । यमनियमांची ताटी ।
जे मनातें सदा मुठी । धरूनि आहाती ॥ २-३११
तेही किजती कासाविसी । या इंद्रियांची प्रौढी ऐसी ।
जैसी मंत्रज्ञातें विवसी । भुलवी कां ॥ २-३१२

देखे विषय हे तैसे । पावती ऋद्धिसिद्धिचेनि मिषें ।
मग आकळती स्पर्शे । इंद्रियांचेनि ॥ २–३१३
तियें संधी मन जाये । मग अभ्यासीं थोंटावले राहे ।
ऐसें बळकटपण आहे । इंद्रियाचे ॥ २–३१४

**आणि म्हणून अशा मनाचें नियमन करून विषयांच्या तावडींत जो जात नाहीं तोच स्थितप्रज्ञ समजावा.**

तोचि तूं जाण । योगनिष्ठेसी कारण ।
जयाचें विषयसुखें अंतःकरण । झकवेना ॥ २–३१६

**तेव्हां विषयांचा नाद सोडण्यासाठीं व इंद्रियांवर ताबा मिळविण्यासाठीं प्रयत्न केला पाहिजे. विषयसंगापेक्षां उच्च सुख मिळालें म्हणजेच विषयांचा नाद जाईल. पण विषयांचा ध्यास घेऊन प्रथम काम उत्पन्न होतो; कामाची परिपूर्ति झाली नाहीं कीं क्रोध येतो, क्रोध आला कीं सारासारविचार जातो, संमोह उत्पन्न होतो; संमोहानें स्मृतिभ्रंश होतो; स्मृतिभ्रंश झाला कीं बुद्धि नाहींशी होते ( स्मृति हें बुद्धीचें महत्त्वाचें अधिष्ठान आहे ) आणि बुद्धि नाहींशी झाली कीं विनाश होतो असा हा क्रम दिलेला आहे. ज्ञानदेव म्हणतातः—**

तैसे विषयांचें ध्यान । जरी विपायें वाहे मन ।
तरी येसणें हें पतन । गिवसीत पावे ॥ २–३३०

**या विषयांच्या तडाक्यांतून सुटण्याचा मार्ग म्हणजे विषयसुखाहून श्रेष्ठ असें सुख आहे त्याची ओळख करून घेणें.**

तैसा इंद्रियार्थी उदासीन । आत्मरसेंचि निर्भिन्न ।
जो कामक्रोधविहीन । होऊनि असे ॥ २–३३४

**तेव्हां आत्मरसाची गोडी ज्यांनीं चाखली ते विषयसुखाला तुच्छ मानतात. आत्मसुख लाभलें म्हणजे,**

देखें अखंड प्रसन्नता । आथी जेथ चित्ता ।
तेथ रिगणें नाहीं समस्तां । संसारदुःखा ॥ २–३३८

**आणि यासाठीं इंद्रियदमन आवश्यक आहे.**

म्हणोनि अयुक्तपण मनाचें । तेंचि सर्वस्व दुःखाचें ।
या कारणें इंद्रियांचें । दमन निकें ॥ २–३४७

तैसीं इंद्रियें आपैती होती । जयाचें म्हणितलें करिती ।
तयाची प्रज्ञा जाण स्थिति । पावली असे ॥ २–३५३

अशा तऱ्हेचा स्थितप्रज्ञ मनुष्य ऋद्धिसिद्धि प्राप्त झाल्या तरी त्यांचा स्वीकार करीत नाहीं. योगशास्त्रांतील ऋद्धिसिद्धीची कल्पना ही आपणांस नित्य प्रत्ययाला येते. मनुष्य थोडा बहुत स्वार्थत्याग करतो, थोडीबहुत तपश्चर्या करतो आणि त्याला लौकिकांत थोडीबहुत मान्यता मिळते. या मान्यतेचा स्वार्थासाठीं उपयोग करून घेणारे, अर्थशास्त्राच्या भाषेंत या मान्यतेचें भांडवल करून ( To Capitalise ) त्यावर व्यवहार करणारे, प्राप्ति करून घेणारे, लोक असतात. अशा तऱ्हेची प्राप्ति करून देण्याला समर्थ असणाऱ्या ज्या शक्ति त्यांनाच पर्यायानें योगमार्गांत ऋद्धिसिद्धि म्हणतात. अशी प्राप्ति करून घेतली कीं त्या शक्तींचा क्षय होतो, लोकांना तें सोंग उमगतें. आणि म्हणून खरोखर जो सच्छील माणूस आहे तो अशी प्राप्ति करून घेत नाहीं, ऋद्धिसिद्धींच्या स्वाधीन जात नाहीं. स्थितप्रज्ञ पुरुषाला ऋद्धीसिद्धीमुळें होणाऱ्या प्राप्तीपेक्षां फारच मोठ्या अशा सुखाची, आनंदाची प्राप्ति झालेली असते आणि म्हणून या ऋद्धीसिद्धीपासून मिळणाऱ्या सुखाची त्याला परवा नसते. ज्याला मोठें सुख प्राप्त झालें आहे तो लहान सुखाची परवा कशाला करील? दुसऱ्या अध्यायांतील सत्तराव्या श्लोकावरील टीका ही ज्ञानदेवांची निर्मिति आहे. तींत स्थितप्रज्ञ पुरुषाचें वर्णन फार मनोरम केलेलें आहे.

पार्था आणीकही परी । तो जाणों येईल अवधारीं ।
जैसी अक्षोभता सागरीं । अखंडित ॥ २–३५७
जऱ्ही सरितावोघ समस्त । परिपूर्ण होऊनि मिळत ।
तरी अधिक नोहे ईषत् । मर्यादा न संडी ॥ ३५८
ना तरी ग्रीष्मकाळीं सरिता । शोषूनि जाती समस्ता ।
परी न्यून नव्हे पार्था । समुद्र जैसा ॥ ३५९
तैसा प्राप्तीं ऋद्धिसिद्धि । तयासि क्षोभु नाहीं बुद्धि ।
आणि न पवतां न बाधी । अधृति तयातें ॥ ३६०

आणि अशा तऱ्हेनें त्याला क्षोभ होत नाहीं, बाधा होत नाहीं याचें कारण ऋद्धिसिद्धीलाही देतां न येणाऱ्या अशा अद्भुत सौख्याची, ऐश्वर्याची त्याला प्राप्ति झालेली असते. त्यामुळें तो अल्प सुखाकडे ढुंकूनही पाहत नाहीं; बारीक

**चिरीमिरीची एखाद्या क्षुल्लक नोकराप्रमाणें त्याला अपेक्षा नसते. सार्वजनिक आयुष्यांत कांहीं महत्त्व प्राप्त झाल्यावर मग त्याच्या बलावर आपल्या मुलांबाळांना किंवा अगदीं निकट आप्तइष्टांना सरकारांत नोकऱ्या लावून देणारे हे ऋद्धिसिद्धीला भुललेले लोक; त्यांची योग्यता तेवढीच; ते खरे दरिद्री; " आधीं होता वाघ्या । मग झाला पाग्या । त्याचें येळकोट राहिना । मूळ स्वभाव जाईना " या वर्गांतले ते; पण स्थितप्रज्ञ हा सागराप्रमाणें स्वभावतः गंभीर आणि ऐश्वर्यवंत; पावसाळ्यांत त्याला पाणी चढत नाहीं आणि उन्हाळ्यांत तें कमी होत नाहीं; पावसाळा आणि उन्हाळा या बाह्य उपाधींनी त्याला विकृति होत नाहीं. स्थितप्रज्ञाला दिलेली ही सागराची उपमा फारच यथार्थ आहे. स्थितप्रज्ञ ऋद्धिसिद्धीला महत्त्व देत नाहीं; कारणः—**

सांगें सूर्याच्या घरीं । प्रकाशु काय वातीवरी ।
की न लाविजे तरी अंधारी । कोंडेल तो ॥ २–३६१
देखें ऋद्धिसिद्धि तयापरी । आली गेली से न करी ।
तो विगुंतला असे अंतरीं । महासुखीं ॥ ३६२
जो आपलेनि नागरपणें । इंद्रभुवनातें पाबळें म्हणे ।
तो केवीं रंजे पालिवणें । भिल्लाचेनि ॥ ३६३
जो अमृतासि ठी ठेवी । तो जैसा कांजी न सेवी ।
तैसा स्वसुखानुभवी । न भोगी ऋद्धि ॥ ३६४
पार्था नवल हें पाहीं । जेथ स्वर्गसुख लेखनीय नाहीं ।
तेथ ऋद्धिसिद्धि कायी । प्राकृता होती ॥ ३६५
ऐसा आत्मबोधे तोखला । जो परमानंदें पोखला ।
तोचि स्थितप्रज्ञु भला । वोळख तूं ॥ ३६६
तो अहंकारातें दंडुनी । सकळ काम सांडुनी ।
विचरे विश्व होउनी । विश्वामाजीं ॥ ३६७

**वर आलेल्या उपमा किती उचित आणि हृदयंगम आहेत व त्यावरून ज्ञानदेवांचें अलंकारांचें ऐश्वर्य केवढें विस्तीर्ण होतें हें रसिक जाणतीलच. याप्रमाणें दुसऱ्या अध्यायांत गीतेंतील सर्व विषयांचा उपन्यास करून मुख्य तत्त्वही बीजरूपानें कथन केलेलें आहे.**

**४ कर्म कोणाला सुटत नाहीं; तेव्हां प्रत्येकानें कर्म हें केलेंच पाहिजे; तें**

**विहित आणि धर्माला अनुकूल असें कर्म पाहिजे आणि तें योगस्थ वृत्तीनें केलें पाहिजे. कर्मांपासून अलिप्त रहाणें म्हणजे कर्मफलापासून अलिप्त रहाणें; कर्म न करणें असा त्याचा अर्थ नव्हे. पण कर्माकर्मांचा खरा अर्थ अर्जुनाला निःशंकपणें न समजल्यामुळें तो कर्तव्यापासून च्युत होऊं पहात होता. तिसऱ्या अध्यायाच्या सुरवातीला त्याची संशयित मनःस्थिति स्पष्ट दिसून येते आणि म्हणून तो विनंति करतोः—**

म्हणोनि आइकें देवा । हा भावार्थु आतां न बोलावा ।
मज विवेकु सांगावा । मऱ्हाठा जी ॥ ३–१७
मी अत्यंत जड असे । परी ऐसाही निकें परियेसें ।
श्रीकृष्णा बोलावें तुवा तैसें । एकनिष्ठ ॥ ३–१८

**एकनिष्ठ म्हणजे ज्याचा अर्थ एकच होतो असें. त्यावर श्रीकृष्णानीं ज्ञानयोग व कर्मयोग ( म्हणजे योग ) अशा दोन निष्ठा म्हणजे दोन मार्ग आहेत असें सांगितलें व दोन्ही मार्गांचें पर्यवसान एकच आहे,**

हे मार्गु तरी दोनीं । परी एकवटती निदानीं ॥

**हेंही स्पष्ट केलें. ज्ञानयोगांत योगी ज्ञानाचें अधिष्ठान करतो पण त्यामुळें तो कर्मांपासून पूर्ण अलिप्त राहतो असें मात्र नाहीं, जें कर्तव्य आहे तें केलेंच पाहिजे.**

कीं प्राप्तकर्म सांडिजे । येतुलेनि नैष्कर्म्य होईजे ।
हें अर्जुना वायां बोलिजे । मूर्खपणें ॥ ३–४६
म्हणोनि आइकें पार्था । जया नैष्कर्म्यपदीं आस्था ।
तया उचित कर्म सर्वथा । त्याज्य नोहे ॥ ३–५०

**निदान शरीराचीं कर्में तरी शरीर आहे तोपर्यंत चालावींच लागतात; तीं थांबत नाहींत; "म्हणोनि कर्म त्यागु नाहीं । प्रकृतिमंतां ॥ ( ३–५८ )" आणि ज्यांना शरीर आहे त्यांना प्रकृति आहेच-मात्र,**

तुं मानसा नियमु करीं । निश्चळु होय अंतरीं ।
मग कर्मेंद्रियें व्यापारीं । वर्ततु सुखें ॥ ३–७६

**तेव्हां नैष्कर्म्य होणें हें अशक्य आहे. निषिद्ध कर्म अर्थात् करावयाचें नाहीं;**

म्हणोनि जें जे उचित । आणि अवसरें करूनि प्राप्त ।
तें कर्म हेतुरहित । आचरें तूं ॥ ३–७८

**कर्मांचे हे दोन प्रकार लक्षांत ठेवले पाहिजेत. एक उचित; आणि अवसरेंकरून**

**प्राप्त झालेलें तें दुसरें. हे दोन्हीही स्वधर्मांत येतात. स्वधर्म करणें, आपलें उचित किंवा अवसरेंकरून प्राप्त झालेलें, नैमित्तिक कारणांनीं आवश्यक झालेलें कर्म यथासांग करणें, हाच सर्वोत्कृष्ट यज्ञ आहे व याच यज्ञानें देवता प्रसन्न होतील व आपलें कल्याण होईल; मूर्तिमंत दैव म्हणजे भाग्य तुम्हांला हुडकत येईल. पण तें कर्म कसें करावयाचें? पुनः सांगतातः—**

ऐसे समस्त भोगरहित । होआल तुम्ही अनार्त ।
जरी स्वधर्मनिरत । वर्ताल बापा ॥ ३–१०२

**भोगरहित व अनार्त होऊन आचरण होईल तरच भाग्य तुम्हांला शोधीत येईल. परंतु हा यज्ञ जर करावयास चुकाल,**

कां जालिया सकल संपदा । जो अनुसरेल इंद्रियमदा ।
लुब्ध होऊनिया स्वादा । विषयांचिया ॥ ३–१०३
अग्निमुखीं हवन । न करील देवतापूजन ।
प्राप्तवेळे भोजन । ब्राह्मणाचे ॥ ३–१०५
विमुख होईल गुरुभक्ती । आदर न करील अतिथि ।
संतोष नेदील ज्ञाती । आपुलिये ॥ ३–१०६
ऐसा स्वधर्मक्रियारहितु । आथिलेपणे प्रमत्तु ।
केवळ भोगासक्तु । होईल जो ॥ ३–१०७
तया मग अपावो थोर आहे । जेणे तें हातींचे सकल जाये ।
देखा प्राप्तही न लाहे । भोग भोगूं ॥ ३–१०८

**वरील वर्णनांत सहाशें वर्षांपूर्वींच्या गृहस्थाश्रमांतील "उचित व अवसरें करून प्राप्त" अशा कर्तव्यांची माहिती आहे. तत्त्व हें आहे कीं केवळ भोगासक्ती योग्य नाहीं; संपत्तीचा उपभोग घ्यावा, पण केवळ भोगासक्त नसावें, संपत्ति देवतांची म्हणजे दुसऱ्यांची आहे, तिचा सदुपयोग केला पाहिजे हें ओळखावें. पुढील अतिशय सुंदर ओवी संपत्तीसंबंधीं फार उत्कृष्ट तत्त्वाचें कथन करते.**

हें संपत्तिजात आघवें । हवनद्रव्य मानावें ।
मग स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं ॥ ३–१३०

**वर्गावर्गांत तंटेच झालें पाहिजेत या आडनांवी "साम्यवादा"पेक्षां हा साम्यवाद अधिक इष्ट आहे.**

१०

**आपलें प्राप्त कर्तव्य केलेंच पाहिजे याविषयीं श्रीकृष्णांचा फार कटाक्ष आहे.**

म्हणूनि समूळ हा उचितु । स्वधर्मरूप क्रतु ।
नानुष्ठी जो मत्तु । लोकीं इये ॥ ३-१३९
तो पातकांची राशी । जाण भार भूमीसी ।
जो कुकर्मे इंद्रियांसी । उपेगा गेला ॥ ३-१४०
म्हणोनि ऐकें पांडवा । हा स्वधर्म कवणें न सांडावा ।
सर्वभावें भजावा । हाच एकु ॥ ३-१४३
परिस पां सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची ।
खंती करिती कर्माची । ते गांवढे गा ॥ ३-१४५

**जे स्वतः कृतकार्य झालेले आहेत त्यांनीं सुद्धां लोकांना धडा घालून देण्यासाठीं, लोकांना सन्मार्ग शिकविण्यासाठीं विहित कर्माचें आचरण करीत रहावें.**

देखे प्राप्तार्थ जाहले । जे निष्कामता पावले ।
तयांही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं ॥ ३-१५५
मार्गीं अंधासरिसा । पुढें देखणाही चाले जैसा ।
अज्ञाना प्रकटावा धर्मु तैसा । जाणतेनि ॥ ३-१५६
येथ वडील जें जे करिती । तया नाम धर्मु ठेविती ।
तेंचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ॥ ३-१५८

**श्रीकृष्ण सांगतात कीं मी परिपूर्ण आहे, मला कांहीं मिळवावयाचें नाहीं, पण मीही लोकांना मार्गदर्शन होण्यासाठीं कर्माचरण करतों. लोकसंग्रह करणें आवश्यक आहे म्हणून सत्कर्म करीत राहिलें पाहिजे. लोकसंग्रह म्हणजे लोकांना गोळा करणें व तसें करण्यासाठीं लोकांच्या वेड्या वागण्याला पाठिंबा देणें असा अर्थ नव्हे. लोकसंग्रह म्हणजे लोकरक्षण. पुढील ओंव्या पहा.**

म्हणोनि समर्थु जो येथें । आणि लावी सर्वज्ञते ।
तेणे सविशेषें कर्मातें । त्यजावें ना ॥ ३-१६८
जे पुढतपुढती पार्था । हे सकळ लोकसंस्था ।
रक्षणीय सर्वथा । म्हणऊनियां ॥ ३-१७०
मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरें लावावें ।
अलौकिकां नोहावें । लोकांप्रती ॥ ३-१७१

**" अलौकिका नोहावें " म्हणजे, उदाहरणार्थ, मी ब्राह्मी स्थितींत आहें तेव्हां**

वाटेल तेवढ्या बायका आणून बाळगीन अशा विलक्षण गोष्टी बोलणें, असें न व्हावें. ब्राम्ही स्थितींतल्या माणसानें तर ( आणि जो लावी सर्वज्ञते ) विशेष शहाणपणानें वागावें अशी श्रीकृष्णाची स्पष्ट सूचना आहे. " तेथें सत्क्रियाची कावावी । तेचि एकी प्रशंसावी " असा त्यांचा आणि ज्ञानदेवांचा आदेश आहे. सत्क्रिया करतांना मात्र

तुवां शरीरपरा नोहावें । कामनाजात सांडावें ।
मग अवसरोचित भोगावें । भोग सकळ ॥ ३-१८८
म्हणूनि केवळ देहभरण । ते जाणें उघडो नागवण ।
यालागीं एथ अंतःकरण । देयावें ना ॥ ३-२०९

सर्व शिकवणीचें सार हें आहे कीं प्राप्त कर्तव्य, मग तें आपण आंगिकारलेलें असो कीं परिस्थितीनें आलेलें असो ( दोहोंचाही समावेश स्वधर्मांत होतो ) केलेंच पाहिजे, उत्तम प्रकारें केलें पाहिजे. तें कर्तव्य कडू असलें तरी केलें पाहिजे.

अगा स्वधर्म हा आपुला । जरी कां कठिणु जाहला ।
तरी हाचि अनुष्ठिला । भला देखे ॥ ३-३१९

स्वधर्मापासून च्युत होण्याला काम किंवा क्रोध हे मुख्य कारण होतात; त्यांचा अंमल आपल्यावर चालूं देतां उपयोगीं नाहीं; प्रत्येक कर्मांत कांहीं ना कांहीं तरी ( निरपेक्ष दृष्टीनें ) दोष काढतां येईल पण त्यामुळें तें कर्म दूषणीय ठरत नाहीं. हत्या ही वाईट म्हणून युद्ध हें हत्यात्मक असल्यामुळे वाईट असें तत्त्वज्ञान सांगतां येईल; पण कांहीं प्रसंग असे असतात कीं तेव्हां युद्धच केलें पाहिजे; म्हणून त्या प्रसंगीं युद्ध हें नुसतें दोषरहित नव्हे तर आवश्यक कर्तव्य असतें. हा सर्व सारासार विचार करूनच कर्तव्य ठरवावयाचें असतें. परिस्थितीचा संबंध तोडून नुसत्या तात्त्विक ज्ञानाच्या गोष्टी बोलणें हें तत्त्वज्ञान नसून त्याची चेष्टा आहे. भगवद्गीतेंतील उपदेश हा त्यामुळें व्यवहारांत कसें वागावें यासंबंधीं तत्त्वदर्शनाचा उपदेश आहे. त्यांत सर्वत्र " विवेकाची गोठी " सांगितलेली आहे. मनुष्याचें हित देहाच्या तावडींत गेल्यामुळें नष्ट होतें; त्याचें ज्ञानही त्याचमुळें नष्ट होतें.

जे प्राणिया कामीं भरु । देहाचिवरी आदरु ।
म्हणोनि पडिला विसरु । आत्मबोधाचा ॥ ४-२०

प्रत्यक्ष परमेश्वर म्हणून जी निरुपाधिक शक्ति वेदांतशास्त्रांत सांगितलेली

**आहे ती देखील लोकहितार्थ कर्माचरण करते, अवतार घेते; याचें कारण, धर्म, कर्तव्य मार्ग, हा वरचेवर पुसट होतो तो वरचेवर स्वच्छ करावा लागतो.**

जें धर्मजात आघवें । युगायुगीं म्यां रक्षावें ।
तैसा ओघ हा स्वभावें । आद्यु असे ॥ ४–४९
म्हणोनि अजत्व परतें ठेवी । मी अव्यक्तपणही नाठवीं ।
जे वेळीं धर्मातें अभिभवी । अधर्मु हा ॥ ४–५०
ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें । मी साकारु होऊनि अवतरें ।
मग अज्ञानाचे आंधारें । गिळूनि घाली ॥ ४–५१
अधर्माची अवधि तोडीं । दोषांचीं लिहिली फाडीं ।
सज्जनाकरवीं गुढी । उभवीं मी ॥ ४–५२
दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूंचा मानु गिवसीं ।
धर्मासी नीतीशीं । शेस भरीं ॥ ४–५३
मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळीं ।
तैं योगिया पाहे दिवाळी । निरंतर ॥ ४–५४
स्वसुखें विश्व कोंदे । धर्मचि जगीं नांदे ।
भक्ता निघती दोंदे । सात्त्विकांचीं ॥ ४–५५
तैं पापांचा अचळु फिटे । पुण्याची पहाट फुटे ।
जैं मूर्ति माझी प्रगटे । पांडुकुमरा ॥ ४–५६
ऐसिया काजालागीं । अवतरें मी युगींयुगीं ।
परी हेंचि वोळखे जो जगीं । तो विवेकिया ॥ ४–५७

**आणि हें परमेश्वराचें स्वरूप न ओळखतां जे अनेक देवांचा व तंत्रात्मक धर्मांचा डोंगर रचतात त्यांचा सर्वथा धिक्कार केलेला आहे. समाज ठीक चालावा म्हणून " गुणकर्मविभागशः " चार वर्ण निर्मिलेले आहेत असें श्रीकृष्ण सांगतात. " गुणकर्मविभागशः " या शब्दांत जन्माचा उल्लेख नाहीं व ज्ञानदेवही जन्माचा उल्लेख करीत नाहींत. असो. तेव्हां लोकहितार्थ, लोकसंग्रहार्थ म्हणजे लोकरक्षणार्थ परमेश्वर निरुपाधिक असूनही कर्माचरण करतो, कर्मभूमींत अवतार घेतो, तेव्हां कर्म हें केलेंच पाहिजे. पण कर्म म्हणजे काय हे मात्र समजावून घेतलें पाहिजे. तें पुनः सांगतातः—**

जया पुरुषाच्या ठायी । कर्माचा तरी खेदु नाहीं ।
परी फलापेक्षां कांहीं । संचरेना ॥ ४–१०३

**पण ही कर्में केल्यानंतर तीं ज्ञानाग्नीच्या मुखांत अर्पण करावयाचीं, म्हणजे कर्मशास्त्र जाणून फलापेक्षा धरावयाची नाहीं. कारण कर्मानें मिळणाऱ्या सुखापेक्षांही महासुखाची प्राप्ति ज्ञानी पुरुषाला झालेली असते. निरनिराळे यज्ञ आहेत पण कर्मफळ जाळून निरुपाधिक होणें हा ज्ञानयज्ञ सर्वांत श्रेष्ठ आहे.**

**या ज्ञानयज्ञाचें वर्णन अध्याय ४ (१३०–१३९) येथें रूपकाच्या साहाय्यानें फार उत्तम केलेलें आहे. हें ज्ञान प्राप्त करून घेण्याचा एक मार्ग सुचवितात—**

तें ज्ञान पैं बरवें । जरी मनीं आथी आणावें ।
तरी संतां यां भजावें । सर्वस्वेंसी ॥ ४–१६४

**आणि ज्ञान प्राप्त झालें म्हणजे सर्व मोहांधकार नाहींसा होईल.**

जरीं कल्मषाचा आगरु । तूं भ्रांतीचा सागरु ।
व्यामोहाचा डोंगरु । होऊनि असली ॥ ४–१७१
तरी ज्ञानशक्तीचेनि पाडें । हें आघवेंचि गा थोकडें ।
ऐसें सामर्थ्य असे चोखडें । ज्ञानी इये ॥ ४–१७२
देखें विश्वसंभ्रमाऐसा । जो अमूर्ताचा कडवसा ।
तो जयाचिया प्रकाशा । पुरेचिना ॥४–१७३
तया कायसे हे मनोमळ । हें बोलताचि अति किडाळ ।
नाहीं येणें पाडें ढिसाळ । दुजें जगीं ॥ ४–१७४

**आतां हें ज्ञान प्राप्त होण्यासाठीं आपली तयारी काय झाली पाहिजे ? कोणता मनुष्य ज्ञानाला पात्र होतो ?**

तरी आत्मसुखाचिया गोडिया । विटे जो कां सकळ विषयां ।
जयाच्या ठायीं इंद्रियां । मानु नाहीं । ४–१८६
जो मनासी चाड न सांगे । जो प्रकृतीचें केलें नेघे ।
जो श्रद्धेचेनि संभोगें । सुखिया जाहला ॥ ४–१८७
तयातेंचि गिंवसित । तें ज्ञान पावे निश्चित ।
जयामाजीं अचुंबित । शांति असे ॥ ४–१८८

**येथें श्रद्धा शब्दाचा अर्थ विवेकामुळें उत्पन्न झालेला निश्चय; अनिश्चय म्हणजे संशय. विषयाच्या तावडींत जो सांपडलेला आहे त्याला विवेक होत**

नाहीं, त्याचा निश्चय होत नाहीं, तो संशयात्मा होतो आणि " संशयात्मा विनश्यति. " जें समजत नाहीं तें समजलें नाहीं असें म्हणणारा तो संशयात्मा नव्हे; तो जिज्ञासु. संशयाचा नाश आंधळया श्रद्धेनें ( अंधश्रद्धेनें ) होत नाहीं. त्याला श्रीकृष्णांनीं सांगितलेलें औषध आजकाल " ब्राह्मी " स्थितीच्या गप्पा मारून दुराचरण करणाऱ्यांना पटणार नाहीं. पण सुज्ञांनीं तें लक्षांत ठेवावें.

ऐसा जरी ( संशय ) थोरावे । तरी उपायें एकें आंगवे ।
जरी हातीं होय बरवें । ज्ञानखड्ग ॥ ४–२०६

आणि ज्ञानखड्गाचें व अंधश्रद्धेचें सूत नाहीं हें सांगावयास नकोच. याप्रमाणें कर्म व ज्ञान यांचें महत्त्व चार अध्यायापर्यंत सुसूत्रपणें वर्णन केलेलें आपण पाहिलें.

५ ज्ञानमार्ग म्हणजे सर्वकर्मसंन्यास हा भ्रम आलीकडेच उत्पन्न झालेला आहे असें नसून तो प्रत्यक्ष अर्जुनालाही झाला होता. पांचव्या अध्यायाच्या सुरवातीला अर्जुन श्रीकृष्णाला विचारतोः—

मागां सकळ कर्मांचा संन्यासु । तुम्हींचि निरोपिला होता बहुवसु ।
तरी कर्मयोगीं केवीं अतिरसु । पोखीतसां पुढती ॥ ५–२
परी मागील असो देवा । आतां प्रस्तुतीं उकलु देखावा ।
सांगे दोहींमाजीं बरवा । मार्ग कवण ॥ ५–६

या प्रश्नाला श्रीकृष्णाचें उत्तर अगदीं स्पष्ट आहे. संन्यास व योग दोन्हीही " मोक्षकरु " आहेत; पण संन्यास हा ज्ञानी पुरुषालाच केवळ साध्य आहे.

तरी जाणांनेणां सकळां । हा कर्मयोगु कीर प्रांजळा ।
जैसी नाव स्त्रियां बाळां । तोयतरणीं ॥ ५–१६
तैसें सारासार पाहिजे । तरी सोहपा हाचि देखिजे ।
येणें संन्यासफळ लाहिजे । अनायासें ॥ ५–१७

" जाणां नेणां सकळां " कर्मयोगच ठीक हें ज्ञानदेवांचें मत आहे, कारण मूळ श्लोकांत हे शब्द नाहींत; दोहोंत कर्मयोग बरा, एवढेंच तेथें म्हटलेलें आहे. कर्मयोगाच्या ( म्हणजे कर्मठपणाच्या नव्हे, तर उचित कर्म, कर्तव्य, धर्म करण्याच्या ) मार्गानें संन्यासाचेंच फळ मिळतें ( निष्काम कर्म केल्यानें संन्यासाचें पुण्य लाभतें ) असा अभिप्राय ज्ञानदेवांनीं तेराव्या शतकांत दिलेला होता. तेव्हां गीतेचें रहस्य म्हणजे कर्मयोग हा शोध विसाव्या

**शतकांतला नव्हे हें उघड आहे. संन्यासी कोणाला म्हणावें याचा या ठिकाणीं पुनः खुलासा केलेला आहे. तांत्रिक संन्यासी म्हणजे मुंडन करून भगवें वस्त्र परिधान करणारा; पण श्रीकृष्णाला व ज्ञानदेवाला मान्य असा जो संन्यासी त्यानें**

आतां गृहादिक आघवें। तें कांहीं नलगे त्यजावें।
जे घेतें जाहलें स्वभावें। निःसंगु म्हणऊनी॥ ५-२२

**कारण या संन्याशाचें लक्षण लौकिक तंत्र नसून पुढील मंत्र आहे.**

तैसा असतेंनि उपाधि। नाकळिजे जो कर्मबंधी।
जयाचिये बुद्धी। संकल्पु नाहीं॥ ५-२४
म्हणोनि कल्पना जे सांडे। तैंचि गा संन्यासु घडे।
इये कारणें दोनी सांगडे। संन्यासयोगु॥ ४-२५

**अशा प्रकारें संन्यास, सांख्य, ज्ञान आणि कर्मयोग हे खरोखर एकच आहेत; "जे मूर्ख होती सर्वथा" तेच "म्हणती ते भिन्न" परंतु**

पै सम्यक् एणें अनुभवें। जिहीं देखिलें तत्त्व आघवें।
ते दोहींतेंही ऐक्यभावें। मानिती गा॥ ५-२८

**यांत कर्ममार्गाला उचलून धरून ज्ञानाला कमीपणा दिलेला आहे असें नाहीं परंतु "ऐक्य दोहींतें सहजें" हें स्पष्ट केलेलें आहे. कर्ममार्गानें, धर्मप्रतिपालनानें, कर्तव्य उचितपणें करण्यानें तरी ज्ञानाचाच रस्ता गांठावयाचा आहे; कारण कर्म कोणत्या वृत्तीनें करावें याचा खुलासा लक्षांत घेतला म्हणजे तशा कर्म करण्यानें ज्ञान होणारच.**

तैसें संकल्पेंनि काढिलें। जयाचें मनचि चैतन्य जाहलें।
तेणें एकदेशिये परीं व्यापिलें। लोकत्रय॥ ५-३६

**आणि अशी वृत्ति होऊन जो कर्म करतो त्याला योगयुक्त असें यथार्थपणें म्हणावयाचें**

ऐसें तनुत्यागेंवीण। अमूर्ताचे गुण।
दिसती संपूर्ण। योगयुक्ता॥ ५-३९
एऱ्हवीं आणिकांचियेपरी। तोही एक शरीरीं।
अशेषाही व्यापारीं। वर्ततु दिसे॥ ५-४०

तो कर्मे करी सकळें । परी कर्मबंधा नाकळे ।
जैसें न सिपे जळीं जळें । पद्मपत्र ॥ ५–५०
म्हणोनि सर्वत्र सदा सम । ते आपणची अद्वय ब्रह्म ।
हे संपूर्ण जाणें वर्म । समदृष्टीचे ॥ ५–९६

**आणि अशा प्रकारें समदृष्टीनें वागणाऱ्यांना आत्मसुख लाभतें आणि तें ज्याला लाभलें त्याला केवळ इंद्रियसुखाची परवा वाटत नाहीं.**

जिहीं आपणपें नाहीं देखिलें । तेचि इहीं इंद्रियार्थीं रंजले ।
जैसें रंकु कां आळुकैलें । तुषातें सेवी ॥ ५–११०

**विषयांचें सौंदर्य मूर्खांना फसवतें पण—**

हे विरक्तांचिये दिठी । जैं न्याहाळिजे किरीटी ।
तै पांडुरोगाचिये पुष्टी–। सारखें दिसे ॥ ५–११९

**शहाणे लोक त्या रस्त्याला जात नाहींत, ते योगयुक्त होतात. सहाव्या अध्यायांत प्रत्यक्ष योगमार्गाचें वर्णन करून तिकडे वळण्याची सूचना श्रीकृष्णांनीं अर्जुनाला केलेली आहे तो भाग "योगमार्ग-पंथराज" या प्रकरणांत पूर्वी येऊन गेलेला आहे.**

**सातव्या अध्यायांत ज्ञान आणि विज्ञान या दोन शब्दांचे अर्थ स्पष्ट केलेले आहेत. त्या संबंधीं पुढील दोन ओव्या लक्ष्यांत ठेवण्यासारख्या आहेत.**

तैसी जाणीव जेथ न रिघे । विचार मागुता पाउलीं निघे ।
तर्कु आयणी नेघे । आंगीं जयाच्या ॥ ७–५
अर्जुना तया नांव ज्ञान । प्रपंचु हें विज्ञान ।
तेथ सत्यबुद्धि तें अज्ञान । हेंही जाण ॥ ७–६
आतां अज्ञान अवघें हरपे । विज्ञान निःशेष करपे ।
आणि ज्ञान तें स्वरूपें । होऊनि जाइजे ॥ ७–७

**आत्मज्ञान, ब्रह्मज्ञान म्हणजे ज्ञान, सर्व प्रकारचें प्रापंचिक ज्ञान म्हणजे विज्ञान; प्रपंचाला सत्य, शाश्वत समजणें हें अज्ञान. ज्ञान मिळविणें हें सोपें नाहीं. ज्ञान मिळावें म्हणून इच्छा असणारे पुष्कळ आहेत.**

तैसे आस्थेच्या महापुरीं । रिघताती कोटिवरी ।
परीं प्राप्तीच्या पैलतीरीं । विपाइला निगे ॥ ७–१३

**आस्था पुष्कळांना असते, पण पुढची तपश्चर्या एखाद्यालाच होते आणि म्हणून**

ही गोष्ट सोपी नाहीं. यानंतर श्रीकृष्ण प्रकृतीचें वर्णन करतात व ती आठ प्रकारची कशी आहे हें समजावून सांगतात. या प्रकृतीमुळें लोकत्रय निर्माण होतें. आप, तेज, गगन, पृथिवी, वायु, मन, बुद्धि आणि अहंकार अशी आठ भागांची प्रकृति आहे.

या आठांची जे साम्यावस्था । ते माझी परम प्रकृति पार्था ।
तिये नाम व्यवस्था । जीव ऐसी ॥ ७–१९

हे आठ भाग साम्यावस्थेंत असले, एकमेकांना साहाय्यक असले कीं जीव निर्माण होतो. या जीवाच्या ठिकाणीं काम म्हणजे वासनारूप तत्त्व असते. त्यामुळें प्रपंचाचा विस्तार होतो. आणि पंचमहाभूतात्मक विनाशी जें विश्व त्याला ( विनाशित्वामुळें ) माया हें नांव दिलेलें आहे व या विनाशी विश्वापलीकडे शाश्वत जें तत्त्व तें आत्मतत्त्व होय. तेव्हां या विनाशी तत्त्वाच्या पलीकडे जाऊन शाश्वत जें आत्मतत्त्व तें आपण होणें म्हणजेच मोक्ष; अशी ही विचारपरंपरा आहे. या मायेवर एक मोठें विस्तृत व सुंदर असें नदीचें रूपक सातव्या अध्यायांत केलेलें आहे व या नदीला तरून पैलथडीला, मोक्षाला, मुक्त स्थितीला कोण पोहोंचतात हें त्यानंतर सांगितलेलें आहे.

येथें एकचि लीला तरले । जे सर्वभावें मज भजले ।
तयां ऐलीच थडी सरलें । मायाजळ ॥ ७–९७
जया सद्गुरुतारूं फुडे । जे अनुभवाचे कासे गाढे ।
जयां आत्मनिवेदन तराडें । आकळलें ॥ ७–९८
जे अहंभावाचे ओझें सांडुनी । विकल्पाचिया झुळका चुकाऊनि ।
अनुरागाचा निरुता होउनी । पाणिढाळु ॥ ७–९९
जया ऐक्याचिया उतारा । बोधाचा जोडला तारा ।
मग निवृत्तीचिया पैलतीरा । झेंपावले जे ॥ ७–१००
ते उपरतीच्या वांवीं सेलत । सोहंभावाचेनि थावें पेलत ।
मग निघाले अनकळित । निवृत्तितटीं ॥ ७–१०१
येणें उपायें मज भजले । ते हे माझी माया तरले ।
परी ऐसे भक्त विपाइले । बहुवस नाहीं ॥ ७–१०२

असे माया तरणारे भक्त थोडे फार मिळत नाहींत. भक्तांचे चार प्रकार या अध्यायांत सांगितलेले आहेत. आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी आणि ज्ञानी. त्यांच्या व्याख्या;

तेथ आर्त तो आर्तीचेनि व्याजें । जिज्ञासु तो जाणावयालागीं भजे ।
तिजेनि तेणें इच्छिजे । अर्थसिद्धि ॥ ७–११०
मग चौथियाच्या ठायीं । कांहींचि करणें नाहीं ।
म्हणोनि भक्तु एकु पाहीं । ज्ञानिया जो ॥ ७–१११

**आणि ज्ञानी भक्त होण्याला अनेक जन्म घ्यावे लागतात; म्हणजे ज्ञानी होणें हें सोपें नाहीं; पुष्कळ प्रयत्नानें, मोठ्या तपश्चर्येनें ज्ञानी होतां होतें. भजन पुष्कळ करतात; परंतु त्यांची स्थिति ज्ञानयुक्त नसते म्हणून ते फुकट जातात.**

येर बहुत जोडिती किरीटी । जयांचीं भजनें भोगासाठीं ।
जे आशातिमिरें दिठी । विषयांध जाले ॥ ७–१३८
आणि फळाचिया हांवा । हृदयीं कामा जाला रिगावा ।
कीं तयाचिये घसणी दिवा । ज्ञानाचा गेला ॥ ७–१३९

**तेव्हां " भोगासाठीं भजनें " करणाऱ्यांना ज्ञानप्राप्ति होत नाहीं, मोक्ष मिळत नाहीं हेंही सातव्या अध्यायांत स्पष्ट केलेलें आहे. आठव्या अध्यायाचें नांव अक्षरब्रह्मयोग असें आहे व त्यांत अक्षर, निश्चल, अविनाशी अशा ब्रह्माचें वर्णन आहे. पण त्याशिवाय या अध्यायांत एक महत्त्वाचा विषय आहे. मरणाच्या वेळीं देवाचें नांव मुखांतून निघालें कीं मनुष्य सद्गतीला जातो या समजुतीची सांगोपांग चर्चा ज्ञानदेवांनीं या अध्यायांत केलेली आहे व तीची ओळख आपण करून घेतली पाहिजे. गीतेंत यासंबंधीं मूळ श्लोक पुढीलप्रमाणें आहे.**

अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।
यःप्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५

**मरणकालीं माझेंच स्मरण करून शरीर सोडून जो जातो तो माझ्याच स्वरूपीं जातो यांत शंका नाहीं, असा या श्लोकाचा अर्थ आहे; व त्याप्रमाणें मरणाच्या काळीं देवाचें नांव तोंडांत आलें कीं मोक्ष मिळतो असें कोणी कोणी समजतात. मुलग्याचें गांव नारायण किंवा कुत्र्याचें नांव नारायण असलें आणि जन्मभर कांहींही पाप करून मुलाला किंवा कुत्र्याला हाक मारण्याच्या मिषानें " नारायण " हा शब्द जर मरणकाळीं मुखांतून बाहेर पडला तर मुक्ति मिळते अशीही समजूत वरील श्लोकाधारानें पुष्कळांनीं करून घेतलेली दिसते. पण या बाबतींत ज्ञानदेवांचा निर्णय लक्षांत ठेवण्यासारखा**

आहे. भलत्याच्या मुखीं देवाचें नांव येऊन चालत नाहीं, ज्याच्या मुखीं तें येईल तो खरोखर उत्तम, भक्त, योगस्थ, असा असला पाहिजे असा त्यांच्या म्हणण्याचा आशय आहे.

जें आतांचि सांगितले द्वोतें । अगा अधियज्ञ म्हणितला जयातें ।
जे आदीचि तया मातें । जाणोनि अंतीं ॥ ८–५९
ते देह झोळ ऐसे मानुनी । ठेले आपणपें आपण होउनी ।
जैसा मठ गगना भरुनी । गगनींचि असे ॥ ८–६०
ये प्रतीतिचिया माजघरीं । तया निश्चयाची वोवरी ।
आली म्हणोनि बाहेरीं । नव्हेचि से ॥८–६१
तैसा आकार हा आहाच भ्रंशे । वांचूनि वस्तु ते सांचलीचि असे ।
तेचि बुद्धि जालिया विसुकुसे । कैसेनि आतां ॥ ८–६७
म्हणोनी यापरी मातें । अंतकाळीं जाणत सांते ।
जे मोकलिती देहातें । ते मीचि होती ॥ ८–६८

तेव्हां याप्रमाणें देवाला जाणणारे आणि हें जाणून अंतकाळीं त्याला स्मरणारे "मीचि होती" असा या श्लोकाचा अर्थ ज्ञानदेव करतात, "येरा गबाळां"ना ते बिलकुल थारा देत नाहींत. ज्ञानदेव अंधभक्तीचे पुरस्कर्ते नव्हते, याचा हा आणखी एक पुरावा आहे. श्रीकृष्ण पुढें सांगतात

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युद्ध्य च ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयः ॥ ७

परंतु याप्रमाणें जे नेहेमींच देवाचें याप्रमाणें स्मरण करतात त्यांनी मरणाच्या वेळीं निराळें तांत्रिक स्मरण करण्याची आवश्यकता नाहीं. कोण भक्त आणि कोण दांभिक हें देवाला समजतें (कारण तो सर्वज्ञ आहे) आणि भक्ताची काळजी देव वाहतो व भक्तानें विचारण्यापूर्वीं त्याला जें पाहिजे असेल तें तो देतो

म्हणोनी देहांतीचें सांकडें । माझीया कहींचि न पडे ।
मी आपुलीयातें आपुलीकडे । सुखेंचि आणीं ॥ ८–१३४

या अध्यायांत मरणकालासंबंधीं तांत्रिक विवेचन बरेंच आहे तें अर्थात् वरील वचनाप्रमाणें जे खरोखर भक्त आहेत त्यांना लागू नाहीं. मग तें तांत्रिक वर्णन इतक्या विस्तारानें कां दिलें आहे हा प्रश्न निघतो. त्याची चर्चा येथें करण्याची

आवश्यकता नाहीं. ज्ञानदेवांनीं या श्लोकांवर जें भाष्य केलें आहे त्यावरून त्यांचें या बाबतींत मत स्पष्ट झालेलें आहे.

नववा अध्याय हा गीतेंतील फार महत्वाचा अध्याय आहे. राजविद्या-राजगुह्ययोग हें त्याचें यथार्थ नांव आहे. सर्व विद्यांत श्रेष्ठ ती राजविद्या; सर्व गुह्यांत श्रेष्ठ गुह्य तें राजगुह्य. या राजविद्येप्रमाणें पाहिलें तर आत्मसुख अत्यंत श्रेष्ठ; मग माणसांनीं तें टाकून काय म्हणून दिलें ?

जे एकोत्तरेयाचिया वाढी । जळतिये आगीं घालिती उडी ।
ते अनायासे स्वगोडी । सांडिती केवीं ॥ ९–५४

व्याज ज्यास्ती मिळावें म्हणून जळत्या आगींत उडी घालण्याइतके जे लोभी त्यांनीं अनायासानें मिळणारें हें आत्मसुख (स्वगोडी) काय म्हणून दूर लोटलें ? अशी शंका यावी हें स्वाभाविक आहे. त्याचें उत्तर "गाढवाला गुळाची चव काय" अशा प्रकारचें दिलेलें आहे. ज्ञानदेवांनीं आपल्या डौलदार अलंकारिक भाषेनें हें उत्तर दिलेलें आहे.

पाहें पां दूध पवित्र आणि गोड । पासीं त्वचेचिया पदराआड ।
परि ते अव्हेरूनि गोचिड । अशुद्ध काय न सेविती ॥ ९–५७
का कमलकंदा आणि दर्दुरीं । नांदणूक एकेचि घरी ।
परि परागु सेविजे भ्रमरीं । येरां चिखलुचि उरे ॥ ९–५८
तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्व सुखाचा आरामु ।
कीं भ्रांतासि कामु । विषयावरी ॥ ९–६०

प्रपंच नाहीं असें नाहीं, पण तो शाश्वत नाहीं म्हणजेच मायामय, विकृतिमय आहे हें समजून वागावें हा नवव्या अध्यायांतील मुख्य आदेश आहे, त्याच-प्रमाणें परमेश्वराच्या रूपाबद्दल भलभलत्या समजुती करून घेणाऱ्यावरही या अध्यायांत कडक टीका आहे.

मज अकुळाचे कुळ वानिती । मज नित्याचे निधनें शिणती ।
मज सर्वांतरातें कल्पिती । अरि मित्र गा ॥ ९–१६६

ज्ञानदेव हे कर्मठपणाविरुद्ध बंड करणाऱ्यांपैकीं होते हें निःसंशय आहे.

जे श्रुतित्रयातें जाणोनी । शतवरी यज्ञ करोनी ।
यजिलिया मातें चुकोनी । स्वर्गा वरिती ॥ ९–३१०

अशा लोकांचा श्रीकृष्णमुखानें ज्ञानदेव धिःकार करतात. "धर्माधर्मांचे

**टवाळ" "स्वर्गनरकसूचक" धर्म इत्यादि अठराव्या अध्यायांतील शब्द प्रयोगा-वरूनही हेंच स्पष्ट होतें. लौकिक पुण्याला त्यांनीं "पापरूप पुण्य" असें नांव दिलेलें आहे.** ( ९–३१९ )

येर मातें नेणोनि भजन । ते वायांचि गा आनेआन ।
म्हणोनी कर्माचे डोळे ज्ञान । तें निर्दोष होआवें ॥ ९–३५०

**ज्ञान निर्दोष पाहिजे म्हणजे कर्म निर्दोष होतें. ज्ञानयुक्त कर्म हा गीताशास्त्राचा निष्कर्ष आहे व तोच निष्कर्ष ज्ञानदेव अधिक स्पष्टपणानें पुरस्कृत करतात. बाह्य तंत्राला ते महत्त्व देत नाहींत. भक्ति म्हणजे सर्वां भूतीं समत्वाचें आचरण; व ती खरी भक्ति ज्याच्या जवळ आहे तो भक्त आणि अशा भक्तानें "पत्रं पुष्पं फलं तोयं" एवढें जरी मला दिलें तरी तें पुरें आहे असें श्रीकृष्ण स्पष्ट सांगतात. केवळ पाणी देणाऱ्या भक्तानें सुद्धां**

तेणें वैकुंठापासोनि विशाळे । मजलागीं केलीं राउळें ।
कौस्तुभाहोनि निर्मळे । लेणीं दिधलीं ॥ ९–३८९
दुधाचीं सेजारें । क्षीराब्धीऐसीं मनोहरें ।
मजलागीं अपारें । सृजिलीं तेणें ॥ ९–३९०
कर्पूर चंदन अगरु । ऐसेया सुगंधीचा महामेरु ।
मज हातिवा लाविला दिनकरु । दीपमाळे ॥ ९–३९१
गरुडासारखीं वाहनें । मज सुरतरूंचीं उद्यानें ।
कामधेनूंचीं गोधनें । अर्पिलीं तेणें ॥ ९–३९२

**अशा प्रकारें "भक्त" होऊन कोणासही मोक्ष मिळतो; तेथें वर्ण, जाति, वगैरेचा संबंध नाहीं हीही गोष्ट याच अध्यायांत पुढें स्पष्ट केलेली आहे.**

म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा अकारण ।
येथ अर्जुना माझेपण । सार्थक एक ॥ ९–४५६
तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अंत्यजादि इया ।
जाती तंवचि वेगळालिया । जंव न पवती मातें ॥ ९–४६०

**"माझेपण" या शब्दाचा संपूर्ण अर्थ वाचकांनीं लक्षांत घ्यावा. उत्तम आचरण, परोपकार, "भूतांची दया," सर्वां भूतीं समभाव, ही भक्तीचीं लक्षणें आहेत; हीं जवळ असणें म्हणजे माझेपण; तांत्रिक देवदेवतार्चन म्हणजे "माझेपण" नव्हे; आणि हें माझेपण मिळविणें हें प्रत्येक सुज्ञाचें कर्तव्य;**

हाच खरा धर्म; "सर्वधर्मान्परित्यज्य" याच धर्माचें पालन केलें पाहिजे; आणि हें पालन करणें म्हणजे परमेश्वराचें भजन करणें; श्रीकृष्ण विचारतात,

अगा मातें न भजावयालागीं । कवण बळ पां आपुलिये आंगीं ।
काइ घरीं कीं भोगीं । निश्चिंती केली ॥ ९-४९३

पण माणसांचें वेडेपण अगाध आहे, कधीं कधीं जाणूनबुजून तो सत्य सोडतो, असत्याला कवटाळतो.

गीतेंतील सर्व मुख्य विषयांची शिकवण खरोखर पूर्वार्धांतच आहे. त्याचाच विस्तार पुढील नऊ अध्यायांत केलेला आहे. दहाव्या अध्यायाचें नांव विभूतियोग आहे. अकराव्या अध्यायांत विश्वरूपदर्शनाचा विस्मयकारक प्रसंग आहे. बाराव्या अध्यायांत भक्तीचें वर्णन केलेलें आहे. नवव्या अध्यायाप्रमाणें तेरावा अध्याय फार महत्वाचा आहे. त्यांत ज्ञानलक्षणांचें सविस्तर वर्णन ज्ञानदेवांनीं केलेलें आहे व अज्ञानलक्षणेंही स्पष्ट केलेलीं आहेत. चौदाव्या अध्यायांत सत्वरजस्तम या गुणत्रयांचें वर्णन आहे. पंधराव्या अध्यायांत परमेश्वर म्हणजे पुरुषोत्तम ही कल्पना उत्तम प्रकारें व्यक्त केलेली आहे. सोळाव्या अध्यायांत दैवी आणि आसुरी संपत्ति यांचें वर्णन केलेलें आहे. सतराव्या अध्यायांत गुणाप्रमाणें श्रद्धात्रय कल्पून त्यांचें विस्तारानें वर्णन आहे, अठराव्या अध्यायांत सर्व गीतेचा सारांश आणून संन्यास व त्याग यांतील भेद स्पष्ट करून फलहेतुरहित कर्म म्हणजेच ज्ञानयुक्तकर्म हाच खरा त्याग व उत्तम संन्यास हें सांगितलेलें आहे व हाच गीतेचा मुख्य संदेश आहे.

६ ज्ञानेश्वरी हा भगवद्गीतेवर लिहिलेला स्वतंत्र ग्रंथ आहे हें पूर्वीं आम्ही सांगितलेंच आहे. बाराव्या अध्यायापासून तर ज्ञानदेवांनीं स्वतःचें म्हणणें विस्तारानें स्पष्ट केलेलें आहे. गीतेंत जेथें जेथें तांत्रिक विवेचन आलेलें आहे त्या त्या ठिकाणीं ज्ञानदेवांनीं आपण तंत्राला कमी महत्त्व देतों हें स्पष्ट केलेलें आहे. दहाव्या अध्यायांत विभूति सांगितल्यानंतर श्रीकृष्णमुखानें ते म्हणतातः—

ऐसीया व्यापका मातें जाणावें । तै विभूतीभेदें काय करावें ।
परि हे तुझी योग्यता नव्हे । म्हणोनि असो ॥ १०-२६५

अर्जुनाची योग्यता विभूतियोग ऐकण्याचीच होती, व्यापक परमेश्वराला जाणण्याची त्या वेळीं तरी नव्हती म्हणून हा विभूतींचा विस्तार सांगितला.

**पण खरें ज्ञान म्हणजे परमेश्वराचें अर्थात् स्वतःचें व्यापक स्वरूप जाणणें हें होय. अकराव्या अध्यायांत अर्जुन विश्वरूप पहातो.**

मियां इहींच दोहीं डोळां । झोंबावें विश्वरूपा सकळा ।
ऐवढी हांव तो दैवाआगळा । म्हणऊनी करी ॥ १०–३३२

**ती हांव पुरी झाली; व विश्वरूपमुखांत सर्वांचा विनाश झालेला अर्जुनानें पाहिला. श्रीकृष्ण त्याला म्हणतात,**

जेव्हां तुवां देखिलें । हे माझिया वदनीं पडिलें ।
तेव्हांचि यांचें आयुष्य सरलें । आतां रितीं सोपें ॥ ११–४७६

**याच अध्यायांत विश्वरूप हेंच परमेश्वराचें खरें स्वरूप ही गोष्ट स्पष्ट करतात. त्यासंबंधीं कांहीं ओव्या—**

तें हें अपारां अपार । स्वरूप माझें परात्पर ।
एथोनि ते अवतार । कृष्णादिक ॥ ११–६१४
याची सोय पातले । आणि वेदीं मौनचि घेतलें ।
याज्ञिकही माघौते आले । स्वर्गौनियां ॥ ११–६१७
म्हणोनि विश्वरूपलाभें श्लाघ । येथींचें भय नेघ नेघ ।
हेंवांचूनि अन्य चांग । न मनीं कांहीं ॥ ११–६२३
हें रूप जरी घोर । विक्रुती आणी थोर ।
तरी कृतनिश्चयाचें घर । हेंचि करी ॥ ११–६३२
येरे वरिन्चिलेनि चित्तें । बाह्य सख्यसुखापुरतें ।
भोगिजो कां श्रीमूर्तीतें । चतुर्भुज ॥ ११–६३६

**ज्ञानदेवांचा अभिप्राय स्पष्ट आहे. मूर्तिपूजा वगैरे गोष्टीं साधनीभूत आहेत. त्यांचें महत्त्व मर्यादित आहे. त्यांना अमर्याद महत्त्व देणाऱ्यांनीं ज्ञानदेव आपले पाठीराखे नाहींत हें लक्ष्यांत ठेवावें.**

**ज्ञानदेवांनीं हा ग्रंथरचनेचा खटाटोप तरी कां केला ? कीर्ति किंवा प्राप्ति यांपैकीं कशाचीही त्यांना परवा नव्हती.**

साहित्यसोनियाचिया खाणी । उघडवी देशियेचिया क्षोणीं ।
विवेकवल्लीची लावणी । हों देईं सैंघ ॥ १२–१२

**मराठी भाषेत साहित्यरूपी, वाङ्मयरूपी सोन्याच्या खाणी निर्माण करावयाच्या आणि विवेकतरूंची लावणी करावयाची हे दोन हेतु त्यांचे होते—**

ये मराठियेचिया नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं ।
घेणे देणे सुखचिवरी । हो देई या जगा ॥ १२–१६

**मराठींत ब्रह्मविद्या सांगावयाची, सर्वांना सांगावयाची व देणें घेणें सर्व सुखाचेंच करावयाचें. आमच्या मायबोलीला समृद्ध करावयाची आणि विवेकाचे साम्राज्य सर्वांना सुलभ करावयाचें हा त्यांचा थोर हेतु होता. सगुण आणि निर्गुण, भक्ति आणि ज्ञान यांचें तारतम्य लक्षांत ठेविलें पाहिजे; ज्ञानदेव तें स्पष्ट करतात.**

तरी व्यक्त आणि अव्यक्त । हे तूंचि एक निभ्रांत ।
भक्तीं पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें ॥ १२–२३

**पण भक्त म्हणजे नुसता भोळा भावडा नव्हे, केव्हां तरी देवाचें नांव घेणारा तो नव्हे,**

तेंमे सर्वेंद्रियांसहित । मजमाजी सूनि चित्त ।
जे रात्रिदिवस न म्हणत । उपासिती ॥ १२–३८
इयापरी जे भक्त । आपणपें मज देत ।
तेचि मी योगयुक्त । परम मानीं ॥ १२–३९

**ज्ञानदेवांनीं सांगितलेला भक्तिपंथ कित्येक समजतात तसा सोपा नाहीं. त्याचें वर्णन पहाः—**

कर्मेंद्रिये सुखें । करिती कर्म अशेखें ।
जियें कां वर्णविशेखें । भागा आलीं ॥ १२–७६
विधातें पाळित । निषेधातें गाळीत ।
मज देऊनि जाळित । कर्मफळें ॥ १२–७७
ययापरी पाहीं । अर्जुना माझे ठाईं ।
संन्यासूनि नाहीं । करिती कर्में ॥ १२–७८
आणीकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानसिक भाव ।
तयां मीवांचूनि धांव । आनौती नाहीं ॥ १२–७९

**असे भक्त होणें हें सोपें नाहीं. कदाचित् ते अधिक कठीण आहे म्हणून हठयोगाची शारीरिक कसरत करण्याचा पंथ कित्येक पतकरतात. भक्त होणें चुटकीसरशी साधत नाहीं. त्याला अभ्यास करावा लागतो. त्याचें वर्णनः—**

अथवा हें चित्त । मनबुद्धिसहित ।
माझ्या हातीं अचुंबित । न शकसी देवों ॥ १२–१०४

तरी गा ऐसें करीं । यया आठां पहारांमाझारां ।
मोटकें निमिषभरी । देतु जाय ॥ १२-१०५
मग जें जें कां निमिख । देखेल माझे सुख ।
तेतुले अरोचक । विषयीं घेईल ॥ १२-१०६

**अभ्यासयोगाचें हें वर्णन ज्ञानदेवांचें स्वतःचें आहे. त्यापुढें ते सांगतातः—**

आणि जें जें कर्म निपजे । ते थोडेंबहु न म्हणिजे ।
निवांतचि अर्पिजे । माझ्या ठायीं ॥ १२-१२३

**परमेश्वर म्हणजे विश्वस्वरूप; " माझ्या ठायीं अर्पिजे " म्हणजे स्वार्थासाठीं आपल्या उद्योगाचा उपयोग न करतां तो सर्वां भूतीं असणाऱ्या परमेश्वरासाठीं म्हणजे परोपकारासाठीं करावा. हें सर्व नीटपणें व्हावें म्हणून " संयतीसीं वसो । बुद्धि तुझी । " निष्कामपणा किती असावा याला दृष्टांत देतातः—**

अगा आत्मजेच्या विषी । जीवु जैसा निरभिलाषि ।
तैसा कर्मी अशेषीं । निष्कामु होई ॥ १२-१३२

**हा कर्मफलत्याग सर्वांत श्रेष्ठ मार्ग** आहे **असें ज्ञानदेवांचें निश्चयपूर्वक सांगणें आहे. " योगामाजीं योगु । धुरेचा हा ( १२-१३४ ) " असें ते म्हणतात. सर्वां भूतीं परमेश्वर ही दृष्टि झाली कीं**

जीवु परमात्मा दोनी । बैसोनिया ऐक्यासनीं ।
जयाचिया हृदयभुवनीं । विराजती ॥ १२-१५३

**तेव्हां उत्तम भक्त होणें हें योगाइतकेंच दुर्घट** आहे.

**तेराव्या अध्यायांत कित्येक शब्दांची फोड मोठ्या चतुराईनें केलेली आहे. " अव्यक्त " म्हणजे काय त्याचें स्पष्टीकरणः—**

पैं सांख्याचिया सिद्धांतीं । प्रकृति जे महामति ।
तेचि येथें प्रस्तुतीं । अव्यक्त गा ॥ १३-९०
आणि सांख्ययोगमतें । प्रकृति परिसविली तूतें ।
ऐसी दोहीं परी जेथें । विवंचिली ॥ १३-९१
तेथ दुजी जे जीवदशा । तिये नांव वीरेशा ।
येथें अव्यक्त ऐसा । पर्यावो हा ॥ १३-९२

**धृति म्हणून ज्ञानगुण सांगितलेला आहे; त्याची व्याख्या ज्ञानदेवांनीं अगदीं नवीन धर्तीनें केलेली आहे. ती पाहिली म्हणजे इंग्रजींतील** Solidarity **या**

शब्दाला धृति हा पूर्ण अर्थानें प्रतिशब्द आहे असें दिसून येतें. परस्पर विरोध असतांना कार्य निर्माण करण्यासाठीं विरोधी तत्त्वांनी एकत्र येऊन सहकार्य करविणारी जो शक्ति तिला धृति हें नांव दिलेलें आहे. तिचें ज्ञानदेवांच्या शब्दांत वर्णनः—

तरी तत्वां परस्परें । उघड जातिस्वभाववैरें ।
नव्हे पृथ्वीतें नीरें । निनाशिजे ॥ १३–१४३
नीरातें आटी तेज । तेजा वायूसी झुंज ।
आणि गगन तंव सहज । वायु भक्षी ॥ १३–१४४
तेवींचि कोणेही वेळे । आपण कायिसयाही न मिळे ।
आंत रिघोनि वेगळें । आकाश हें ॥ १३–१४५
ऐसी हीं पांचही भूतें । न साहती एकमेकांतें ।
कीं तियेही ऐक्यातें । देहासि येती ॥ ११३–१४६
द्वंद्वाची उाखिविखी । सोडूनि वसती एकीं ।
एकएकातें पोखी । निजगुणें गा ॥ १३–१४७
ऐसे न मिळे तयां साजणें । चाले धैर्य जेणे ।
तया नांव म्हणे । धृति मी गा ॥ १३–१४८

आजकाल भरतखंडांत जर कोणत्या शक्तीची आवश्यकता असेल तर " न मिळे तयां साजणें " करणाऱ्या धृतीची आहे. ज्ञानलक्षणांत ज्ञानाचें वर्णन करतांना तें मिळविण्यासाठीं मोठमोठे लोक कशी धडपड करतात याचें ज्ञानदेवांनीं फारच विस्मयकारक वर्णन केलेलें आहे.

जया ज्ञानालागीं । गगन गिळितातीं योगी ।
स्वर्गाची आडवंगी । उमरडोनि ॥ १३–१६२
न करिती सिद्धीची चाड । न धरिती ऋद्धीची भीड ।
योगाऐसें दुवाड । हेंळसिती ॥ १३–१६३
तपोदुर्ग ओलांडित । ऋतुकोटि वोवांडित ।
उलथूनि सांडित । कर्मवल्ली ॥ १३—१६४

त्या ज्ञानाचें वर्णन पहाः—

जे इंद्रियांची द्वारें आडी । प्रवृत्तीचे पाय मोडी ।
जें दैन्यचि फेडी । मानसाचें ॥ १३–१६९

मदाचा ठावोचि पुसी । जें महामोहाते ग्रासी ।
नेदी आपपरु ऐसी । भाष उरों ॥ १३–१७१
जें संसारातें उन्मूळी । संकल्पपंकु पाखाळी ।
अनावरातें वेटाळी । ज्ञेयातें जे ॥ १३–१७२
जयाचेनि उजाळें । उघडती बुद्धीचे डोळे ।
जीवु दोंदावरी लोळे । आनंदाचिया ॥ १३–१७४

**आणि हें ज्ञान ज्याला झालें त्याच्या देहावर त्या ज्ञानाचीं चिन्हें उमटतात असें ज्ञानदेव सांगतात. म्हणजे माणसाच्या प्रत्यक्ष आचरणावरून तो ज्ञानी कां अज्ञानी हें समजावयाचें, त्याच्या सोंगाढोंगावरून नव्हे. उदाहरणार्थ एक दोन चिन्हांचें वर्णन:—**

पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ति कानीं नायकावी ।
हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोका ॥ १३–१८९
वाचस्पतीचेनि पाडे । सर्वज्ञता तरी जोडे ।
परी वेडिवेमाजीं दडे । महिमेभेणें ॥ १३–१९१
शरीरभोगाकडे । पहातां कृपणु आवडे ।
एऱ्हवीं धर्मविषयीं थोडे– । बहु न म्हणे ॥ १३–२१०
अपेक्षित पावे । तें जेणें तोषें मानवे ।
अनपेक्षिताही करवे । मानु तोचि ॥ १३–३४५
वारियाची धांव । तैसे सरळ भाव ।
शंका आणि हांव । नाहीं जया ॥ १३–३६०
दिठी नोहे मिणधी । बोलणें नाहीं संदिग्धीं ।
कवणेंसी हीनबुद्धी । राहटिजेना ॥ १३–३६५
बाहेरी कर्में क्षाळला । भीतरीं ज्ञानें उजळला ।
इहीं दोहीं परी आला । पाखाळा एका ॥ १३–४६४
तरी परमात्मा ऐसें । जे एक वस्तु असे ।
ते जया दिसे । ज्ञानास्तव ॥ १३–६१६
तें एकवांचूनि आनें । जियें भवस्वर्गादि ज्ञानें ।
तें अज्ञान ऐसा मनें । निश्चयो केला ॥ १३–६१७

**अज्ञानाचींही लक्षणें व चिन्हें ( टाकून द्यावींत ) म्हणून सांगितलेलीं आहेत.**

**दासबोधांतील बराच भाग ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायावरून निर्माण झालेला आहे हें चतुर वाचकांच्या लक्षांत येईल. आतां अज्ञानचिन्हेंही कांहीं कांहीं देऊं.**

तरी संभावने जिये । जो मानाची वाट पाहे ।
सत्कारें होये । तोषु जया ॥ १३–६५७
जैसे पोटालागि सुणे । उघडें झांकलें न म्हणे ।
तैसे आपले परावें नेणे । द्रव्यासाठीं ॥ १३–६८०
इया ग्रामसिंहाचिया ठायीं । जैसा मिळणी ठावो अठावो नाहीं ।
तैसा स्त्रीविषयीं कांहीं । विचारीना ॥ १३–६८१
आणि विषयांची गोडी । जो जीतु मेला न संडी ।
स्वर्गींही खावया जोडी । येथूनीचि ॥ १३–७०३
तरी देह हाच आत्मा । ऐसेया जो मनोधर्मा ।
वळघोनिया कर्मा । आरंभु करी ॥ १३–७१४
न करावें तें करी । असंभाव्य मनीं धरी ।
चिंतू नये तें विचारी । जयाची मति ॥ १३–७७३
रिघे जेथ न रिघावें । मागे जें न घ्यावें ।
स्पर्शे जेथ न लागावें । आंग मन ॥ १३–७७४
न जावें तेथ जायें । न पाहावें तें जो पाहे ।
न खावें तें खायें । तेवींचि तोषे ॥ १३–७७५
न धरावा तो संगु । न लगावें तेथ लागु ।
नाचरावा तो मार्गु । आचरे जो ॥ १३–७७६
नायकावें तें आइके । न बोलावें तें बके ।
परी दोष होतील हें न देखे । प्रवर्ततां ॥ १३–७७७

**रामदासाखेरीज व्यवहार कोणाला समजत नाहीं; ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम हे संताळे होते, असें "न बोलावें ते बकणारे" अज्ञानी होते, दुसरें काय म्हणावयाचें ? ज्ञानेश्वरींतील व्यवहारज्ञान हा स्वतंत्र ग्रंथाचा विषय होईल; असो आतां तेराव्या अध्यायांतील वेदांत तत्त्वज्ञानाचें सारसर्वस्व सांगणारी पुढील ओवी पहा:—**

नामरूपसंबंधु । जातिक्रियाभेदु ।
हा आकारासीच प्रवादु । वस्तूसि नाहीं ॥ १३–९०५

तेरावा अध्याय ज्ञानदेवांच्या प्रज्ञेचा स्वतंत्र विलास आहे व त्या अध्यायांतील त्यांची विचारसंपदा आपणाला चकित करून सोडते.

चौदाव्या अध्यायांत गुणत्रयांचें वर्णन करितांना ज्ञानदेवांनीं स्वतःचें विवरण पुष्कळच केलेलें आहे. त्रिगुणातीत हो, तिन्ही गुणांच्या पलीकडे जा, असा गीतेचा संदेश आहे. ज्ञानाची परिपूर्णावस्था म्हणजे निस्त्रिगुणता. ती आंगीं बाणली "कीं सर्वेंद्रियांच्या आंगणी। विवेक करी राबणी" ( २०६ ) आणि

वासना एकवटें। प्रवृत्ति वोहटे।
मानस विटे। विषयांवरी ॥ २१३

प्रवृत्ति ओहोटणें याचा अर्थ फलहेतुरहित कर्म करणें. आपणांला, परमेश्वराला, सर्वां भूतीं पहाणें म्हणजेच अव्यभिचारी भक्ति हे ओवी ३८१ मध्यें स्पष्ट केलेलें आहे. ज्ञानयुक्त जो सेवा करतो त्याच्या मस्तकावर ब्रह्मतेचा मुकुट स्थिर होतो.

यथा ब्रह्मत्वासीच पार्था। सायुज्य ऐशी व्यवस्था।
याचि नांवे चौथा। पुरुषार्थु गा ॥ १४–४०१

चौथा पुरुषार्थ म्हणजे मोक्ष. मोक्ष मिळण्यासाठीं मरण्याची जरूरी नाहीं. तो "याचि देहीं याचि डोळां" पहावयास मिळतो; कारण ती मनाची व आचरणाची स्थिति आहे. पंधराव्या अध्यायांत अश्वत्थ वृक्षाचें रूपक करून पुनःश्च विश्वप्रपंच आणि परमेश्वर यांचें विवरण केलेलें आहे. ज्ञानदेव सुरवातीला पुनः एकदां महत्त्वाचा सिद्धांत सांगतात.

तरी विरक्तीवांचोनि कांहीं। ज्ञानासि तगणेंचि नाहीं।
हें विचारूनि ठाई। ठेविलें देवें ॥ १५–३६

अनुरक्तीचा पंथ काढणाऱ्यांनीं हें लक्षांत ठेवावें; व ब्राम्ही स्थितीच्या नांवाखालीं शारीरिक उपभोगाचें किंबहुना व्यभिचाराचें समर्थन करूं नये; आणि केलें तर तें सुज्ञांनीं सत्य मानूं नये. या गोष्टी बाह्यांगाच्या नाहींत, तांत्रिक नाहींत, सोंगाढोंगाच्या नाहींत.

तैसा चित्तीं अहंते ठावो। आणि जिभे सकलशास्त्रांचा सरावो।
ऐसेनि कोडी एक जन्म जावो। परि न पविजे मातें ॥ १५–३९६

आणि ज्ञान प्राप्त होतें तें अनुभवानें, कर्माचरणाणें, कर्मसंन्यासानें नव्हे, तर कर्मफलत्यागानें; आणि कर्मफलत्याग होण्यासाठीं कर्म "शृंगारोनि" केलें पाहिजे. पुढील तीन ओव्याः—

तैसी गीता हे जाणितलीया । काय विस्मयो मोह जावया ।
परी आत्मज्ञानें आपणपयां । मिळिजे येथ ॥ १५–५८५
जयां आत्मज्ञानाच्या ठायीं । कर्म आपुलेया जीवितापायीं ।
होऊनीया उतराई । लया जाय ॥ १५–५८६
हरपलें दावूनि जैसा । मागु सरे वीरविलासा ।
ज्ञानचि कळस वळघे तैसा । कर्मप्रासादाचा ॥ १५–५८७

**ज्ञान हा कर्मप्रासादाचा कळस आहे हें गीतेंतील महातत्त्व म्हणून ज्ञानदेवांनीं सांगितलेलें आहे. म्हणजे या "गीतारहस्याचा" शोध तेराव्या शतकांतच लागलेला होता हें स्पष्ट दिसतें. असो. सोळाव्या अध्यायांत दैवी व आसुरी संपत्तीचें विवरण आहे. संपत्ति शब्दाची व्याख्या पहा:—**

जेथ एक एकातें पोखी । ऐसे बहुत पदार्थ येकी ।
संपाजिती, ते लोकीं । संपत्ति म्हणिजे ॥ १६–६६

**या अध्यायांत चातुर्वर्ण्याची कर्तव्यें व गुण यांचेंही विस्तृत वर्णन आहे. अपैशुन्य या गुणाचें वर्णन करतांना पुढील ओवी येते तीवरून ज्ञानदेवांची सामाजिक शिकवण स्पष्ट होतें.**

ना ना बुडतयाते सकरुणु । न पुसे अंत्यजु कीं ब्राह्मणु ।
काढूनि राखे प्राणु । हेंचि जाणिजे ॥ १६–१४३

**आध्यात्मिक तेजाची व्याख्या पुढीलप्रमाणें दिलेली आहे.**

न ठाके निषेधु आड । न पडे विधीची भीड ।
नुपजेचि जीवीं कोड । महासिद्धीचें ॥ १६–१८९
ऐसें ईश्वराकडे निज । धांवे आपसया सहज ।
तया नांव तेज । आध्यात्मिक तें ॥ १६–१९०

**शारीरीक सुखाबद्दल लिहितांना ज्ञानदेव म्हणतात:—**

येथ उर्वशिया इंद्र सुखी । जैसा कां स्वर्गलोकीं ।
तैसाचि कृमिही नरकीं । लोळतु श्लाघे ॥ १६–३०८

**जो आनंद उर्वशीसारख्या अप्सरेचा उपभोग घेतांना इंद्राला होतो तोच आनंद नरकांत लोळणाऱ्या किड्याला होतो. केवळ कामोपभोगरतांच्यासाठीं हा आहेर आहे. असो. तेव्हां यासाठीं सर्व आचरण ज्ञानयुक्त असावें. आचरणासंबंधीं ज्ञानयुक्त नियम घालणारें तें शास्त्र.**

कार्याकार्यविवेकीं । शास्त्रेंचि करावीं पारखीं ।
अकृत्य तें कुडें लोकीं । वाळावें गा ॥ १६–४६६

**आणि अशा तऱ्हेनें वागलें कीं लोकसंग्रह म्हणजे लोकरक्षण, म्हणजे समाजरक्षण, राष्ट्ररक्षण होतें.**

**सतराव्या अध्यायांत श्रद्धा, तप, आहार, यज्ञ, हीं गुणांप्रमाणें त्रिविध कशीं होतात ते सांगून पुन: त्यांचें कायिक, वाचिक, मानसिक हे भेद कसे पडतात याचें सुंदर स्पष्टीकरण केलेलें आहे. हठयोग करून किंवा तसले प्रकार करून शरीराला त्रास देणाऱ्यांचा स्पष्ट निषेध ज्ञानदेव करतात.**

केवळ मूर्खपणाचा वारा । जीवीं घेऊनी धनुर्धरा ।
नाम ठेविजे शरीरा । वैरीयाचें ॥ १७–२५४

**दानही गुणांप्रमाणें त्रिविध असतें हें पुढें सांगितलेलें आहे आणि अशा प्रकारें निषिद्ध गोष्टींचा विचारपूर्वक निर्णय या सतराव्या अध्यायांत केलेला आहे. आणि वर सांगित्याप्रमाणें अठराव्या अध्यायांत सर्व गीतेचा सारांशच दिलेला आहे, तिकडे थोडी दृष्टि देऊन आपण या सुंदर विषयाचा निरोप घेतला पाहिजे.**

**अठरावा अध्यायाची प्रस्तावना करतांना म्हटलें आहे:—**

जी गीतारत्नप्रासादाचा । कळसु अर्थचिंतामणीचा ।
सर्व गीतादर्शनाचा । पाढाऊ जो ॥ १८–३०

**आणि गीतेंच्या अठरा अध्यायांत सातशें श्लोक आहेत पण सर्वांतून आशय एकच निघतो असें ज्ञानदेव सांगतात. कर्म तर करावयाचें पण कर्माची बाधा होणार नाहीं अशा प्रकारें तें करावयाचें हा गीताशास्त्राचा विषय आहे. संन्यास व त्याग यांचे अर्थ पुढील ओवींत स्पष्ट केलेले आहेत.**

जें निपटूनि कर्म सांडिजे । तें सांडणें संन्यासु म्हणिजे ।
आणि फलमात्र कां त्यजिजे । तो त्यागु गा ॥ १८–९२

**या परिभाषेप्रमाणें संन्यास ग्राह्य नाहीं, त्याग ग्राह्य आहे ही मुख्य शिकवण गीताशास्त्राची अर्थात् ज्ञानेश्वरीची आहे. काम्य कर्मानें बंधनें प्राप्त होतें, तेव्हां अहेतुकपणानें केलेलें कर्म तें उत्तम. पण कर्म हें केलेंच पाहिजे व कर्माकर्माची विचारणा करून तें केलें पाहिजे म्हणजे तें ज्ञानपूर्वक केलें पाहिजे. ज्यांना कांहीं पराक्रमाची आशाच नाहीं ते कर्मत्याग सांगतात.**

तैसें फळकामदुर्बळ । म्हणती कर्मचि किडाळ ।
मग निर्णयो देती केवळ । त्यजावें ऐसा ॥ १८–१३७

**तेव्हां कर्म त्यजावें या पंथाचे ज्ञानदेव नव्हते, महाराष्ट्रांतील दुसरे संतकविही नव्हते. सत्कर्में केलींच पाहिजेत हें त्यांचें तत्व होतें.**

तीर्थे बाह्य मळु क्षाळें । कर्म अभ्यंतर उजळे ।
एवं तीर्थे जाण निर्मळे । सत्कर्मेची ॥ १८–१६०
म्हणोनी फळीं लागु । सांडोनि देहसंगु ।
कर्म करावी हा चागु । निरोपु माझा ॥ १८–१७६

**शरीराला क्लेश होतील या भयानें कर्म न करणाऱ्यांचा, उद्योग न करणाऱ्यांचा स्पष्ट निषेध गीतेंत आहे. कर्म तर करावें पण तें हौसेनें, उत्तम प्रकारें करावें हा ज्ञानदेवांचा संदेश आहे.**

तरी स्वाधिकाराचेनि नांवे । जें वांटिया आलें स्वभावें ।
ते आचरे विधिगौरवे । शृंगारोनि ॥ १८–२००

**कर्मबंधन म्हणजे काय हेंही ज्ञानदेव स्पष्ट करतातः —**

तैसा कर्तृत्वाचा मदु । आणि कर्मफळाचा आस्वादु ।
हा दोहींचे नांव बंधु । कर्माचा कीं ॥ १८–२०५

**तेव्हां अहंता नसावी आणि कर्मफळाची इच्छा म्हणजे स्वार्थ नसावा हाच ज्ञानदेवांचा संदेश आहे. पुनः पुनः सांगतात कीं शरीर आहे तोंपर्यंत कर्म सत्कर्म, केलेंच पाहिजे.**

आणि हां गा सव्यसाची । मूर्ति लाहोनि देहाची ।
खंती करिती कर्माची । ते गांवढे गा ॥ १८–२१८

**कर्माचा कंटाळा करणाऱ्यांना ज्ञानदेव गांवढे, गांवढळ, असें नांव देतात.**

**कर्म कसें होतें त्याची शास्त्रोय कारणमीमांसाही जातांजातां या अध्यायांत केलेली आहे. कर्मयोगाचें रहस्य समजलें कीं सर्वां भूतीं समदृष्टि होतें; तिचें गोड वर्णन पहाः—**

तैसा आत्मत्वें वेष्टिला होये । तो जयाजया दृश्यातें पाहे ।
तें दृश्यपण द्रष्टेपणेंसीं होत जाये । तयाचेचि रूप ॥ १८–४१०

**ज्ञानाची श्रेष्ठ स्थिति म्हणजे ज्ञान हें भानही हरपणें. ( याचें विवेचन " अमृतानुभव " या भागांत केलेलें आहे. ) ज्ञानाचेंही गुणाप्रमाणें प्रकार होतात. त्यांत**

सात्त्विक गुणाचा आश्रय उत्तम; पण ज्ञानाची परमावधि म्हणजे निस्त्रिगुणता. सर्व सुखांत सात्त्विक सुख उत्तम; पण त्याहीपलीकडे आत्मसुख. आस्तिक्य या शब्दाची ज्ञानदेवांनीं केलेली व्याख्या फार लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे.

पै राजमुद्रा आथिलिया । प्रजा भजे भलतया ।
तेविं शास्त्रें स्वीकारिलिया । मार्गमात्रातें ॥ १८-८४९
आदरें जे कां मानणें । ते आस्तिक्य मी म्हणे । ८५०

वर्णाप्रमाणें निरनिराळे गुण याही अध्यायांत सांगितलेले आहेत व त्या त्याच्या गुणांना अनुसरून कर्मे होतात हें स्पष्ट केलेलें आहे; व नंतर आपला जो स्वधर्म म्हणजे कर्तव्य तें आचरिलेंच पाहिजे हा सिद्धांत पुनः सांगितलेला आहे. या यथायोग्य कर्माचरणानें फलबुद्धि न धरतां असणें यालाच भक्ति हें नांव दिलेलें आहे; केवळ टाळकुटी किंवा बाह्य तंत्र म्हणजे भक्ति नव्हे. सर्व कर्मे परमेश्वराला अर्पण करावें, म्हणजे त्याचें फळ स्वार्थीं न घालतां परमार्थीं घालावें.

क्रियाजात मी जालेपणें । घडे कांहींचि न करणें ।
तयाचि नांव पूजणे । खुणेचें माझे ॥ १८-१७८

आणि ज्ञानाची पुनः एकदां व्याख्या करून परमेश्वर म्हणजे काय हेंही सांगतात.

अर्जुनपण न घेता । मी ऐसे जे पांडुसुता ।
उठतसे ते तत्त्वता । तयाचे रूप ॥ १८-१३१५
म्हणोनी तूं आणि आम्ही । हे दिसताहे देहधर्मी ।
मग ययाच्या विरामीं । मीचि होसी ॥ १८-१३६७

आणि हें सर्व ऐकून शेवटीं पूर्ण ज्ञानी झालेला अर्जुन म्हणतोः—

आतां मोह असे कां नाहीं । हें ऐसें जी पुससी काई ।
कृतकृत्य जाहलो पाहीं । तुझेपणें ॥ १८-१५६२
गुंतलो होतों अर्जुनगुणें । तो मुक्त झालें तुझेपणें ।
आतां पुसणें सांगणें । दोन्ही नाहीं ॥ १८-१५६३
जे मज तुम्हां आड । होतें भेदाचें कवाड ।
तें फेडोनि केलें गोड । सेवासुख ॥ १९-१५७४
तरी आतां तुझी आज्ञा । सकळ देवाधिदेवराज्ञा ।
करीन देई अनुज्ञा । भलतियेविषयीं ॥ १८-१५७५

आणि अर्जुनाच्या या आश्चर्यकारक मोहविमुक्तीचा प्रसंग पाहून संजय

आनंदातिशयानें नाचूं लागला. जेथें श्रीकृष्ण आणि अर्जुन आहेत तेथें

तयांचिये देशींच्या झाडीं । कल्पतरूंतें होडी ।
न जिणावें कां येवढी । मायबापें असतां ॥ १८–१६४२
ते पाषाणही आघवें । चिंतारत्नें कां नोहावें ।
तिये भूमिके कां न यावें । सुवर्णत्व ॥ १८–१६४३
तयांचिया गांवींचिया । नदी अमृतें वाहावीया ।
नवल कायि राया । विचारी पां ॥ १८–१६४४
तयांचे बिसाट शब्द । सुखें म्हणो येती वेद ।
सदेह सच्चिदानंद । कां नोहावे ते ॥ १८–१६४५
पै स्वर्गापवर्ग दोन्ही । इयें पदें तया अधीनीं ।
श्रीकृष्ण बाप जननी । कमला जया ॥ १८–१६४६

अशा प्रकारें हें रसरशीत वर्णन आमच्या कवीश्वरानें केलेलें आहे. अर्जुन ज्ञानी झाला हें पाहून कृष्णाला अत्यानंद झाला.

आणि पुत्रें मी सर्व गुणीं । जिणावा हे बापा शिराणी ।
तरी ते शार्ङ्गपाणी । फळा आली ॥ १८–१६५२

आपल्यापेक्षां मुलानें थोर व्हावें ही प्रत्येक पित्याची इच्छा असली पाहिजे; म्हणजे जुन्या–नव्यांचा तंटा होत नाहीं, तंट्याला कारण उरत नाहीं. तेव्हां अशा प्रकारें या ग्रंथाचा शेवट झालेला आहे. निवृत्तिनाथाच्या कृपेनें हा मराठींत ग्रंथ केला असें शेवटीं ज्ञानदेव सांगतात.

याकारणे मियां । श्रीगीतार्थ मऱ्हाठिया ।
केला लोकां यया । दिठीचा विषो ॥ १८–१७३५

ज्ञानदेवांच्या विचारांतील, तत्त्वज्ञानांतील, शिकवणींतील ही कांहीं रत्नें हाताला आलीं तशीं येथें दिलेलीं आहेत. ज्ञानेश्वरी हा विवेकाचा, तत्त्वज्ञानाचा, शिक्षणाचा, आनंदाचा महासागर आहे. त्यांत कितीहो डुंबलें तरी पुरें झालेसें वाटत नाहीं, त्याचा अंत लागणें शक्य नाहीं; तो अंत लावण्याला ज्ञानेश्वरीचें नित्य विचारयुक्त वाचन हाच उत्तम व इष्ट उपाय आहे.

ग्रंथाच्या शेवटीं ज्ञानदेवांनीं आपला आशीर्वाद आपणां सर्वांना दिलेला आहे—देवाकडून त्यांनीं मागून घेतलेलें आहे. त्यांत त्यांच्या विचारांचें, तत्त्वज्ञानाचें शिकवणीचें रहस्य सांठलेलें आहे.

जे खलांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो ।
भूतां परस्परें पडो । मैत्र जीवांचें ॥ १८–१७९४
दुरितांचें तिमिर जावो । विश्वस्वधर्मसूर्ये पाहो ॥
जो जें वांच्छील तो तें लाहो । प्राणिजात ॥ १८–१७९५
वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूतळीं । भेटो तयां । १८–१७९६

ज्ञानदेवाची विचारसंपदा त्यांच्या काव्यसंपदेहूनही भव्य आहे, उज्वल आहे. त्यांच्या शिकवणींत संदिग्धपणा नाहीं, निश्चय आहे. त्यांची मुख्य शिकवण कर्माचरण करून, तपश्चर्या करून, स्वार्थ सोडून, कर्माचीं फळें परमार्थाला अर्पण करून, भूतदयेनें प्रेरित होऊन सर्व जीवन उपयोगास लावणें ही आहे. या शिकवणींत परलोकाचा संबंध नाहीं. ही शिकवण उत्तम पारमार्थिक आणि उत्तम व्यावहारिक आहे. आमचा हा द्रष्टा ज्ञानदेव व्यवहार व परमार्थ निराळे समजत नव्हता. त्यांना निराळे कल्पून व्यवहाराची परमार्थाशीं ताटातूट करणाऱ्यांनीं जगावर संकट आणलें आहे. ज्ञानदेवांना बाह्य सोंग नको होतें, आंतर ज्ञान पाहिजे होते. “हिंसेच्या पायावर आहिंसा रचतां येत नाहीं;” असें तें स्पष्ट सांगतात आणि आपल्या कर्मानें जो कोणी जगण्याला नालायख झाला आहे त्याला मारलाच पाहिजे हें तत्व ते स्पष्ट करतात. त्यांच्या ग्रंथाचें आधुनिक दृष्टीनें वाचन आणि मनन आणि तदनुसार आचरण करणें हा आमच्या राष्ट्राच्या उद्धाराचा सर्वोत्कृष्ट मार्ग आहे.



# भाग बारावा



## समारोप

जो आपणपें सांडोनि कांहीं । इंद्रियग्रामावरी येणेंचि नाहीं ।
तो विषय न सेवी हें काई । विचित्र येथ ॥ ज्ञा. ५-१०५
सहजें स्वसुखाचेनि अपारें । सुरवाडलेनि अंतरें ।
रचिला म्हणऊनि बाहिरें पाऊल न घली ॥ ५-१०६
सांगें कुमुददलाचेनि ताटें । जो जेविला चंद्रकिरणें चोखटें ।
तो चकोरु काई वाळुवंटें । चुंबितु असे ॥ ५-१०७
तैसें आतमसुख उपाइलें । जयासि आपणपेंचि फावलें ।
तया विषयो सहज सांडवले । म्हणों काई ॥ ५-१०८

ज्ञानदेवाची ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव हे ग्रंथ वाचल्यानंतर कुमुददलांच्या ताटांत चोखट चंद्रकिरणांचें भोजन केल्याचा आनंद मिळतो यांत शंका नाहीं व तो आनंद उपभोगल्यानंतर अधम काव्याच्या "वाळुवंटां"त तोंड खुपसण्याची बुद्धि होणें शक्य नाहीं. मराठी वाङ्मयाला तर ज्ञानदेवानें उन्नत पदवीला पोहोंचविलेंच पण तत्त्वज्ञानाची मराठी परंपराही त्यानेंच घालून दिली. सहाशें साडेसहाशें वर्षांपूर्वीं होऊन गेलेल्या या महाकवीची भाषा जुनी आहे व तिचा परिचय करून घ्यावा लागतो. पण तिची मोडणी एकदां समजल्यानंतर ती अवघड नाहीं. ज्ञानेश्वरींतील दृष्टांतांतून निघणारें व्यवहारज्ञान व त्यावरून कळून येणारी तेव्हांची सामाजिक स्थिति यासंबंधीं बरेच लिहितां येण्याजोगें आहे; पण आधींच प्रस्तुत ग्रंथाचा विस्तार पुष्कळ झाला आहे तेव्हां तिकडे अंगुलिनिर्देश करण्यापलीकडे या ठिकाणीं अधिक कांहीं करणें शक्य नाहीं. ज्ञानेश्वरींत ठिकठिकाणीं श्रीकृष्णमुखानें ज्ञानदेवच बोलताहेत व त्यांचा महाराष्ट्राला प्रेमळ संदेश सर्वत्र दिसून येतो. श्रीकृष्णाचें जसें अर्जुनावर प्रेम होतें तसेंच ज्ञानदेवांचें या महाराष्ट्रावर होतें.

हें वाच्य म्हणोनि बोलिजे । कीं श्राव्य मग आयिकिजे ।
तैसें नव्हे परी तुझें । भाग्य बरवें ॥ १८-१३४२

त्यांनीं जें सांगितलें आहे तें नुसतें वाच्य आणि श्राव्य नव्हे—तसें

लिहिणाऱ्यालाही कवींत गणतात—पण तें विशेष अर्थानें भरलेलें आहे. धर्माचा खरा अर्थ ज्ञानदेवांनीं मराठींत उघडा केला व कृष्णभक्तीच्या नांवाखालीं शारीर कामोपभोगाकडे वळलेला भक्तिमार्ग ज्ञान आणि सत्कर्म यांच्या बाजूला आणून ठेवला. ढोंग आणि लबाडी करणाऱ्यांना ज्ञानदेवांनीं थारा बिलकुल दिला नाहीं; आंधळ्या भक्तीचा पुरस्कार त्यांनीं केलेला नाहीं; बुवाशाहीला, लफंग्या गुरूंना त्यांनीं आपल्या कक्षेंत जागा ठेविली नाहीं; भाबडेपणाचा त्यांनीं कैवार घेतला नाहीं; निर्भयता, तेजस्वीपणा, उज्वलता, उद्योगतत्परता, सत्यप्रियता आणि सारासार विचार यांचा त्यांनीं आपल्या सुंदर वाणीनें परिपोष केला, पुरस्कार केला. ज्ञानदेवाची वाणी म्हणजे अमृत आहे; आणि त्या अमृतसेवनानें मरणाचें भय राहणार नाहीं. खरा धर्म, खरें ज्ञान, खरा कर्ममार्ग, खरा परोपकार यांची दीक्षा ज्ञानदेवांनीं महाराष्ट्राला दिली त्यांच्या नांवाचा जयजयकार महाराष्ट्रभर चाललेला आहे. पण त्यांच्या तत्वाचें आचरण महाराष्ट्रभर झालें पाहिजे. ज्ञानदेवांना स्वतःच्या जयजयकाराची पर्वा नव्हती. अमानित्व या गुणाचें त्यांच्या ठिकाणीं पूर्ण वास्तव्य होतें. त्यांना देवाचा अवतार म्हणून त्यांची खरी स्तुति होत नाही. त्यांनीं जें शिकवलें आहे तें आचरणांत आणणें हीच त्यांची खरी स्तुति. हीच त्यांची खरी पूजा. ज्ञानेश्वरीसारखें सुंदर वाङ्मय ज्या मराठी भाषेच्या मागें उभें आहे तींत अधम वाङ्मय निर्माण होणें हें देखील दैवदुर्विलासाचें उदाहरण आहे. चंद्रकिरणांचें भोजन मिळण्याचें भाग्य असतांना "वाळुवंटे चुंबण्या"ची बुद्धि ही दुर्बुद्धि हें उघड आहे.

ज्ञानदेव कर्मत्याग सांगत नाहींत, "शृंगारोनी कर्म करावें" म्हणून सांगतात; पण इंद्रियदमनाशिवाय ज्ञान नाहीं आणि ज्ञानाशिवाय मोक्ष नाहीं हें त्यांचें सारतत्त्व लटक्याचा अभिमान बाळगणाऱ्या जुन्या नव्या दोघांनींही लक्षांत ठेविलें पाहिजे. शरीरदंड करण्याला ज्ञानदेवांचा विरोध होता; पण शरीराचें फाजील स्तोम माजविणें, इंद्रियांच्या आहारीं जाणें, हेंही त्यांना मान्य नव्हतें. "युक्ताहारविहार" या तत्त्वाचे ते प्रणेते होते, नियतपणा, नियमितपणा (यालाच पुढें रामदासांनीं "नेमस्त" हें नांव दिलें) यावर त्यांचा फार भर होता. तामसी गुणांचा त्यांनीं फार धिःकार केलेला आहे. निद्रा, आलस्य, यांच्या तावडींत सांपडूं नये म्हणून त्यांचा विशेष कटाक्ष आहे.

अंतःकरण प्रसन्न असावें हा त्यांचा उपदेश आहे. प्रसन्न वृत्ति ही सर्वोत्कृष्ट वृत्ति होय आणि मनांत कसलेंही किल्मिष ठेवूं नये; मन स्वच्छ ठेवावें. द्वेष दुसऱ्याचा करावयाचा आणि आपलें मन गढून करावयाचें या गोष्टीला त्यांनीं दूषण दिलेलें आहे.

२ हा समारोप लिहितांना जो विशेष विचार मनांत येतो तो हा कीं इतकें लिहूनही यांत ज्ञानदेवाचें सर्व कांहीं आलेलें नाहीं; पुष्कळ राहिलें आहे असें वाटतें. त्याला कारणही आहे. हिमालय पर्वतांत एखादा मनुष्य कितीही हिंडला तरी सर्व हिमालय हिंडून झाला असे कधींही होत नाहीं, कारण त्या पर्वतांतील भूमिभाग आणि उच्च शिखरें, वनस्थली आणि नदनद्या, हीं इतकीं आहेत कीं. तीं सर्व एका माणसाच्या आटोक्यांत येत नाहींत, येणें बहुधा शक्य नाहीं. अशा शेंकडों ज्ञानदेवी ओव्या आहेत कीं ज्यांचें विवरण करण्या-साठीं मोठे ग्रंथ लिहावे लागतील. ज्ञानदेव हे साधारणपणें दुसऱ्यांच्या मतांची चर्चा करीत नाहींत; स्वतःचें म्हणणें तेवढें शांतपणें सांगतात. पण तेराव्या अध्यायांत अहिंसेची चर्चा करतांना त्यांनीं कित्येक दुसऱ्या मतांचा उल्लेख करून त्यांचा वैयर्थकपणा सिद्ध केला आहे. कसल्याही प्रकारच्या हिंसेवर उभारलेली ती अहिंसा नव्हे असें त्यांनीं प्रतिपादन करून याज्ञिक म्हणजे कर्मठ लोकांवर प्रतिकूल टीकेचा धडाका उडविलेला आहे.

> जे अवृष्टीचेंनि उपद्रवें । गादलें विश्व आघवें ।
> म्हणोनि पर्जन्येष्टि करावें । नाना याग ॥ १३--२२२
> तंव तिचे इष्टीचिया बुडी । पशुहिंसा रोकडी ।
> मग अहिंसेची थडी । कैंची दिसे ॥१३–२२३
> पेरिजे नुसधी हिंसा । तेथ उगवैल काय अहिंसा ।
> परी नवल बापा धिंवसा । या याज्ञिकांचा ॥ १३–२२४
> अहो वसतीं धवळारें । मोडूनि केली देव्हारें ।
> नागवूनि वेव्हारें । गवादी घातली ॥ १३–२३१

व्यवहारांत दुसऱ्याला फसवून द्रव्यसंचय करावयाचा आणि मग अन्नछत्र घालावयाचे तशी पुष्कळांची अहिंसा असते; अहिंसा ही अंतःकरणांत असेल तरच ती आचरणांत इंद्रियद्वारां उमटेल असें तें सांगतात. अंतःकरण अहिंसामय झालेला कसा वागतो याचें वर्णनः—

पुढां स्नेह पाझरे । माघां चालती अक्षरें ।
शब्द पाठीं अवतरे । कृपा आधीं ॥ १३–२६३
तैसे साच आणि मवाळ । मितले आणि रसाळ ।
शब्द जैसे कल्लोळ । अमृताचे ॥ १३–२७०
ऐसा मनें देहें वाचा । सर्व संन्यासु दंडाचा ।
झाला ठायीं जयाचा । देखशील ॥ १३–३११
तो जाण वेल्हाळ । ज्ञानाचें वेलाउळ ।
हें असो निखिल । ज्ञानचि तो ॥ १३–३१२

याप्रमाणें ज्ञानेश्वरींत पुनः पुनः बुडी मारावी तो नवींनवीं रत्नें हातीं लागतात. ओवी पुनः पुनः वाचावी तो नवा नवा अर्थ लक्ष्यांत येतो. त्यामुळें या विषयाचा अभ्यास संपला असें कधीं होणारच नाहीं. तो सतत चालू असणें हें काव्यानंद मिळविण्याचें आणि ज्ञानानंद मिळविण्याचें मराठींतील अद्वितीय साधन आहे. म्हणून तर "एक तरी ओवी अनुभवी" असें मोठ्या कौतुकानें संतकवि सांगतो.

३ आमच्या राष्ट्रांत बळ आलें पाहिजे व बळ येण्याचा मार्ग म्हणजे इंद्रियावर ताबा ठेवून युक्ताहारविहार असणें हा आहे. त्यक्ताहारविहार व्हा म्हणून ज्ञानदेव सांगत नाहींत; ते निराहाराचे भोक्ते नाहींत; ते कसल्याही आग्रहाचे पुरस्कर्ते नाहींत. त्यांचा सर्व उपदेश पुढील एका ओवींत साठलेला दिसतो.

दिठी नोहे मिणधी । बोलणें नाहीं संदिग्धी ॥
कवणेसी हीन बुद्धी । राहटीजेना ॥ १३–३६५

दृष्टींत मिंधेपणा नाहीं; दृष्टि निर्भय आहे कारण ती दृष्टि निर्लोभ, निःस्वार्थी माणसाची आहे. बोलण्यांत संदिग्धपणा नाहीं; कारण त्याला कोणालाही फसवावयाचें नाहीं, कोणालाही खूष करावयाचा हेतु नाहीं, कोणालाही दुःख देण्याचा हेतु नाहीं; सर्वांचें कल्याण व्हावें ही ज्याची बुद्धि तो संदिग्ध, वकीलासारखें, मुत्सद्यासारखें बोलत नाहीं. ज्याला कोणाबद्दलही हीन बुद्धि नाहीं त्याची भूमिका डावपेचाची नसते. त्याची भूमिका फार उच्च असते. आजच्या सर्व तरुणांची दृष्टि मिंधी नसावी, त्यांचें बोलणें संदिग्ध नसावें, त्यांनीं कोणालाही हीन लेखूं नये, त्यांनीं निर्भय असावें, त्यांनीं "शृंगारूनी"

कर्म करावें, त्यांनीं निःस्वार्थ होऊन सर्वस्व परमार्थाला—स्वार्थाविरहित तो स
परमार्थ—अर्पण करावे ( त्याला पाहिजे तर कृष्णार्पण म्हणूं नका; ज्ञानदेव मानव
रूपासाठीं भांडत नाहींत, वस्तूसाठीं भांडतात ) ही ज्ञानदेवांची शिकवण आहे

ज्ञानदेवांनीं जें सांगितलें तें कृष्णमुखानें सांगितले आहे. पण त्यां
पुष्कळ ठिकाणीं ज्ञानदेव बोलताहेत हें स्पष्ट कळतें. अर्थात् ज्ञानदेवांना
अकरावा अवतार जे समजतात त्यांना श्रीकृष्ण आणि ज्ञानदेव यांच भेद
मानण्याचें कारण नाहीं. पण त्या भूमिकेवरून जे विचार करीत नाहींत
त्यांनाही ज्ञानदेवाची पुढील ओवी अत्यंत मननीय वाटेलः—

ऐसे सर्वज्ञेही मिया । सर्वही निर्धारूनिया ।
निके होय तें धनंजया । सांगितलें तुज ॥ १८–१३३१
आता तूं ययावरी । निके हें निर्धारीं ।
निर्धारूनि करीं । आवडे तैसे ॥ १८–१३३२

हा श्रीकृष्णमुखानें ज्ञानदेवांचा सर्वांना संदेश आहे. यांत आज्ञा नाहीं;
विचारपूर्वक स्वतःच्या निर्णयाप्रमाणें वागण्याची सूचना आहे. यांत जुलूम
जबरदस्ती नाहीं; यांत वैयक्तिक स्वातंत्र्य आहे. आणि लोकसत्तेला मान्यता आहे.
आणि हाच विचार मनांत ठेवून महाराष्ट्रधर्माची ध्वजा उभी करणारे, कवींचे
कवि, तत्वज्ञांचें तत्वज्ञ, श्री ज्ञानदेव यांच्याविषयीं लिहिलेल्या या ग्रंथाचा
समारोप करणें इष्ट होईल.

दुरिताचे तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्ये पाहो ।
जो जें वांच्छील तो तें लाहो । प्राणिजात ॥ १८–१७९५